झालेली असते. कुटुंबियांच्या व प्रेक्षकांच्या, आणि वाचकांच्याही तळमळीच्या पराकोटीच्या क्षणी हर्क्युलीस येतो व लायकसचा वध करतो.

हा कथानकाचा पहिला धागा. युरायपिडीजच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे या नाटकातही तीन अलग कथानके आहेत.

कथानकाचा दुसरा धागा हर्क्युलीसच्या वेडाचा. हर्क्युलीस व त्याचे कुटुंबीय यांच्या पुनर्मीलनाच्या आनंदाच्या क्षणी एकदम एक अरिष्ट उद्भवते. ' इरिस ' व ' भ्रांतचित्तता ' या पिशाच्चिनी प्रगट होतात व हेराक्लीजचे माथे फिरवून टाकतात. त्याला असा भ्रम होतो की आपण पाताळलोकात आपल्या शत्रूंशी झगडत आहोत व त्या आवेशाच्या झटक्यात तो आपल्या पत्नीला व मुलांना ठार करतो. पित्याकडे वळणार तोच त्याचे वेड ओसरते व मग आपल्या हातून घडलेल्या भयंकर कृत्यांची जाणीव होताच, अत्यंत व्यथित होऊन तो आत्मघातास प्रवृत्त होतो.

आता कथानकाचा तिसरा धागा सुरू होतो. हेराक्लीजने पाताळातून अथेन्सचा राजा थीसिअस याची सुटका केलेली असते. तो थीसिअस, आता त्याचा परम स्नेही झालेला असतो. तो येतो व हेराक्लीजचे सांत्वन करून त्याला आत्मघातापासून परावृत्त करतो व त्याला अथेन्समध्ये आश्रयस्थान देऊ करतो. आता हेराक्लीजपुढे दोन पर्यायी मार्ग आहेत. एक आत्मघात करून भयंकर मनोव्यथेतून सुटका करून घेणे, व दुसरा अथेन्समध्ये राहून यातना भोगीत, आत्मदंड करून घेऊन स्नेहाच्या छायेत दुरितापासून मुक्ती कालांतराने मिळवणे. हेराक्लीज दुसरा मार्ग स्वीकारतो व नाटकाचा शेवट होतो.

मानवाच्या व्यथेचे चित्रण हा युरायपिडीजचा आवडता व हातखंडा विषय होता. हे चित्रण या नाटकात पुरेपूर व प्रभावी झाले आहे. ॲम्फ्रीट्रीऑन, हेराक्लीजची पत्नी व मुले व नंतर स्वतः हेराक्लीज यांची तडफड प्रेक्षकांच्या व वाचकांच्या हृदयाला पीळ पाडील अशी रेखाटली गेली आहे. पहिल्या भागातील हेराक्लीजच्या कुटुंबावरील अरिष्टामुळे करुणा व नंतर हेराक्लीजच्या वेडाच्या भरातल्या भीषण कृत्यांमुळे भयचकितता, कातर विस्मय या भावनांचा हृदयात प्रक्षोभ होऊन पुढे थीसिअसच्या सौहार्दाने जसा हेराक्लीजला तसा वाचकांनाही दिलासा मिळतो व शोकात्मिकेचे उद्दिष्ट यथातथ्यपणे साधले जाते.

या नाटकात युरायपिडीजने प्रचलित धार्मिक श्रद्धांना धक्का देऊन आपली ग्रीक देवांबद्दलची अश्रद्धा थीसिअसच्या मुखातून व्यक्त केली आहे. हेराक्लीजचे वेड व त्यामुळे त्याच्या हातून घडलेली अपकृत्ये याबद्दल बोलताना विषादाने तो म्हणतो, " आपला वैरभाव प्रकट करून असे गर्हणीय आचरण करणाऱ्या देवांना, देव तरी कसे मानावे ? " या नाटकात युरायपिडीजच्या धर्मश्रद्धाविषयक दृष्टिकोणातील फरक अगदी स्पष्ट होतो. श्रेष्ठ शोकात्मिकाकार सोफोक्लिस याच्या मते मानवाने देवाधिदेव झ्यूसच्या सर्वज्ञतेवर, सर्व

शक्तिमत्त्वावर व न्यायबुद्धीवर पूर्ण श्रद्धा ठेवावी. कितीही आपत्ती आल्या तरीही श्रद्धा ढळू देऊ नये तो करतो ते सर्वथा योग्यच आहे ही भावना सतत बाळगावी पण युरायपिडीज प्रतिपादतो की, "देव सद्‌गुणांचे पुतळे नाहीत, ते भरवशाचे नाहीत, म्हणून मानवाने स्वतःवरच श्रद्धा ठेवावी, आत्मविश्वास दृढ करावा, म्हणजे मग हेराक्लीजला थीसिअसच्या सौहार्दाची मिळाली तशी मदत मानवाला कुठून तरी निश्चितच मिळेल." युरायपिडीजची ही धारणा, नुकत्याच उदय पावू लागलेल्या व ग्रीकांमध्ये पसरू लागलेल्या संशयवादी सोफिस्टांच्या विचारधारेशी बरीचशी सदृश होती.

नुसत्या संवादांनी नव्हे, तर सर्व घटनांनीही हे नाटक वाचकांचे मन गोंधळवून टाकणारे, त्याला संशयग्रस्त करणारे व त्याच्या मनात नाना प्रश्न उभे करणारे असे आहे.

शूरवीर म्हणून गाजलेल्या हेराक्लीजची अशी दुहेरी फसवणूक का व्हावी? माणसांकडून व नियतीकडूनही तो नागवला जातो. दुरात्म्यांचा, लायकससारख्या त्याच्या कुटुंबियांच्या जिवावर उठलेल्या दुष्टांचा बंदोबस्त तो आपल्या अतुल्य बलाने करू शकतो, पण आंधळ्या, दुर्वृत्त, अमानुष शक्ती त्याच्याविरुद्ध विनाकारण उभ्या ठाकल्या तर त्यांच्याशी मुकाबला त्याने कसा करावा? त्यांना शरण जावे व निमूटपणे यातनांपुढे मान तुकवावी? या प्रश्नाचे उत्तरही थीसिअसच्या मुखातून युरायपिडीजने वदविले आहे. थीसिअस हेराक्लीजला म्हणतो, "या शक्तींपुढे मान तुकवून आत्मघात करू नको. या शक्तींना आव्हान देऊन सिद्ध करून दाखव की निरपराध मानव दुबळा नाही; तो आपल्या हिंमतीवर व आपल्या मित्रांच्या सौहार्दाच्या साहाय्याने या शक्तींना जिंकू शकतो." या अविवेकी, दुष्प्रवृत्त शक्तींपुढे, बाह्य जगातील काहीही–उच्च कुल, संपत्ती, प्रतिष्ठा, अधिकारपद टिकाव धरू शकत नाही. मानवाचे सदाचरण, त्याने आयुष्यात दाखविलेली वीरवृत्ती याचाही मुलाहिजा त्या धरीत नाहीत. मानवाच्या हाती एवढेच की संकटात सापडल्यावरही आपली प्रतिष्ठा सोडायची नाही, आपत्तीतसुद्धा प्रसन्न राहायचे, हिंमत हरायची नाही, मान वाकवायची नाही. हा अंतरीचा दिवा उजळल्यानेच अखेर दुरितांचे तिमिर निपटेल; याव्यतिरिक्त बाहेरच्या जगातील कुठल्याही आशेवर, आधारावर विसंबण्यात अर्थ नाही.

नाटकातील गायकवृंद नगरीतील वृद्ध नागरिकांचा आहे. ते अगतिक, दुबळे, नव्या जुलमी राजाच्या सत्तेखाली दबलेले असे आहेत. हेराक्लीजच्या हातून लायकस ठार झाल्यावर 'आमचा जुना खरा राजा आला; नवा, उपटसुंभ राजा नष्ट झाला' असे आनंदोद्‌गार ते काढतात. पण एकंदरीने, ॲरिस्टॉटलने विहित केल्याप्रमाणे या गायकवृंदाचा दबदबा वाटत नाही, प्रभाव पडत नाही, कथानकाला त्याचे साहाय्य होत नाही.

'बाकाई' हे युरायपिडीजचे शेवटचे नाटक. ते त्याने मॅसिडोनियात असताना लिहिले व त्याच्या मृत्यूनंतर ते रंगमंचावर आले. हे युरायपिडीजचे सर्वोत्तम उत्कृष्ट नाटक समजण्यात येते.

या नाटकातली मध्यवर्ती कल्पना युरायपिडीजच्या अगदी पहिल्या नाटकात, ‘ मीडीआ’त अंतर्भूत झाली होती. मानवाच्या मनातील सहजप्रवृत्ती व सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या प्रवृत्ती, यांमधील विरोध व संघर्ष ही ती कल्पना. त्याच्या इतर नाटकांतूनही हा विरोध चित्रित केला गेला आहे. पण या नाटकात त्याची मांडणी पराकोटीची समर्थ, नाट्यमय व काव्यमय आहे. युरायपिडीजने या नाटकात रचनाकौशल्याची परमावधी गाठली आहे. काव्याचा व नाट्याचा भाग परिणामकारक, रसरशीत व जोरदार आहे, स्वभावरेखनातही ठसठशीतपणा आहे. या गुणोत्कर्षांमुळेच ‘ बाकाई ’ हे युरायपिडीजचे सर्वोत्तम नाटक गणले गेले आहे.

मानवांच्या अंतःकरणातील सहजप्रवृत्तींचे प्रतीक म्हणून वारुणीदेव डिओनायसस सबंध नाटकात वावरताना दिसतो. मात्र तो रंगमंचावर देवस्वरूपात येत नसून, एक ‘ बाकाई ’, बॅक्कसपंथीय डिओनायससचा भक्त म्हणून मानवरूपात प्रकट झालेला दिसतो. बॅक्कस हा देव मद्याचा, तसाच बेबंद हर्षोन्मादाचा आहे. गायिकावृंदाच्या ( वृंद बाकाईचा – या देवाच्या भक्तिणींचा आहे ) गीतांतून स्पष्ट होते की हा देव आशिया खंडात आपल्या पंथाचा प्रसार करून आता थीब्स्‌मध्ये आला आहे. थीब्स्‌चा तरुण राजा पेंथिअस हा स्वतःला बुद्धिवादी म्हणवणारा असतो. पण खरे म्हणजे तो संकुचित वृत्तीचा व आग्रही आहे. त्याला हा भावनाविवश, उन्मत्त, नीतिमूल्यांना नाकारणारा पंथ पटत नाही. त्याला ते केवळ वासनाकांड वाटते. डिओनायसस त्याला त्याच्या या विरोधाबद्दल शिक्षा करण्याचा संकल्प करून थीब्समधल्या सर्व स्त्रियांना, भुरळ पाडून, सिथेरिआ पर्वतावरील रानावनात नेऊन सोडतो. तेथे त्या स्वच्छंदपणे नाचत उडत डिओनायससची स्तुतिस्तोत्रे गात मुक्तविहार करीत राहतात. पेंथिअसची माता अॅगावे ही त्यांची प्रमुख असते. पेंथिअस मानवस्वरूपातील डिओनायससला पकडून बंदीशाळेत टाकतो. पण अनेक चमत्कार करून डिओनायसस, स्वतःला मुक्त करतो. राजवाडा पडतो, जळतो. मग डिओनायसस, पेंथिअसला भुरळ घालून, बाकाईचे नृत्यगान पाहण्यासाठी त्यांच्या संचारस्थानाकडे त्याला घेऊन जातो. तेथेच एका झाडावर बसून, टीकादृष्टीने बॅक्कसच्या भक्तिणींचे नाचरंग पाहात असताना, तो या डिओनायससच्या भक्तिणींच्या दृष्टीस पडतो. त्यांच्या तावडीत सापडल्यावर त्याचे हाल हाल होतात व उन्मादाच्या भरात त्याची माता पेंथिअसच्या देहाचे तुकडे तुकडे करते.

युरायपिडीजने प्रथमच, अॅरिस्टॉटलच्या नियमात बसेल असे एकसंध कथानक ‘ बाकाई ’त हाताळले आहे व ते अत्यंत वेगाने व सामर्थ्याने चढवीत, फुलवीत नेले आहे. अवघ्या पन्नास ओळीत प्रास्ताविक आटपून कथानक गती घेऊ लागले व मोठ्या जोषात पुढेपुढे सरकते. मधून मधून विखुरलेला बाकाईवृंदाच्या उन्मादगीतातील काव्याचा फुलोरा मन मोहून टाकतो. पेंथिअसचा वृद्ध पिता व वृद्ध भविष्यवेत्ता टायरेसिअस बॅक्कसभक्तिणींच्या

मेळाव्यात सामील होण्यासाठी कंबर बांधतात. नृत्यानुरूप वेष चढवून, बॅक्कसचा प्रतीक असा पल्लवभूषित दंड हाती घेऊन वनाकडे निघतात तो प्रवेश या प्रचंड वेगवान, चित्त-थरारक शोकनाट्यात जरा मन रिझवून त्यावरचा ताण सैल करतो. या नाटकातील स्वभाव-रेखनही इतर नाटकांपेक्षा आपल्या रेखीवपणाने उठून दिसते.

पेंथिअस हा नाटकाचा मध्यबिंदू, या शोकनाट्याचा नायक, मूळचा सुस्वभावी, सरळ, निरुपद्रवी, पण संकुचित मनोभूमिकेचा. दृश्यसृष्टीच्या पल्याडच्या भावविश्वाचा वेध घेणाऱ्या कल्पनाशक्तीचा त्याच्या ठिकाणी संपूर्णपणे अभाव आहे. तो रूक्ष मनोवृत्तीचा, थंड, उथळ आहे. बेभान करणाऱ्या हर्षोन्मादात विरघळून जाणे या वृत्तीचा त्याला अर्थच लागत नाही, व तो अर्थ जाणून घेण्याची त्याची तयारीही नाही. तो स्वतःच्याच मतांच्या आग्रही अभिनिवेशात, त्यांना चिकटून राहण्याचा हट्ट धरतो व त्यामुळे अखेरीस त्याचा विनाश होतो.

असा निरस, ऱ्हस्व दृष्टीचा, आकुंचित मनोवृत्तीचा, स्वतःच्या प्रतिष्ठेच्या मुखवट्यावर सुरकुती पडू न देणारा पेंथिअस एका बाजूला तर दुसरीकडे सौंदर्यपूजक, अतिवास्तव जगाचा साक्षात्कार होऊन त्या आनंदात बेभान होऊन, मुक्तकंठाने गाणाऱ्या, थयथय नाचणाऱ्या बाकाईंचा समूह व त्यांचा तशाच वृत्तीचा आराध्यदेव डिओनायसस यांच्यामधला विरोध युरायपिडीजने ठिकठिकाणी, ठळकपणे स्पष्ट केला आहे व त्यामुळे अत्युत्कृष्ट नाट्य निर्माण झाले आहे. कारण विरोध, संघर्ष हा नाट्याचा प्राण आहे.

ॲरिस्टॉटलने ग्रीक नाट्यमंथनातून काढलेल्या अनेक निष्कर्षांपैकी एकाला धरून, युरायपिडीजने आपला गायिकावृंद हे नाट्यातले एक क्रियाशील पात्रच बनविले आहे. हा वृंद नाटकातील वातावरणाशी एकजीव झाला आहे. कथानकात घडणाऱ्या घटनांची तो आत्मीयतेने चर्चा करतो, नाटक व्यापून राहिलेल्या अद्‌भुतरम्य, गूढगुपित वातावरणाला आपल्या गीतातील सुरांनी, नर्तनाच्या तालांनी पुष्टी देतो. पेंथिअसच्या अटळ शोकान्तात सक्रिय भाग घेतो व अखेरीस आपल्या पंथाच्या विजयघोषाने सारा परिसर दणाणून टाकतो. युरायपिडीजच्या इतर नाटकांतील गायकवृंदांप्रमाणे तो अलिप्त किंवा स्वतःमध्येच गुंतून राहत नाही.

या नाटकातील मध्यवर्ती कल्पना युरायपिडीजने आपल्या मीडीआ व हिपॉलिटस या नाटकात मांडली होती हे आपण पाहिलेच. मानवाच्या मनातील सहजस्फूर्ती व नीतिमूल्यांचे सोयरसुतक नसलेल्या शक्ती देवतारूपाने त्याने 'हिपॉलिटस' मध्ये आणल्या होत्या. उद्दाम कामभावनेची देवता ॲफ्राडायटी हिचा प्रभाव पडलेली फीड्रा व मृगयादेवता आर्टेमीस हिच्या प्रभावाखालचा हिपॉलिटस; बेबंद प्रीती, तसाच द्वेष व सूडभावना या अंतःप्रवृत्तींची प्रतीक मीडीआ व सुसंस्कृत, संयमित, विवेकी मनोवृत्तीचा जेसन अशी द्वंद्वे त्याने रेखाटली

होती व सहजप्रवृत्तींच्या प्रतीक अशा देवतांचा अपमान करणाऱ्या मानवांचा कसा विनाश होतो ते ' हिपॉलिटस ' व ' मीडीआ ' या नाटकांतून दाखविले होते. पण ' बाकाई 'मध्ये हे द्वंद्व जास्त समर्थ व प्रत्ययकारी वठले आहे. त्यातील नाट्याला काव्यमयतेची व रेखीव ठाशीव स्वभावरेखनाची जोड लाभल्यामुळे त्याची गुणवत्ता वृद्धिंगत झाली आहे. अर्थात ' मीडीआ 'मधल्या जेसनइतका, पेंथिअस बुद्धिप्रामाण्यवादी मानवांचे समर्थ प्रतीक नाही. तो बराचसा दुबळा वाटतो. डिऑनायसस या आदिम प्रवृत्तींच्या अबाढव्य शक्तींपुढे संकुचित बुद्धिवाद किती पांगळा पडतो हे जास्त उठावदारपणे दाखविण्यासाठीच युरायपिडीजने कदाचित पेंथिअसला असा कमकुवत दाखवला असावा. डिऑनायसस हा बुद्धीच्या आवाक्यापलीकडच्या हर्षोन्मादाने, निसर्गपूजेत, देवश्रद्धेत रममाण होणाऱ्या बेभान ब्रह्मानंदाचे, त्रिकालाबाधित सत्ये, सौंदर्य व निरागसता यांचे प्रतीक आहे, व त्याच्या आराधनेने मानवाला परमसौख्य, निरंकुश आनंद प्राप्त होणार आहे असे दर्शविले आहे.

पण या सहजप्रवृत्तींच्या प्रतीक अशा शक्तींना विरोध करणाऱ्यांना मात्र कठोर दंड भोगावा लागतो. जेसन, हिप्पॉलिटस, पेंथिअस ही निरपराध भासणारी, स्वतःच्या संकुचित नीतिदंडकाप्रमाणे जीवनमूल्ये जपणारी माणसे या विरोधापायी नाश पावतात. कधीकधी ओल्याबरोबर सुकेही जळते या न्यायाने काही व्यक्ती निष्कारण दंड भोगतात. बिचारी अॅगावेही उन्मादाच्या भरात पोटच्या पोराच्या चिरफाडीचे अघोर कृत्य करून बसते. कारण या आदिमशक्ती अंध, भावनाशून्य, दयामाया न जाणणाऱ्या असतात.

युरायपिडीजची क्रांतिकारक मनोवृत्ती या नाटकात उठावाने दिसते. ग्रीकांच्या प्रचलित बुद्धिप्रामाण्यवादी सिद्धान्तांना व सुवर्णमध्याच्या सामोपचारी वृत्तीला त्याने या नाटकात शह दिला आहे. ही एक प्रकारची बुद्धिवादाविरुद्ध असलेली सौंदर्यवादी क्रांतीच त्याने पुकारली, व पुढे तिचा पाठपुरावा त्याच्यानंतरच्या आर्यॉन, अॅगथॉन वगैरे नाटककारांनी केला.

क्रांतिकारक मध्यवर्ती कल्पनेची प्रभावी, नाट्यपूर्ण मांडणी याबरोबर युरायपिडीजच्या आकर्षक भाषाशैलीने या नाटकाला श्रेष्ठ दर्जा प्राप्त करून दिला आहे. दूतांच्या मनांवर छाप पाडणाऱ्या वक्तव्यांनी व गायिकावृंदांच्या कधी गंभीर तर कधी उन्मादयुक्त, उत्कट, भावनावेगपरिपूर्ण अशा गीतांनी व त्या गीतांतील मधुर तालसूरलयीने प्रेक्षकवाचकांच्या अंतःकरणावर एक प्रकारची सुखद धुंदी चढते. अर्थात भाषांतरात मुळातली गोडी कमी होणे व नुसते नाटक वाचताना त्याचा प्रभाव कमी परिणामकारक होणे अपरिहार्य आहे. तरीही वृंदातल्या गीतातला जोर, उन्माद, कल्पनेचे बेबंद नर्तन जाणवल्याशिवाय राहात नाही. एकंदरीने या अखेरच्या नाटकात युरायपिडीजची कला आपल्या विविध पैलूंच्या दर्शनाने व शोकात्मिकेस अवश्य अशा साऱ्या गुणांच्या परमोत्कर्षाने वाचकांना ब्रह्मानंद-सहोदर असा वाङ्मयानंद प्राप्त करून देते याबद्दल दुमत होणार नाही.

असा होता युरायपिडीज, कथानकाच्या रचनेत, स्वभावरेखनात, दृश्यात, वृंदवर्तनात अनेक गृहीतदंडक मोडणारा, प्रचलित धार्मिक श्रद्धांना आवाहन देणारा व म्हणून समकालीन लोकप्रियता काहीशी हरवून बसलेला. पण तरीही शोकात्मिकांचा केवळ आत्माच अशा करुण व कातरविस्मितता या दोन भावनांच्या प्रकटीकरणाचे कौशल्य अंगी असल्यामुळे त्याचे स्थान जागतिक शोकात्मिक साहित्यात अढळ आहे.

कमलाबाई टिळक

युरायपिडीज लिखित शोकनाट्य

# मीडिआ

पात्रपरिचय

(१) दाई
(२) मीडिआच्या मुलांना शिकविणारा शिक्षक
(३) मीडिआ
(४) कॉरिन्थमधील नारीवृन्द
(५) कॉरिन्थचा राजा क्रेऑन
(६) जेसन
(७) अथेन्सचा राजा ईजिअस
(८) दूत
(९) मीडिआची दोन मुले

दृश्य : कॉरिन्थमधील जेसनच्या घरा-
समोरील जागा.

**दाई :** खरंच ! ते कधी येथून गेलेच नसते तर ? अर्गो नौका खडकांच्या करड्या निळ्या जबड्यातून झेपावत गेली नसती आणि पुढे कोल्चिसच्या वाटेला गेलीच नसती तर ! पेलिअस राजाच्या हुकुमावरून सोनेरी लोकर आणण्यासाठी गेलेल्या त्या मर्द जवानांच्या हातातील वल्ही होण्यासाठी पेलिअन पर्वताच्या उतरणीवरील पाइनच्या झाडांवर जर कधी कुऱ्हाडीचे घाव पडलेच नसते तर ? तर मग माझी धनीण, मीडिआबाईसाहेब, जेसनच्या प्रीतीने भारून जाऊन तटबंदी असणाऱ्या आयोल्कस शहराला जायला नौकेतून कधी निघाल्याच नसत्या. तसेच ज्यांच्या सांगण्यावरून पेलिअसच्या मुलींनी आपल्या बापाला ठार मारलं त्या मीडिआबाईसाहेब, आपण व आपली मुले यांच्यासमवेत जेसनसह या कॉरिन्थ शहरात कधीच रहायला आल्या नसत्या. निर्वासित झालेल्या अशा अवस्थेतही येथील पौरजनांनी त्यांचे स्वागतच केले आहे. तशा त्या जेसनच्या आज्ञांचे अगदी काटेकोरपणे पालन करतात आणि पत्नी जेव्हा पतीच्या मनोदयांविरुद्ध वर्तन दक्षतेने टाळते तेव्हा तिला यशस्वी वैवाहिक जीवनाचे रहस्य उमगलेच म्हणायचे.

पण आता तिची दुनियाच तिची वैरी झाली आहे. आणि जिथे तिच्या प्रीतिभावना खोलवर रूजल्या आहेत तिथेच ती घायाळ होत आहे. कॉरिन्थच्या राजाशी सोयरिक जुळवून शाही शय्येचे सुख मिळावे म्हणून स्वतःचे दोन मुलगे आणि माझी धनीण यांच्याशी जेसनने प्रतारणा केली आहे. त्याने क्रेऑनची मुलगी ग्लॉसी इच्याशी विवाह केलाय ! बिच्याऱ्या मीडिआबाईसाहेब ! जेसनने पूर्वी घेतलेल्या साऱ्या पवित्र आणाभाका व नंतर वाट्याला आलेली अवहेलना व लाजिरवाणी अवस्था यांचा पुनःपुन्हा उच्चार करीत संतापाने हव्या तशा बडबडताहेत. जेसनशी एकनिष्ठ रहाण्याबद्दल काय पारितोषिक आपणाला मिळाले त्याला साक्षी रहाण्याबद्दल देवदेवतांना पाचारताहेत. काही खात नाहीत, पीत नाहीत. दारुण मनस्तापाच्या आघाताने कोसळल्यासारख्या जमिनीवर अंग टाकून पडल्या आहेत. दिवसाचे कंटाळवाणे तास आपल्या अश्रुपाताने कसेबसे ढकलताहेत. जेसनचे दुष्ट, घातकी वर्तन कानावर आल्यावेळेपासून त्यांनी एकदाही डोळा वर करून पाहिलं नाही की खड्य-डीत जमिनीला टेकविलेले आपले मुख वर उचलले नाही. त्यांच्या सख्या त्यांना जेव्हा समजुतीने काही सांगायला जातात तेव्हा त्या जणू बनतात एखादा कठीण फत्तर, नाहीतर सागराची लाट ! काही प्रतिसादच येत नाही त्यांच्याकडून ! मात्र एखाद्या वेळी त्या आपले

सुंदर मुख दुसरीकडे वळवतात आणि स्वतःशीच बोलत रहातात. जो माणूस आज त्यांचा तिरस्कार नि अपमान करीत आहे त्याच्याबरोबर येण्यासाठी आपण आपल्या पित्याशी, आपल्या मातृभूमीशी, आपल्या गृहाशी दलगबाजी केली, हे आठवीत सर्वांच्या नावाने मोठ्याने आक्रोश करीत रहातात त्या. बिचाऱ्या मीडिआईसाहेब! ज्यांना मायभूमीपासून वंचित व्हावं लागत नाही, ते किती भाग्यवान आणि सुखी असतात याची जाणीव सध्याच्या त्यांच्या यातनांमधून झाली आहे त्यांना. उबग आला आहे त्यांना स्वतःच्या मुलांचासुद्धा. मुलं दृष्टीस पडल्याने एवढ्या देखील सुखावत नाहीत त्या. माझ्या मनात तर धडकीच भरलीय! काहीतरी भीषण असं उद्दिष्ट साकारतय त्यांच्या मनात! फार भीतिदायक स्वरूप धारण केले आहे तिने. तिचे वैर संपादणारा कोणीही सहजपणे काही मात करू शकणार नाही तिच्यावर!

ही आली पाहा मुलं. त्यांचा धावण्याचा व्यायाम संपवून परतताहेत. आपल्या आईवर झालेल्या या वज्राघाताची पुसटती कल्पनाही नाही बिचाऱ्यांना! हं! अल्लड आहेत बिचारी. लहान कोवळी मने आणि दुःखद विचार, यांची जोडी जमणे कठीणच!

[ मीडिआंच्या दोन मुलांसह शिक्षक प्रवेश करतो. ]

**शिक्षक :** खूप वर्षे काम केलेली माझ्या मालकिणीच्या घरातील जुनी दाई व सेविका! या इथे दारात स्वतःशीच बडबडत दुःखाचे रडगाणे गात एकटीच उभी राहून काय करते आहेस तू? काय ग! मीडिआबाईसाहेबांना असं एकटंच सोडून आल्याबद्दल बोलत नाहीत का त्या तुला?

**दाई :** पुराण्या मित्रा! जेसनच्या मुलांच्या शिक्षका! आपल्या धनिणीवर झालेल्या आघाताने विश्वासू दासीला त्या जणू आपल्या काळजावरच पडल्यासारख्या यातना होतात. आता अगदी हद्द झाली. माझी सहनशक्तीच संपलीय. इथे उघड्यावर येऊन मालकिणीवर झालेला अन्याय सगळ्या जगाला आणि देवलोकालाही ओरडून सांगितल्याशिवाय राहवेनाच मला.

**शिक्षक :** दुर्दैवी बिचाऱ्या! अजून शोकाला आवर घातला नाही का त्यांनी?

**दाई :** शोकाला आवर? तुझ्या भाबडेपणाचा हेवा वाटतोय मला. अरे! आता कुठे त्यांच्या दुःखाला सुरूवात झालीय. अजून अर्धे सुद्धा संपले नसेल!

**शिक्षक :** खुळी बिचारी! खरं म्हणजे ती माझी धणीण! मी तिला असं म्हणायला नको होतं...खरं तर तिने एवढ्यातच सगळं रडून घेऊ नये. सर्वांत वाईट, धक्का देणारं, असं तिने ऐकलंच नाही अजून!

**दाई :** सर्वांत वाईट! म्हणजे अजून काय आहे बाबा? काहीही दडवून ठेवू नकोस माझ्यापासून! सांग काय झालंय असं?

**शिक्षक :** कुठं काय? छे! काहीसुद्धा घडलेलं नाही! मी काही म्हणालो का? माफ कर

हं! विसरून जा ते...

**दाई :** हे पहा बोलून चालून आपण दोघेही या घरांतले दासच. कशासाठी मला अंधारात ठेवतोस? इतकं का न सांगण्यासारखं विलक्षण गुपित आहे ते? हे बघ! खात्री बाळग, माझ्या तोंडातून एक अक्षरही उच्चारलं जाणार नाही.

**शिक्षक :** आपली ती पिअरीची पवित्र पुष्करणी आहे ना! तिथंच पलीकडे बाके टाकलेली आहेत. म्हातारे लोक फासे खेळत बसतात तिथे. सहज फिरत फिरत तिथेच गेलो होतो मी! म्हाताऱ्यांना वाटलं मला कही ऐकू येत नाहीय! त्यातला एकजण सांगत होता, म्हणे कॉरिन्थचे राजे क्रेऑनमहाराज या मुलांची येथून कुठेतरी दूर रवानगी करणार आहेत. म्हणजे त्यांना आणि त्यांच्या आईलाही हद्दपार करणार आहेत. आता ऐकलं ते खरं का खोटं मला माहीत नाही. खरं नसेल, तर फारच छान!

**दाई :** पण जेसन असं होऊ देईल? मुलांच्या आईशी त्याचे भांडण असले तरी मला नाही वाटत आपली मुले हद्दपार होताहेत हे तो निमुटपणे सहन करील!

**शिक्षक :** बाई ग! प्रीतीच्या नव्या खेळांत जुन्याला केव्हाच गचांडी मिळालीय. या घराबद्दल जेसनच्या अंतःकरणात आता तिळाएवढीही माया नाही, समजलीस?

**दाई :** असलेली संकटे दूर होण्याआधीच त्यांत आणखी भर? हं! निकालच लागला म्हणायचा तर मग आपला!

**शिक्षक :** पण बाई ग! जरा ऐकून घे. बाईसाहेबांना हे सारं सांगायची ही वेळ नाही. अगदी गप रहा. याबद्दल काही बोलायचं नाही.

**दाई :** बाळांनो! कळलं का रे तुम्हाला आपला बाप जेसन कसा आहे तो! शापून टाकावसं वाटतं अगदी! पण छे! काय बोलते मी हे! नाही नाही! शापायचं नाही. कसं झालं तरी माझा धनी आहे तो. तरीही तो अपराधी आहे हे मी म्हणणारच. आपल्या जिवलग, प्रिय माणसाशी विश्वासघाताने वागलाय तो.

**शिक्षक :** दोषी नसतो कोण? शेजाऱ्यापेक्षा प्रत्येकजण स्वतःची सोय आधी पहातो हे कळायला फार फार वेळ लागलाय तुला. या मुलांची काय पर्वा त्यांच्या बापाला? तो अडकलाय प्रीतीच्या जाळ्यात.

**दाई :** बाळांनो! चला! घरात पळा आता! सगळं काही ठीक होईल हं!

[मुले थोडीशी दूर जातात]

हे पहा, बाईसाहेब जोपर्यंत या अनाकलनीय मनःस्थितीत आहेत, तो पर्यंत या मुलांना त्यांच्या जवळपास फिरकूसुद्धा देऊ नकोस! एकटेच राहू दे मुलांना. मुलांकडे त्या कशा नजरेने बघतात, ते बारकाईने पाहिलंय मी, एखाद्या पिसाट बैलासारखी दिसते त्यांची नजर. कसल्यातरी कारवाईचा विचार खदखदतोय त्यांच्या मनात. एवढं मला पक्कं ठाऊक आहे

की, आपला बळी पकडीत सापडल्याशिवाय त्यांचा क्रोध शमायचा नाही. देव करो! आणि त्याचा घाव त्यांच्या वैऱ्यावर पडो, मित्रांवर नको.

[ घराच्या आतील भागातून मीडिआचा आवाज ऐकू येतो. ]

**मीडिआ** : आः! आः!! काय ही दैन्यावस्था? काय भयंकर अवहेलना! करू तरी काय आता मी! यापेक्षा मरण का येत नाही एकदाचं?

**दाई** : ऐकलत ना! पहा, पहा कसं तडफडताय त्यांचे हृदय! कसा संताप करून घेताहेत त्या स्वतःचा. जा-झटकत आत बाळानो! जरासुद्धा जाऊ नका त्यांच्या नजरेच्या टप्प्यांत. अगदी जवळपाससुद्धा फिरकू नका. दूर अंतरावर रहा जपून. दयामाया राहिलेली नाही त्यांच्या चित्तवृत्तीत. कुणाचा केव्हा घात करतील याचा नेमच नाही राहिलेला. भयंकर कोपिष्ट, हट्टी दुराग्रही मनाच्या आहेत त्या. दोघेही झटदिशी आत व्हा बघू!

[ मुलं आत जातात· त्यांच्यामागून शिक्षक जातात. ]

त्यांच्या आक्रोशाचे हे काळेशार ढग...आताशी कुठे जमायला सुरूवात झालीय, स्पष्टच दिसतंय, की, त्यांचा क्रोध जसाजसा उफाळेल तसातसा या ढगांतून ज्वालांचा स्फोट होईल. बेफाट विचारांच्या आवेगात, क्षमा माहीत नसलेल्या क्रोधाच्या भरात अपमानाचा डंख झालेली ही बाई करणार आहे तरी काय आता!

**मीडिआ** : [ आतूनच ] काय मला यातना होत नाहीत की माझ्यावर अन्याय झालाच नाही? मी शोक का करू नये? बाळानो! तुमची आई द्वेषाचे भक्ष्य झाली आहे. तुमच्या जीवनावर शापाचे सावट पडले आहे. तुमच्यावर पडो मृत्यूचा घाला आणि तुमच्या पित्यावरही. होऊन जाऊ द्या त्याच्या सगळ्या घराण्याचा सत्यानाश!

**दाई** : अरेरे! काय करुणास्पद प्रसंग हा! दुर्दैवी मीडिआ! अग तुझी ही अश्राप बालकं! आपल्या दुष्ट वर्तणुकीशी त्यांचा काय संबंध? का रागराग करतेयस त्यांचा? बाळांनो तुमचीच काळजी पडलीय मला. तुमचं काय होणार, या भीतीने थरकाप होतो माझा! राणीचे मन म्हणजे वचकून रहावं अशीच गोष्ट. तिला सराव असतो हुकूम सोडण्याचा, हुकमाची तामिली करण्याचा नव्हे. राणीचा क्रोधानल एकदा का भडकला, की तो शमविणे महा कठीण! सर्वसामान्य पातळीवर जीवन जगायला शिकणे हेच अधिक फलदायी. मला नको ते वैभवशाली जीवन. जसजशी मी म्हातारी होत जाईन तसं तसं निवांत आणि शांत जीवन मिळावं मला. फार उच्च नाही, फार खालची नाही अशी मध्यमस्थिती सर्वात श्रेयस्कर. नावाचा बडेजाव आणि आचरणात जोखीम नाही तिच्या. वैभव आणि सत्ता प्राप्त झाल्यास मुळीच काही फायदे होत नाहीत. उलट देव कोपतात तेव्हा भरभराटीला आलेले घर अगदी पार उन्मळून पडते.

[ कॉरिन्थमधील स्त्रियांचा नारीवृन्द प्रवेश करतो. ]

नारीवृन्द :

मी ऐकला आवाज तिचा
ती अजूस करते आहे रुदन
झाली नाही अजून शांत
त्या कोल्चिसच्या हतभागी स्त्रीचा
ऐकला मी आवाज...
मी ऐकिला गे ऐकिला !

सांग ना तिच्याबद्दल काही आम्हाला,
पुराण्या दाई
दाराशी ठाकले मी उभी जेव्हा
ऐकिली प्रासादात हुंदके देताना
मी तिला तेव्हा !

जेसनच्या घराण्याला यातनानी वेढल्यावर
होतात वेदना माझ्याही हृदयाला
कारण निष्ठा आहे माझी
ती त्याच घराशी !

**दाई** : जेसनचे घर ! उरलंय कुठं आता ते ! सगळं सगळं संपलय आता. जेसन आहे आता एक बंदिवान राजकन्येच्या मंचकाचा. आणि मीडिआ बसलीय आपल्या दालनात, आपलं जीवित अश्रूत बिरघळवीत, संपवीत. नाही देणार दिलासा तिला कोणत्याच सखीचा सांत्वनाचा शब्द !

**मीडिआ** : [ अजून आतून ]

ये ! आकाशातील धगधगत्या ज्योति !
ये !
आरपार घूस माझ्या मस्तकात
आणखी काय हाती लागणारय माझ्या,
आता जगून तरी !
आः ! उबग अगदी उबग आलाय
जगण्याचा मला. शेवट केला पाहिजे या
जीविताचा. सारं, सारं, इथेच सोडुन मला
मरून जायला हवयं.

**नारीवृन्द :**

हे झ्यूस देवा ! हे माते ! हे तेजोमया !
ऐकता आहात ना ही
यातनांनी तडफडणाऱ्या एका पत्नीची आळवणी !

[ दारात जाऊन मीडिआला उद्देशून ]

काय ग हा आततायीपणा !
कसल्या शय्येची धरतेस तू वाञ्छा
तीच ना, की,
सारेच पळतात दूर जिच्यापासून अंगचोरीत ?
मरण हवंय तुला,
होय ना मीडिआ ?
मुळीच नको करूस अशी विनवणी !
रमला असेल तुझा रमण एका अन्य प्रीतीच्या पाशात,
तरीपण इतका राग का यावा तुला ?
ही तर नित्यच घडणारी गोष्ट आहे !
स्वतः झ्यूस घेईल तुझी बाजू
देववील न्याय तुला
आवर, पतीबद्दलचा हा तुझा अत्युत्कट शोक
तुझेच शरीर पोखरून टाकतो आहे हा

**मीडिआ :** [ अद्यापि आतूनच ]

सर्व शक्तिमान थेमिस ! थरकाप उडविणाऱ्या आर्टेमिस !
घेतला होता जखडून ज्याला मी
पवित्र अशा थोर आणाभाकांनी
पाहिलीत ना माझी काय दशा केलीस ती,
त्या माझ्या दुष्ट नवऱ्याने !

काहीच नव्हते केले मी क्षोभ येण्यासारखे
तरीही जे धजले
करायला घोर अन्याय माझ्यावर
तो जेसन आणि त्याची ती वधू
पाहीन का मी त्यांना

तुकडे तुकडे होऊन जमिनीवर पडलेली
छिन्नभिन्न झालेल्या राजप्रासादात ?

हाय रे ! माझे बाबा ! माझा गाव !
झिडकारून आले त्यांना मी !
आणि माझा भाऊराया !
मारलं मी त्याला.
केवढं लाजिरवाणं कृत्य घडलं माझ्या हातून !

**दाई** : ऐकत आहात ना, काय म्हणताहेत माझ्या बाईसाहेब ते ! भक्तांच्या हाकेला धावून येणाऱ्या थेमिसची आणि मानवांच्या आणाभाकांचा संरक्षक असणाऱ्या झ्यूस देवाची, आकांताने आळवणी करताहेत त्या. त्यांचा हा असा बेफाट क्रोध शांत करणे साध्यासुध्या मार्गाने साध्य होणारी गोष्ट नाही ही.

**नारीवृंद** : मला फार वाटते, त्यांनी येथे बाहेर यावे आम्हाला भेटू द्यावं त्यांना ! बोलू द्यावं त्यांच्याशी. आमचे चार शब्द ऐकल्यावर कदाचित मावळेल त्यांचे हे रौद्रस्वरूप, हा वैरभाव, हा अत्युत्कट क्रोध ! मैत्रीण म्हणून जे करणे मला शक्य आहे, ते करायला आतुर आहे मी. दाई, जा बरं, आणि वळव तिचं मन बाहेर येऊन आम्हाला भेटण्यासाठी ! त्यांना सांग आम्ही सर्व त्यांच्याच बाजूने आहोत म्हणून. घरातील मंडळींना त्यांच्याकडून इजा होण्यापूर्वी धाव आत त्यांना बोलवायला. तिचा हा विकार वेग म्हणजे न थोपविता येणारा प्रलयंकारी महापूरच आहे.

**दाई** : जाते मी. पण मला नाही वाटत मी त्यांचे मन वळवू शकेन. तरीही माझ्या प्रयत्नांची मी आनंदाने पराकाष्ठा करीन. आम्हा नोकरांपैकी कुणी त्यांच्याजवळ गेलं अगर बोलण्याचा प्रयत्न केला तर त्या अशा काही क्रुद्ध नजरेने पहातात की जणू एखादा पिसाळलेला बैलच किंवा जशी काय आपल्या छाव्यांना जपणारी सिंहीणच

[ दाई दाराजवळ जाते व वळून तिथेच उभी राहते. ]

जुन्या पिढीतील पुरुषांना जरा अक्कलच कमी.
फारशी नाही चूक होणार
त्यांना तुम्ही खुशाल मूर्ख म्हटलंत तर—
त्यांनी शोधून काढली गीते—
आणि संगीतातील नितांत मधुर गोडवा
मेजवान्यात उत्सवात आणि समारंभप्रसंगी
फार उपयोग होतो त्यांचा.

पण जीवितातील कटुता आणि यातना दूर करण्यासाठी
नाही सुचलं कोणालाही
गीतांचा आणि तंतुवाद्यांचा उपयोग करण्याचे.

दुःखच असते खरे कारण,
मृत्यू, अरिष्टे आणि कुटुंबाचा सर्वनाश यांच्या मागे
संगीताने शमल्या जर दुःखाच्या वेदना
तर खरे मोलाचे होईल ते!

नाही तर कशासाठी हवीत गाणी
मस्त, मनपसंत जेवणानंतर
संतुष्ट झालेलेच आसतात लोक
आकंठ भोजनानंतर!
[दाई आत जाते.]

**नारीवृंद :**

ज्याने केला आहे विश्वासघात तिचा
अशा आपल्या पतीवर
कर्कश स्वरांत घृणास्पद आरोप
ओरडून करताना, हुंदके देताना, आक्रंदताना
ऐकिली मी तिला

क्षार सामुद्रधुनी,
जी आहे सीमारेषा आणि प्रवेशद्वार
पॉन्टिक सागराची
तिच्यातून वाट काढीत, रात्रीचा प्रवास करीत
ज्या आणाभाकांनी आकर्षित केलं तिला
एशियाहून हेलासला दूरवर
त्या आणाभाकांची साक्षीदार झ्यूसकन्या थेमिस—
तिला साद घालीत आहे ती

[मीडिआ बाहेर येते. ती अजिबात शोकविव्हल दिसत नाही. उलट कमालीची शांत आणि संयमित आहे.]

**मीडिआ** : कॉरिन्थमधील बायांनो ! तुम्ही मला उगीच बोल लावू नये म्हणून आल्येय मी बाहेर. काही जणी खऱ्याच असतात मोठ्या अभिमानी वृत्तीच्या, घरी तशाच दारी. पण काही उगाच बदनाम होतात आढ्यतेखोर म्हणून! का ? तर केवळ त्या एकाकी राहातात इतरांपासून दूर म्हणून. योग्य न्याय करणे माहीत नसते जगाच्या छिद्रान्वेषी काकदृष्टीला. माणसाचा खराखुरा स्वभाव समजून घेण्याइतका दमच निघत नाही त्यांना. त्यांची जरी एखाद्याने केली नसली कसलीही आगळिक तरी ते टाकतील त्याच्यावर एकच कटाक्ष आणि लगेच शत्रुत्व करू लागतील त्यांचे. अर्थात हे खरं की, परक्या माणसाने जरा जमवून घ्यायला हवं पण ग्रीकव्यक्तीनेसुद्धा आपल्यात समाविष्ट झालेल्यांना सतावू नये रांगड्या हटवादीपणाने. माझी पायरी मला समजते. तरीही माझ्यावर पडलेला हा घाव माझ्या कल्पने पलीकडचा होता. त्या घावाने छिन्नभिन्न होऊन गेलंय माझं हृदय. काही...काही स्वारस्य उरलं नाही माझ्या या आयुष्यात. सख्यांनो ! मला आता मरण हवंय...मरण ! जेसन माझं जीवित सर्वस्व होता. त्यालाही पूर्णपणे माहीत आहे हे. पण आता मात्र आपण अगदी तिरस्करणीय व्यक्ती असल्याचे त्याने सिद्ध करून दाखविले आहे.

शरीरात प्राण आणि मन असणाऱ्या साऱ्या प्राणिमात्रात आम्ही बायका अत्यंत कमनशिबी. खरोखर अमाप हुंडा देऊन आम्ही नवरा विकत घ्यायचा मग त्याचा स्वीकार करायचा आमच्या सगळ्या शरीराचा मालक म्हणून. हे म्हणजे एका अन्यायी कृत्याला दुसऱ्या अन्यायाची जोडच. त्यानंतर मग उभं ठाकतं भलं मोठं प्रश्नचिन्ह ! आमच्या वाट्याला आलेला नवरा चांगला निघेल की वाईट ? घटस्फोट घेणे हे काही शिष्टसंमत नाही आम्हा बायकांच्या बाबतीत आणि पुरुषाला तिरस्काराने दूर ठेवणं तेही होत नाही शक्य. त्याहीपेक्षा कठीण स्थिती परक्या स्त्रीची. अशी स्त्री ज्याच्या शय्येची वाटेकरी होते त्या पुरुषाशी कसे जमवून घ्यावे याचे पाठ तिला माहेरी मिळालेले नसतात. अशी ती येऊन पडते नव्या चालिरीती नवे कायदे यांच्या जंजाळात. मग त्या स्त्रीला जादूविद्याच यायला हवी ही समस्या सोडवायला. आणि मग जर अशा या अवघड कसरतीत आम्ही यशस्वी झालो आणि जर विवाहाच्या जोखडाखाली आमचे पती धडपड करू लागले नाहीत तर...तर मग आमच्या जीवनाचा हेवाच वाटेल सगळ्यांना. तसं नसलं म्हणजे मग मात्र मरण बरं. घरच्या सहवास सुखाचा पुरुषाला कंटाळा आला तर बाहेर पडून त्या कंटाळ्यावर तो उपाय शोधू शकतो. आम्हा पतिव्रतांना मात्र एकाच पुरुषावर निष्ठा ठेवायची सक्ती आणि मोठ्या मानभावीपणे सांगतात आम्हांला, "तुम्ही बायका कशा सुरक्षित असता घरी. संकटापासून अगदी दूर ! पुरुषांना घराबाहेर पडून लढावे लागते रणांगणावर ! मूर्ख कुठले ? एका अपत्याचा भार वहाण्यापेक्षा आघाडीवर उसे ठाकून झुंजायला एकदाच नव्हे, तर तीन वेळा तयार होईन मी !

पण बायांनो तुम्हाला नि मला एकच तर्कसरणी नाही बरं लागू पडायची ! आपल्या वडिलांच्या घरात जीवनाचा मुक्त उपभोग घेऊ शकता तुम्ही. सख्यांच्या सहवासाचे सुख लुटता. मी मात्र अगदी एकटी. मला माझं गाव नाही. आता तर माझा नवराच माझी अवहेलना करू लागलाय. पृथ्वीच्या पार टोकावरील देशातून मला इथं आणण्यात आलंय लूट म्हणून. मला ना आई ना भाऊ. दुःखाच्या या कडेलोटाच्या वेळी ज्याच्याकडे मदतीसाठी आशेने वळावे, असं रक्ताच्या नात्यातील कोणी...कोणी नाही मला.

म्हणून बायांनो ! माझी एक विनंती आहे तुम्हाला. माझ्यावर झालेल्या अन्यायांचा बदला म्हणून जेसनवर सूड घेण्यासाठी मी काही मार्ग शोधला तर कृपा करून मौन धारण करा त्या बाबतीत. बहुतेक बाबतीत स्त्री असते भीरू आणि दुर्बल. रणगर्जना ऐकली, तलवार दिसली, तरी तिचा थरकाप उडतो. पण, तिच्या वैवाहिक जीवनातील हक्काला हात घालून पहा ! मग तिच्यासारखा रक्तपिपासू वैरभाव सापडणार नाही दुसऱ्या कुठे !

**नारीवृंद :** तू सांगशील तसंच वागेन मी. जेसनला शिक्षा करणं हेच न्याय्य ठरेल. असल्या अन्यायांनी तुझे काळीज घायाळ व्हावं, याचे मला नाही नवल वाटत.

[ क्रेऑन येताना दिसतो ]

पण इकडे पहा मीडिआ ! मला कॉरिन्थचा राजा क्रेऑन येताना दिसतोय. काही तरी नवा निर्णय सांगायला येत असावी स्वारी.

**क्रेऑन :** कोण ? मीडिआ का ? नवऱ्याविरुद्धच्या रागाने आरडाओरडा चाललेला दिसतोय. मी तुला हुकूम करतोय, चालती हो कॉरिन्थबाहेर ! उचल आपल्या मुलांना नि हो गावाहेबर. फुकट वेळ काढूपणा करू नकोस. मी जातीने इथे आलोय ते या हुकमाची तामिली व्हावी म्हणून. तुला माझ्या देशाबाहेर व्यवस्थितपणे हाकलल्याशिवाय मी राजगृहात परतणार नाही.

**मीडिआ :** हाय ! माझ्या शापित जीवनाची काय ही क्रूर अखेर ! माझ्या दुष्मनांनी तर शीड पूर्ण उभारून भरधाव सोडलीय माझी जीवननौका, पण मला आसरा देईल, मला वाचवील, असा आश्वासक किनाराच दिसत नाही कुठे ? अन्यायपूर्ण वागणूक मिळते आहे मला. क्रेऑन ! अशा कोणत्या अपराधाबद्दल हद्दपार करताय मला ?

**क्रेऑन :** मी घाबरतो तुला. कशाकरता सत्य लपवून ठेवायचं ? माझ्या मुलीला तू काही तरी भयानक इजा करशील अशी भीती वाटते मला. शिवाय कितीतरी गोष्टी आहेत माझ्या काळजीत भर टाकणाऱ्या. फार हुषार बाई आहेस तू ! ' अनेक प्रकारच्या जादूटोण्यात तरबेज. तुला वंचित करण्यात आलं आहे जेसनच्या शय्येपासून. त्यामुळे तू भयंकर संतापली आहेस. जेसन, त्याची वधू नि तिचा बाप यांचा सूड उगवायच्या धमक्या तू बोलून दाखवल्या आहेस. या वार्ताही मला समजल्या आहेत. म्हणून तर स्वतःच्या रक्षणासाठी पहिला

पवित्रा घेण्याची मी त्वरा करीत आहे. आतापासूनच तुझ्याशी शत्रुत्व करणं मी पसंत करतो नाहीतर आता गबाळपणा दाखवून मग त्याचे मोल अश्रुपाताने करण्यात काय अर्थ आहे?

**मीडिआ** : आली पुन्हा आडवी माझ्या मार्गात माझी हुषारीची कीर्ती! क्रेऑन! किती तरी वेळा माझा हा लौकिक माझा सत्यानाश करणारा शाप ठरला आहे. ज्याच्या अंगी थोडातरी चाणाक्षपणा आहे त्याने आपल्या अपत्यांना बुद्धिमत्तेचा वापर इतरांपेक्षा अधिक प्रमाणात करायला कधीही शिकवू नये. काय मिळवतो आपण अशा परोपकारी हुषारीने? त्यामुळे आपल्या स्वतःच्या कामात हयगय मात्र होते आणि आपले सर्व उपकृत नागरिक बंधू आपल्याला पाण्यात पहातात. ज्यांना अक्कल नाही त्यांना अगम्य असे काही तुम्ही शिकवायला गेलात तर ते तुम्हाला अडाणी आणि निरुपयोगी ठरवितात आणि जे बुद्धिमान समजले जातात त्यांच्यापेक्षा लोक जर तुम्हाला तुमच्या सल्ल्यामुळे वरचा नंबर देऊ लागले तर त्यांना सहन होणार नाही ते अनुभवावरून माहीत झाले आहे मला हे. मी हुषार आहे म्हणून काही लोक मत्सर करताना माझा; इतरांना मी आवडतच नाही, खरं तर... मी स्वतः काही इतकी हुषार नाही.

म्हणून मला विचारायचंय! क्रेऑन महाराज! कशाची भीती वाटतेय आपल्याला? मी काही अपकार करीन याची! माझ्यापासून भीती बाळगायचे मुळीच कारण नाही तुम्हाला. क्रेऑन! मी पडले एक स्त्री. अशा परिस्थितीत मी एका राजाला कशी अडचणीत आणू शकेन? शिवाय तुम्ही माझे काहीही वाकडे केलेले नाही. तुम्हाला पसंत पडणाऱ्या पुरुषाला तुम्ही आपली कन्या दिलीत. मी माझ्या नवऱ्याचा तिरस्कार करते हे खरं, पण तुम्ही जे केलंत, ते करण्याचा पूर्ण अधिकार होता तुम्हाला! तेव्हा तुम्हाला प्राप्त झालेल्या सौख्याबद्दल माझ्या मनात कोणताही हेवादावा नाही. खुशाल लग्न करा आपल्या मुलीचे त्याच्याशी. तुम्हा उभयतांचे कल्याण असो. पण मला राहू द्याना कॅरिन्थमध्ये! वरचढ शक्तीपुढे नमते घेत मी माझी दुःखं निमूटपणे सोशीन.

**क्रेऑन** : वरवर मोठे सौम्य आहे तुझे बोलणे. पण खोलवर, तुझ्या अंतःकरणाच्या गाभ्यात, तू काय कारस्थाने रचीत असशील याचा विचार सुरू झाला, म्हणजे माझं रक्त गारठतं. खरं तर पहिल्यापेक्षाही आता तुझ्यावरचा माझा विश्वास कमी झालाय. डोक्यात चटकन राख घालणारी स्त्री आणि त्याच प्रकृतीचा पुरुष, ही शांत दिसणाऱ्या धूर्त बाईपेक्षा कमी धोक्याची असते. म्हणून म्हणतो, चालती हो इथून तू! अगदी आताच्या आत्ता. जास्त वादविवाद नकोयत! तू माझी दावेदारीण हे मी पक्कं समजून चुकलोय स्वतःशी. माझ्या शहरात राहता यावं म्हणून योजलेल्या तुझ्या कोणत्याही युक्त्या प्रयुक्त्या चालणार नाहीत. समजलं!

**मीडिआ** : मी आपणपुढे गुडघे टेकते, तरुण वधू, आपला मुलगा यांच्या नावाने

करुणा भाकते.

**क्रेऑन** : कशाला उगाच फुकट बडबड करतेस! माझा निश्चय तू कधीही फिरवू शकणार नाहीस.

**मीडिआ** : मी भीक मागते. दयामाया सोडून तुम्ही मला हाकलून देणार बाहेर ?

**क्रेऑन** : नक्कीच. तुझ्यापेक्षा मला माझ्या माणसांबद्दल निश्चितच जास्त माया आहे.

**मीडिआ** : माझं घर! माझा देश! किती जबरदस्त ओढ वाटते आहे मला तुमच्याबद्दल या संकटात.

**क्रेऑन** : मलाही माझा देश प्रिय आहे. कन्येच्या खालोखाल तोच आहे माझे प्रीतिस्थान!

**मीडिआ** : काय दुर्वृत्त शक्ती ठरते मानवी जीवनात प्रेम ही ?

**क्रेऑन** : मला वाटतं, ते सारं परिस्थितीवर अवलंबून राहील!

**मीडिआ** : हे झ्यूस देवा! माझ्या या यातनाकांडाला कोण जबाबदार, ते लक्षात असू दे तुझ्या.

**क्रेऑन** : नीच निंद्य कारटे! माझ्या सगळ्या विवंचना ने तुझ्याबरोबरच. चालती हो एकदाची.

**मीडिआ** : खूप काळज्या आहेत मला माझ्या. आणखी नकोत कुणाच्या!

**क्रेऑन** : आता एक क्षणभर विलंब केलास तर तुझ्या झिंज्या पकडून फेकून देण्यात येईल तुला वेशीबाहेर. कोण आहे रे तिकडे ?

**मीडिआ** : नको, नको! तेवढे मात्र नको क्रेऑन. मला एक मागणी करायचीय तुमच्याकडे.

**क्रेऑन** : निघून न जाता मला अजूनही छळायचा बेत दिसतोय तुझा मीडिआ!

**मीडिआ** : तसे नाही. मी जाणार तर आहेच (ती त्याला अजूनही बिलगलेली आहे.) त्याबाबतीतील नव्हती माझी मागणी.

**क्रेऑन** : तर मग काय म्हणून तू पडत नाहीस बाहेर! हे आढेवेढे कशासाठी ?

**मीडिआ** : मला फक्त हा आजचा एकच दिवस राहू द्या. इथं निर्वासित जीवनाबद्दल मला काही योजना करायला हवी. प्रत्यक्ष बापाने अंग काढून घेतल्यावर माझ्या दोन मुलांसाठी काहीतरी तरतूद मलाच करायला हवी. थोडीतरी करुणा येऊ द्या. आपणही एक पिता आहात! त्यांच्याबद्दल तुम्हाला सुद्धा ममता वाटायला हवी. मला स्वतःला काहीही वाटत नाही माझ्या हद्दपारीचं. पण मुलांसाठी रडू येतं हो मला. फार फार दारुण आहे त्यांच्या नशिबी येणारा कर्मभोग!

**क्रेऑन** : मी काही स्वभावतः जुलमीवृत्तीचा नाही. माझ्या मृदू अंतःकरणाने अनेक

वेळा धोका दिलाय मला आणि आतासुद्धा मवाळ वागणे मुर्खपणाचे आहे हे मला पटते, पण, तरीही मीडिआ ! तू मागतेस ते तुला मिळेल. एक धोक्याची सूचना लक्षात ठेव ! उद्या क्षितिजावर येणाऱ्या वंदनीय सूर्यदेवाने तुला अगर त्यांना माझ्या देशाच्या हद्दीत पाहिले तर तुझा मृत्यू अटळ. माझा हा निर्वाणीचा शब्द समज आणि तशी निकडच असेल तर हा आजचा दिवस इथे राहा. मी ज्याला भितो आहे ते एका दिवसात पार पाडणं तुला जवळजवळ अशक्यच आहे.

[ क्रेऑन जातो. ]

**नारीवृंद :**

मीडिआ ! हतभागी मीडिआ !
तुझ्या यातना
विदीर्ण करताहेत आमची अंतःकरणे
निर्वासित अशी भटकताना
कुठे वळशील आसऱ्यासाठी तू !
कोणत्या घराकडे स्वागताच्या आशेने पहाशील
आणि कोणत्या भूमीकडे संरक्षणासाठी ?

तुझी वाटचाल निश्चित केली आहे देवांनी
ज्या सागरावरून,
तो संकटसागर किती खवळलेला, किती
भयानक आणि धोकेबाज आहे !

**मीडिआ :** सगळीकडूनच अनिष्ट दिसते आहे भावी परिस्थिती ! वाट बिकट आहे. हं ! आहे खरं असं. पण आता जसं दिसतंय तसाच सगळ्या गोष्टीचा शेवट होईल असं मात्र समजू नका. या नवविवाहित जोडप्याला अजून उतरायचं आहे कठीण कसोटींना. तसेच सहजासहजी नाही चुकवू शकणार त्यांचे जवळचे सगेसोयरे आपल्या दुष्कृत्यांचा दंड. माझे हेतू साध्य व्हावेत, माझे बेत प्रत्यक्षात आणता यावेत म्हणून तर हे सारे नाटक, नाहीतर मी या माणसाची अशी हांजी हांजी केली असती असं वाटतं का तुम्हाला ? एरवी निसटता स्पर्शही केला नसता, की एक शब्दही उच्चारला नसता. ओः ! काय महामूर्ख निघाला हा ! जर हाकलली असती त्याने मला ताबडतोब, तर सगळे बेत कोसळले असते त्याचे धडा-धड. पण उलट, त्याने परवानगी दिली एक दिवस रहाण्याची. आज घालीत मी कंठस्नान माझ्या तीनही वैऱ्यांना बाप, मुलगी, आणि...आणि माझा नवरा.

त्यांचा मृत्यू घडवून आणण्याचे नाना मार्ग डोक्यात घोळताहेत माझ्या, पण कोणता

त करावा तेच नाही समजत. देऊ का घराला आग लावून आणि करू का राख-रांगोळी
च्या रंगमहालाची ? का मंचकापर्यंत लपत छपत जाऊन भोसकू त्यांच्या छाताडातून
पार धारदार सुरा ! पण त्यात एक धोका आहे. जर मी पकडले गेले घरात शिरताना
र प्रत्यक्ष कृती करताना, तर मग माझं मरण निश्चित ! शेवटची खेळी हसत जिंकून
तील माझे दुष्मन. माझ्या प्रवृत्तीला पटणारा सर्वोत्तम धोपट मार्ग म्हणजे विषप्रयोग
न ठार मारणं.

ह एक ठरले. पण समजा, मेले ते अशा तऱ्हेने ! पुढे काय मग ? नंतर कोणते शहर आसरा
ठ मला ? कोणता सुहृद हमी घेईल माझ्या संरक्षणाची आणि देऊ करील आश्रयस्थान,
ल्या देशात, स्वतःच्या घरात ! कोणीही नाही दिसत सध्या तसा. मी थोडे सबुरीने घेतले
जे. जर कुठून ना कुठून मदतीचा दणकट हात आला दृष्टिपथात तर मी हा खून
राईने नि गुपचूप पाडीन पार. पण जर काहीच साध्य न होता दुर्दैवाने मला हद्दपार व्हावं
लं तर मी स्वतः खड्ग हातात घेईन. माझं अंतःकरण जास्तीत जास्त कठोर करीन नि
ांनाही ठार मारीन. बेहत्तर आहे मला त्यासाठी प्राण द्यावा लागला तरी.

ण सर्व देवतांपेक्षा जिच्यावर माझी आत्यंतिक श्रद्धा आहे, जी माझी मनपसंत सहाय्य-
आहे, माझ्या गृहातील मध्यवर्ती होमकुंडाची अधिष्ठात्री जिची प्रतिमा आहे, त्या राणी
टीची शपथ घेऊन सांगते, त्यांच्यापैकी ज्यांनी ज्यांनी मला दुखवले आहे, त्यांच्यापैकी
ीही केल्या कर्माचे प्रायश्चित घेतल्याशिवाय सुटून जाणार नाही. मला एकदा माझ्या
ाला तर सुरुवात करू द्या ! या विवाहाबद्दल फार कटू पश्चाताप करावा लागणार आहे
ना, यातनांनी तळमळत करावा लागेल असा पश्चात्ताप. दोन घराण्यांचे संबंध जोडल्या-
ल आणि मला हद्दपार केल्याबद्दलही.

वल तर मग ! करायला लाग तुझा बेत मीडिआ ! करच तुझे कारस्थान. तुझ्या संपूर्ण
र्यासह तुझी योजना तयार कर, तुझ्या धैर्याची परीक्षा घेणाऱ्या भीषण क्षणापर्यंतची. तू
त्या परिस्थितीत आहेस ते समजताय तुला. तुझा बाप राजा होता. त्याचा बाप होता
सहस्ररश्मी. म्हणून जेसन आणि सिसिफस जमातीतील त्याचे नूतन दोस्त, यांच्याकडून
हसे नाही होता कामा ! तुला समजताय काय करायला हवंय ते ! त्याशिवाय [ नारीवृंदा
वळून त्यांना उद्देशून ] आपण जन्माला आलो स्त्रिया म्हणून कोणत्याही सत्कृत्याला
पयोगी, पण सर्व प्रकारच्या दुष्कृत्यात मात्र कमालीच्या तरबेज.

**नारीवृंद :**

उलटे वाहू लागले आहेत
पवित्र नद्यांचे प्रवाह
परंपरा, समाजव्यवस्था

सगळ्यांचीच झालीय उलटापालट
ठकवाठकवी हेच ठरलय पुरुषांचे व्यवहार चातुर्य !
पुरुषांनी घेतलेल्या आणाभाका म्हणजे
देवतांचा अपमान

पार बदलून जातील परंपरागत समजुती
आम्हा स्त्रियांच्या गुणावगुणाबद्दलच्या
येईल अशी ही वेळ
जेव्हा स्त्री होईल सन्मानीत

अगदी वावगी अशी ती जुनी बदनामी
जखडून ठेवणार नाही आता आम्हाला
कालबाह्य ठरतील आत जुन्या युगांतील शाहीर
बेइमान स्त्रियांवर कवने करणारे.

स्त्रियांच्या आकलनशक्तीला
भावभरी काव्यस्फूर्ती कधी बहाल केलीच नाही
संगीत कलेचा अधिष्ठाना फीबस याने
नाहीतर आम्हीही निवडू शकलो असतो
कवितांसाठी विषय
पुरुषाविरुद्ध तोडीस तोड अशी रचली असती
आम्ही महाकाव्ये
पण खरे म्हणजे काळ आहे कितीतरी पुरातन
आणि त्याच्या समृद्ध कथासंचयात
पुरुष, स्त्री पेक्षा कमी अगर अधिक लौकिकाचा
खासच नाही.

म्हणूनच तर मीडिआ,
तू प्रेमवेडी होऊन पूर्वेकडील सागराच्या खडकाळ
जबड्यातून मार्ग काढीत निघालीस
शिडे उभारून आपल्या वडिलांचे घर सोडून

आणि इथे या परक्या देशात राहून
मुकलीस तू आपल्या वैवाहिक जीवनाला
तुझी शय्या राहिली एकाकी
तू हाकलली गेलीस सरहद्दीबाहेर
निर्वासित अगतिक...
पवित्र आणाभाकांची संपली सुभगता
या विस्तृत ग्रीक दुनियेत इभ्रत अशी
राहिलीच नाही
ती गेलीय उंच नभांत विरून

कुठे जाशील तू आता आसरा शोधीत ?
तुझ्या पित्याच्या घराचे दार तर तुला बंदच आता
दुसरीच कोणी झाली आहे तुझ्या नवऱ्याच्या
शय्येची स्वामिनी !
नवी राणी हुकमत चालवतीय
तुझ्या या घरात !

( तेसन प्रवेश करतो. )

**जेसन :** बरेच वेळा पाहिलंय मी ! ही काही पहिलीच वेळ नाही ! बेलगाम संतापाचे काय जीवघेणे परिणाम होतात ते. जे सत्तेवर आहेत त्यांचा निर्णय तू निमूटपणे मानला असतास तर तू कॉरिन्थमध्येच राहू शकली असतीस, याच घरात वावरली असतीस. त्या ऐवजी मूर्खासारखं बरळत राहिलीस तू आणि परिणामी झालीस आता हद्दपार. ठीक आहे ! तुझ्या संतप्त शब्दांच्या भडिमाराने मी जराही विचलित होत नाही. जेसनच्या दुष्कृत्यांची उजळणी करीत रहा, तुला वाटेल तितका वेळ. पण राजा आणि राजकन्या यांच्यावर शिव्यांचा वर्षाव केल्यावरही केवळ हद्दपारीवरच निभावलं याबद्दल नशिबवान समज स्वतःला. त्या दोघांना आवरण्याचा मी सतत प्रयत्न करीत आहे, पण राजघराण्याविरुद्ध अशा हास्यास्पद शिव्याशापांचा वर्षाव करण्याचे मात्र अजून तू चालूच ठेवले आहेस. हं ! तर मग तू हद्दपार झालीसच, तरीही मी मात्र मैत्रीला अंतर देणार नाही. तुझ्या अडचणींचा मी अगदी काळजीपूर्वक विचार केला आहे; आणि तुझं असं आततायी वर्तन असूनही तुला आणि तुझ्या मुलांना भणंग भिकाऱ्यासारखे भावी जीवनाची काहीच तरतूद नसताना जायला नये लागूयासाठी आलोय मी इथे ! हद्दपारी मागोमाग संकटाची मालिका आलीच. तू

माझा तिरस्कार करतेस यांत शंकाच नाही, पण माझ्या मनात मात्र तुझ्याबद्दल कसलाही आकस कधीही येऊ शकणार नाही.

**मीडिआ :** ओंगळ भेकडा! तुझ्या असल्या नामर्दपणाला साजेसा आणखी एखादा अपशब्द सुचला असता तर तोही मी उच्चारला असता. हं! तर मग आपण आलात म्हणायच्चे शेवटी. माझा सर्वात भयप्रद वैरी मला भेटायला आलाय! अरे, मित्रांचा विश्वासघात केल्यावर हे असं मित्रांच्या नजरेस नजर देणे याला काही धैर्य नाही म्हणता येणार. ही उद्धट धिटाई, हा तर एक रोग आहे रोग! माणसाला होणारा सर्वात किळसवाणा विकार! निखळ निर्लज्जपणा! तरी पण बरं झालं आलास ते! मला जे काही सांगायचय ते सांगितल्यावर जरा हलकं वाटेल माझ्या जिवाला! ते ऐकताना मात्र, क्षणोक्षणी बिचकशील, दचकशील तू!

अगदी सुरूवातीपासूनच सांगायला प्रारंभ करते मी. नाकपुड्यातून आग ओकणाऱ्या बैलांना ताब्यात आणून त्यांना जोखडाखाली जुंपून घातकी ठरणारी नांगरट करायला तुला जेव्हा पाठविण्यात आले तेव्हा मीच वाचवलेत तुझे प्राण. आर्गोतून तुझ्या बरोबर सागरी सफरीवर आलेल्या प्रत्येक ग्रीक जवानाला माहीत आहे हे!

रात्रंदिवस पापणीला पापणी न भिडविता भोवताली वेटोळ्यावर वेटोळी घालून सोनेरी लोकरीची राखण करणारा तो सर्पराज! त्याला ठार मारणारी कोण? तर मी! अशा तऱ्हेने पाजळलीय मी तुझ्या यशाची मशाल. मी अगदी आपखुषीने फसवलं माझ्या बापाला, घर सोडलं माझं आणि पेलिऑन पर्वताच्या नजिक आयोल्कसला आले तुझ्या सांगाती. माझी तुझ्यावरची नितांत प्रीती प्रगट झाली पण शहाणपणा मात्र कमीच होता त्या वर्तनात. त्या ठिकाणी पेलिअस राजाला त्याच्याच कन्यांच्या हातून अत्यंत भयानक रीतीने ठार करिवलं आणि त्याच्या सर्व घराण्याचा सत्यानाश केला. याची परतफेड तू कशी केलीस? मला घराबाहेर काढण्याचा दुष्टपणा करून तू दुसरी पत्नी वरलीस. असं वागलास तू! वंशवृद्धीसाठी दोन पुत्रांना मी जन्माला घातलेले असूनही! तू जर अद्याप निपुत्रिक असतास तर या नवीन संबंधासाठी धडपडणाऱ्या तुला मी क्षमाही केली असती. पण आणाभाकांना दिला जाणारा मान गेला हवेत विरून! कधी कधी मनात येतं, पुरातन देवदेवतांची सत्ता संपुष्टात आली आहे, अशी तर तुझी समजूत झालेली नाही ना! आणि आता वर्चस्व, काय ते नव्या कायद्यांचे असं का वाटतंय तुला! माझ्याशी वचनभंग केल्याचा गुन्हा तू केलायस याची जाणीव नक्कीच असणार तुला.

माझा हा भाबडा उजवा हात—किती तरी वेळा कुरवाळला असशील तू तो! माझे हे गुडघे! किती तरी वेळा बिलगला असशील त्यांना तू! माझ्या दुर्दैवी अंगोपांगानो! या माणसाच्या वचनभंगाने लाजिरवाणा कलंक चढलाय तुमच्यावर! क्रूर चेष्टा झाली आहे

तुमची ! आणि फसवणूक झाली आहे आपल्या साऱ्या आशा आकांक्षांची.

ऐक तर मग ! माझा मित्र म्हणवतोस ना तू आपल्याला ? त्या नात्याने मला तुझा सल्ला विचारायचाय. तुझ्याकडून काही मदत मिळेल अशी आशा नाहीच मला. पण तरी तुला मी काही विचारणार आहे आणि तुझा नीचपणा उघडकीला आणणार आहे. सांग बरं मी कुठे जाऊ आता ते ! तुझ्याबरोबर येण्यासाठी ज्यांच्याशी मी विश्वासघाताने वागले त्या माझ्या मायभूकडे आणि जन्मदात्याकडे जावे मी ? का आयोलकसला जाऊ पेलिअसच्या अभागी मुलींकडे ? आपल्या बापाला जिने आपल्याकडून ठार करविलं त्या, माझे काय छान स्वागत करतील नाही ? असं आहे हे सारं ! घराकडील माझे सर्व स्नेहीसोबती माझा द्वेषच करतात. आणि तुला सहाय्य करताना ज्यांना दुखवायचा मला कसलाही अधिकार नव्हता, अशांचे शत्रुत्व, मी ओढवून घेतलं. या सगळ्यांचे मला जे पारितोषिक तू दिलेस त्याने मी झाले एक हेव्याचा विषय सर्व हेलेनी बायकांच्या दृष्टीने नाही ? वहाव्वा ! काय अपूप नवरा मिळा-लाय मला ? केवढा एकनिष्ठ ! काय दीनवाणी अवस्था ही माझी ? मी देशोधडीला लागणार, एकाकी, सग्यासोयऱ्यांना अंतरून माझ्या हतभागी अर्भकांसह भटकत रहाणार ! हो ना ! तुझे पोटचे गोळे आणि तुझा जीव वाचविणारी मी, रस्त्याच्या कडेने भीक मागत बसू, तेव्हा तुझ्यासारख्या नव्या खुन्या नवरदेवाच्या बेशरमपणाची दिवटी, कशी पण झळाळून उठेल !

हे झ्यूसदेवा ! बनावट सोन्यातून अस्सल बावनकशी सोने कसे पारखून घ्यावे याच्या खाणाखुणा आमच्यासाठी स्पष्ट करून दाखवतोस तू ! पण सज्जनातून हलकट वेचून काढायची वेळ येते, तेव्हा त्याबद्दलच्या निशाण्या त्यांच्या शरीरावर का नाही स्पष्ट उमटवून ठेवीत तू ?

**नारीवृंद :**

जेव्हा उफाळता क्रोध घेतो
अत्युत्कट प्रीतिभावनेची जागा
तेव्हा ठरतो तो अत्युग्र
सर्व क्रोध प्रकारात
ओसरत नाही त्याची तीव्रता
कोणत्याही उपायांनी

**जेसन :**

फार चतुराई दाखवायला हवी मला बोलताना असं दिसतंय. प्रत्यारोप आणि शाप या झंझावातात अत्युत्कृष्ट नौकानयन कौशल्याची गरज आहे. नाममात्र एखादे शीड ठेवून बाकीची सारी गुंडाळून घेऊन या वादळावर स्वार व्हायला हवं मला. मीडिआ ! मला केलेल्या मदतीचा तू जो एवढा डोंगर रचलायस, त्यापासून सुरुवात करायची तर माझ्या

यशस्वी सागर सफरीचे श्रेय कुणा अन्य दैवी अगर मानवी सहाय्याला नसून ते आहे अफ्रोदितेला, असे माझे ठाम मत आहे. तू बुद्धिमती आहेस हे मान्य आहे मला. पण माझ्या वरच्या अनिवार प्रेमविकारावेगाने तू माझा जीव वाचवायला कशी धडपडत होतीस ते सविस्तर सांगणे, म्हणजे नसती कुरापत काढण्यासारखं होणाराय. मी त्या मुद्द्यावर अधिक भर देणार नाही. तू मला ते सहाय्य दिलंस ते त्याचे स्वरूप लक्षात घेता ठीकच होतं म्हणायचं. पण मला वाचविण्याच्या मोबदल्यात तू दिलंस त्यापेक्षा कितीतरी जास्त पदरात पडलं आहे तुझ्या, कसं ते सांगू दे मला. पण मला प्रथम हे स्पष्ट करायला हवं की तू तुझा रानटी देश सोडलास आणि हेलासमध्ये स्थाइक झालीस. न्याय कशाला म्हणतात हे या देशात समजलं तुला. जिथे जुलमाला कायद्यापुढे माघार घ्यावी लागते अशा समाजात तुला रहायला मिळाले. शिवाय या ठिकाणी तुझ्या अंगीच्या गुणांचा पुष्कळच बोलाबाला झाला. तुझी कीर्ती पसरली. अजूनही तू जर पृथ्वीच्या त्या टोकालाच असतीस तर तुझं नावसुद्धा कुणी उच्चारलं नसतं. माझ्या स्वतःच्या दृष्टिकोणातून सांगायचं तर मला जीवनात कीर्ती मोलाची वाटते. ती नसेल तर सोन्याच्या लगडी अगर ऑर्फीअसपेक्षाही मधुर गळा, मला मोह पाडू शकणार नाही. तूच सुरूवात केलीस वाद घालायला माझ्या सागरसफरीबद्दल म्हणून हे सारं सांगितलं. तुझ्या वादंगाला माझे हे उत्तर.

राजघराण्याशी जडलेल्या माझ्या विवाह संबंधाबद्दलच्या तुझ्या अर्वाच्य टोमण्यांना उत्तर ऐक आता. माझं हे कृत्य पूर्ण विचारांनी, शहाणपणाने केलेले आहे. विकारवश होऊन नव्हे. त्या मागचा हेतू तुझ्या आणि मुलांच्या हिताचाच होता हे मी तुला दाखवून देणार आहे. अंहं ! मधे बोलू नकोस, गप रहा ! स्वतःच्या राज्याला मुकून निर्वासित होऊन संकटे पाठ-पुरावा करीत नामोहरम करीत असताना मी आयोल्कसहून येथे येऊन टेपलो तेव्हा राजाच्या मुलीशी विवाह करण्याइतकी दुसरी कोणती जास्त भाग्योदयाची संधी होती माझ्यासमोर ? रागाने, मत्सराने, तू धरून चालतेस त्याप्रमाणे मला काही तुझ्या रूपगुणांचा उबग आला नव्हता की नवी बायको हवी या लालसेने मी काही अगदी झपाटून गेलो नव्हतो ! किंवा मला कटाक्षाने माझ्या कुटुंबाचा खूप मोठा विस्तार करायचा होता असंही नाही. आपल्याला पुत्र आहेत ना, ते पुरेसे आहेत मला ! मी तृप्त आहे त्या बाबतीत. पण पहिली आणि अत्यंत महत्त्वाची गोष्ट मला साध्य करायची होती ती म्हणजे आपण वैभवात रहायला हवं, दारिद्र्यात नव्हे. दरिद्री माणसाला त्याचे सर्व स्नेहीसोबती कसे टाळीत असतात ते मला माहीत आहे. त्यानंतर दुसरी गोष्ट म्हणजे माझ्या उच्चकुलीन प्रतिष्ठेला शोभेल अशा इतमामात माझ्या मुलांना मला वाढविता यावं, आणखी मुलगे असावेत असंही मनात होतं – तुझ्या मुलांचे भाऊ म्हणून. त्या सर्वांना सारख्याच दर्जाने वागवावे व अशा प्रकारे एकमेकांशी दृढ स्नेह संबंध जोडलेले असे एक वैभवशाली कुटुंब उभे करावे. तुला आता आणखी अपत्यांची गरज

भासत नाही—होय ना ? पण मला मात्र सध्या असलेल्या पुत्रांना उत्कर्षाच्या अधिक सुख-सोयींचा पाठिंबा मिळावा म्हणून आणखी पुत्र व्हावेत, अशी मनीषा आहे.

तर मग अशी ही माझी योजना दुष्टपणाची होती का ? तू तुझ्या सवती मत्सराला आवर घालू शकलीस तर तुला सुद्धा मान्य होईल माझी योजना. पण तुम्ही बायका अशा काही मनस्थितीच्या ताब्यात जाता, नवऱ्यापासून मनपसंत शय्यासुख लाभलं की तुम्हाला वाटतं, आपल्याला जे हवं, ते सारं काही मिळालंच; जण जर का त्या सुखात काही विक्षेप आला, तर मग तुमच्या लेखी अति उदात्त जीवनसुद्धा बिषवत कडवट ठरतं. स्त्रीची गरज न पडता काही अन्य मार्गानं मुलं प्राप्त व्हायला हवी होती. स्त्रिया जर अस्तित्वात नसत्या तर मानवी जीवन सर्व दुःखांपासून मुक्त झालं असतं.

**नारीवृंद :** जेसन ! वर वर तरी फार परिणामकारक रीतीने मांडली आहेस तू तुझी बाजू. पण मला वाटतं–तुला हे ऐकून आश्चर्यही वाटेल–अशा प्रकारे पत्नीला दूर करण्यात चुकतोयस तू !

**मीडिआ :** अनेक व्यक्तींशी अनेक बाबतीत माझे मतभेद आहेत हे तर उघडच आहे. प्रभावी वक्तव्य करणारा दुष्ट माणूस हा इतर दुष्टांपेक्षा जास्त अपराधी असं वाटतं मला. असा माणूस विलक्षण धिटाईने तुमचा गळा कापील, कारण त्याला माहीत असतं, खुनी कृत्यांवर देखण्या शब्दांची कशी साखरपेरणी करावी ते. खरं म्हणजे तो स्वतःला समजतो तितका धूर्त नसतोच. आपण फार मोठ्या मनाचे आहोत असा साळसूद अविर्भाव आणीत तू मला ओशाळी करण्याचे धारिष्ट्य करतो आहेस, पण तुझा नक्षा उतरवायला एकच शब्द पुरा आहे. तू जर इतका शहाजोग होतास तर या बाबतीत तू मला प्रथम विश्वासात घ्यायला हवं होतंस. मला न कळवता असं चोरून लग्न करायला नको होतंस ! वा ! छान !

**जेसन :** मी तुला हे आधी सांगितलं असतं, तर तू मला मोठं सहाय्य केलं असतंस नाही ! अग अजूनसुद्धा तुझा हा उफाळणारा क्रोध आवरण्याचं मनावर घेत नाहीस तू !

**मीडिआ :** मुद्दा तो नाही. तुझं आता वय होत चाललंय, तेव्हा आशियातील पत्नी आता तुला प्रतिष्ठादायी वाटत नाही.

**जेसन :** पुन्हा समजून घे नीट ! राजघराण्याशी मी संबंध जोडलाय तो कोणत्याही एखाद्या स्त्रीच्या मोहाने नव्हे, तर मी तुला आधीच सांगितलय त्याप्रमाणे तुझा भविष्यकाळ निश्चित करावा, माझ्या मुलांना राजवंशातले पाठीराखे भाऊ मिळावेत आणि आपणा सर्वांचेच स्वास्थ्य दृढ करावे म्हणून.

**मीडिआ :** लाथ मारते मी तुझ्या त्या वैभवशाली भविष्य काळावर. काही नको आहे मला त्या वैभवातले ! तुझे ते स्वास्थसुद्धा नकोय. वेदना होतात माझ्या हृदयाला त्याच्या कल्पनेने.

**जेसन :** हे बघ ! नक्कीच तुझी विचारसरणी बदलेल आणि तू जास्त समजुतदारपणे

वागशील. मग चांगल्याला वाईट ठरवण्याचे तू सोडून देशील आणि खरोखरी भाग्यवान असूनही दुःखाचे हे करुणास्पद नाटक करण्याचे पण थांबवशील.

**मीडिआ :** चालू दे ! खुशाल डिवचत रहा मला. आसरा आहे घराचा तुझ्या मस्तकावर. मी पडले आहे एकटी, हद्दपार झालेली.

**जेसन :** आपल्या हातानीच ही अवदसा ओढवून येतली आहेस तू आपल्यावर. दोष तुझाच. उगीच दुसऱ्या कोणालाही दोष देऊ नकोस.

**मीडिआ :** माझा दोष ? काय केलं रे मी असं ? तुला माझी पत्नी बनवलं नि मग टाकून दिलं की काय ?

**जेसन :** राजा आणि त्याचे घराणे यांना निष्ठुरपणे शिव्याशाप दिलेस तू.

**मीडिआ :** होय ! दिले ! आणि तुझ्या घराण्यावरसुद्धा नियतीने पाठविला आहे घोर शाप-माझ्या रूपाने.

**जेसन :** मला हा वाद आणखी वाढवायचा नाही. मुलांच्या आणि तुझ्या गरजा भागविण्यासाठी जर काही तरतूद मला करण्याजोगी असेल तर सांग मला. जे काही हवे असेल तुला, ते संतोषाने देईन मी; अगर तुला सहाय्य करतील अशा माझ्या मित्रांना तू म्हणत असशील तर ओळखपत्रे पाठवीत मी—ऐक माझं ! अशी ही मदत नाकारणे हा वेडेपणा होईल. हा अत्युग्र क्रोध जर तू सोडलास ना, तर हर एक बाब तुझ्या फायद्याचीच ठरेल.

**मीडिआ :** तुझ्या मित्रांशी संबंध ठेवणे अगर तुझ्याकडून कसलीही देणगी घेणे—या गोष्टी साठी तू काहीही केलंस तरी माझे मन तयार होणार नाही. म्हणून काहीही देऊ करू नकोस मला. लबाड, विश्वासघातक्याच्या देणग्या चांगल्या पायगुणाच्या ठरत नाहीत.

**जेसन :** ठीक तर मग तुला आणि मुलांना सहाय्य व्हावे, म्हणून शक्य ते सर्व मी केले आहे, याला देवच साक्षी आहेत. सहानुभूतीला तू प्रतिसाद देत नाहीस मित्रत्वाच्या प्रस्तावांना तू दुराग्रहाने धिक्कारतेस यामुळे तुझे अनिष्टच होणार नाही तर काय !

**मीडिआ :** चालता हो ! फार वेळ दवडलास तू इथे बाहेर ! नव्यानेच प्राप्त झालेल्या वधूबद्दलच्या तुझ्या हृदयातील आतुरतेने पेटून उठला असशील तू ! जा ! भोग तिच्या सहवासाचं सुख !

[ जेसन जातो ]

जेसन ! असंही होईल कदाचित. देवराया ! माझे शब्द उचलून धर.. आजचा हा तुझा विवाहदिन अखेरीस विवाहाचा अस्त पाहील. मागे राहील फक्त घृणा आणि भीषणता.

**नारीवृन्द :**

उफाळणाऱ्या, दुर्दम्य अशा प्रीतीच्या भावना
जेव्हा पुरुषाच्या हृदयात घुसतात

तेव्हा त्या मिळवून देत नाहीत त्याला
परिणामी सत्कीर्ती अगर चांगुलपणा

पण जर अवतरेल ॲफ्रोदायती
नाजूक पदन्यासाने पुरुषाच्या हृदयात
तर असा आनंद मिळवून देणारी
अन्य देवताच नाही जगात

नको ग सोडूस कधी माझ्यावर
राज्ञी ॲफ्रोदायती
तुझ्या सोनेरी धनुष्यातून
वासनेच्या माधुर्यात बुचकाळलेला
अनिवार्य असा तुझा बाण !

निरागसता—अनाघ्रात
देवांची सर्वांत मोहक देणगी
तिनेच करावी माझी निवड
आपलीशी करून सोडण्यासाठी
क्रोधमय झगडे आणि न संपणारे वैर
यांचा हल्ला माझ्यावर करीत
जुनी सोडून नवी प्रीती करण्याचे
माझ्या हृदयाला कधींही न लागो वेड

ती भयकारी सायप्रसबेटाची अधिष्ठात्री
पारख करू दे धूर्तपणे तिला स्वतःलाच
स्त्रियांच्या प्रीतिभावनांची
आणि आदर करू दे त्या शय्येचा
जिथे माजत नाहीत झगडे.

मला आहे माझा देश ! माझे घर !
हताश, दयनीय अवस्थेत

दुःसह जीवित कसेबसे कंठीत
देशहीन निर्वासित होण्यापासून
देव करोत माझे रक्षण

ते तर सर्वांत शोचनीय संकट
मृत्यू फार बरा त्यापेक्षा
मी मृत्यूलाच जोडीन हात
असा संभाव्य दिवस माझ्यापुढे ठाकण्यापूर्वी
सर्व अरिष्टांत आणि यातनांत
आपल्या मायभूपासून वंचित होण्यासारखं
दुसरं काही नाही अधिक दुःखप्रद

हे काही प्रतिबिंबित विचार नव्हेत
सांगोवांगी ऐकीव गोष्टीतून उचललेले
हे आहे असं काही, की
जे बघितलय आम्ही प्रत्यक्ष

विदीर्ण करणाऱ्या दुःखाचे तडाखे सोसलेस
तू मीडिया !
पण कोणीही केली नाही दया तुझ्यावर
ना कॉरिन्थनगरीने, ना तुझ्या स्नेह्यांनी
स्नेह्याच्या सरळ हृदयातील गुप्त भावना
हस्तगत करून घेऊन मग
स्नेहपंथ तोडून टाकणाऱ्या माणसावर
कोसळो अपकीर्ति आणि सर्वनाश
माझी कधीच होऊ शकणार नाही
त्याच्याशी मैत्री
[ ईजिअस येतो. ]

**इजिअस :** सर्वतोपरी सुखांत रहा मीडिआ ! जुन्या मित्रांच्या भेटीच्या वेळी याहून अधिक चांगली दुसरी शुभेच्छा नाही.

**मीडिआ :** सुज्ञ पॅन्डिऑनच्या पुत्रा इजिअस सर्वदा सुखी राहा तूही. कुणीकडून येणे

झाले तुझे आता ?

**ईजिअस** : डेल्फीहून येतोय मी. ॲपोलोच्या दैवीवाणीचे प्रतिष्ठान आहे ना ते !

**मीडिआ** : डेल्फी ! या जगाचा मध्यबिंदू. भविष्यवाणीचे माहेरघर ! कशासाठी गेला होतास तिकडे ?

**ईजिअस** : अपत्यसंभवाबाबत विचारणाकरण्यासाठी ! माझं बीज अंकुरावं, सुफळ व्हावे म्हणून,

**मीडिआ** : म्हणजे ? इतकी वर्षे झाली तरी अजून पाळणा हलला नाही तुझ्या घरात ?

**ईजिअस** : हो ना ! निपुत्रिकच आहे मी ! नियतीनेच निश्चित केले असले पाहिजे ते.

**मीडिआ** : पण पत्नी तर नांदते आहे ना घरात ? की नाही ?

**ईजिअस** : लग्न झालेलेच आहे माझे.

**मीडिआ** : मग अपत्यसंभवाबाबत काय दैवीवाणी झाली फीबसची ?

**ईजिअस** : त्याची वाणी मला अगर कुणाही मानवी विवेचकाला न उलगडण्याइतकी गूढ शब्दांत गुरफटलेली होती.

**मीडिआ** : मी ते ऐकणं न्याय्य होईल का ?

**ईजिअस** : निश्चितच ! तुझ्या सारखीच्या तल्लख बुद्धीची गरजच आहे त्यासाठी.

**मीडिआ** : सांग तर मग, सांगण्या जोगं आहे तर ?

**ईजिअस** : त्याने मला आज्ञा केली, " मद्याच्या कातडी थैलीचे तोंड खुले ठेवू नकोस."

**मीडिआ** : अस्सं ! किती काळपर्यंत ?

**ईजिअस** : मी घरी सुखरूप येऊन पोचेपर्यंत.

**मीडिआ** : आलं लक्षात. पण कॉरिन्थच्या दिशेने काय हेतूने जहाज हाकारलंस ?

**ईजिअस** : पेलॉप्सचा मुलगा पिथिअस ट्रीझनचा राजा माहीत आहे ना तुला ?

**मीडिआ** : हो तर ! फारच सच्छील श्रद्धाळू माणूस !

**ईजिअस** : मला त्याचा सल्ला घ्यायचा होता या भविष्यवाणीबद्दल !

**मीडिआ** : या बाबतीत तो तज्ज्ञ आहे खरा !

**ईजिअस** : होय ! तसाच माझा जिवलग सुहृदही आहे तो. आम्ही दोघे बरोबरच जात होतो ना मोहिमांवर !

**मीडिआ** : मला उमेद आहे की तुम्हाला जे मिळविण्याची उत्कंठा आहे ते तुम्हाला प्राप्त होईल आणि तुम्ही सुखी व्हाल.

**ईजिअस** : पण तू का अशी फिकट आणि खंगलेली दिसतेस ? काय झालंय काय असं ?

**मीडिआ** : ईजिअस ! माझा नवरा म्हणजे हयात असणाऱ्या साऱ्या मानवांत अत्यंत दुर्वृत्त माणूस.

**ईजिअस** : अरेच्या ! असं कसं झालं ? सांग पाहू सारी हकिगत मला तुझ्या दुःखाची.

**मीडिआ** : जेसनने माझा विश्वासघात केलाय—मी त्याचा काहीही अपराध केलेला सताना

**ईजिअस** : म्हणजे काय केलंय त्याने ? नीट उकलून सांग ना सगळं !

**मीडिआ** : त्याने दुसरी बायको केलीय आणि तिला मालकीण केलीय माझ्या संसाराची.

**ईजिअस** : पण असं करणं फारच बेशरमपणाचं आहे. खरंच त्याची छाती झाली ?

**मीडिआ** : खरंच झालं आहे तसं. एकेकाळी त्याचे प्रेम होते माझ्यावर. आता माझा बंध तोडून टाकला आहे त्याने.

**ईजिअस** : कंटाळला की काय तुला तो ? का कुठे दुसरीच्या प्रेमात पडला ?

**मीडिआ** : हो ना ! अगदी बेफामपणे ! ज्याच्यावर स्नेह्यांनी विश्वास टाकावा असा नाही हिलेला तो.

**ईजिअस** : असं आहे तर ! मग तू म्हणतेस तसा तो वाईट असेल तर जाऊ दे तुटून बंध सारा !

**मीडिआ** : तो प्रीतिपाशात अडकलाय तो राजणराण्याच्या आणि सत्ताधाऱ्यांच्या.

**ईजिअस** : काय ? बोल पुढे ! कोण आहे मुलीचा बाप ?

**मीडिआ** : कॉरिन्थचा राजा क्रेऑन ?

**ईजिअस** : आलं लक्षात ! तर मग तुझ्या मनाची अशी उलघाल होते आहे ती युक्तीकच आहे.

**मीडिआ** : हूं ! सगळंच संपलं आता. अन आणखी भरीत भर म्हणजे हद्दपार केलंय ला.

**ईजिअस** : कमालच झाली म्हणायची दुर्दैवाची ! लोकविलक्षणच ! काय ग–कुणी केलं ला हद्दपार ?

**मीडिआ** : क्रेऑनने हद्दपार केलंय मला कॉरिन्थमधून !

**ईजिअस** : आणि जेसनला हे मान्य आहे ? किती लांच्छनास्पद गोष्ट आहे ही त्याला ?

**मीडिआ** : छे ! छे ! तसं नाही. तो विरोध करतोय. पण त्याने धैर्याने सहन करायचं रवलंय म्हणे सगळं ! ईजिअस ! इकडे बघ ! एक शरणार्थी म्हणून मी तुझ्या दाढीला हात ावून विनवते आहे; माझ्या असल्या या हीनदीन अवस्थेत मला दया दाखव म्हणून तुझ्या डघ्यांना कवटाळून धरते आहे. येऊ दे करुणा तुला ! मी निर्वासित आहेच; भरीला मला ाश्रित होऊ देऊ नकोस. मला आसरा दे अथेन्समध्ये. तुझ्या घरात मला सन्मानाने थारा ळू दे. या पुण्यकृत्याबद्दल देव तुझं बीज सुफलित करोत व तुझा जीवनक्रम सुखान्त होवो. हजासहजी काय सुवर्णसंधी चालून आलीय तुझ्याकडे याची कल्पना नाही तुला अजून.

तुझी निपुत्रिकता दूर करतील अशा शक्तींच्या काही औषधी महीत आहेत मला. शपथेवर सांगते मी, तुला मुलं होतीलच.

**ईजिअस** : मीडिआ, मी उत्सुकच आहे अनेक कारणांसाठी तुला सहाय्य करायला. पहिलं कारण म्हणजे हे देवसंमत पुण्यकृत्य आहे आणि दुसरं, मुलं होण्याच्या बाबतीत तू मला हे मधाचे बोट लावलंयस म्हणून. कारण अगदी हताश घेऊन बसलो होतो मी स्वतःच्या वंशवृद्धीक्षमतेबद्दल. तर मग तुझ्यासाठी मी आता करणाराय ते असं. तू एकदा अथेन्सला येऊन पोचलीस म्हणजे मग माझा शब्द मी पाळीन आणि माझ्या सर्व शक्तीनिशी तुझं रक्षण करीन. पण मला प्रथमच हे स्पष्ट करून टाकलं पाहिजे. तुला कॉरिन्थहून माझ्याबरोबर घेऊन जाण्याचा मात्र माझा विचार नाही. तू आपण होऊन अथेन्सला आलीस तर मात्र तुला तिथे नक्कीच आश्रयस्थान लाभेल. दुसऱ्या कुणाच्याही हवाली करणार नाही नंतर मी तुला. प्रथम कुणाचीही मदत न घेता कॉरिन्थबाहेर पड. कॉरिन्थमधील रहिवासी माझे स्नेहीच आहेत. त्यांना दुखवायचं नाही मला.

**मीडिआ** : तसंच होईल सारं. आता दिलेला शब्द शपथ घेऊन दृढ कर. नंतर मग तुझ्यामाझ्यातील संबंध सुरळीत झाले असे समजायचे.

**ईडिअस** : का ? विश्वास नाही तुझा माझ्यावर ? कसली शंका त्रस्त करते तुला ?

**मीडिआ** : माझा विश्वास आहे तुझ्यावर पण मला खूप शत्रू आहेत रे ! एकटा क्रेऑनच नाही तर पेलिअसचे सगळे कुटुंबच. एकदा का तू शपथेने बांधला गेलास म्हणजे तुझ्या देशातून मला बाहेर हुसकावयाचा त्यांनी प्रयत्न केला तरी तू मला टाकणार नाहीस. पण तुझे वचन नुसते शाब्दिकच राहिले, देवांच्या नावाने ते शपथबद्ध झाले नाही तर कदाचित तू त्यांच्याशी सख्य करशील व ते सांगतील ते करायला तयार होशील. मला कुठल्याच सत्तेचे पाठबळ नाही. उलट त्यांच्याकडे संपत्ती आणि राजघराण्याला उपलब्ध असणारी सगळीच साधने आहेत.

**ईजिअस** : मोठी कौतुकास्पद आहे तुझी दूरदृष्टी. पण तुझी तशी इच्छाच असेल, तर माझाही विरोध नाही. खरं तर शपथ घेणं माझ्या बचावाला हितप्रदच. कारण, सरळ सरळ शपथेचे कारण सांगून मी तुझ्या शत्रूंना तोंड देईन आणि तुलाही पूर्ण सुरक्षितता वाटेल. सांग ! कोणत्या देवांच्या नावे मी शपथ घ्यायला हवी ?

**मीडिआ** : तुझ्या पायाखालील धरित्रीदेवी, माझ्या पित्याचा पिता असा सूर्यनारायण आणि देवदेवतांची अगदी सर्व प्रभावळ यांच्या नावाने घे शपथ !

**ईजिअस** : काय करण्याबद्दल तसेच काय टाळण्याबद्दल शपथ घ्यायची मी ?

**मीडिआ** : तुझ्या मुलुखातून तू स्वतः मला कधीही हुसकून लावायचं नाहीस, अशी शपथ; आणि जर माझे वैरी मला ताब्यात घेऊ पाहातील तर कधीही जिवातजीव असेपर्यंत

आपखुषीने तू मला त्यांच्या हवाली करणार नाहीस, अशीही.

**ईजिअस :** धरित्रीदेवी, सहस्ररश्मीचा तळपता प्रकाश आणि सर्व देवदेवता यांच्या नावाने तू आता उच्चारलेस त्या साऱ्या शब्दांना जागण्याची मी शपथ घेतो.

**मीडिआ :** आता झालं माझं समाधान आणि समज, जर तू शपथ मोडलीस तर ?

**ईजिअस :** तर मग सर्व अपराधी माणसांना देव जी शिक्षा करतात तीच मला मिळो.

**मीडिआ :** जा तर आता आणि आनंदात रहा. सगळं काही ठीक आहे. माझा बेत पार पडला नि माझी आकांक्षा पूर्ण झाली म्हणजे शक्य तितक्या लौकर मी तुझ्या शहरात येऊन पोचेन.

[ ईजिअस तिचा हात हातात घेतो आणि झटकन निघून जातो. ]

**नारीवृन्द :**

ईजिअस ! सुखरूप नेवो तुला घरी
हरमीज ! पांथस्थांचा रक्षणकर्ता
तुला ते ते सर्व मिळो
ज्याची तू करतोयस आतुरतेने इच्छा
आमच्या सदिच्छा जिंकल्या आहेत
तुझ्या हृदयातील उदात्त भावनांच्या आविष्काराने

**मीडिआ :** हे इयूस देवा ! हे न्यायदेवते झ्यूसकन्ये !

हे तळपत्या दिनमणे !
मी लागले आहे आता विजयाच्या मार्गाला
आता नक्कीच आहे आशा की
पाहीन मी माझ्या शत्रूंना त्यांच्या पात्रतेनुसार
शासन झालेले
ज्या स्थानी होते माझे कारस्थान अगदीच कमजोर
नेमक्या त्याच ठिकाणी मदतीचा हात पुढे आला
ईजिअसच्या रूपाने
तोच ठरेल माझं निवांत आश्रयस्थान
अथेन्स शहराच्या तटबंदीतून माझा एकदाचा प्रवेश
झाला की,
तिथेच नांगरता येईल सुखरूपपणे माझी जीवननौका

मला आसरा घ्यायला
आता मी तुम्हाला सांगते माझा सर्व बेत
ते एकणे काही सुखावह नाही मात्र

[ मीडिआची दाई येते व मीडिआ काय सांगते ते गुपचूप ऐकत रहाते ]

जेसनला मला भेटण्याची विनंती करण्यासाठी मी प्रथम माझा दास पाठवीन मग मी त्याच्याशी अत्यंत मृदुमधुर शब्दांनी बोलेन. त्याला सांगेन की त्याने योग्य तेच केले आहे म्हणून माझ्या विश्वासघाताच्या मोबदल्यात त्याने राजघराण्याशी जी सोयरीक जमविली ती फारच हितकर आणि शहाणपणाची योजना होती. असं सांगेन त्याला मी. मग मी त्याला विनवीन माझ्या मुलांना इथेच राहू देण्याबद्दल. माझा जे द्वेष करतात अशा शत्रूच्या प्रदेशात माझ्या पोटच्या मुलांना अवमानीत होण्यासाठी मागे ठेवण्याचा माझा विचार आहे असे मात्र नाही. पण राजकन्येला ठार मारण्याच्या माझ्या कारस्थानात मला त्यांची मदत घ्यायला हवी. मी त्यांना राजप्रासादात पाठवीन काही भेटी बरोबर देऊन, तलम विणीचा पोषाख आणि ठोकून ठोकून बनविलेला सोन्याच्या पत्र्यांचा किरीट. या बहुमोल भेटी स्वीकारून तिने त्या परिधान केल्या म्हणजे ती आणि जे जे स्पर्श करतील ते, वेदनांनी तळमळत मरतील, अशाच प्राणघातक विषाने माखणाराय मी माझ्या भेटवस्तू.

पण....पुरे झालं आता हे! मला वेदनांनी रडू येतंय ते त्यानंतर मला जे करायचंय त्यामुळे. मी ठार मारणाराय माझ्या मुलांना. कोणीही माझ्यापासून हिरावून घेऊ शकणार नाही माझ्या अपत्यांना. जेसनचे सगळे घर छिन्नभिन्न करून टाकले म्हणजे मी; एक खुनी स्त्री, माझ्या लाडक्या अपत्यांच्या रक्तपातापासून दूर पळून जाण्यासाठी कॉरिन्थ सोडीन. होय! कितीही भीषण गुन्हा असला, तरी त्याची टोचणी सोशीन मी. पण माझ्या वैऱ्यांच्या विजयाचे विकट हास्य नाही सहन होणार मला.

ठीक आहे! आता होऊ द्यात गोष्टी योजल्यानुसार. जगून तरी काय करायचंय मला! ना गाव, ना घर, ना हताश जीवनापासून निवारा. एका ग्रीक तरुणाच्या मोहक वक्तव्याने जिंकली गेले मी. देवाच्या मदतीने ज्याला मी आता शासन करणार आहे अशा तरुणाबरोबर मी जेव्हा माझ्या बापाचे घर सोडून जायला तयार झाले, तेव्हाच, फार फार पूर्वी माझ्या हातून घडून गेली चूक. माझ्यापासून त्याला जे पुत्र लाभले, ते जिवंत असलेले या पुढे कधीच दिसणार नाहीत त्याला. त्याच्या नव्या वधूपासून कधीच होणार नाही त्याला पुत्र-लाभ. कारण हिडिस मृत्यूच गाठणार आहे त्या दुष्ट चांडाळणीला माझ्या विषप्रयोगाने. मी दुबळी, निष्क्रीय, दुसऱ्यापुढे नमून रहाणारी आहे असं कुणीच समजू नये. मी फार फार वेगळया प्रकृतीची बाई आहे हे लक्षात ठेवावे सर्वांनी. वैऱ्यांची कर्दनकाळ आणि मित्रांशी एकनिष्ठ. अशाच जीवनाला लाभते झळाळणारे यश

**नारीवृंद :** तू आम्हाला प्रत्येक गोष्ट सांगितली आहेस आणि मला तुझ्याशी मित्रत्व जोडायचाय तसंच मानवी मूल्यांची पायमल्ली होऊ नये असं वाटतंय म्हणून मी सांगते, तू असं काही करता कामा नयेस.

**मीडिआ :** दुसरा कुठलाच पर्याय शक्य नाही. तुम्ही असं काही सांगावत याबद्दल तुम्हाला दोष देता येत नाही; कारण, माझ्या वाट्याला आलीय तशी वागणूक वाट्याला आली नाही तुमच्या.

**नारीवृंद :** तरी पण; स्वतःच्याच लेकरांना ठार मारायचं ! तू हृदय असं वज्रासारखं कठीण करू शकशील ?

**मीडिआ :** जेसनच्या हृदयावर खोल जखम करण्याचा हाच एक मार्ग आहे.

**नारीवृंद :** पण यामुळे तुझ्याही हृदयावर दुःखाचा आत्यंतिक खोल आघात नाही होणार ?

**मीडिआ :** होऊ द्या ! हे सगळं होईपर्यंत शब्दांची उधळण व्यर्थ आहे. दाई ! जिच्या-बरोबर विश्वासाने निरोप पाठवावे अशी तूच एक आहेस. जा आणि आण बोलावून जेसनला इकडे. तू ही एक स्त्रीच आहेस आणि शिवाय माझी विश्वासू दासीही—तेव्हा माझ्या बेताबद्दल एक अवाक्षरही काढू नकोस तोंडातून.

[ दाई जाते ]

**नारीवृंद :**

उपभोगीत आले आहेत
संपत्ति आणि वैभव
अथेन्सचे नागरिक आणि एरेक्थूसचे पुत्र
फार फार पुरातन काळापासून
परकीयांच्या धाडीने न होरपळलेल्या
पवित्र भूमीवर,
वाढली आहेत
ही पुण्यश्लोक देवांची लेकरे

बागडले आहेत त्यांचे जीव
ज्ञानाच्या देदीप्यमान कुरणांनी
खाद्य पुरविले आहे त्यांच्या प्रज्ञांना
नित्यच विहरतात ते प्रसन्न पदन्यासांनी
तळपत्या आकाशाखाली

म्हणतात की,
फार फार शतकांपूर्वी जन्माला आला
सोनेरी केसांचा हार्मनी–मधुस्वरमिलाप—
ज्याची निर्मिती केली.
पिअरीच्या नऊ कुमारी कलादेवतांनी
असे म्हणतात
अ‍ॅफ्रोदायती भरून घेते आपला चषक
देखण्या सिफिससच्या स्फटिकतुल्य प्रवाहातून
तिच्याच उच्छवासांबरोबर वहात येताना
या भूभागावर
मधुभरित मंद वाऱ्यांच्या झुळका
ती चढविते आपल्या रुळणाऱ्या कुंतल झुलुपांवर
मधुर सुवासाच्या गुलाब पुष्पाचा किरीट
आणि ज्ञानासमवेत करायला सिंहासनाधिष्ठित
पाठविते भीति भावनांना
साऱ्या कलांत गुणवत्तेचा कळस गाठतो
असा प्रीतिभावनांचा ज्ञानाशी मिलाप

आपल्या स्नेह्यांना संरक्षण देणारी ही भूमी
पवित्र सलिलांच्या पुण्यमय सलिलाने
पावन झालेली ही भूमी
अशी ही अथेन्स नगरी—

कसं करील स्वागत
जिचं अस्तित्वच होईल कारण प्रदूषणाला
अशा तुझ्यासारख्या अपत्यघातकर्तीचा !
पूर्ण विचार कर अपत्यांवर पडणाऱ्या घावाचा
ध्यानात आण
केवढा भार घेणार आहेस स्वतःवर रक्तपाताचा
मीडिआ !
नतमस्तक होतो आम्ही तुझ्यापुढे

याचना करतो आम्ही तुझ्याकडे
सगळ्या ज्ञात शपथा घेऊन आणि विनविण्या करून
नको करूस कत्तल आपल्या अपत्यांची !

आणशील कुठून एवढा कणखरपणा उद्दिष्टांचा ?
या भयानक कृतीला न कचरता तोंड द्यायला ?
कसा उभा करशील निर्धार ?
अंतःकरणाचा नि हातांचा ?
जेव्हा येईल तो क्षण आणि तुझी दृष्टी पडेल त्यांच्यावर
मारेकरिणीची भूमिका पत्करण्याचा तो क्षण
त्या क्षणाला,
उचलेल तुझा हात ते कृत्य करण्याला ?
तुझे पुत्र
गुडघे टेकतील तुझ्यापुढे दयायाचनेसाठी
तेव्हा
कलंकित करशील आपली बोटे त्यांच्या
लालभडक रक्ताने ?
अग ! तुझं हृदय विरघळून जाईल खात्रीने तेव्हा
आणि समजेल तुला तेव्हाच की,
आपण नाही करू शकत हे !

[ जेसन राजप्रासादाकडून येतो; मीडिआकडे घरातून दोन परिचारिका येतात. ]

**जेसन** : मला बोलावणं पाठवलंस तू ? आलोय मी त्याप्रमाणे. तू जरी माझा तिरस्कार करीत असलीस तरीही मी तुझे ऐकून घ्यायला तयार आहे. काही तरी नवी विनवणी दिसत्येय ? काय आहे ती ?

**मीडिआ** : जेसन मी जे काही बडबडले त्याबद्दल क्षमा कर असं विनविते मी तुला. चालवून घेतला पाहिजे तुला माझा आकस्तळा स्वभाव. आपण उभयता आहोत परस्पर प्रीतीच्या अनेक स्मृतींचे भागीदार. मी स्वतःचीच केव्हापासून काढते आहे खरडपट्टी. मी स्वतःला बजावलं, " मूर्ख आहेस तू ! अग माणसं तुझ्या अधिकाधिक कल्याणासाठी योजना करीत असताना चिडचीड करणं, राजाबरोबर आणि आपल्या पतीबरोबर भांडण उकरून काढणं, हा शुद्ध वेडेपणा आहे तुझा. मूर्ख आहेस तू ! तो जे करतो आहे ते आपणासर्वांनाच हितप्रद होणार आहे. त्याची बायको राजघराण्यातील ! तिचे मुलगे होणार तुझ्या मुलांचे भाऊ

का नाही झटकून टाकीत तू तुझा क्रोध ? देवच जर चांगलं तरतूद करताहेत कृपावंत होऊन तर आता बिघडलं कुठं ? काही झालं तरी दोन लेकरं आहेतच ना अजून माझी ! त्यांच्या संगोपनाची व्यवस्था व्हायला हवी ना ! मला जाणवलं. आपण इथे आलो ते परकी निर्वासित म्हणून. इथे आपले सगेसोयरेही आहेत नाममात्र. मला माझा मूर्खपणा समजून आला, या सर्व गोष्टींचा विचार केल्यावर समजलं मला, रागावणे किती व्यर्थ आहे ते ! म्हणून आता आपण जे काही केलंत त्याचं स्वागत करते मी. हे नवीन स्नेहसंबंध जोडण्यात आपला सुज्ञपणा दिसून आला असंच आता माझं मत झालं आहे. सगळा आचरटपणा झाला तो माझाच. खरं तर मी मदत करायला हवी होती आपल्याला या योजनांत ! संतोष मानायला हवा होता मी आपल्या मधुचंद्राची शेज सजविण्यात, आपल्या वधूची परिचर्या करण्यात. पण आम्ही बायका असं नाही म्हणायचं मला, की आम्ही स्वतःच वाईट असतो म्हणून— पण या अशा आहोत खऱ्या. जेसन ! तुम्ही मात्र अनुकरण करता कामा नये आमच्या या गैर वर्तणुकीचे, मूर्खपणाचे. तसेच आमची बरोबरी करण्यासाठी मूर्खपणाला मूर्ख कृती करूनच उत्तर पण देऊ नका. अगदीच चुकलं होतं माझं ! कबूल करते मी ! माझी हार पत्करते मी. पण त्यावर त्यानंतर मी जास्त शहाणपणाने विचार केलाय. बाळांनो ! अरे बाळांनो ! आत आहात का ? या बरं जरा बाहेर ?

[ मुले बाहेर येतात, त्यांच्या मागोमाग त्यांचा शिक्षक येतो. ]

मुलांनो ! भेटा आपल्या वडिलांना प्रेमाने, मी भेटते आहे तशी आणि गुंफा आपले हात त्यांच्याभोवती. विसरून जा हं आपले सगळे भांडण आणि प्रेम करा त्यांच्यावर. तुमची आई आत्ता करते आहे तसं. दिलजमाई केलीय आम्ही. रागबिग सारा संपला आहे आता. घ्या ! बाळांनो ! घ्या त्यांचा हातात हात [ डोळ्यांत एकदम अश्रूंचा लोट येतो; ती तोंड बाजूला वळविते. ] माफ करा हं ! भविष्यात आपल्यासाठी काय दुःख पडलंय याची आठवण आली मला [ जेसनला आलिंगन दिल्यावर मुलं परत मीडिआकडे वळतात. ] बाळांनो ! तुमच्या सर्व आयुष्यभर असेच पसराल का आपले बाहुपाश माझ्यासाठी ? हाय ! अश्रू आणि भीती, याने व्यापून टाकलंय माझं पीडित हृदय ! या इतक्या कालावधीनंतर संपवलेय मी, तुमच्या वडिलांबरोबर असलेले माझे भांडण आणि आता बघा, न्हाऊ घालते आहे मी या कोवळ्या मुखाला माझ्या आसवांनी.

**नारीवृंद** : मला सुद्धा वाटतं
अश्रूंनी पुन्हा पान्हावणार आहेत माझे डोळे
विनाशाच्या वाटचालीला आता तरी खीळ पडो
आता नको पुढे पाऊल टाकू !

**जेसन** : तू आपला विचार बदललास मीडिआ ! फार समाधान वाटलं मला हे पाहून.

तुझ्या मागच्या क्रुद्ध नाराजीला खरोखरीच दोष देत नाही मी. आपला नवरा दुसऱ्या बायकोशी विवाहबद्ध होतो तेव्हा बाईला राग येणे स्वाभाविकच आहे अगदी. पण अधिक शहाणपणाचे विचार सुचले तुला नंतर. उशिराने का होईना, शेवटी योग्य तोच निर्णय पटला आहे तुला. हीच आहे योग्य कृती समंजस बाईची. मुलांनो ! तुम्हाला हेच सांगायचंय की तुमच्या वडिलांनी अगदी काळजीपूर्वक विचार केलाय आणि तुमच्यासाठी ईश्वरी सहाय्याने उज्ज्वल भविष्याची योजना करून ठेवलीय. अरे ! योग्य वेळ आली की माझी खात्री आहे, तुम्ही आपल्या भावांसमवेत कॉरिन्थमधील मोठे धुरीण ठराल. मात्र चांगले मोठेधाटे आणि बलदंड व्हा. तुमचा पिता आणि त्याचे मित्र असलेले देव, बाकी सर्व काही आपल्या काबूत ठेवतील. तुम्ही जेव्हा दणकट होऊन पूर्ण तारुण्यात याल तेव्हा माझ्या शत्रूंना पाणी पाजताना पहायचंय मला तुम्हाला. [ मीडिआ पुन्हा भावनाविवश होऊन रडते. ] हे काय आता ? आता कशासाठी हा आसवांचा महापूर ! अशी निस्तेज का दिसतेस? आवडलं नाही का तुला मी काय बोललो ते ? तोंड का फिरवतेस असं ?

**मीडिआ :** छे ! छे ! कुठं काय ? काहीसुद्धा नाही. मुलांचाच विचार चालला होता माझ्या मनात.

**जेसन :** मी सगळी काही व्यवस्था करीन त्यांची ! निर्धास्त रहा अगदी !

**मीडिआ :** होय ! निर्धास्त आहे मी. मी आपल्या शब्दांवर अविश्वास दाखविते असे नाही, पण आम्ही शेवटी बायका त्या बायकाच. डोळे कसे अगदी सहजासहजी ओले होऊ लागतात.

**जेसन :** इतकं का वाईट वाटून घेतेस मुलांबद्दल !

**मीडिआ :** किती केलं तरी आई आहे मी त्यांची ! तुम्ही जेव्हा त्यांना दीर्घायुष्य लाभावे म्हणून आळवणी केलीत ना, तेव्हा मला वाटलं; पण होईल का असं ! आणि मला भरून आलं हो ! पण मला जे तुम्हाला सांगायचंय, त्यातलं थोडसंच सांगून झालं की ! आता बाकीचे उरलेले सांगते हं ! क्रेऑनने निर्णय घेतला मला कॉरिन्थ बाहेर पाठविण्याचा. नंतर मला पण पूर्णपणे वाटायला लागलं की माझ्यासाठीसुद्धा हाच मार्ग सर्वोत्कृष्ठ. मी जर इथेच राहिले तर त्याला नि तुम्हाला माझे रहाणे त्रासदायकच वाटणार. लोकांना वाटतं, तुम्हा सर्वांबद्दल माझ्या मनात अढी आहे. म्हणून जायलाच हवं मला. पण मुलं !—ती मात्र तुमच्या नजरेखाली वाढली तर मला जास्त बरं वाटेल. त्यांना इथेच राहू देण्याबद्दल क्रेऑनच्या विनवण्या करा ना !

**जेसन :** नाही सांगवत मी त्याचे मन वळवू शकेन असं. तरीही मी प्रयत्न करून पहातो. तर मग—हे पहा !

**मीडिआ :** तुमच्या पत्नीलाच सांगा ना, मुलांबद्दल तिच्या वडिलांपाशी रदबदली करायला ?

**जेसन :** अं ! अरे हो ! हो ! निश्चितच. खात्री आहे माझी, ती आपल्या वडिलांचे मन वळवीलच.

**मीडिआ :** इतर स्त्रियांसारखीच ती असेल तर खात्रीनेच यशस्वी होईल ती मन वळविण्यात. पण मीसुद्धा काही सहाय्य करू शकेन या कामात. मी तुमच्या पत्नीला एक देणगी पाठवते. या भूतकालावर कुठेही या वस्तूंपेक्षा जास्त मनोहर वस्तू नाही आढळायच्या. मुलं घेऊन जातील ही भेट. अग ए दासींनो ! एकीने कुणीतरी झटकन जा आणि आणा पाहू तो पोषाख आणि तो सुवर्ण किरीट ! माझ्या वडिलांचे वडील, प्रत्यक्ष भगवान सूर्यनारायण, यांनी आपल्या नंतरच्या पिढ्यांना दिलेला ठेवा आहे हा. एक राजवंशीय उमदा पती आणि शिवाय या बहुमोल देणग्या, 'आपल्या, अगदी आपल्या मालकीच्या' असं जेव्हा तिला सगळ्यांना ठासून सांगता येईल तेव्हा तिचं सौख्य शतगुणित होईल.

[ एक दासी करंडक घेऊन येते. मीडिआ तो मुलांच्या हातात देते. ]

बाळांनो ! धरा बरं नीट या देणग्या. पोचत्या करा त्या साऱ्या त्या राजवंशीय धन्य वधूकडे आणि अगदी तिच्याच हातात द्या बरं का ? जा ! अशा प्रकारच्या देणगीत जी गुणवत्ता असायला हवी, ती सारी पूर्णत्वाने आढळेल तिला यात.

**जेसन :** अगे वेडे ! कशाकरिता तू वंचित होतेस अशा वस्तूंना ! राजप्रासादात कपड्या-लत्त्यांची वाण आहे असं का वाटतं तुला ? का तिथे पुरेसे सोनं नाही असं समजतेस ? ठेवून दे त्या तुझ्याजवळ. उगीच देऊन टाकू नकोस. माझ्या पत्नीला माझी जर काही किंमत असेल तर या मूल्यवान भेटींपेक्षाही माझ्यासाठीच ती मान्य करील माझं म्हणणं. खात्री आहे माझी त्याबद्दल.

**मीडिआ :** आता उगाच अडवू नका मला. अहो ! असं म्हणतात की देवांनासुद्धा राजी करतात देणग्या ! मग मर्त्य मानवांचे काय ? सुवर्ण हे हजारो तर्कशुद्ध मुद्द्यांपेक्षा जास्त बिनतोड वाटते त्यांना. आजचा दिवस आहे तिचा ! आजपासून तिचे वैभव आणखी नवी उंची गाठील. ती राजवंशीय, त्यातून तरुण. माझ्या मुलांना हद्दपारीपासून वाचविण्यासाठी मी वेळी प्राणही देईन, मग सोन्याची काय कथा ? चला ! बाळांनो ! तुम्ही दोघेजण त्या वैभवशाली प्रासादात जा. आपण हद्दपार होऊ नये म्हणून आपल्या वडिलांच्या नूतन पत्नी-पुढे माझ्या स्वामिनीपुढे-गुडघे टेका, विनवणी करा आणि मुख्य म्हणजे ती, ही भेट अगदी स्वतःच्या हातात घेईल याकडे लक्ष द्या. जा झटकन ! यशस्वी व्हा ! आणि ज्यासाठी तुमची आई तळमळते आहे, ते साध्य झाल्याची चांगली बातमी घेऊन या परत.

[ जेसन जातो. मागोमाग मुलं व त्यांचा शिक्षक हेही जातात. ]

**नारीवृंद :**

उरली नाही आता बिलकूल आशा
अगदी नाही आशा मुलं जिवंत राहायची
या क्षणी ती वाटचाल करीत आहेत हत्याकांडाची
नववधू स्वीकारील तो सुवर्णकिरीट
स्वागत करील त्या निष्ठुर मारेकऱ्यांचे
आणि आपल्याच हाताने बसवील काळजीपूर्वक
आपल्या सोनेरी केशकलापावर
मृत्यूचे ते आभरण.

नाकारू शकणार नाही ती
असली मोहकता ! असली स्वर्गीय झळाळी !
ती स्वतःलाच लपेटून घेईल त्या पोषाखांत
आणि आच्छादील आपला केशकलाप
घडीव सोन्याच्या त्या किरिटगुच्छाने
असे सजवीत नववधूचे लावण्य
गृहप्रवेश करायला नव्या घरसंसारात
मृत जीवांमध्ये नांदायला
असा प्राणघातक आहे हा सापळा
ज्यात अडकणार आहे ती—
अटळ आहे मृत्यू, जो तिष्ठतो आहे तिच्यासाठी
सुटकाच नाही त्याच्या क्रूर मगरमिठीतून

आणि जेसन ! दुर्दैवी जीवा !
विवाहसंबंधात कमनशिबी ठरलेल्या राजाचा जामात तू
कल्पनाच नाही रे तुला
की ज्या कृपेची याचना करतोयस तू
ती मोहरबंद करील तुझ्या पुत्रांचा विनाश
आणि आवळून टाकील तुझ्या बायकोला
एक भयानक कर्मभोगाने
हतभागी जेसन

उज्ज्वल भवितव्याबद्दल इतका दृढविश्वास
पण खरोखरी काय वाढून ठेवलं आहे
याबद्दल मात्र गाढ अज्ञानांधकार

त्यानंतर
तुझ्या वाट्याला येणाऱ्या दुःखाबद्दल,
अनुकंपनीय माते
अश्रू ढाळीत आहे मी.
अग ! विवाहशय्येबाबतच्या आपल्या मत्सरापायी
तू करणार हत्या आपल्याच अपत्यांची ?
कारण काय तर—
हक्क आणि निष्ठा यांना डावलून
त्याग केला तुझा, तुझ्या पतीने
आणि संगत धरली आहे
दुसऱ्या पत्नीची

[ शिक्षक दोन मुलांसह राजप्रासादातून परत येतो ]

**शिक्षक :** बाईसाहेब ! या दोनमुलांची रद्द करण्यात आली आहे हद्दपारी. राजकन्येने यांच्याकडून स्वहस्ते घेतल्या तुमच्या देणग्या; फार आवडल्या त्या तिला. मुलांना आता राजप्रासादांत शत्रू उरले नाहीत. [ मीडिआ स्तब्ध रहाते ] छान ! चांगलीच जिरली तुमची !! म्हणजे ही बातमी चांगली नाही की काय ? अशा का उभ्या अशनिपात झाल्यासारख्या ?

**मीडिआ :** [ स्वतःशीच ] फारच भीषण ! फारच कठोर !

**शिक्षक :** आपले शब्द अगदीच विसंगत आहेत आणलेल्या बातमीशी !

**मीडिआ :** काय निर्घृण आहे हे जीवन !

**शिक्षक :** तर मग अजाणता काहीतरी भलतंच भयंकर नाही ना मी सांगितलं ? मला वाटलं होतं, माझी बातमी चांगली होती फार.

**मीडिआ :** तुझी बातमी आहे ती ठीक आहे. तुला नाही दोष देत मी !

**शिक्षक :** मग डोळ्यांतून अश्रू गाळीत, जमिनीकडे नजर रोखून का उभ्या आहात अशा ?

**मीडिआ :** पुराण्या मित्रा ! तशाच बळकट कारणाने रडायला आलंय मला. ईश्वरी इच्छा आणि माझी स्वतःची मांगहृदयी करणी—यांनी घडवून आणलंय हे सगळं !

**शिक्षक :** धीराने घ्या बाईसाहेब ! कालांतराने आणतील परत तुमची मुलं तुम्हाला स्वगृही.

**मीडिआ :** त्याच्या आधी मला आणखी काही जणांना पाठवायचंय त्यांच्या त्यांच्या घरी—देवारे ! हाय ! हाय ! !

[ रडू लागते. ]

**शिक्षक :** जगात तुम्ही काही एकट्याच माता नाही आपल्या मुलांपासून ताटातूट झालेल्या ! आपण सगळी मर्त्यच. तुम्ही इतकं लावून घेऊ नये मनाला.

**मीडिआ :** होय मित्रा ! मानतो मी तुझे म्हणणे. जा बरं आता आत, नि नेहमी करतोस तशी त्यांची सगळी तयारी कर.

[ शिक्षक जातो. मुलं मीडिआकडे येतात. ]

बाळांनो ! माझ्या लाडक्यांनो ! तुम्हाला तुमचं गाव आहे आणि स्वतःचे घरही आहे आणि जेव्हा आपण एकमेकांपासून अलग होऊ, तेव्हा तुम्ही निरंतरचे रहाल त्या घरात. तुम्ही असाल मातृहीन आणि मी दुःखीकष्टी. तुमच्या सहवासाचे सुख मनाजोगे मिळण्यापूर्वीच तुम्ही मोठे होऊन वैभवशाली झाल्याचे पहाण्यापूर्वीच मला जायला हवं परक्या भूमीमध्ये हद्दपार होऊन. कधीच दृष्टीस पडणार नाहीत माझ्या तुमच्या नववधू ! कधीच सजविता येणार नाहीत मला तुमच्या सुहागरात्रीच्या शय्या आणि नाही नेता येणार तुम्हाला त्यांच्याकडे उंचावलेल्या मशालीच्या प्रकाशात. कधीही न नमणारे माझे हृदय हेच आहे माझ्या व्यथेचे मूळ. हे सगळं काही व्यर्थच ठरलं तर मग ! तुमचं लालनपालन केलं ती सारी वर्षे, मी वाहिलेली काळजी, तो गात्रे शिणविणारा थकवा, तुम्हाला जन्म देताना झालेल्या त्या प्रसव-वेदना ! होय ! खरंच सांगते एकेकाळी फारफार अपेक्षा बाळगल्या होत्या मी तुमच्याकडून वेडेपणाच होता तो. वाटलं होतं, म्हातारपणी काळजी घ्याल तुम्ही माझी; अंत्यसंस्कार करण्यासाठी माझा मृत देह आपल्या हातांनी गुंडाळाल कफनात. मग लोक किती हेवा करतील माझा, अशी मुलं लाभल्याबद्दल ! तो मधुर पण दुःखद विचार मावळलाय आता. तुमच्यापासून दुरावल्यावर माझं जीवन ठरेल केवळ मनस्ताप आणि यातना. यापुढे आपल्या या प्रिय नेत्रांनी कधीच पहाणार नाही तुम्ही आपल्या आईकडे. जीवनाच्या एका वेगळ्याच क्षेत्रात यापुढे होणार आहे तुमचा प्रवेश.

प्रिय बाळांनो ! असे का पहाताय टक लावून माझ्याकडे ? हसता आहात माझ्याकडे बघून ! तुमचं शेवटचंच हास्य ! पण का ? का अशी वेळ यावी ? [ ती रुदन करू लागते. मुलगे तिच्यापासून थोडे दूर सरकतात. व ती नारीवृन्दाकडे वळते ] हाय ! करू तरी काय आता मी ? बायांनो ! माझी सगळी, सगळी हिंमत संपलीय ! यांची ही कोवळी, तरतरीत मुखकमलं ! नाही जमणार मला हे ! विचारसुद्धा करणार नाही त्याचा मी यापुढे ! मी त्यांना

कॉरिन्थमधून दूर घेऊन जाईन. मला स्वतःलाच जर त्यामुळे दुप्पट दुःखी व्हावं लागणार असेल तर केवळ त्यांच्या पित्याला यातना देण्यासाठी काय म्हणून मी इजा करू माझ्या मुलांना! निश्चित ते मी करणार नाही. त्याचा विचारसुद्धा नको पुन्हा.

काय झालंय तरी काय मला? माझ्या वैऱ्यांना फिदीफिदी हसायला मी संधी देणार आहे की काय? त्यांना बेलाशक निसटून जाऊ देऊ मी त्यांच्या अपराधाची गय करून, काहीच शिक्षा न करता? ते कृत्य करण्यासाठी मला व्हायला हवं वज्रकठोर! काय भेकड आहे मी! मृदु, मुळमुळीत भाषणाने स्वतःच्याच निर्धाराला मोहात पाडत्येय? मुलांनो! आत जा. [ मुले दाराकडे जातात आणि तिच्याकडे पहात दारात उभी रहातात ] मी करणार असणाऱ्या होमाच्या प्रसंगी उपस्थित रहाणं वैध नाही असं जर वाटत असेल कुणाला' तर त्याबद्दलची काय ती खबरदारी त्यांनी घ्यावी. माझा हात नाही लटका पडणार.

हाय रे माझ्या हृदया! नको! नको करूस असं काही! हाय! व्यथित हृदया! जगू दे त्यांना! वाचव तुझ्या मुलांना! सगळीच राहू आपण एकत्र अथेन्समध्ये सुखरूपपणे! आणि सुखी करतील तुला ती...सुखी करतील? ...नाही! नाही!! नाही!!! नरकाच्या खोल गर्तेत असणाऱ्या वैराच्या अधिष्ठात्या साऱ्या पिशाच्चयांना स्मरून सांगते; नाही! मागे राहू देणार नाही मी माझ्या मुलांना माझ्या शत्रूंच्या रागाची भक्ष्ये व्हायला. कोठल्याही परिस्थितीत आता यापासून सुटका नाही हे निश्चित. होणारी गोष्ट होऊन चुकलीय. होय! आता तो सोनेरी किरीट तिच्या मस्तकावर असेल! त्या पोषाखातील राजघराण्यातील ती नववधू, आता मृत्युपंथाला लागली असेल! मला ठाऊक आहे सगळं. माझ्या प्रवासाचा मार्ग दुःखाचा आहे आणि त्याहूनही अधिक दुःखद व खडतर मार्गात पाठविणार आहे मी या मुलांना! हे सगळं व्हायचंच आहे. तर मग आता बोलतेच मी त्यांच्याशी. या! बाळांनो, या! लाडक्या बाळा! दे तुझा हात माझ्या हातात! आणि, तू ही दे रे बाळा! आता आपण निरोप घ्यायला हवा एकमेकांचा. हाय! हा प्रिय हात, आणि हे लडिवाळ मुखमंडळ, तुमचा हा उमदा; बाळसुलभ निरागस चेहेरा आणि देह! लाडक्या बाळांनो! तुम्हा दोघांनाही शुभाशीर्वाद, पण इथे नाही ते सफल होणार! तर त्या तिथे होतील. या लोकीच्या सर्व शुभांची धूळधाण केलीय तुमच्या बापाने. किती सुख वाटते आहे तुम्हाला कवटाळण्यात! बालकांची त्वचा असतेच कशी मुलायम आणि त्यांचे उच्छ्वासही शुद्ध, पवित्र. जा! जा आता दूर! या पुढे नाही पाहवणार मला तुमच्याकडे! सहनशीलतेच्या पलीकडे आहेत माझ्या वेदना! [ मुले आत जातात. ] समजतेय मला किती भीषण आहे, मी आता काय करणार आहे ते. पण जीवनातील साऱ्या भीषणतेचे उगमस्थान असा हा क्रोध, माझ्या निर्णयशक्तीवर स्वार झाला आहे.

[ राजप्रासाद दिसेल अशा प्रकारे मीडिआ उभी राहते. ]

**नारीवृन्द :**

केले आहेत मी अनेकदा वादविवाद
अति सूक्ष्म मुद्यात शिरून आणि अधिकाधिक तावातावाने
स्त्रीला शोभणार नाही कदाचित
अशा प्रकारे

पण बायकांनासुद्धा असते बुद्धिमता खरोखरी
आमच्या स्वभावाचाच भाग
आणि आम्हाला जीवनात करते ती रास्तमार्गदर्शन
आमच्यापैकी सर्वांनाच नसते ती
मान्य आहे मला
पण तुम्हाला आढळतील कदाचित
स्त्रियांच्या विस्तृत मेळाव्यात काही थोड्या
ज्या निश्चितच असतात समर्थ
समर्पक विचार करायला

आणि हे आहे माझे मत
ज्या स्त्रिया आणि पुरुष
असतात कायमचे अपत्यहीन
ते असतात जास्त भाग्यवान
अपत्यांच्या मायबापांपेक्षा
निपुत्रिकांना साधनच नसतं
अपत्य असणं हे शाप की वरदान हे समजण्याचे
पण अपत्यहीन असल्याने
ते मुक्त असतात अनेक व्यथांमधून

परंतु जे वाढवीत असतात आपल्या घरांमधून
अपत्यांच्या मधुर देणगीला
त्यांना पहाते मी नेहमीच
सतत काळजीच्या भाराने वाकलेले आणि खंगलेले

प्रथम विवंचना;
त्यांना करायचं कसं लहानाचं मोठं
निरोगी आणि सुरळीत अवस्थेत
नंतर
जीवननिर्वाहापुरेशी मालमत्ता
वारसाहक्काने त्यांना प्राप्त करून देण्यासाठीच्या विवंचना
त्यानंतर मग आणखीही एक काळजी !
कधीच अंदाज करू शकत नाहीत ते
की जे कष्ट उपसतो आहोत आपण
ते परिणामी गुणी मुलांसाठी, की
नालायक गुणहीन कारट्यांसाठी

आणि मानवीजीवनाला व्यापून रहाणाऱ्या
सर्वसाधारण दुःखा व्यतिरिक्त
आहे आणखी एक अधिक खडतर दुःख
समजा ! अखेरीस त्यांचे सगळे ठीकठाक झाले
त्यांची मुलबाळंही झाली मोठी
आणि आणखी विशेष सांगायचं म्हणजे
निघाली प्रेमळ आणि सचोटीची
तर मग काय घडतं ?
दुर्दैवाचा एक अंधारातील घाव !
मृत्यू येतो कुठून तरी
घेऊन जातो तुमच्या बालकांना अज्ञानात
मग कशासाठी रहावे मर्त्यमानवाने
देवांशी कृतज्ञ !
आपल्याला लाभलेल्या अपत्यांबद्दल
जो देव
आधीच त्यांच्यावर असणाऱ्या दुःखाच्या ओझ्यात टाकतो भर
या आणखी एका दुःखाची
सर्व दुःखात अत्यंत दुःखदायी

**मीडिया :** सख्यांनो ! फार वेळ वाट पहातेय मी; राजवाड्यातून काही वार्ता येईल

म्हणून. काय झालं असावं पुढे ! जेसनचा एक दास धापा टाकीत येताना दिसतोय मला. नक्कीच भयंकर बातमी आणणार तो.

[ दूत प्रवेश करतो. ]

**दूत :** मीडिया ! दूर निघून जा ! पळून जा ! हाय रे ! कसली करणी ही ! किती अमंगल किती भयानक ! जहाज मिळव, रथ घे; जे जमेल ते साधन घे आणि जा निसटून झटकन.

**मीडिआ :** काय म्हणून पळून जायचं मी !

**दूत :** ती ठार मेली ना ! राजकन्या आणि तिचा पिता, क्रेऑनसुद्धा. दोघेही ठार मरण पावली आहेत, तुझ्या विषप्रयोगाने.

**मिडिआ :** तुझी बातमी तर आहे सर्वोत्कृष्ट. आजपासून मी तुला माझा सुहृद् आणि हितकर्ता समजते.

**दूत :** काऽऽय ! शुद्धीवर आहेस का तू ? का ठार वेड लागलंय ! राजघराण्याविरुद्ध असला हीन गुन्हा तर केलासच. अन् त्याशिवाय ते वृत्त ऐकताना तुला आनंदाचे भरते येते आहे ? थरकाप नाही होत तुझा अशा गोष्टींनी ?

**मिडिआ :** तुझ्या ताशेऱ्याला योग्य असे उत्तर देऊ शकते मी मित्रा ! पण अमळ विसावा घे. सांग मला कसे मेले ते ! दुप्पट आनंद मिळवून देणार आहेस तू मला, त्यांना आलेले मरण भयंकर असेल तर.

**दूत :** जिथे विवाह साजरा झाला होता, त्या राजप्रासादात आपल्या पित्याबरोबर त्या दोन लहान मुलांनी प्रवेश केला ना, हातात हात घालून; आम्हा चाकरांना फार आनंद झाला तेव्हा. तुम्हांला कसं वागवलं गेलं होतं, ते ऐकून आम्हा सर्वांनाच वाटलं होतं वाईट आणि आता बातमी गेली एकाकडून दुसऱ्याकडे की तुम्ही आणि जेसनने मिटवून टाकलंय ते सारं प्रकरण म्हणून. फार बरं वाटलं आम्हांला मुलांना पाहून. एकाने त्यांच्या हाताचे चुंबन घेतले, दुसऱ्या कुणी त्यांच्या मोहक केसांचे. मी स्वतःतर इतका खूष होतो की त्यांचे मागोमाग मी गेलो राजकन्येच्या महालात; आमच्या बाईसाहेब–आपल्या ऐवजी आम्ही हल्ली ज्यांना बाईसाहेब म्हणतो त्या– त्यांची नजर आपल्या मुलांची जोडी येताना दृष्टीस पडण्या पूर्वी फक्त जेसनवरच खिळून राहिली होती. पण मुले दृष्टीला पडताच त्यांनी आपले डोळे मुलांकडे वळवले आणि मुलं आपल्या महालात आल्याचं पाहून अस्वस्थ होत त्यांनी आपले मोहक मुख बाजूला फिरविले. मग त्यांचा तो तिरसटपणा त्यांचा तो लहान पोरीला शोभणारा तापटपणा शांत करायला सुरुवात केली तुमच्या यजमानांनी. ते म्हणाले, ' तू अशी दावेदारी करता कामा नये आपल्या स्नेह्यांशी. वळव पाहू तुझा मुखडा इकडे नि दे सोडून रागावणं ! ज्यांच्यावर तुझा पती प्रीती करतो. त्यांच्यावर तूही केली पाहिजेस माया. आता या भेटीचा स्वीकार कर आणि माझ्यासाठी म्हणून विनंती कर तुझ्या वडिलांना यांची हद्दपारी थांब-

विण्याबाबत." मग जेव्हा कां त्या मोहक भेटी पाहिल्या तेव्हा बाईसाहेब विरघळल्या आणि 'होय' म्हणत गेल्या जेसनने जे जे सांगितले त्याला. आणि लगेच तुमची मुलं आणि यजमान महालातून बाहेर पडण्यापूर्वीच त्यांनी तो भरतकाम असलेला झगा घेतला नि आपल्या अंगावर घातला. मग त्यांनी तो सुवर्णकिरीट आपल्या कुरळ्या केसांवर बसवला आणि चकचकीत आरशात पहात त्या नीटनेटकी केशरचना करू लागल्या, त्यात दिसणाऱ्या आपल्या अचेतन प्रतिमेकडे हसतमुखाने नजर टाकीत. मग त्या उठून उभ्या राहिल्या आणि आपल्या शुभ्र, अनावृत्त पावलांनी नाजूक पदन्यास करीत महालातल्या महालात इकडून तिकडे अशा फिरू लागल्या. झगा नेटक्या चुणांनी टाचेपर्यंत कसा रुळतो आहे, हे त्या वारंवार मागे मुरडून पहात होत्या.

आणि मग एकाएकी दिसलं आम्हांला आमचा थरकाप उडवणारं ते दृश्य. त्यांची कांती पालटली, त्यांचे झोक जाऊ लागले, गात्रन् गात्र थरथरायला लागलं त्यांचं. कशाबशा एका खुर्चीपर्यंत पोचून त्या तिच्यावर कोलमडल्या. नाहीतर पार कोसळल्याच असत्या जमिनीवर मग त्यांच्या एका म्हाताऱ्या दासीने—तिला वाटलं पॅन किंवा अन्य कोणी देवगणाने तिला झपाटलं असावं, म्हणून रक्षामंत्र म्हणायला सुरुवात केली. पण मग तिला दिसून आलं की त्या पोरसवदा ओठातून पांढऱ्या बुडबुड्यांसारखा फेस येतोय. डोळे फिरविल्यामुळे तिच्या डोळ्यांतील बाहुल्या पार दिसेनाशा झाल्या होत्या. शरीरातील सारं रक्त ओसरून गेलं होतं. त्वचा फिकट पडली होती. त्या म्हाताऱ्या दासीला आपली चूक उमगली आणि मंत्रोच्चाराची जागा एका हताश किंकाळीत घेतली. एक दासी धावली राजेसाहेबांना बोलवायला. दुसरी धावली जेसनच्या शोधार्थ—त्याच्या तरण्याताठ्या वधूला काय झालंय, ते त्याला सांगायला. इकडे तिकडे धावणाऱ्या लोकांच्या दणदणाटांनी दुमदुमून गेला सगळा राजवाडा.

हे सगळं घडून आलं कांही क्षणातच—तुफान धावणारा जेमतेम शंभर यार्ड धावेल न धावेल इतक्या अल्प अवकाशात ती पडली होती निःशब्द होऊन डोळे मिटून. बिचारी पोर! मग आल्या भानावर आणि त्यांनी अशी फोडली एक भयानक किंकाळी की जणुकाय दोन जीवघेण्या वेदना एकदमच तुटून पडल्या आहेत त्यांच्यावर, प्रथम जो सोनेरी किरीट त्यांनी आपल्या मस्तकाभोवती बसविला. त्यातून उफाळत होता त्यांना गिळून टाकू पहणारा ज्वालेचा अचाट लोळ! आणि जो देखणा पोषाख दिला होता त्यांना तुमच्या मुलांनी—बिचारी दुर्दैवी पोर—तो पोशाखच स्वाहा करीत होता त्यांची विशुद्ध गात्रे. ज्वालांनी लपेटलेल्या अवस्थेतच ताडकन् खुर्चीवरून उडी मारून त्या उठल्या आणि आपलं मस्तक नि लांबसडक केशकलाप सारखा इकडून तिकडे हलवीत धावत सुटल्या त्या सैरावैरा. पण किरिटाचा सोनेरी पट्टा घट्ट बसविला गेला होता. काही केल्या तो हलेना. जास्त जोराने त्या आपलं मस्तक हलवू लागल्या की अखेरीस वेदना यातनांनी शिणून त्या जमिनीवर कोसळल्या।

यांच्या वडिलांशिवाय कोणालाही त्या ओळखण्याजोग्या राहिल्या नव्हत्या. त्यांचे डोळे, यांचा चेहरा, सारी प्रगटवीत होती एकत्र भीषण विद्रूपता. त्यांच्या मस्तकातून ठिबकणारे रक्त, ज्वालांत मिसळून जात होते. विषाच्या अदृश्य दाढेखाली रगडले गेलेले तिचे मांस नखळ अस्थीपासून वितळून निघत होतं. पाइनवृक्षाच्या सालीतून डिंक झिरपावा तसं झरपत होतं. अति भयानक दृश्य. आमच्यापैकी एकाचीही नाही झाली छाती त्यांच्या शरीराला स्पर्श करायची! आम्ही जे पाहिलं तेवढ्यापासूनच पुरेसा धडा मिळत होता आम्हाला.

इतक्यांत त्यांचे वडील आले एकदम महालात. आपल्या कन्येवर कशा प्रकारच्या मृत्यूने झडप घातलीय हे त्या गरीब–बिचाऱ्याला समजलेच नाही. त्यांनी झोकून दिलं स्वतःला यांच्या शेजारी. मोठ्यांनी हुंदके देऊन रडले ते. मुके घेतले त्यांनी तिचे. आपल्या बाहूंत कवटाळलं नि ओरडले, "हतभागी लाडक्या पोरी! कुठल्या देवाने मरण ओढवून आणलं गा तुझ्यावर इतक्या निर्दयपणे! कोण घेत आहे माझ्यापासून हिरावून, माझं एकुलतं एक लेकरू! मी असा म्हातारा. माझं एक पाऊल पडलं आहे कबरीत. माझ्या पोरी! मरू दे मलाही तुझ्याचबरोबर! जरा वेळाने त्यांनी आपले अश्रू व शोक आवरला आणि आपलं थकलेलं जीर्ण शरीर वर उचलीत उठायचा प्रयत्न केला. आणि मग लॅरिलवृक्षाच्या फांद्याना आयव्हीी लता चिकटावी तसे ते तिच्या पोशाखाला घट्ट चिकटून बसले. भीषण धडपड सुरू झाली मग; त्यांनी आपला गुडघा उचलण्यासाठी धडपडावं तोच तिच्या पोषाखाने त्यांना खाली खेचावं. राजेसाहेबांनी जोर लावून उठायचा प्रयत्न केला तर त्यांचे जीर्ण मांस अस्थिपासून सुटून बाहेर यावे. शेवटी राजेसाहेबांनी आपली दयनीय दडपड थांबवली यातनांनी थकून त्यांनी धडपड थांबवली, शरणागती पत्करली. अखेरचा श्वास त्यांचे प्राण घेऊन बाहेर पडला. आणि आता मृत्यूच्या मारमिठीत मीलन झालेले मुलगी आणि बाप पहुडले आहेत तिथे. अश्रू निर्माण झाले ते या अशा दृश्यासाठीच—

मीडिआबाईसाहेब! मला आपल्याला उद्देशून आणखी कांहीच सांगायचं नाही. प्रतिशोध टाळण्यासाठी काय करायंच हे आपण स्वतःच चांगलं जाणता. मानवी जीवनाबद्दल सांगायचं तर ते म्हणजे एक छाया, असं कितीतरी दिवस वाटतं आहे मला. मी हे अगदी न चाचरता न बिचकता सांगतोय की ज्यांना बहुसंख्य लोक समजतात बुद्धिमंत–शहाणपणाच्या सिद्धांताचे उद्‌गाते—त्यांचाच मूर्खपणा बाकीच्या सर्व, माणसांच्या मूर्खपणापेक्षा असतो आत्यंतिक दोषार्ह. सुख ही अशीच एक चीज आहे की जी कोणत्याच मानवाला लाभत नाही. भाग्योदय होतो आणि वाढते वैभव कधी या माणसाचे कधी त्या, पण सुख मात्र कधीच कुणाला मिळत नाही.

[ दूत जातो ]

**नारीवृंद :**

आज पहातोय आपण
कशी देवाची इच्छा करीत आहे
जेसनचा न्याय
आणि कसे बसताहेत अरिष्टाचे तडाखे त्याच्यावर
एका पाठोपाठ एक

**मीडिआ :** सख्यांनो ! स्वच्छ सरळ दिसतो आहे आता माझा मार्ग ! ठार मारायचं मुलांना जमेल तितक्या लौकर आणि नंतर पळ काढायचा कॅरिन्थमधून. आणि परिणामी खुषीने ठार मारण्यासाठी त्यांना परक्याच्या हवाली करायला नको. कारण त्यांना मरायला हवंच कोणत्याही परिस्थितीत. आणि जर मरायला हवं, तर मी जिने त्यांना जन्म दिलाय तिनेच त्यांना ठार मारणं जास्त उचित. तर मग सिद्ध हो माझ्या हृदया ! जे तुला करायचंय ते भयानक आहे खरंच, पण तसंच अनिवार्य ! मग आता कशाकरता थांबायचं ! माझ्या अभागी हाता हो पुढे ! घे ती तलवार ! घे ! आणि कर चाल त्या हताशतेच्या सीमेकडे. भीरूता नको, भावनाविवश करणाऱ्या आठवणी नकोत, विसरून जा, त्यांच्यावर कशी एके-काळी तू ममता केलीस ती. विसरून जा. आपल्याच उदरातून ते जन्माला आले आहेत हे ! आजच्या या छोट्याशा दिवसापुरती विसरून जा ती आपली मुलं आहेत हे. मग रडत राहा खुशाल. तू त्यांना ठार केलंस तरी तुझी ती लाडकी लेकरंच होती, जीवन कसं दावा साधताय माझ्याशी !

[ मीडिआ घरात जाते.]

**नारीवृन्द--**

खडबडून जागी हो भूदेवी !
दृष्टिक्षेप करा इकडे
सूर्याच्या तेजस्वी किरणशलाकांनो
पहा या अभागी स्त्रीकडे
आपल्याच बालकांच्या रूधिराने
तिने आपण खुनी हात कलंकित करण्यापूर्वी
कारण ती आहेत बालके
तुमच्याच सुवर्णवंशाची
आणि जे रक्त वाढलं देवांच्या धमन्यांपासून
ते सांडणं मर्त्यमानवांनी
ही फारच भयानक गोष्ट

स्वर्गात जन्माला आलेल्या तेजोमया
अटकाव कर तिला, थोपवून घर
सुटका कर राजप्रासादाची
या दयनीय, रक्ताने हात माखलेल्या
सूडाच्या पिशाच्चिनीपासून

जी काळजी वाहिलीस त्यांच्याबद्दल आजपर्यंत
ती लोपली का ग एकदम!
ज्यांना वाढिविलेस तूं नवमास उदरांत आपल्या
त्यांच्याबद्दलची ममता
पार फुकट गेलीय! पार व्यर्थ ठरलीय!

खवळलेल्या सागराचे प्रवेशद्वार असलेल्या
निळ्या सिम्प्लीगॅडिजमधून
कशासाठी आलीस तरी तूं इथे?
बालकांच्या हत्त्येत परिणती होणाऱ्या क्रोधांगाराने
का स्वाहकार करावा तुझ्या हृदयाचा?
जिथे नात्यातले रक्त सांडून
भूमी होते अपवित्र
तिथे लटकत असतात शाप
माणसांच्या जीवनावर
आणि हत्त्यां घेते स्वरूप त्या कर्मभोगाचे
जो कोसळतो अपराधी घरावर
स्वर्गातील न्यायदंडानुसार!

[ घराच्या आतील भागातून मुलांची किंकाळी ऐकू येते ]

**नारीवृन्द :** ऐकता आहात कां?
टाहो फोडताहेत मुलं सुटकेसाठी
कमाल झाली या अधम भ्रष्ट स्त्रीची

[ **बालकांचे भयभीत आवाज** : धावा! धावा! वाचवा! आई! सोड ग मला! आई! नको ना जीव घेऊ आमचा! ]

**नारीवृन्द** : जाऊं या कां आपण आत ? मला वाटतं, रक्षण करायला निश्चित जायलाच हवं आपण मुलांचे ?

[ **पुन्हा मुलांचे आवाज** : ‘ वाचवा ! वाचवा ! ! ’ देवाला स्मरून ठार मारत्येय ती आम्हांला. नाही सुटू शकत आम्ही तिच्या तलवारीच्या घावातून ! ]

**नारीवृन्द** : काय ही अधम माता ! अग आपलीच वंशवेल खुडून टाकतेस ? आपल्याच रक्तमांसाच्या मुलांना ठार मारतेस ! जसं व्हायचं ठरवलं होतंस, तशीच पत्थराची आणि लोहाची बनली आहेस तूं !

गतकाळांत एकच होऊन गेली अशी
ऐकलेलं आहे मी जिच्याबद्दल
आणि एकच स्त्री
जिने उचलला होता आपला हात
आपल्याच अपत्यांवर

इनो तिचं नांव
जेव्हा झ्यूसची पत्नी हीरा
हिने इनोला हाकलली होती स्वतःच्या घरांतून
या पृथ्वीवर भटकण्यासाठी भ्रांतचित्त अवस्थेत
तेव्हा आपल्याच अपत्यांच्या हत्त्येने
कलंकित झालेल्या तिने
दुःखवेगांत उडी मारली सागरांत
पाऊल टाकले तिने पुढे अवकाशात
निमुळत्या कड्याच्या सुळक्यांवरून
आणि केली आपली अखेर
मृत्यूत...
आपल्या दोन पुत्रांशी मीलन होण्यासाठी
काय असू शकणार आहे याहून विचित्र आणि भयंकर ?

हाय गे स्त्रीच्या शय्ये !
वासनावेग आणि यातनांनी ग्रासलेली आहेस तूं !
किती दुष्टावा ! किती दुःख !
या पृथ्वीवर पसरावायला
कारणीभूत झाली आहेस तूं !

[ जेसन प्रवेश करतो; धावत धावत आणि धापा टाकीत ]

**जेसन :** त्या तिथे, दरवाज्या सभोवती उभ्या असणाऱ्या बायांनो! मीडिआ अजून आहे का या घरांत? पापी खुनी स्त्री! कां गेली ती, आणि निसटली? शपथेवर सांगतो, राजघराण्यांसाठी मी घेणार असलेल्या सूडातून तिला सुटून जायचं असेल तर भूमातेच्या उदरांत कुठेतरी खोल लपून बसायला हवं तिने, अगर पंख लावून आकाशाच्या पोकळीत उडून जायला हवं. ठार मारलंय तिने, राजाला आणि राजकन्येला! कांहीच शासन न होता आपण सुटू जाऊ असं कां वाटतंय तिला? पण खरं सांगायचं म्हणजे तिच्याबद्दल नाही एवढा कासावीस झालो मी. जास्त फिकिर आहे, मुलांबद्दलची मला. जे दुखावले गेलेत तिचे हातून ते लावतील तिला दुःख भोगायला. मी वाचवायला आलोय माझ्या मुलांना वेळेवरच. उच्चारसुद्धा नको अशा त्यांच्या आईच्या अपकृत्याचा सूड म्हणून क्रेऑनचे कुटुंबीय ठार मारतील त्यांना अशा भीतीने.

**नारीवृन्द :** जेसन कळायचंय तुला अजून, तुझ्यावर केवढं मोठं अरिष्ट कोसळलय ते! नाहीतर नसतं म्हणालास असं.

**जेसन :** कुठलं अरिष्ट? मीडिआ मलासुद्धा ठार मारणाराय की काय?

**नारीवृन्द :** मरण पावली आहेत तुझी मुलं. त्यांच्या आईनच ठार मारलंय तुझ्या दोन्ही मुलांना.

**जेसन :** काय? माझ्या मुलांना ठार मारलं? नुसतं ऐकूनच ठार झालोय मी!

**नारीवृन्द :** ती दोघंही मृत्यू पावली आहेत.

**जेसन :** कुठायत ती? इथे बाहेर तिने त्यांना ठार मारलं की आत घरात?

**नारीवृन्द :** उघड तो दरवाजा नि पहा त्यांना मृत्यूच्या थारोळ्यात पडलेली.

**जेसन :** कोण आहे तिकडे? ए दासा! अडसर काढ या दरवाज्याचे! उघड! आणि बघू दे मला जीवाच्या थरकाप करणाऱ्या त्या दोन गोष्टी, माझे दोन मृत पुत्र आणि जिला मी ठार मारणार आहे अशी ती बया!

(जेसन दारावर धडका मारतो. मीडिआ राजवाड्याच्या छतावर दिसते. पक्षधारी नागांकडून ओढल्या जाणाऱ्या रथांत ती बसली आहे. दोन्ही मुलांची मृत शरीरे तिच्या बाजूला ठेवलेली आहेत.)

**मीडिआ :** जेसन! मृत बालकांना आणि त्यांना जिने ठार मारलं त्या मला शोधण्यासाठी कशाला धडका मारतो आहेस दारावर! थांबव हे, बंद कर सारी हालचाल! जर तुझे माझ्याशी काही काम असेल तर सांग काय हवंय ते! शक्यच नाही तुला, या रथात बसलेल्या आम्हाला स्पर्श करणं! हा रथ पाठवलाय सूर्यदेवाने शत्रूच्या हातून आमचा बचाव व्हावा म्हणून.

**जेसन :** किळस येते मला तुझी! प्रत्येक देवाकडून, माझ्याकडून आणि आखिल मानव समाजाकडून सर्व स्त्रियांत अत्यंत तिरस्कृत समजली गेली आहेस तू. अग! तू आहेस एक आई! स्वतःच्या लहान लेकरांवर तलवार कशी उचलवली तुला? मला अपत्यहीन कसं करून सोडवलं? माझं जीवित कसं उद्‌ध्वस्त करवलं तुझ्याच्याने? अशा या हत्येनंतर निखळ कलंकाने माखलेली तू? सूर्यनारायणाला आणि भूमातेला कसं दाखवशील आपलं तोंड? ठिकऱ्या ठिकऱ्या उडवू देत देव तुझ्या जीवनाच्या. शहाणा झालोय मी आता. पण रानटी लोकांच्या भूमीतून तुझ्या राजवाड्यातून मी जेव्हा घेऊन आलो तुला या ग्रीकांच्या वास्तूत तेव्हा ठार वेडा होतो मी. तू एक चालताबोलता विनाशक शाप—आपला बाप आणि आपली जन्मभूमी यांच्याशी आधीच दगलबाजी केलेली तू—तुझ्या पातकांना योग्य अद्दल घडविणारा सूड देवांनी माझ्यावर सोपवलाय. अर्गोच्या माझ्या देखण्या नौकेच्या तक्तपोशीवर तू प्रथम पाऊल टाकलंस, तत्पूर्वीच आपल्या भावाला ठार मारलं होतंस त्याच्या गृहाग्नी जवळ. ती होती तुझ्या हत्याकांडाची सुरूवात. मग तू झालीस माझी पत्नी नि भार वाहिलास माझ्या अपत्यांचा आणि आता त्यांना ठार मारलं आहेस, केवळ वैषयिक मत्सरातून. जिच्या हातून असं कृत्य घडू शकलं असतं अशी एकही स्त्री नसेल आमच्या हेलासमध्ये. तरी त्यांच्यापैकी एकही स्त्री पसंत न करता मी तुझ्याशी लग्न केलं. माझी पत्नी म्हणून निवड केली, द्वेषाची, हत्येची. तू स्त्री नाहीस! वाघीण आहेस वाघीण! टस्कनमधली शिला राक्षसीण! छे तिच्याहूनही क्रूर! हाय! पण काय उपयोग याचा मी सगळा दिवस तुला शिव्याशाप देत बसलो तरी! पश्चात्तापाचा स्पर्शही होणार नाही तुला. कारण तुझं हृदय आहे साऱ्या भावनांपासून निर्लेप, अलिप्त. जा! चालती हो माझ्या नजरेपुढून! कलंकित डाकिणी! अपत्यघातकी! राहू दे मला एकट्यालाच माझ्या कर्मभोगाबद्दल दुःख करायला. मी गमावून बसलोय माझ्या तरुण वधूला! दोन मुलगे गमावून बसलोय! माझ्या बीजापासून जन्मलेले नि मी वाढविलेले जिवंत असे कधीच पाहू शकणार नाही मी त्यांना पुन्हा!

**मीडिआ :** मला आवश्यक वाटलं असतं तर दिलं असतं मी सविस्तर उत्तर तू म्हणालेल्या प्रत्येक बाबीला. पण मी तुला एकदा किती उपयोगी पडले आहे नि तू कशी केलीस त्याची परत फेड हे आपणासर्वांचा पिता झ्यूस अगदी नीटपणे जाणून आहे. माझ्या शय्येचा अपमान करूनही आपण हौसेमौजेचे जीवन जगू आणि माझ्याकडे उपहासाने हसत राहू असं जर तू समजला असलास तर मोठी चूक होत होती ती तुझी. राजकन्येची सुद्धा चूकच होती आणि क्रेओननेही चूकच केली होती, तुला आपला जामात करण्यात आणि धरून चालण्यात की मला तो हद्दपार करू शकेल. बेदरकार! असं! आता मी वाघीण, शिला ठरले काय? वाट्टेल त्या शिव्यांचा कर माझ्यावर मारा. मी धक्का दिलाय तुझ्या अंतःकरणाला आणि योग्य तीच गोष्ट केलीय.

**जेसन :** तू सुद्धा सोसते आहेस यातना ! माझी हानी ती तुझी सुद्धा कमी हानी आहे का ?

**मीडिआ :** खरं आहे ते—पण माझं दुःख म्हणजे तुझं हास्य ओरबाडून काढण्यासाठी मोजलेली रास्त किंमत.

**जेसन :** अरेरे ! बाळांनो ! काय दुष्ट आई दिली दैवाने तुम्हाला ?

**मीडिआ :** अरेरे ! मुलांनो ! तुमच्या बापाच्या विश्वासघाताची किंमत मोजावी लागली तुम्हाला तुमच्या प्राणांनी !

**जेसन :** माझ्या मुलांना ठार मारणारे हात काही माझे नव्हते ?

**मीडिआ :** छे ! तुझे हात नव्हते ते ! पण तुझी नूतन परिणीत पत्नी आणि तू माझा केलेला अपमान ही कारण झाली त्यांच्या मृत्यूला.

**जेसन :** मी तुझी शय्यासोबत सोडली एवढं कारण पुरेसं वाटलं तुला, त्यांना ठार मारायला !

**मीडिआ :** आणि तुला काय वाटतं ? स्त्रीवर होणारा हा आघात अगदी क्षुल्लकच आहे ?

**जेसन :** होय ! एखाद्या शालीत स्त्रीच्या दृष्टीने. पण तू ? तुला वाटलं जणू सगळं जगच गेलं आपल्या हातून !

**मीडिआ :** मला सुद्धा घाव घालता येतात. तुझे मुलगे मारले आहेत मी.

**जेसन :** मरण पावले ते ? छे ! हयातच आहेत ते, सूड म्हणून तुझ्या साऱ्या जीवनाला पछाडण्यासाठी.

**मीडिआ :** कुणी केली या वैराला सुरूवात ? देवच जाणतात सर्व काही.

**जेसन :** होय ! जाणून आहेत ते तुझ्या अंतःकरणातील पापी कालकूट.

**मीडिया :** बैस करीत माझा तिटकारा ! तुझा कर्णकटू आवाज. किती घृणा वाटते त्या स्वराची मला !

**जेसन :** मला तुझ्या आवाजाची वाटते तितकीच. तडजोडीचं बोलणं करू या नि होऊ एकमेकांपासून दूर ताबडतोब.

**मीडिया :** अगदी खुषीने ! काय अटी आहेत तुझ्या ? काय फर्मावतो आहेस मला ?

**जेसन :** अंत्यसंस्कार करण्यासाठी आणि शोक मानण्यासाठी माझे पुत्र स्वाधीन कर माझ्या.

**मीडिया :** छे ! मुळीच नाही. मी स्वतःच घेऊन जाईन त्यांना हीरा अक्रियाच्या देवालयात. माझ्या वैऱ्यांपैकी कुणीही त्यांच्या थडग्यांचा अपमान करू नये, म्हणून मी स्वतः आपल्या हातांनी देवालयाच्या पवित्र आवारात मूठमाती देणाराय त्यांना. या धर्मभ्रष्ट हत्येचे पातक धुतलं जावं म्हणून कॉरिन्थमधील जनतेने दरवर्षी भंडारा आणि होम हवन विधिपूर्वक

करावं अशी व्यवस्था करण्याचा आदेश देऊन ठेवणार आहे मी. पॉन्डिऑनचा पुत्र ईजिअस याच्या आधाराने माझी रहाण्याची व्यवस्था करण्यासाठी मी स्वतः जाणार आहे अथेन्सला एरेक्थिअसच्या शहराला. तू तुझ्या लायकीनुसार गौरवहीन मरण मरशील; अर्गो जहाजाचा वासा पडून तुझं मस्तक छिन्नभिन्न होईल. अशाप्रकारे तुझ्या माझ्यावरील प्रीतीची ही कथा तुझं दैव अशा हीनदीन रीतीने संपवील.

**जेसन :** बालकांच्या रक्तपाताचा शाप कोसळो तुझ्यावर ! छिन्नभिन्न केलं जावो तुझं अस्तित्व कृतापराधाचा दण्ड देणाऱ्या न्याय देवतेकडून !

**मीडिया :** वचनभंग करणारा, अतिथीला फसवणाऱ्या खोटारड्या ! कोणता देव मान देईल तुझ्या या शापवाणीला !

**जेसन :** ओंगळ ! तिरस्करणीय ! अपत्य घातकी !

**मीडिया :** घरी जा ! बायको थांबून राहलीय अंत्य-संस्कारासाठी !

**जेसन :** जातो मी ! एकेकाळचा पिता, आता अपत्यहीन !

**मीडिया :** इतक्या लौकर नको शोक करायला लागूस ! म्हातारपण येऊ घातलय !

**जेसन :** बाळांनो ! किती प्रिय होता रे !

**मीडिया :** आपल्या आईला ! तुला नव्हे.

**जेसन :** तुला ? आणि प्रिय ? आणि तरी ठार मारलंस तू त्यांना ?

**मीडिया :** होय जेसन ! तुझं हृदय भग्न व्हावं म्हणून !

**जेसन :** त्यांना बाहुपाशात घ्यायला किती आतुर आहे मी ! त्यांच्या ओठांचा मुका घेण्याने दिलासा मिळेल मला.

**मीडिया :** आता येताहेत होय तुझ्या तोंडातून मायेने शब्द ! आता तुला मुका घ्यावासा वाटतोय त्यांचा ! पण त्यावेळी—तेव्हा तू त्यांना झिडकारलंस ! हद्दपार करवलंस !

**जेसन :** देवाखातर, एकदा तरी करू दे ना मला त्यांच्या अंगोपांगांना स्पर्श !

**मीडिया :** नाही करता येणार तुला ? फुकट तोंडाची वाफ दवडू नकोस विनवण्या करून !

**जेसन :** झ्यूस ! ऐकतो आहेस ना काय चाललीय माझी विटंबना ती. आपल्याच बालकांच्या रुधिराने कलंकित झालेल्या या रानटी श्वापदाकडून झिडकारला गेलोय मी.

पण आता काळ आणि शक्ती करू देईल तसं या दुःखमय दिवसांबद्दल मी अश्रू ढाळीत राहीन. तू माझ्या मुलांना कसं ठार मारलंस नि मला त्यांना स्पर्श करायला अगर मूठमाती देऊ द्यायलाही कसं नाकारीत आहेस, याला साक्षी रहायला, देवांना आवाहन करतो मी. ती माझ्या पोटी आलीच नसती, अगर मी जगलोच नसतो त्यांना मृतावस्थेत पहायला नि त्यांचा नाश करणाऱ्या तुलाही—असं काही देव करता तर किती छान झालं असतं ?

[ हे भाषण सुरू असता रथ दृष्टीआड होतो. ]

**नारीवृंद :**

अगणित आहेत प्रारब्धे
ऑलिम्पसचा झ्यूस आदानप्रदान करतो अशी
अनेक गोष्टींचा करतात देव
अगदी विस्मयकारक शेवट
गोष्टी जशा घडतील
असं वाटतं आपल्याला
तशा घडतच नाहीत त्या
अतर्क्य असंसुद्धा आणतात देव
शक्य कोटीत
आणि हेच आहे तात्पर्य
या कथेचे अखेर !

# मीडिआ—टिपणे

१. **इजिअस** ( Aegeus )

पॉन्डिऑनचा मुलगा व सेरॉप्सचा नातू. थीसिअसचा पिता आणि अथेन्सचा राजा.

२. **ॲफ्रोदायती** : ( Aphrodite )

प्रीति व सौंदर्य यांची ग्रीक देवता. एका दंतकथेप्रमाणे ती झ्यूस व डायोनीची कन्या. आणखी एका आख्यायिकेप्रमाणे तिचा जन्म समुद्र फेसापासून झाला. तिच्या नावाचा अर्थ तोच आहे. सागरातून बाहेर आल्यावर प्रथम तिने सायप्रसच्या भूमीवर पाऊले टाकली तेव्हा तिची पाउले पडली, त्या ठिकाणी कोवळे कोवळे तृणांकूर उगवले. वनस्पतीच्या उत्पत्तीशी तिचा संबंध आहे. जनन व आदर्श स्त्री सौंदर्य यांची ती देवता. ग्रीक शहरात तिची सर्वत्र पूजाअर्चा होत असे. तिचा कमरपट्टा हे प्रीतिभावनेचे अमोघ अस्त्र समजले जाई. रोमन लोक हिला व्हीनस म्हणत.

३. **आर्गो** ( Argo )

पेलिअस राजाच्या सांगण्यावरून जेसन कोल्चिस येथील भयंकर नागराजाच्या पहाऱ्यात असणारी सोनेरी लोकर आणण्यासाठी आपल्या जवान मित्रांबरोबर ज्या जहाजातून सागर प्रवासाला गेला होता त्या जहाजाचे नाव. या मोहिमेतील सर्व वीरांना ऑर्गोनॉट्स म्हणत.

४. **आर्टेमिस** ( Artemis )

ग्रीक पुराणातील कुमारीदेवता. वन्यपशू, वनस्पति, पातिव्रत्य, अपत्यजन्म व शिकार, यांच्याशी तिचा संबंध आहे. सर्व सामान्यांची ही आवडती देवता. ती झ्यूस व लेटो याची कन्या व ॲपोलो देवाची जुळी बहीण. तिची मूर्ति बहुशः धनुष्यबाणासहित असते. रोमन हिला दायाना ( Diana ) म्हणत. ट्रॉयच्या रणसंग्रामात ती ॲपोलोप्रमाणेच ट्रोजनांना सहाय्य करी.

५. **अथेन्स** ( Athens )

ग्रीस राज्याची राजधानी. ग्रीकांचे राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक केंद्र. ॲथेन्स हे नाव या शहराची संरक्षक देवता अथीनी इच्यावरून प्रचारात आले.

६. **कोल्चिस** ( Colchis )

प्राचीन लेखकांनी एशियामायनरमधील फासिस नदीच्या खोऱ्याला दिलेले नाव. हा प्रदेश म्हणजे ‘ गॉर्जिअस सोव्हिएट सोशलिस्ट रिपब्लिक ’च्या पश्चिमेला असलेला, पूर्वी ‘ मिंग्रे-लिया ’ या नावाने ओळखला जाणारा प्रदेश. हा भूभाग काळया समुद्राच्या पूर्वेकडील टोकाला जवळजवळ त्रिकोनाकृति असा आहे. ग्रीकांच्या दुपटीने हा समृद्ध व सधन प्रदेश त्यांना फार फायद्याचा होता. जवस, लीनन कापड, शेतीमाल, लोकर, कातडी, मेण, लाकुड सोने व गुलाम, ग्रीकांना या प्रदेशातून मिळत. त्याबदली ग्रीसमधून मीठ, ऑलिव्ह तेल, मातीची भांडी, व सुबक कापड पाठवले जाई. काही प्राचीन लेखकांच्या मते कोल्चिसमधील माणसे काळी व लोकरीसारखी केस असणारी होती. त्यांचे रीतिरिवाज इजिप्शिअस वळणाचे असत. काहीच्या मते कोल्चिअन लोक पीत वर्णाचे होते, कारण ते दलदल व चिकट हवा असणाऱ्या खोऱ्यात रहात व फासिस नदीचे दूषित पाणी पीत. सुसंस्कृत ग्रीक लोक कोल्चिसला व तेथील लोकांना रानटी म्हणत.

७. **कॉरिन्थ** [ Corinth ]

अथेन्सच्या पश्चिमेला अंदाजे पन्नास मैलांवर असणारे शहर.

८. **क्रेऑन** [ Creon ]

लिसिथसचा मुलगा ग्लॉसीचा पिता व कॉरिन्थचा राजा. याची कन्या ग्लॉसी ही जेसनची दुसरी पत्नी.

९. **डेल्फी** [ Delphi ]

ग्रीसमधील शहर. अॅपोलोची सुप्रसिद्ध दैवीवाणी सांगणारे मंदिर याच शहरांत आहे.

१०. **इरकथिअस** [ ErechthEus ]

दंत कथेतील माहितीनुसार अथेन्सचा राजा व देवही. अथेन्सशहराची संरक्षक देवता अथीनी इने आपल्या अथेन्समधील भाग्यमंदिरात त्याची प्रतिष्ठापना केली. अथेन्समधील नागरिकांनी मेंढा व बैल यांचा हवी देऊन त्याला प्रसन्न करून घेतले. त्या नंतरच्या काळात त्या देवालयात अथीनी देवतेशिवाय कुणीही नव्हते. एक प्रचंड नागराज तिथे असे. इरेक्थि अस हा स्वतःच नाग झाला होता. हा नाग पृथ्वीवरील पूर्वजांचा संरक्षक होता.

**११. हेकेटी** [ Hecate ]

तायतनांपैकी एक ग्रीक देवता. असे मानीत की देवलोकांत ती 'लूना' (चंद्रदेवता) पृथ्वीवर डायाना व अधोलोकांत तेथील राणी पर्सेफोनी या रूपाने वास्तव्य करते. या मुळेच तिला तीन मस्तके कल्पिली गेली असावीत. एक अश्वाचे एक श्वानाचे व एक सिंहाचे. काही आख्यायिकांप्रमाणे पर्सिफोनीच्या शोधांत तिने भाग घेतला होता व नंतर तिची सखी म्हणून अधोलोकांत राहिली होती. रस्ते मिळतात अशा वळणावर तिची पूजा करण्यात येते. चेटूक, करणी, अशा कमी प्रतीच्या जादूची ती देवता समजली जाते.

**१२. हेलास** [ Hellas ]

ग्रीसचेच आणखी एक नाव. मूळ ग्रीस, एशिया मायनर, सिसिली आणि भूमध्य समुद्राच्या किनाऱ्यावर असलेल्या ग्रीसच्या सर्व मिळून प्रदेशाला हा शब्द प्राचीन काळी वापरीत.

**१४. हीरा** [ Hera ]

ग्रीक दंतकथेनुसार बलदंड राक्षस क्रोनस व ऱ्हेआ यांची कन्या. झ्यूसची बहीण व पत्नी. ऑलिम्पस देवांची राणी. रोमन लोक तिला आपल्या ज्यूनो सदृश समजतात. हीरा ही झ्यूसची संशयी व आक्रस्तळी पत्नी. अलेकमिनी, लेटो व सिसिली या नवऱ्याला आवडणाऱ्या आपल्या सवतींचा व त्यांच्या मुलांचा ती द्वेष करीत असे. जराशा भीतियुक्त अंतःकरणानेच तिची पूजाअर्चा केली जाई. तिची पूजा अर्चा सर्व ग्रीसमध्ये विशेषतः आर्गेसच्या प्राचीन केंद्रात, मायसिनी व स्पार्टामध्ये होत असे. ही झ्यूसची एकमेव कायदेशीर पत्नी. विवाहाची व स्त्रीजीवनाची देवता समजली जाते.

**१३ अ. हीरा ॲक्रीआ :** ॲक्रीया हे थिसिलीतील एका शहराचे नाव. इथे हीराचे मंदीर होते. यावरून तिला ॲक्रीया हीरा हे नाव पडले.

**१४. हर्मीज** [ Hermes ]

झ्यूस व माइआ यांचा पुत्र. रस्ते व वाटसरू यांचा देव. हा मृतात्म्यांना मार्गदर्शन करतो व इरिस समवेत देवांचे निरोप पोचविण्याचे काम करतो.

**१५. आयोल्कस** [ Iolcus ]

थेसलीतील एक गांव. जेसन याच गावचा. या गावाच्या राज्यावर बापामागून त्याचाच अधिकार. पण त्याचा सावत्र चुलता पेलिअस याने कपटाने राज्य बळकाविले व जेसनला सोनेरी लोकर आणण्याची अवघड कामगिरी सांगितली.

## १५. जेसन [ Jason ]

आयोल्कसचा राजा ओसन याचा मुलगा. बाप मेल्यावर त्याचा सावत्र चुलता पेलीअस याने आयोल्कसेचे राज्य बळकाविले व जेसनचा काटा परस्पर दूर निघावा म्हणून सोनेरी लोकर आणण्याची जवळजवळ अशक्य कामगिरी त्याच्यावर सोपविली. आर्गो जहाजातून तो जवानांबरोबर कोल्चिसला गेला. तेथील राजाची मुलगी मीडिआ ही त्याच्या प्रेमात पडली व अनेक जीवघेण्या संकटातून त्याची सुटका करून तिने त्याच्याशी विवाह केला. पुढे आयोल्कस हून कॅरिंथला आल्यावर जेसनने तेथील राजा क्रेआन याची मुलगी ग्लासी इच्याशी लग्न केले व मीडिआचा राग ओढवून घेऊन सर्वनाश करून घेतला.

## १७ मीडिआ [ Medea ]

कोल्चिसचा राजा इटीस याची कन्या. हिला औषधी मंत्रतंत्र, यांची चांगली माहिती होती. जेसनवर प्रेम बसल्याने तिने त्याला आगीचे निश्वास सोडणाऱ्या वैलांपासून वाचवून सर्प-राजाच्या तावडीतील सोनेरी लोकर मिळवून दिली. परतीच्या प्रवासात आपला पाठलाग करणाऱ्या आपल्या वडिलांना अडथळा यावा म्हणून स्वतःबरोबर आलेल्या सख्याभावाच्या शरिराचे अवयव तोडून तिने समुद्रात टाकले. हेतू हा की ते जमा करण्यात वडिलांचा वेळ जावा व आपला पाठलाग चुकावा. शेवटी आयोल्कसला आल्यावर तिने जेसनचा चुलता राजा पेलिअस याच्या मुलींकडून त्या राजाला ठार मारविले. तेथून पळ काढून ती व जेसन कॉरिन्थला आली. त्यांचा विवाह होऊन त्यांना दोन मुलगे झाले होते. नंतर जेसनने कॉरिन्थचा राजा क्रेओन याच्या मुलीशी दुसरे लग्न केल्याने ती चिडली. जेसनवर सूड उगविण्यासाठी तिने त्याची नूतन पत्नी ग्लासी, राजा क्रेओन व आपली दोन मुले यांना ठार केले व त्याचा न भूतो असा सूड उगविला.

## १८ म्यूजेस ऑफ पिअरिआ [ Muses of pieria ]

या संगीतादि सर्व कला, काव्य वगैरेंच्या देवता असे ग्रीक मानीत. या एकूण नऊ आहेत यांचा जन्म झ्यूस व नेमॉसिनी यांच्यापासून ऑलिम्पस पर्वताच्या पायथ्याशी असलेल्या पिअरिआ येथे झाला. नंतर त्यांचे वास्तव्य बिओशिआतील हेलिकॉन पर्वतावर असे. पारन-सेस पर्वत व कॅस्टीलिअन झरा ही त्यांची पवित्रस्थाने आहेत. या कुमारी देवता आहेत. स्फूर्तिसाठी महाकवी महाकाव्यांच्या प्रसंगी त्यांचे स्तवन करीत.

## १९ ऑर्फिअस [ Orpheus ]

प्राचीन काळचा संगीतज्ञ कवी. आपली पत्नी युरिडिसी हिला आणण्यासाठी तो अधो-

लोकात गेला होता. तिथे त्याने आपल्या जवळचे वाद्य, इतके मधुर व उत्कृष्ट वाजविले की ते ऐकून अधो लोकांतील अधिकाऱ्यांनी त्याला आपली पत्नी परत भूलोकी न्यायला परवानगी दिली. अट एकच होती. पृथ्वीवर पोचेपर्यंत त्याने मागेवळून तिच्याकडे पहायचे नाही. त्याप्रमाणे पत्नीला घेऊन तो पृथ्वीवर यायला निघाला. त्याने एकदाही मान मागे वळविली नाही. पण पृथ्वीवर पोचण्याच्या अगदी थोडेसेच आधी पत्नी येत आहे ना, हे पहाण्यासाठी त्याने मान वळवून मागे पाहिले. त्याच क्षणी ती गुप्त झाली व दुर्दैवी ऑर्फिअस तिला कायमचा गमावून बसला.

## २०. पॅन [ Pan ]

मूळ देवता आर्केडियातील. ग्रीकांची आवडती पण आर्केडियाबाहेर तिचा विशेष प्रभाव नाही. हर्मीज हा पॅनचा पिता व पेनिलोपी ही माता. पॅनचा आकार पशुसदृश—शिंगे, तंगड्या व कान, बकऱ्यासारखे असत. पशूंचे विविध आकार धारण करून तो वाटसरूंना घाबरवी. यावरून आङ्गल भाषेत पॅनिक म्हणजे घाबरी करणारी भीती हा शब्द आला. पॅन पावा वाजवतो व नृत्य करतो.

## २१. पेलिअन [ Pelion ]

थेसिलीतील मॅग्नेशिया प्रदेशातील पर्वत. पुराणांतील कथेनुसार राक्षसांनी या पर्वताचा उपयोग ऑलिम्पसवरील देवांच्या राज्यात जाण्यासाठी शिडीसारखा केला. अर्धी मानवी व अर्धी घोड्याची आकृती असणारे सेन्टॉर्स या पर्वतावर राहात असत. पर्वताच्या शिखरावर झ्यूसचे मंदिर असून तेथे प्रतिवर्षी यात्रा भरते. या पर्वताच्या उतरणीवर दाट झाडी आहे. आर्गो जहाजासाठी या पर्वतावरील लाकडे तोडली होती.

## २२. पेलिअस [ Pelias ]

थेसिली प्रांतातील आयोल्कसचा राजा. राज्यावर खरा अधिकार जेसन याचा. कारण जेसन हा ईसनचा मुलगा. ईसन हाच खरा राजा. पण तो मृत झाल्यावर जेसनला राज्य देण्याऐवजी ईसनचा सावत्र भाऊ–जेसनचा चुलता पेलिअस याने ते राज्य अन्यायाने बळकाविले व जेसनचा कायमचा निकाल लावावा म्हणून त्याला कोल्चिसमधील सोनेरी लोकर आणण्याच्या अशक्यप्राय कामगिरीवर पाठविले. ही अवघड कामगिरी मीडिआच्या सहाय्याने पुरी करून जेसन तिच्यासह आयोल्कसला आला; तेव्हा जेसनला राज्य मिळावे म्हणून मीडिआने पेलिअसच्या मुलींकडून पेलिअसला ठार करविले.

**२३. फीबस** [ Phoebus ]

ॲपोलोचे आणखी एक नाव. सूर्यदेवता, ग्रीकांचा एक प्रमुख देव, झ्यूस व लेटो यांचा पुत्र, आर्टेमिसचा जुळा भाऊ. डेलॉस बेटात याचा जन्म झाला. हा भविष्यज्ञानाचा व संगीताचा अधिष्ठाता देव आहे. डेल्फी इथे त्याचे मंदिर आहे.

**२४. सिम्प्लेगॅडीज** [ Symplegades ]

काळ्या समुद्राच्या प्रवेशद्वाराशी बॉस्परसच्या मुखाशी असलेल्या खडकाचे नाव. निळसर रंगाचे हे दोन खडक दोन बाजूला असून ते सायनिअन ( Cyanecen ) या नावानेही ओळखले जातात. हे खडक एकदम बाजूला होत व एकदम मिटत. त्यांत केवढ्याही मोठ्या जहाजाचा निकाल लागे. फीनिअस या अंधराजाची हार्पीजच्या तडाख्यातून सुटका केल्यावर त्याने सिम्प्लेगॅडीजच्या निळ्या कड्यांमधून कसे जायचे ते सांगितले व त्यांना कोल्चिअसला जाण्याचा मार्ग दाखवून दिला. जेसनने प्रथम एक कबूतर त्या खडकामधून पाठविले. खडक मिटल्याने त्या कबूतराचा चक्काचूर झाला व पुन्हा खडक उघडले तेव्हा ते परत मिटायच्या आत जेसनने आपले आर्गो जहाज पलीकडे हाकारले. पण आश्चर्य म्हणजे तेव्हा-पासून ते खडक मिटलेच नाहीत. अशाप्रकारे पुढे सिम्प्लेगॅडीज खडकांचा धोका संपला.

**२५. सिसीफस** [ Sisyphus ]

इओलस आणि एनार्टे यांचा पुत्र. सागर देवता ग्लॉकस इचा पिता; सर्व मानवांत धूर्त म्हणून ओळखला जाणारा. याने कॉरिन्थ शहर वसविले. कॉरिन्थचा राजा असताना त्याने नौकानयन व व्यापार यांना उत्तेजन दिले. मृत्यू सिसीफसला न्यायला आला तेव्हा सिसीफसने त्याला बेड्या घातल्या. ऑरिस ही देवता तेथे येऊन मृत्यूला बंधमुक्त करीपर्यंत कुणीही मेले नाही. ऑरिसने मृत्यूला मोकळा करून सिसीफसला त्याच्या हवाली केले. एवढ्याने संपले नाही. मृत्यूनंतरचे आपले कोणतेही संस्कार करू नकोस, असे त्याने आपल्या पत्नीला सांगितले. मग अधोलोकांत गेल्यावर तिथे त्याने अशी तक्रार केली की पृथ्वीवर असणारी त्याची पत्नी त्याचे मृत्यूनंतरचे संस्कार करण्यात टाळाटाळ करीत आहे म्हणून ‘ मला परत पृथ्वीवर पाठव, मी तिला शिक्षा करतो ’ असे सांगून ह्याने अधोलोकातील प्रमुख हेडीज याचेमागे टुमणे लावले. अखेरीस हेडीजने त्याला परत पृथ्वीवर पाठविले. पृथ्वीवर आल्यावर पत्नीला शिक्षा करण्याऐवजी तो तेथेच मजेत राहिला व वार्धक्य येईपर्यंत जगला.

अधोलोकांत त्याला एक भयंकर शिक्षा होती. एक मोठी शिला पर्वतावर ढकलत चढवून शिखरावर ठेवायची पण शिखराशी जाताच ती शिला खाली येई व परत तो वर ढकलीत ती शिखरापर्यंत नेई. असे सतत चालले होते.

सौरसिद्धांतानुसार सिसीफस म्हणजे सूर्याची वाटोळी तबकडी. रोज सकाळी उगवून सायंकाळी अस्तंगत होणारी. सिसीफस म्हणजे महासागरावर उठणारी व नंतर फुटणारी प्रचंड लाट, माणूस ज्ञानाचा हव्यास करतो पण त्याच्या हाताला काहीही लागत नाही, हेच या कथेचे तात्पर्य.

## २६. शिला [ Scylla ]

ही एक भयानक सागरी राक्षशीण होती. हिला सहा तोंडे व बारा पाय होते. हिचा आवाज कुत्र्याच्या पिलाच्या रडण्यासारखा होता. कलाकृतीत मात्र, ती मत्स्यकन्येसारखी दाखविली जाते. तिच्या कटिप्रदेशापासून कुत्र्यांची उत्पत्ती होते. ती एका उंच खडकावरील गुहेत रहात असे. योग्य वेळी ती आपले मुंडके गुहेबाहेर काढी व जलचर आणि सागरावरून जाणाऱ्या जाहाजातील खलाशी, प्रवासी व अन्य माणसे यांची ती अचूक पारध करी. या खडकापासून अगदी जवळच आणखी एक खडक होता. त्या खडकात चारिब्डिस ( Charybdis ) नावाची आणखी एक सागरी राक्षशीण रहात असे. ती दिवसातून तीन वेळा सागरातील पाणी पिऊन टाकी व तीन वेळा बाहेर फेकी. शिला ही इटलीच्या बाजूला तर चारिब्डिस ही सिसिली बेटे आहेत, त्या अंगाला होती. ओव्हिड कवीच्या कल्पनेनुसार शिला ही एक देखणी स्त्री होती. तिचा द्वेष करणाऱ्या सिरसे या देवतेने तिचे रूपांतर सागर राक्षशीत केले.

## २७. झ्यूस [ Zeus ]

रोमन यालाच ज्यूपिटर म्हणतात. प्राचीन ग्रीक झ्यूसला आकाश व हवामान यांचा देव मानीत. वातावरणातील सर्व घडामोडींचा हा अधिष्ठाता. मेघगर्जना व वीज यांचा हाच जनक. विद्युतपात हे याचे परंपरागत शस्त्र. निरभ्र आकाश व स्वच्छ हवामान यांचा जनकही हाच. प्राचीन समजुतीनुसार हा क्रोनस व ऱ्हेआ यांचा पुत्र. झ्यूसचा जन्म क्रीटमध्ये झाला. बापाला राज्यावरून दूर करून हा स्वतः राजा झाला. डिमीटर, हीरा नि हेस्टिया या त्याच्या बहिणी नि बायकाही. ॲपोलो हा पुत्र व अर्मेटीस, ॲरीस आणि अथीना या कन्याही त्याच्याच. हा देवाधिदेव मानवांच्या नशिबांवर स्वामित्व गाजवितो, सागरावर वादळे निर्माण करतो. पॉसिडोन व हेडीज हे याचे भाऊ. या तिघांनी सर्व विश्वाचे राज्य वाटून घेतले. पॉसिडन सागराचा, हेडीज अधोलोकाचा व झ्यूस देवलोकाचा राजा झाला. झ्यूसची वस्ती ऑलिम्पस येथे असे. तेथून तो पृथ्वीतळावरील सारी सूत्रे हलवी.

## १८. सोनेरी लोकरीची कथा

ही सोनेरी लोकर कोल्चिस येथे एका वृक्षवाटिकेत टांगून ठेवली होती. ही लोकर कोणीही नेऊ नये म्हणून एक भयानक नागराज तिथे पहारा करीत असे. हा नागराज कधीही झोपी जात नसे.

जेसनचा चुलता पेलिअस याने त्याच्या हक्काचे राज्य परत करण्यासाठी सोनेरी लोकर आणण्याची अट घातली. या मोहिमेत भाग घेण्यासाठी जेसनने ग्रीसमधील जवानांना आवाहन केले. हे जवान पन्नास होते व ते सगळे ज्या जहाजातून या साहसासाठी सागरप्रवासाला निघाले त्या आर्गो जहाजालाही बरोबर पन्नास वल्ही होती. अरगस याने बांधलेल्या या पहिल्याच युद्धनौकेला त्याचेच नाव आर्गो असे दिले होते. या युद्धनौकेतील ग्रीक जवानांना आर्गोनॉट्स म्हणत. 'ॲरगोस' या शब्दाचा अर्थ 'जलद' असाही आहे. ॲथीना या देवतेने या युद्धनौका बांधणीत जातीने लक्ष घातले होते व नौकेच्या पुढील भागात डोडोना येथील ओकवृक्षाची एक खांदी खोचून ठेविली होती. ही खांदी दैवीशक्तीने दैवीवाणीचा उच्चार करीत असे. डोडोना हे डेल्फीपूर्वी दैवीवाणीबद्दल प्रसिद्ध होते. ही दैवीवाणी ओक वृक्षाच्या खांदीतूनच उमटे.

सागरी प्रवासांत अनेक अडचणींना तोंड देत जेसन शेवटी कोल्चिसला पोचला. तेथील राजा ईटीस याने जेसनला एक अवघड कामगिरी सांगितली व ती पुरी केल्याशिवाय सोनेरी लोकर द्यायला नकार दिला.

ईटीसजवळ दोन बैल होते. त्यांचे पाय ब्रॉन्झचे होते व ते तोंडातून भयंकर गरम अशा ज्वाला फेकीत. या बैलांना जोखडाखाली गुंतवून नांगरट करायची होती. नांगरट झाल्यावर त्या जमिनीत एका प्रचंड सर्पराजाचे दात पेरायचे होते. हे दात पेरल्यावर जमिनीतून शस्त्रधारी सैनिकांचे पीक वर येणार होते. ईटीसची कन्या, जादुगारीण मीडिआ, ही जेसनच्या प्रेमात पडली. तिने आपला एक दास जेसनच्या मदतीला दिला. या दासाने योजलेल्या युक्तीने जेसनला बैलांच्या तोंडातून येणाऱ्या ज्वालांची धग लागली नाही. भूमीतून वर येणाऱ्या शस्त्रधारी लढवय्यांवर एक दगड फेकल्यास ते आपापसात लढून मरतील व त्यांचा तुम्हाला त्रास होणार नाही असे मीडिआने सांगितले होते. जेसनने त्याप्रमाणे केल्यावर त्याही जीवघेण्या संकटातून तो बाहेर पडला.

ही अवघड कामे केल्यावरही ईटीस त्याला सोनेरी लोकर द्यायला तयार होईना. त्या सोनेरी लोकरीची राखण एका प्रचंड नागराजाकडे सोपविली होती व कोणीही लोकर नेऊ नये म्हणून हे नागराज कधी झोपतच नसत. त्या नागराजावर मीडिआने जादू करून त्याला झोप आणवली. दरम्यान जेसनने ती सोनेरी लोकर उचलली व लोकर आणि मीडिआसह त्याने कोल्चिसहून प्रयाण केले. राजा ईटीसने त्यांचा पाठलाग सुरू केला. हा

पाठलाग होऊ नये, त्यात व्यत्यय यावा म्हणून मीडिआने स्वतःबरोबर आणलेल्या आपल्या सख्ख्या भावाचे हात, पाय आदि अवयव तोडून ते एकेक असे समुद्रात टाकले. हेतू हा की अखेरच्या संस्कारासाठी ते जमविता जमविता ईथिसचा वेळ जावा व दरम्यान आपले जहाज पुढे हाकारता यावे.

अनेक दिवसांच्या प्रवासानंतर आर्गो जहाज आयोल्कसला आले.

आरगोनॉट्सच्या या साहसांची कथा फार पुरातन आहे. होमरलाही ती माहीत होती.

# हिपॉलिटस

## दर्शनानुक्रमाने पात्रपरिचय

ॲफ्रॉडाइटी : कामुक प्रेमाची देवता

हिपॉलिटस : थीस्यूसचा अनौरस पुत्र.
कोरस : हिपॉलिटसच्या परिवारातील शिकारी

परिचर : हिपॉलिटसचा सेवक

कोरस : नारीवृन्द कोरस : ट्रोझीनवासी स्त्रियांचा समूह

दाई : फीद्राची दाई.

फीद्रा : थीस्यूसची पत्नी

थीस्यूस : ॲथेन्स आणि ट्रोझीनचा राजा
दूत :

आर्टिमीझ : कौमार्याची व मृगयेची देवता

[**दृश्य :** ट्रोझीन येथील राज-प्रासादासमोरील भाग. रक्तपाताचे प्रायश्चित्त घेण्याकरिता थीस्यूस येथे राजप्रासाद सोडून स्वेच्छेने एक वर्ष वास्तव्य करून आहे. रंगमंचाच्या एका बाजूस ॲफ्रॉडाइटीचा पुतळा आहे. दुसऱ्या बाजूस आर्टिमीझमचा पुतळा आहे. रंगमंचाच्या मध्यावर राज-प्रासादाचे द्वार आहे.

ॲफ्राडाइटी प्रवेश करते.

**ॲफ्रॉडाइटी :**
मी ॲफ्रॉडाइटी
मर्त्यांमधे शक्तिशाली. देवतांमध्ये दैदीप्यमान;
स्वर्गलोकी सिप्रिअन हे माझे नामाभिधान आहे.
भूलोकी पूर्व किनाऱ्यापासून दूरवरच्या
पश्चिम महासागरापर्यंत,
ज्यांच्या ज्यांच्यावर सूर्यप्रकाश पडतो
त्या सर्वांवर
माझी अधिसत्ता विस्तारली आहे.
माझ्या शक्तींचा आदर करतात
ते माझ्या कृपाप्रसादास पात्र होतात.
जे गर्विष्ठ, उद्धट आहेत असे आढळते,
त्यांना मी जमीनदोस्त करते
कारण देवतांनाही अभिमान आहे आणि
मर्त्यमात्रांकडून होणारी आराधना स्वीकारण्यात
आनंद वाटणे हा त्यांचा स्वभाव आहे.
आणि माझे शब्द सत्य आहेत हे मी आजच सिद्ध
करून दाखवीन.

थीस्यूस[1]पासून अमेझॉनला[2] झालेला पुत्र हिपॉलिटस,
कठोर पिथ्यूसने[3] आपल्या कडक शिस्तीत बालपणापासून
त्याचे शिक्षण केले,—
ट्रोझीनच्या रहिवाश्यांतील एक मात्र हिपॉलिटसच
मला स्वर्गीय शक्तींमधील सर्वांत अधिक विनाशकारी
शक्ती असे म्हणतो.
कामशय्येविषयी त्याला घृणा आहे. विवाहाचा
तो धिक्कार करतो.
अपोलोच्या भगिनीची, झ्यूसची कन्या आर्टिमीझची तो
आराधना करतो.
सारा दिवस तिच्यासह, त्या कुमारिकेसह, हरित वनराईत
तो भटकत असतो,
त्याच्या गतिमान मृगया-श्वानांना बरोबर घेऊन
पृथ्वी पशुहीन करीत असतो,
मर्त्यमानवाहून अत्यंत उच्च कोटीत असलेल्यांच्या सहवासाचा
त्याला अतिहव्यास आहे.
मला त्यांच्या मृगयाक्रीडेचा हेवा नाही वाटत—
मला हेवा वाटण्याचे कारणच काय?
पण हिपॉलिटसने माझा उपमर्द केला आहे आणि
त्याला त्याचे प्रायश्चित्त भोगावेच लागेल—
आजच्या आजच—फार पूर्वी आखलेल्या माझ्या योजनांचा
शुभारंभ झाला आहे, अगदी थोडे काम उरले आहे.

दोन वर्षांपूर्वी हिपॉलिटसने पॅन्डिअनची नगरी, ॲथेन्स येथे जाण्याकरिता, पवित्र गूढ विधींना उपस्थित राहण्याकरिता आणि त्याचे दीक्षाकर्म पूर्ण करण्याकरिता पिथ्यूसचे घर सोडले.

आणि तिथे उच्चकुलोत्पन्न फीड्राने,[4] त्याच्या पित्याच्या पत्नीने त्याला पाहिले—

आणि एका अनिवार कामवासनेने, माझ्या योजनेनुसार तिचे हृदय ग्रासले.

थीस्यूस समवेत ती ट्रोझीनला येण्यापूर्वीची ही घटना आहे. राजपुत्र घरी ट्रोझीनला आला: फीड्रा ॲथेन्सची राज्ञी होती. जिथे तिचे मन तिच्या प्रियकराबरोबर तिकडे दूर ट्रोझीनमध्ये भटकत होते, तिथे ॲक्रोपोलीसवर, साक्षात पॅलसच्या खडकांवर तिने त्या ट्रोझीनकडे तोंड करून, सागरसन्मुख प्रीतिदेवतेचे मंदिर बांधले.

त्या काळापासून अजूनही त्या मंदिराला हिपॉलिटसचे नामाभिधान आहे.

परंतु पॅल्लनटायमच्या[५] रहिवाश्यांच्या रक्ताने हात लांच्छित झालेल्या थीस्यूसने स्वतःचे पापक्षालन करण्याकरिता, एक वर्ष देशत्याग करण्याचा दंड स्वीकारला, आणि आपली पत्नी फीद्रा हिच्यासह अॅथेन्सहून ट्रोझीनला समुद्रप्रयाण केले. म्हणून आता, ती गरीब बापडी प्रेमविकाराच्या जखमांनी विव्हल होऊन आणि वेडावून निःशब्दपणे आसन्नमरण होऊन पडली आहे. तिची व्यथा राजप्रासादातील कुणालाही माहीत नाही. परंतु तिच्या वासनेची ही पुरी कहाणी अशी गुप्त राहणार नाही.

खरे सत्य मी थीस्यूसला प्रकट करीन, त्याच्या पुढे सर्व काही उघड केले जाईल.

माझ्याशी सामना करणाऱ्या या युवकाचा, त्याचा स्वतःचा पिता, थीस्यूस, सागराधिपती पॉसायडोन याने त्याला दिलेल्या वराने प्राप्त झालेल्या शापसामर्थ्याने वध करील. थीस्यूसची तीन मनोगते सफल झाल्याशिवाय राहणार नाहीत.

फीद्राच्या शीलाची प्रतिष्ठा अभंग राहील, परंतु तिला तिच्या प्राणास मुकावे लागेल.

कारण तिच्यावर कोसळणाऱ्या अरिष्टांच्या विचाराने मी माझ्या अधिकाराचा त्याग करणार नाही.

तर माझे समाधान होईपर्यंत माझे वैरी माझे ऋण फेडीतच राहतील.

आता मी निघते. हा पाहा हिपॉलिटस, थीस्यूसचा पुत्र इकडेच, वनातील मृगयेच्या श्रमानंतर दमून घरी येत आहे, आणि त्याच्या पाठोपाठ मोठ्याने जयघोष करीत त्याच्या अनुचरांचा, अनुयायांचा घोळका आर्टिमीझची स्तोत्रे गात येत आहे! मृत्यूचे दरवाजे आता उघडले आहेत, आणि आजचे दिवसाच्या प्रकाशाचे हे त्याचे अखेरचे दर्शन आहे याची त्याला किंचितही कल्पना नाही.

**जाते**

**हिपॉलिटस शिकाऱ्यांसह प्रवेश करतो. त्याच्या बरोबरच एक वृद्ध परिचरही आहे.**

**हिपॉलिटस :**

या मागोमाग अन् गात रहा!
चला स्वर्गीच्या तेजस्वी कन्येची आराधना करू!
आपल्या रक्षणकर्त्या कुमारीदेवीची आराधना करा.
आर्टिमीझचा अनुनय करू :

**शिकारी :**

हे लेटो अन् झ्यूस कन्ये
सुवर्णा कुमारीदेवी आर्टिमीझ

पवित्र अन् श्रेष्ठ
कुमारी देवी आर्टिमीझ
आमचे गीत श्रवण कर !
अभिवादन, सानंद अभिवादन
सर्वश्रेष्ठ लावण्यमयी कुमारिके ! अभिवादन
तव राजवंशी पित्याच्या प्रांगणी
तुझा नित्य वास असे,
विशाल नभांगणाच्या
सोनेरी परिसरात
तू लीलेनं संचार करतेस,
अमर कुमारिकांतील
सर्वश्रेष्ठ लावण्यवती
आर्टिमीझ
अभिवादन, सानंद अभिवादन !

**हिपॉलिटस् :**
देवी,
मेंढपाळ जिथे आपली मेंढरे चरण्यास नेण्यास धजत नाहीत, ज्यावर विळ्याचे पाते कधी फिरले नाही.

परंतु भृंगतती मात्र ज्या अस्पृष्ट कुरणावरील वसंत–वायुलहरीतून मार्ग क्रमीत भ्रमण करीत असतात त्या नव्हाळ कुरणात नुकत्याच वेचलेल्या ताज्या फुलांचा हा मुकुट मी तुझ्यासाठी गुंफला आहे.

जिथे झुळझुळणाऱ्या निर्झराच्या रूपाने साक्षात पावित्र्यच फुलांना वाढवीत असते.

ज्यांच्या कृत्रिम संस्कारापासून अलिप्त अशा मनोवृत्तींचा प्रत्यक्ष परमपवित्रतेने पूर्णपणे ताबा घेतला आहे, आणि ज्यांचे निरागस स्वत्व पूर्णत्वाने पावित्र्याधीन झालेले असते अशांनाच येथील पुष्पांच्या माला गुंफण्याचा अधिकार असतो, अपवित्रांना नाही.

हे प्रिय स्वामिनी तुझ्या तेजस्वी कुंतलाकरिता भक्तिभावाने अंतःकरणपूर्वक अर्पण केलेल्या या पुष्पबंधाचा स्वीकार कर. सर्व मर्त्यमात्रांमध्ये केवळ मलाच हा सन्मान प्राप्त झाला आहे मी तुझा सवंगडी आहे, मी तुझ्याशी संभाषण करतो, तुझा स्वर श्रवण करतो, तुझे मुख-दर्शन मात्र मला लाभत नाही.

आणि माझ्या जीवनयात्रेचा जसा आरंभ झाला तसाच तिचा अंतही होवो.

**परिचर :** मत्प्रभो—पण नाही—हे राजपुत्रा ! कारण केवळ देवांनाच प्रभू म्हणावे—मी

दिलेला एखादा उचित सल्ला तू स्वीकारशील काय ?

**हिपॉलिटस** : अर्थात! मी तो मानला नाही तर उघड उघड मूर्ख ठरेन मी.

**परिचर** : तर मग—पुरुषांकरिता घालून दिलेला एक जुना दंडक तुला माहीत आहे ?

**हिपॉलिटस** : नाही. तुला काय म्हणायचे आहे ? तू हे मला का विचारीत आहेस ?

**परिचर** : तो दंडक की जो सांगतो : गर्व आणि सर्व प्रकारचा वैरभाव, असहिष्णुता निंद्य माना.

**हिपॉलिटस** : होय; चांगला दंडक आहे तो : औद्धत्य नेहमीच तिरस्करणीय असते.

**परिचर** : आणि मनमोकळेपणाने वागणे आणि मनात कसलीही अढी नसणे खचित विलोभनीय असते.

**हिपॉलिटस** : खूपच विलोभनीय असते; शिवाय लाभदायकही असते—त्यात काही त्रासही नसतो.

**परिचर** : हे जसे माणसांच्या बाबतीत खरे असते तसे देवांच्या बाबतीतही खरे असते असे तुला वाटत नाही ?

**हिपॉलिटस** : हो, का नाही; आपली मर्त्य जीवनपद्धती जर देवांच्यासारखीच असली तर ते खरेच असले पाहिजे.

**परिचर** : मग तू एका श्रेष्ठ देवतेची प्रार्थना का करीत नाहीस ?

**हिपॉलिटस** : हां जरा सावध! एखाद्या शब्दानेही अनर्थ होईल. कोणती देवता म्हणतोस तू ?

**परिचर** : इथे तुझ्या स्वतःच्या दाराशीच ती उभी आहे. ॲफ्रॉडाइटी.

**हिपॉलिटस** : मी तिला दुरूनच नमस्कार करतो. तिचा वारा मला अजून लागलेला नाही. मी निष्कलंक आहे.

**परिचर** : तरीही ती श्रेष्ठ आहे. आणि तिचे सामर्थ्य सर्वश्रुत आहे आणि सर्वजण त्याला भिऊन असतात.

**हिपॉलिटस** : ज्या देवतांची साधना रात्री होते त्यांच्याविषयी मला प्रीती नाही.

**परिचर** : मुला, देवांची जी योग्य आराधना आहे तिची आपण अवहेलना करू नये.

**हिपॉलिटस** : आपण कुणावर कृपा करावयाची हे देवांनी ठरवावे. कुणाची आराधना करावी हे मर्त्य माणसांनी ठरवावे.

**परिचर** : देव तुला शहाणपणा आणि सद्‌भाग्यही देवोत.

**हिपॉलिटस** : चला गड्यांनो, आपण आत जाऊ; जेवणाची वेळ झाली आहे. मृगयेनंतर खाद्यपदार्थांनी गच्च भरलेले मेज म्हणजे डोळ्यांना सुखविणारे दृश्य आहे. घोड्यांना खरारा करा. यथेच्छ भोजन झाल्यावर मी त्यांना रथाला जुंपून बाहेर काढून खूप तालीम

देणार आहे—तुझी ॲफ्रॉडाइटी ? हूं, माझ्या लेखी ती नगण्य आहे.

**शिकारी सोबत्यांसह हिपॉलिटस जातो.**

**परिचर :** तरुणांच्या वर्तनाचे आपण अनुकरण करायचे नसते. राज्ञी ॲफ्राडइटी ! तुझ्या भक्तांना उचित असलेल्या लीन अंतःकरणाने आम्ही तुझी उपासना करतो. तरुण रक्ताला आणि ज्या धिटाईने—तुझ्या विरुद्ध हे मूर्खासारखे शब्द बाहेर पडतात त्या धिटाईला तू क्षमा करावीस. तू त्याचे शब्द ऐकलेस हेही विसरून जा. तू देवता आहेस. आणि देवतांचे सुज्ञपण माणसांच्यापेक्षा सुज्ञतर असले पाहिजे.
जातो.

**ट्रोझीनवासी स्त्रियांचा वृन्द प्रवेश करतो**

**नारीवृन्द वृन्दगान : स्ट्रोफी एक १**

खडकातून झुळझुळणारा झरा
तुम्हाला माहीत आहे ?
धरणीच्या हृदयातून पाणी उसळत असते
तिथे त्या जलाशयात कलश बुडवितात—
एक माझी सखी
तिथे गेली होती.
झऱ्याच्या पाण्यात उज्ज्वल रंगीत वस्त्रे धुण्याकरिता
अन् उन्हात तापलेल्या खडकावर वाळत
घालण्याकरिता
तिनेच मला प्रथम सांगितली
राणीची व्यथा

**ॲन्टी स्ट्रोफी एक**

रुग्णशय्येवर ती कशी झुरते आहे,
दाराबाहेर पडत नाही
तलम अवगुंठनीच्या पदरात
मेघांनी झाकलेल्या

तप्त सूर्यबिंबासारखे
आपले सुवर्ण कुंतलमंडित
मुख झाकून घेते.
तीन दिवस झाले
भूमातेचा उपहार
तिचे नाजुक ओठ
अव्हेरतात—असे म्हणतात—
भाकरीचा साधा घासही ती घेत नाही
कसले वादळ तिचे जीवन उद्ध्वस्त करीत आहे
मी सांगत नाही, पण
मृत्यूच्या बंदरात नांगर टाकण्याची
तिला ओढ लागली आहे.

## स्ट्रोफी दोन

तिची अवस्था बेबंद उन्मादाची नाही
हेकटी [८] किंवा पॅनचा [९] हा प्रभाव नाही
गिरिकन्दरजन्य हे वेड नाही
सायबेलीच्या [१०] उन्मादात कोरिबॅन्टिक भटकणे नाही.
मृगयासक्त आर्टिमीझला तेल आणि मधाचा
सनातन नैवेद्य देण्याचे विसरून तिने तिचा
अपराध केला आहे काय ?
देवांचा प्रकोप क्षारसागराच्या लाटा उल्लंघून
प्रत्येक किनाऱ्याला, प्रत्येक बेटापर्यंत
संचार करीत पोहोचतो.

## ॲन्टिस्ट्रोफी दोन

की थीस्यूसचे मन अन्यत्र भुलले आहे ?
तुझा राजा असलेला पती
कुणा गुलाम युवतीच्या गुप्त शय्येवर
विलास करून बेइमान तर झाला नाही ?

क्रीटहून एखाद्या मुसाफिराने काही दुःखद
वार्ता घेऊन आपल्या आतिथ्यशील बंदरात
समुद्रमार्गे प्रवेश केला आहे काय ?
तुझे आप्त दूरदेशी काही आपत्तीने ग्रासले आहेत काय ?
की ज्यामुळे अतीव कटू दुःखाने तुझी
शय्या तुझी बंदीशाला झाली आहे ?

### एपोड

पण स्त्रिया नेहमीच दुर्बळ असतात,
आणि त्यांचे वर्तनही चमत्कारिक असते.
स्त्रीत्वाचा स्थायीभाव वेदना आणि
स्खलनशीलता
आणि त्यामुळे त्यांचे अस्तित्वच
भय नि असहाय्यता याचे मिश्रण बनते.
माझ्या स्वतःच्या गर्भाशयातून उठणारी
ही भयाची शिरशिरी मी अनुभवली आहे
पण मी सर्व स्त्रियांच्या
स्वर्गीय सहाय्यकर्त्या आर्टिमीझचा धावा केला.
शरसंधान करणारी आर्टिमीझ
आणि
—देवांना धन्यवाद असोत—
ती माझ्या आपत्काली साहाय्याला नेहमीच धावली आहे
ती पहा म्हातारी दाई दाराकडे येत आहे,
ती राणी फीद्राला मोकळ्या हवेत आणीत आहे,
तिची दुःखी मुद्रा पूर्वीपेक्षा अधिकच म्लान झाली आहे.
आमची राणी ! किती दुर्बल, किती निस्तेज झाली आहे ती
ती इतकी कृश कशामुळे झाली आहे हे जाणून घ्यावे असे
मला किती किती वाटते !

**राजप्रासातून फीद्रा दाईच्या आधाराने रंगमंचावर प्रवेश करते. परिचारक तिच्याकरिता एक मंचक आणतात.**

दाई : छे ! किती निष्ठुर या जगाच्या यातना आणि व्यथा !
तुझ्याकरिता मी काय करू? कसं सांगू ?
इथं तू निरभ्र आकाशाखाली सूर्यप्रकाशात आहेस;
महालातून तुझा मंचक आम्ही इथे आणला आहे.
इथेच येण्यासाठी तू आळवणी केली होतीस आणि तुला
इथेच यायची आतुरता लागली होती.
क्षणात तुझी लहर बदलेल आणि
महालात परतण्याकरिता तू तळमळशील.
प्रत्येक क्षण तुझी वंचना करीत आहे
कशातच तुला सुख लाभत नाही.
तुजपाशी आहे ते तुला नकोसे होते,
जे तुजपाशी नाही त्याची तू अभिलाषा धरतेस.
बाई, स्वतः अजारी पडणं परवडलं, रुग्णाचं एकतरी
दुखणं असतं;
पण आजाऱ्याची देखभाल करणं नको
मनाला आणि हाताला रिकामा दुहेरी शीण !
माणसाचं जीवन म्हणजे जन्मापासून मरणापर्यंत
यातना आणि दुःख—
कधी उसंत नाही
सुटका नाही
आणि मेल्यावर तरी अधिक सुखकर जगात प्रवेश आहे का ?
धुक्यात आणि अंधारात सगळं लपून गेलंय
ज्या अर्थी दुसरं जिणं आपल्याला ठावे नाही
त्या अर्थी मृतांचं जग हेही एक गूढच आहे,
प्रकाशाचा जो आपल्या वाट्याला आला असेल त्या,
जसा असेल तसल्या–
इवल्याश्या कवडश्यावरच
जीव जडवला पाहिजे, डोळे मिटून
अन् आपली वेडीबागडी जीवनयात्रा कंठिली पाहिजे
भाकडकथावर भरवसा ठेवून.

**फीद्रा** : सख्यांनो मला जरा हात द्या, माझे मस्तक
जरा उचलून धरा.
माझ्या गात्रांमधले अवसान पार वितळून गेले आहे.
माझे धवल हात आणि सुडौल स्कंध सावरून धरा.
या जड भरतकाम केलेल्या अवगुंठनीचा
माझ्या मस्तकाला भार झाला आहे.
काढा ती !
माझे कुंतल आता माझ्या स्कंधाभोवती
रुळू द्या.

**दाई** : सावकाश, माझ्या बाळे ! शांत पडून राहा.
उगीच शीण करून घेशील.
अन् मनाने धीर धरलास तर हे दुखणं
सोसणं तुला जास्त सोपं होईल.
आपण सारी मर्त्य आहोत म्हणून हे सोसलंच पाहिजे.

**फीद्रा** : असं वाटतं की ताज्या दवबिंदूत एखाद्या
झऱ्याच्या काठावर ओणवावे आणि
प्यालाभर नितळ स्वच्छ पाणी प्यावे
वाटतं की पॉप्लर वृक्षांच्या तळाशी पडावे
आणि वाऱ्यावर डोलणाऱ्या गवतात गाढ
विसावा घ्यावा.

**दाई** : जरा हळू बोल मुली !
अविचाराने आणि एवढ्या मोठ्याने असे
शब्द उधळू नकोस, आजूबाजूला लोक आहेत !
वेडेपणाच्या चक्रांवर तुझे शब्द बेबंद उधळत आहेत

**फीद्रा** : चल मला घेऊन !
मी गिरिकंदरी अन् वनात जाणार आहे.
पाईनच्या अरण्यात.
जिथे शिकारी कुत्रे सावजाच्या मागावर धावतात
आणि चितळाच्या पाठीवर असतात.
अरे देवा !
कुत्र्यांच्या कळपावर ओरडत

वाऱ्यावर भुरभुरणाऱ्या, चमकणाऱ्या
माझ्या केसापर्यंत भाला उंचावून
त्याचे धारदार पाते भिरकावून द्यावे असे
मला किती तरी वाटते!

**दाई :** मुली, तू ही खळखळ कशाकरिता करते आहेस.
मृगया आणि मृगया-श्वानांशी तुझा काय संबंध आहे ?
झऱ्यांच्या जलाची ही इतकी ओढ का ?
तुला तहानच लागली असेल तर इथेच
या प्रासादाच्या भिंतीजवळून खाली टेकडीकडे
एक झरा वाहात जात आहे!

**फीद्रा :** हे क्षारजलाशयाच्या स्वामिनी आर्टिमीझ,
धाडसी, उमद्या अश्वारोहणाविषयी आसक्ती असलेल्या आर्टिमीझ!
तुझ्याप्रमाणे तोल संभाळून भरधाव दौडावे
आणि थेसलीतील घोड्याचा वेग काबूत ठेवण्याचा
लगाम हाती असावा असे मला किती किती वाटते.

**दाई :** तुला आणखी काय काय म्हणावंसं वाटेल? मुली हा शुद्ध वेडेपणा आहे! प्रथम तुला गिरिकंदरातील वनराईत पशूंची मृगया करण्याची ओढ लागली होती, आता शुष्क वालुकामय प्रदेशातून घोड्यावरून दौडण्याची इच्छा झाली आहे. खरोखर कोणत्या देवाने तुला झपाटले आहे, आणि तुझ्या शुद्धबुद्धीची तुझ्यातून हकालपट्टी केली आहे, हे सांगण्याचे कठीण काम केवळ एखाद्या द्रष्ट्यालाच जमेल.

**फीद्रा :** काय केलं मी? मी बडबडत होते.
माझं मन भरकटलं—कुठे ? कुठे ?
मला भ्रम झाला होता.
कुणा देवाने माझ्यात वेडेपणाचा प्रादुर्भाव केला.
छे! काय यातना या!
लाडके दाई, माझी अवगुंठनी दे पुन्हा.
मी जे काही बोलले त्याची लाज वाटते आहे मला.
अवगुंठनीचा पदर माझ्या मुखावर ओढ.
माझे आंसू ढळत आहेत आणि लाजेने माझी
काया तप्त झाली आहे.
परत भानावर येणे म्हणजे यातना,

आणि भ्रमात राहणेही काही कमी यातनामय नाही.
म्हणून काहीच न वाटणे
आणि तसेच मरून जाणे उत्तम !

**दाई :** ( तिच्या मुखावर अवगुंठनी ओढीत )
उगी, मुली, उगी !
माझे मुखही मृत्यूने किती लवकर झाकले जाईल ?
मी खूप जगले, नि खूप शिकले,
आपल्याला केव्हातरी मरायचेच आहे म्हणून.
मैत्री जोडण्यात अतिरेक न करणे,
किंवा आपल्या अंतःकरणाचा तळ कुणाला
उघड करून न दाखविणेच बरे.
प्रीतीची बंधने, आपल्या भोवती,
तोडून टाकण्यास किंवा बांधण्यास सोपी
अशी सैल असणेच बरे.
मी हिच्यासाठी सोसते आहे तशा,
एकाच हृदयानं दोघांच्या यातना
सोसणं फार बिकट ओझं आहे.
असं म्हणतात की
सुखापेक्षा दुःखच फार वाट्याला येते
काटेकोर आणि कर्मठ वर्तनामुळं,
आणि ते आरोग्य आणि आयुष्य
यांचे वैरी असते.
या आत्मनिरपेक्ष प्रेमाचा तर मला कंटाळा आला आहे.
म्हणून मला वाटते
इतर गोष्टींप्रमाणे यातही
अतिरेक न करणेच उत्तम
कुणीही सुज्ञ मनुष्य हेच सांगेल.

**नारीवृन्द कोरस :** बाई, राणीचे दुःख आम्हाला दिसतंय आणि आम्हाला तिच्याविषयी वाईट वाटतं; परंतु तिचे दुखणे काय आहे हे आम्हाला कळत नाही. म्हणून तिच्या वृद्ध, विश्वासू सेविकेला, तुला आम्हाला विचारावेसे वाटते, तू आम्हाला सांगणार नाहीस का ?

**दाई :** मलाच काही माहीत नाही. त्याबद्दल मी तिला विचारलं पण ती सांगत नाही.

**नारीवृन्द कोरस** : पण, प्रथम ही व्यथा कशी आणि केव्हा सुरू झाली हे तुला माहीत नाही का ?

**दाई** : अजूनही उत्तर तेच आहे : या असल्या सर्व प्रश्नांवर ती गप्पच आहे.

**नारीवृन्द कोरस** : ती किती दुर्बल आणि कृश दिसते आहे !

**दाई** : त्यात काही नवल नाही. गेल्या तीन दिवसांत तिने अन्नाचा कणही घेतला नाही.

**नारीवृन्द कोरस** : तिला काय चित्तभ्रम झालाय ? की तिला मरणाची इच्छा आहे ?

**दाई** : मरणाचीच तिची मनीषा आहे. मरण्याकरिताच ती उपास करते आहे.

**नारीवृन्द कोरस** : तिचा नवरा हे सगळे शांतपणे चालू देतो हे नवलच म्हणायचे !

**दाई** : आपली व्यथा ती त्याच्यापासून लपविते. आपण ठीक आहोत असेच ती त्याला सांगते.

**नारीवृन्द कोरस** : तो काय तिच्या मुखाकडे पाहात नाही आणि त्याला स्वतःला दिसत नाही खरे काय आहे ते ?

**दाई** : आता सध्यातरी तो ट्रोझीनपासून दूर गेला आहे.

**नारीवृन्द कोरस** : तू तिला बोलायला लावू शकत नाहीस का ? काहीही कर पण या दुखण्याचे आणि या भ्रमिष्टपणाचे कारण शोधून काढलेच पाहिजे.

**दाई** : मी सर्व काही केलं, आणि मला काही यश आलं नाही, परंतु मी प्रयत्नाची पराकाष्टा करणार आहे, आणि अजूनही प्रयत्न सोडणार नाही. आणि सख्यांनो आपत्काली माझ्या मालकिणीला साथ करणारी मी आहे याला साक्षी तुम्ही आहात. ( ती फीद्राकडे वळते. )

बाळे, लाडके, आपण पूर्वी काय बोललो हे दोघीही विसरून जाऊ या. तुझ्या मुद्रेवरील हे त्रस्त सावट दूर कर; माझी लाडकी लेक ती ! अशी पुनः भरकटू नकोस–तुझ्या अंतःकरणात डोकावून तुझे विचार उकलण्याचा पाठपुरावा करण्यात माझ्या हातून चूक झाली; यापुढे मी अधिक शहाणपणाने वागेन, तुझे दुखणे म्हणजे काही उघडपणे न सांगण्यासारखे आहे का ? उपाययोजना करून तुला साहाय्य करण्याकरिता या सख्या इथे आहेत परंतु तुझी व्यथा पुरुषाला सांगता येण्यासारखी असेल तर तसे तरी सांग. आपण वैद्यांचा सल्ला घेऊ. अरे ! एक शब्दही तुझ्याकडून नाही ? लाडके, मी जर मूर्खपणाने बोलले असले तर मला सुधारून घे; मी योग्य बोलले असेन तर तुला ते पसंत आहे असे सांग ? नुसती मुकाट बसू नको ! बोल ! एक शब्द तरी बोल ! माझ्याकडे बघ ! छे बाई, काहीच उपयोग नाही या साऱ्याचा. ( ती रडते ) आपल्या सर्व कष्टांपासून काहीच साध्य होत नाही. आणि आपण समस्येच्या उलगडण्यापासून पूर्वी जितके दूर होतो तितकेच आताही आहोत; पूर्वीही तिचा न बोलण्याचा निर्धार ढळत नव्हता आणि आताही ती बोलण्याचे नाकारीत आहे. बाई

माझे ऐक ! तुला समुद्राहून अधिक हेकट व्हायचं असेल तर हो—पण तू मेलीस तर तुझ्या मुलांचे काय ? त्यांची बाजू कोण घेईल ? त्यांच्या पित्याचा प्रासाद काही त्यांना वारसाहक्काने मिळणार नाही. मुळीच नाही. अगदी अश्वारूढ अमेझॉनांची राणी हिपॉलिटाची शपथ ! तिला एक पुत्र आहे, तुला माहीत आहे तो चांगलाच–हिपॉलिटस–आहे अनौरस पण जोपासतो आहे महत्त्वाकांक्षा राजवंशात जन्म घेतल्याची. तुझी मुले त्याची गुलाम म्हणून राबतील !

**फीद्रा** : नाही ! नाही ! !

**दाई** : अऽहाऽ ! तेच तुला खुपतंय ना ?

**फीद्रा** : तू माझा जीव घेते आहेस ! दाई, सर्व देवांची शपथ घालून मी तुला विनविते की त्याच्याविषयी पुनः कधी बोलू नकोस !

**दाई** : असं ! बघ ! तुला काही भ्रम झालेला नाही ! आणि तरीही तू स्वतःला वाचविण्यास आणि तुझ्या मुलांना साहाय्य करण्यास तयार नाहीस.

**फीद्रा** : माझ्या मुलांवर माझे प्रेम आहे— पण दुसरेच काही मला निराशेत बुडवून टाकीत आहे.

**दाई** : मुली, तुझे हात तर रक्तलांच्छित नाहीत ?

**फीद्रा** : माझे हात निष्कलंक आहेत पण—पण माझे हृदय भ्रष्ट झाले आहे.

**दाई** : भ्रष्ट ? काय म्हणतेस ? कुणी वैऱ्याने केलेल्या अत्याचाराने ते भ्रष्ट झाले आहे ?

**फीद्रा** : नाही, वैऱ्याने नाही ! त्याने माझा सर्वनाश करावा अशी जशी माझी इच्छा नाही तशी त्याचीही नाही.

**दाई** : थीस्यूस ! त्याने का तुला काही अपाय केला आहे ?

**फीद्रा** : छे ! नाही ! तो माझ्या बाबतीत जितका निरपराध आहे तितकीच मीही त्याच्या बाबतीत आहे असे मला सिद्ध करता येईल तर !

**दाई** : तर मग तुझ्या मृत्यूकडे तुला फरफटत ओढणारे हे भय तरी कसले आहे ?

**फीद्रा** : माझे पाप मजजवळच राहू दे. तुझा तर मी काही अपराध केला नाही ना ?

**दाई** : अगदी माझा नाइलाज होईपर्यंत मी तुला सोडणार नाही. मी जर अपेशी ठरले तर तो दोष तुझाच आहे.

**फीद्रा** : तू माझ्यावर बळजोरी करशील की काय ? सोड माझा हात !

**दाई** : सोडणार नाही ! तू मला काय ते सांगेपर्यंत मी तुला अगदी अश्शी धरून ठेवीन.

**फीद्रा** : बिचारी ! सत्य तुला सुद्धा भयावह वाटेल.

**दाई** : तुझे तळमळणे पाहण्यापेक्षा दुसरे काय अधिक भयावह आहे ?

**फीद्रा** : तुला सांगायचे म्हणजे तुझे मरणच ओढवेल; परंतु मी जे करते आहे ते माझ्या प्रतिष्ठेकरिता—

**दाई :** तसे असेल तर ते सांगण्याने जगाच्या दृष्टीने तुझ्या प्रतिष्ठेत भरच पडेल.

**फीद्रा :** अप्रतिष्ठेतून प्रतिष्ठा प्राप्त करण्याचा मार्ग मी शोधीत आहे.

**दाई :** तर मग मला सांगण्याविषयी तुझी मनधरणी करते आहे ते योग्यच आहे–तू कसे हे लपवू शकतेस ?

**फीद्रा :** देवांची शपथ आहे तुला, मला एकटीच राहू दे आणि माझा हात सोड.

**दाई :** तू माझे जे देणे लागतेस ते जोवर मला देत नाहीस तोवर मी तुझा हात सोडणार नाही.

**फीद्रा :** खरं आहे. मी तुझे देणे लागते, तू जे मला विचारीत आहेत ते आता सांगते मी तुला.

**दाई :** तर मग मी आता गप्प बसते ! आता तू सांगितले पाहिजेस.

**फीद्रा :** माझे आई[11] ग ! कसली भयंकर, कसली करुणास्पद वासना तुझ्याठायी भडकली होती !

**दाई :** म्हणजे तिच्या त्या वृषभाविषयीच्या कामातुरतेविषयी तू बोलतेस का ? मुली तुला काय म्हणायचे आहे ?

**फीद्रा :** आणि तू सुद्धा माझ्या भगिनी ! डायोनिससला तुजविषयी आसक्ती होती,— प्रीतीने तुला किती यातना भोगायला लावल्या ?

**दाई :** त्याच्याविषयी कशाला बोलायचं आता ! त्या कथा विसरलेल्याच बऱ्या.

**फीद्रा :** ज्या शापाने त्यांचा घात केला तोच आता वारसाहक्काने माझ्या वाट्याला आला आहे. माझाही घात करीत आहे.

**दाई :** तू मला घाबरवून सोडते आहेस ! तू आता सांगणार आहेस तरी काय ?

**फीद्रा :** माझ्या दुर्दैवाचा आरंभ त्यांच्यापासूनच झाला. ते काही नवीन नाही.

**दाई :** मला जे ऐकण्याची उत्कंठा लागली आहे त्याविषयी तू काहीच सांगत नाहीस.

**फीद्रा :** मी जे शब्द उच्चारावेत असे तुला वाटते–ते तूच माझ्याकरिता बोलू शकली असतीस तर !

**दाई :** गुप्त विचार समजायला मी काही कुणी जादूगार नाही.

**फीद्रा :** कुणी प्रेमात पडले आहे असे जेव्हा लोक म्हणतात तेव्हा प्रेमाचा कोणता अर्थ त्यांना अभिप्रेत असतो ?

**दाई :** अहा ! अग माझ्या मुली ! ती तर अतिमधुर भावना आहे—आणि तरीही वेदनामय आहे.

**फीद्रा :** वेदना मला गवसल्यासारखी दिसते पण त्याची माधुरी मात्र नाही.

**दाई :** काय बोलतेस तू हे ! तुझे कुणा पुरुषावर प्रेम आहे ? कोण आहे हा पुरुष ?

**फीद्रा** : ओळख कोण असावा तो ? अग तोच तो ! ॲमेझॉनचा पुत्र !

**दाई** : हिपॉलिटस !

**फीद्रा** : तू त्याचे नाव घेतलेस, मी नाही हं !

**दाई** : अग माझ्या बाळे ! काय बोलते आहेस तू हे ! हाय ! माझ्या काळजावर घाव घातलास तू हा ! सख्यांनो मी कसे हे सोसू ? यापुढे जीविताचा भार कसा वाहू मी ? हे घृणास्पद जीवन ! हा शापित दिवस ! ( ती जमिनीवर कोसळते—नारीवृंद तिला सावरण्याकरिता पुढे येतो ) नको ! मला पडू द्या अशीच. माझ्या वाटेला जाऊ नका. मला मरायचे आहे आणि चिरशांती मिळवायची आहे ! मी मरणाच्या दारी आहे, माझे जीवन आता संपले आहे...याचा अर्थ काय ! ही निर्मळ अंतःकरणाची स्त्री—मनामधे पापाचा विचारही नाही—तरीही स्वतःच्या इच्छेविरुद्ध या पापकर्माच्या वासनेने पेटली आहे.( आव्हानपूर्वक ) ॲफ्रॉडाइटीही मुळी देवताच नाही ! नाहीच ! हा सर्वनाश तिनेच फीद्रावर, माझ्यावर आणि सर्व राजकुलावर ओढवून आणला आहे—ती एखाद्या देवतेहून महान आहे—श्रेष्ठ आहे.

**नारीवृन्द : कोरस** : ऐकलेत ना ?

करुण रुदन राज्ञीचे ऐकलेत ?
मानवी अंतःकरणाला साहवेल त्याहून अधिक
निष्ठुर आघातातून प्रसवलेले ते रुदन ?
प्रिय राज्ञी तुझ्या अंतरीचे नैराश्य
माझ्या हृदयाला उमगण्यापूर्वीच मलाही मरून जाऊ दे !
हाय ! व्यथेच्या कन्ये फीद्रा !
हाय ! हे व्यथे !
आमचा वंश तुझ्यावरच पोसून वाढला !
प्रकाशात अचानक खेचून काढलेली
दारुण आपत्ती !
घडी घडी तुझ्या घराला भेडसावणाऱ्या
या भयाला तोंड देत तू कशी जगणार आहेस ?
क्रीटच्या राजकन्ये !
प्रीतीच्या राज्ञीने तुझ्या आकाशकक्षेत एक
भलताच अभद्र तारा पाठविला आहे
तो आता कुठे बुडणार आणि कुठे अस्तंगत होणार
हेच आम्ही आता पाहणार आहोत.

**फीद्रा** : पेलोपॉनिजच्या बाहेरच्या उंबरठ्यावर इथे राहणाऱ्या ट्रोझीनवासी स्त्रियांनो !

माझ्याशिवाय अन्य चरित्रे कशी उद्ध्वस्त झाली याचा विचार करीत मी कधी कधी रात्र रात्र जागून काढली आहे; आणि माझा असा विश्वास आहे की असले दुर्भाग्य उपजत मूर्खपणातून उद्भवत नाही, कारण अनेक वेळा जी माणसे या यातना भोगतात ती शहाणी आणि सच्छील असतात. परंतु आपण या गोष्टीचा असा विचार केला पाहिजे की योग्य काय आहे हे आपल्याला कळतं आणि दिसतंही. परंतु ते आपण आचरू शकत नाही. काही आळसामुळे फशी पडतात, इतर, एखादे सुख सदाचारापेक्षा श्रेष्ठ मानल्यामुळे फसतात; आणि जीवनात अशी सुखे असंख्य असतात.

माझी विचारसरणी कशी घडत गेली ते ऐका. प्रीतीने माझ्यावर घाला घातला तेव्हा ती जखम सोसण्याचा उत्तम मार्ग शोधण्याचा मी प्रयत्न केला. एक शब्दही मुखावाटे बाहेर पडू द्यायचा नाही, मी जे सोशीत होते ते लपवायचे असा माझा पहिला निश्चय होता; कारण दुसऱ्याला शहाणपणाचे पाठ देण्यात कुशल परंतु स्वतःच्याच मूर्खपणाने स्वतःवर सर्वनाश ओढवून घेणाऱ्या जिभेचा भरवसा धरता येत नाही. नंतर आत्मसंयमनाने या वेड्या वासनेवर मात करून ती सोसण्याची—कारण ती तशी सोसणेच योग्य होते—मी सिद्धता केली. शेवटी जेव्हा या कामविकारावर प्रभुत्व मिळविण्यात मला यश आले नाही तेव्हा सर्व विरोध झुगारून मी असा निर्णय घेतला की, मी अनुसरण्याचा सर्वोत्तम, वादातीत मार्ग म्हणजे मरण. मी घेतलेला निर्णय तो हाच होय; म्हणूनच कुठल्याही प्रकारचा गुण देईल असा औषधी द्रव्यांचा उपाय करून माझा स्वतःचा उद्देश मला निष्फल करायचा नव्हता. माझ्या पापाचे लोकांना साक्षी ठेवून प्रदर्शन करण्याची जशी माझी इच्छा नाही तशीच जे योग्य आहे तेच मी करीत असताना ते लपविण्याचीही माझी इच्छा नाही. मला ज्या विषयाची आसक्ती जडली आहे तो विषय आणि ती आसक्ती दोन्हींतही पाप आहे हे मला माहीत होते. मला हेही यथोचितपणे माहीत होते की, मी एक स्त्री आहे; जगाच्या तिरस्काराचे एक लक्ष्य आहे. ज्या कोणी पहिल्या स्त्रीने परपुरुषाच्या नादी लागून आपल्या पतीशी प्रतारणा केली, तिच्यावर दुःख व मृत्यू ओढवून नाश होवो तिचा. उच्च कुलातील स्त्रियांमधेच प्रथम या भयंकर व्याधीचा प्रसार झाला; श्रेष्ठ पदस्थ जेव्हा भ्रष्टाचाराचा स्वीकार करतात तेव्हा सामान्यजन तेच करतील. प्रत्येक पापकर्म गुप्तपणे, बिनदिक्कतपणे करीत असताना ज्यांच्या जिभा मात्र चारित्र्य, शीलाविषयी बडबडत असतात अशा स्त्रियांची मला घृणा वाटते. सागराच्या पावित्र्यातून प्रसवलेल्या राणी ॲफ्रॉडाइटी! अशा स्त्रिया आपल्या पतीच्या नजरेला नजर तरी कशी देऊ शकतात; आणि त्यांच्या पापकर्माला आसरा देणाऱ्या अंधाराला आणि शापित भिंतींना वाचा तर फुटणार नाही ना या भयाने त्यांचा थरकाप कसा उडत नाही?

सख्यांनो, माझ्या पतीच्या आणि मुलांच्या प्रतिष्ठेला कलंक लावण्याचा अपराध माझ्या हातून घडू नये याकरिताच मी मृत्यूस कवटाळीत आहे. मला माझे पुत्र सर्व नगरांतील

श्रेष्ठ नगर जे ॲथेन्स तेथे जायला हवेत, आणि तेथे त्यांनी स्वतंत्र माणसासारखे आपले मस्तक उन्नत ठेवायला हवे, मुक्तपणे बोलायला हवे. त्यांच्या मातेमुळे त्यांना शरम वाटता कामा नये. मातापित्यांच्या गुप्त पापांच्या ओझ्याखाली जीवित कंठण्याची पाळी आली तर मोठा धैर्यवान पुरुषही लाचार होऊन जाईल. असे म्हणतात की, केवळ निःस्पृहवृत्ती आणि निरागस सद्सद्विवेक बुद्धीच माणसाला जीवनसंघर्षात शक्ती देते, उलट ज्यांची मने पापी असतात त्यांना, ज्याप्रमाणे एखाद्या युवतीला तिच्या दर्पणात तिचे खरे रूप दिसते, त्याप्रमाणे आज ना उद्या ज्या वेळी काळ आपला दर्पण त्यांच्या समोर धरील त्या वेळी त्यांना त्यांचे स्वतःचे पाप उघड झालेले दिसेल. माझा समावेश अशा लोकांत कधीही न होवो!

**नारीवृन्द कोरस :** खरंच आहे ते! सद्‌गुण जिथे जिथे प्रकटतो तिथे तिथे आपल्या सुभगतेने उठून दिसतो; आणि या जीवनात सद्‌गुणाचे फल म्हणजे नाम, सुकीर्ती.

**दाई :** माझे बाई, तुला काय झालंय हे प्रथम ऐकलं तेव्हा त्या पहिल्या धक्क्याने अगदी घाबरून गेले होते मी! पण आता मला वाटतं की तो मूर्खपणाच होता माझा. आयुष्यात, दुसऱ्यांदा सुचलेले विचार अनेक वेळा अधिक सुज्ञपणाचे ठरतात; तुझ्या बाबतीत जे घडले आहे ते काही तसे असाधारण किंवा अनाकलनीय नाही, ॲफ्रॉडाइटीचा प्रीतिज्वर तुला जडला आहे. तू : तू प्रेमात पडली आहेस. त्यात विलक्षण असे काय आहे? असे अगणित लोक प्रेमात पडलेले आहेत! आणि म्हणून प्रेमाकरिता जीवनत्याग करण्याचा तुझा हेतू आहे की काय? जर मृत्यू हेच प्रेमिकांचे कर्तव्य असेल आणि तर मग आताच्या भावी प्रेमिकांपुढे फार बिकट मार्ग उभा आहे म्हणायचा? प्रीतीचा झंझावात जेव्हा तिच्या सर्व सामर्थ्यानिशी वाहू लागतो तेव्हा त्याला प्रतिकार करता येत नाही. जे तिच्या सहज आहारी जातात त्यांच्यावर ती हळुवारपणे चोर पावलांनी आपला अंमल बसवते, परंतु जे उद्धट आणि हेकट असतात त्यांना ती उचलते आणि—त्यांचे काय करते माहीत आहे तुला,—त्यांना धुळीत पायदळी तुडविते! प्रीती मेघावर आरूढ होते आणि उफाळलेल्या सागरावरून दमदार पावले टाकीत जाते. सर्व विश्व प्रीतीतून निर्माण झाले; प्रत्येक बीज ती पेरते. पृथ्वीवरील प्रत्येक जीव प्रीतीने आपल्याला दिलेल्या देणगीमुळे त्या मधुर वासनेच्या पोटी जन्मला आहे, ज्यांच्या जवळ पुरातनकाळी काढलेली चित्रे आहेत, किंवा जे त्या कलेची साधना करतात– त्यांना माहीत आहे की झ्यूसला एकदा [12]सेमिलीविषयी कामवासना उत्पन्न झाली होती, त्यांना माहीत आहे की एकदा सुंदर देदीप्यमान उषादेवीचे[13] सेफॅलसवर[14] प्रेम बसले म्हणून तिने त्याला पळविले आणि देवांमध्ये राहण्याकरिता त्याला घेऊन गेली. अजूनही ती आणि सेफॅलस आकाशात राहतात आणि देवाची सोबत सोडण्याची त्यांना घाई झाल्यासारखे दिसत नाही. त्यांच्या बाबतीत परिस्थिती फार प्रबळ ठरली आहे, आणि खरे सांगते माझ्यावर विश्वास ठेव, त्यांना समाधान आहे आणि तू—तू विरोध करतेस? निसर्गनियमांत दोष

काढण्याचा तुझा कृतनिश्चयच असेल तर असे दिसते की तुझ्या पित्याने तुला काही अटींवर जन्म द्यायला हवा होता, किंवा दुसरे देव शोधायला हवे होते. मी तुला विचारते किती सालस आणि समजुतदार पती, पत्नी त्यांच्याशी प्रतारणा करताना दिसली तर नजर दुसरीकडे वळवतात ! किती पिते आपल्या प्रेमविव्हळ पुत्रांना त्यांना हवे ते मिळवून देण्यात साहाय्य करतात ? मर्त्य माणसाचे खरे शहाणपण दोष पूर्णपणे झाकण्यात आहे. सुतार छपराचे वासे रंधून चकचकीत करीत नाही; आणि आपण मर्त्य माणसांनी कंटाळवाण्या पूर्णत्वाकरिता झगडू नये हे बरे. काही झाले तरी या तुझ्यावर आलेल्या आपत्तीच्या महापुरातून तू कशी काय तरून पार होणार आहेस ? मुली, तूही मर्त्य आहेस. जीवनात तुझ्या वाट्याला येणारे भले जर दुरिताहून भारी असेल तर तू अत्यंत सुदैवी आहेस असे म्हटले पाहिजे. माझ्या लाडक्या लेकी, तुझे दुराग्रही अंतःकरण मृदू होऊ दे; अशी ईश्वरनिंदा करू नकोस ! कारण देवाहून आपण अधिक सामर्थ्यवान असावे असे वाटणे म्हणजे ईश्वरनिंदा नाही तर काय ? तू प्रेमात पडली आहेस, तर मग ते सहन कर—आणि जी देवांची योजना आहे ती स्वीकारण्याचे धाडस दाखव. तुझ्यावर आघात झाला आहे; तो घाव तुझ्या कल्याणाप्रत वळव. अग पुष्कळ जादूमंत्र, आराम देणाऱ्या सिद्धी आहेत; तुझ्याकरिता आपण एखादी औषधी मिळवू. आपण स्त्रियांनी याबाबतीत लक्ष घातले नाही तर पुरुषांकडून ही व्यथा दूर व्हायला फार काळ प्रतीक्षा करावी लागेल.

**नारीवृन्द कोरस नारीवृन्द** : फीद्रा, तुझ्या आताच्या गरजेच्या दृष्टीने हिचा उपदेश अधिक व्यवहारी आहे. तरीही मला वाटते तुझेच बरोबर आहे. तरीही तिच्या दूषणापेक्षा माझी अनुमती स्वीकारण्यास अधिक अवघड आणि अधिक यातनादायक वाटेल तुला.

**फीद्रा** : यामुळेच सुभग नगरांचा आणि प्राचीन कुलांचा नाश ओढवतो–या गोड बोलण्याने–अतिरिक्त गोड बोलण्याने; मला जे आवडेल असे तुम्हाला वाटते ते बोलण्यापेक्षा माझी अब्रू वाचविण्याचा एखादा मार्ग दाखवा मला.

**दाई** : हे नुसते उच्चपातळीवरून शिष्ट बोलणे आहे. नुसत्या उदात्त भावना काही तुला साहाय्य करणार नाहीत; तुला तुझा मनपसंत पुरुष मिळाला पाहिजे ! जे काही घडले आहे ते त्याला अगदी स्वच्छ शब्दांत सांगायला हवे आणि अधिक विलंब न लावता त्याला आपल्या बाजूला वळवून घेतले पाहिजे. हा प्रश्न जर जीवनमरणाचा नसता, जर तू अजूनही शुद्ध मनाची स्त्री असतीस तर मी तुला तुझ्या स्वतःच्या वासनापूर्तीकरिता आणि उपभोगाकरिता इतके प्रोत्साहन दिले नसते; परंतु आपण आता तुझा प्राण वाचवण्याकरिता झगडले पाहिजे– आणि यात गैर असे काहीच नाही.

**फीद्रा** : गैर काहीच नाही ! फारच भयंकर आहे हे ! तू गप्प बैस ! असले बेशरमपणाचे शब्द पुनः उच्चारू नकोस !

**दाई :** बेशरमपणाचे—तसेही कदाचित असतील ते. परंतु गोड शब्दांपेक्षा तुला अधिक उपयोगी आहेत ते. पावित्र्याच्या व्यर्थ बढाईकरिता मरण्यापेक्षा मी सांगते तसे कर आणि जग.

**फीद्रा :** नको. देवाशपथ तू असे बोलू नको ! तू जे बोलतेस ते पटण्यासारखे आहे, परंतु ते अधमपणाचे आहे. याहून अधिक बोलू नकोस, माझ्या हृदयाला हे दुःख सोसण्याचे मी वळण लावले आहे. तू जर पापाची एवढी समर्थ तरफदारी करीत राहशील तर ज्या गर्तेपासून मी मागे सरते आहे त्याच गर्तेत मी खोल पडेन.

**दाई :** तुला जर तसे वाटत असेल तर,—मनानेच तू ते पाप करायला नको होतेस. पण तू ते केलेस; आता माझे ऐक—आणि मग तुला जितके कृतघ्न व्हायचे असेल तितकी हो. प्रीतिज्वरापासून आराम देणारी एक औषधी आतमधे माझ्याकडे आहे—आताच मला आठवली ती; तिच्यामुळे तुझी अप्रतिष्ठा मुळीच होणार नाही, मनाला पण काही त्रास होणार नाही; ती तुला या कामविकारापासून परावृत्त करील. मात्र तुझे हृदय कमकुवत नसले पाहिजे.

**फीद्रा :** ही औषधी—ते विलेपन आहे की—पोटात घेण्याचे द्राव आहे ?

**दाई :** मला माहीत नाही नीटसं. मुली, साहाय्य मिळविण्याकडे लक्ष ठेव—स्पष्टीकरणाचा आग्रह नको.

**फीद्रा :** तू फार चतुराई करायला जाशील—आणि माझा सर्वनाश करशील. मला त्याची भीती वाटते.

**दाई :** तर मग तुला सगळ्याचीच भीती वाटेल ! तुला नक्की कशाचे भय वाटते ?

**फीद्रा :** माझ्याविषयी हिपॉलिटसला तू काही तरी सांगशील.

**दाई :** मुली ते तू माझ्यावर सोपव. काय करायचं ते मला कळते. ( स्वगत ) महाराणी अॅफ्रॉडाइटी, आता तू मात्र माझ्या पाठीशी राहून साहाय्य कर ! माझ्या मनात जी एक दुसरी गोष्ट आहे ती साध्य करण्याकरिता, प्रासादातील आमच्या मित्रापाशी एक शब्द उच्चारला तरी पुरेसा आहे.

**दाई जाते. फीद्रा मंचकावरच राहते.**

**नारीवृन्द कोरस : स्ट्रोफी एक**

ही प्रीती, चिरंतन शक्ती,<br>उत्कंठित नेत्रावर अभिलाषेचे<br>दवबिंदूसारखे सिंचन करणारी प्रीती<br>प्रीती,<br>तिचे विजयी बाहू<br>जित जीवाला

मधुरतम बेहोषीने सुखवितात !
हे प्रीती निष्ठुर होऊन येऊ नकोस
माझ्या जीवनात निर्दय संहारकतेने
आक्रमण करू नको.
तप्त सूर्याचा किंवा
ताऱ्याचा ज्वलंत आघात
झ्यूसकन्या ॲफ्रॉडाइटीचा
मदनाच्या हातून सुटलेल्या शराहून
मर्त्य हृदयाला वेड लावण्याच्या बाबतीत
कमी भयावह नसतो.

## अन्टीस्ट्रोफी एक

आल्फिअसच्या तीरांवर
पायाथिअनच्या मंदिरात
यज्ञयाग व्यर्थच वाढतील
अपोलो आणि आर्टेमीझच्या हक्काच्या हवनार्थ
ग्रीसच्या कुरणातील बैलांच्या रक्ताचे पाट व्यर्थच वाहतील !
कारण इकडे आपण ॲफ्रॉडाइटीच्या मधुर सुखद
शयनमंदिराची रखवाली करणाऱ्या इरॉसची
मानवांच्या स्वामीची
आपल्या प्रार्थनांतून उपेक्षा करतो :
प्रीतीच्या आगमनाचे विश्वाच्या निर्मितीपासून
मृत्यू आणि विपत्ती उद्‌भवत आली आहे.

## स्ट्रोफी दोन

ईकालियाची राजकन्या आयोली[१५]
एकेकाळी मुक्त आणि निष्कलंक कुमारी होती.
पुरुषाशी संबंध न आलेली कन्या;
जोखडास न जुंपलेली घोडी

परंतु ॲफ्रॉटाईटीने तिला तिच्या घरातून
बाहेर काढले.
असहाय्य आणि भयभीत वनदेवता;
अशी ती रानावनातून बेभान भटकू लागली.
आणि तिथे रक्तपातात आणि वणव्यात
मृत्यूच्या विव्हल विवाहगीतात
ती रडत असताना तिला
समुद्रावर घेऊन जाण्याकरिता
आयोलीला तिने आल्क्मीनीच्या पुत्रास दिली.

## ॲन्टिस्ट्रोफी दोन

थीब्ज्च्या पवित्र भिंतींनो
डर्सीच्या[१६] झऱ्यांच्या ओठांनो
ॲफ्रॉडाइटीचे आगमन किती भयंकर असते
हे तुम्हीच एक सुरात सांगू शकाल.
विजांचा कडकडाट आणि ज्वाला
जेव्हा सेमिलीवर कोसळल्या
आणि तिच्या गर्भाशयातून
झ्यूसचा पुत्र—बॅकस याचा जन्म झाला तेव्हा
ॲफ्रॉडाइटने तिला निद्राधीन केले
मृत्यूच्या प्रीतिशय्येवरील वधूच जणू.
तिच्या भयाचा निःश्वास सर्व सृष्टीवर जाणवतो.
आणि तिच्या प्रभावाचा मार्ग
भृंगाच्या भरारीसारखा गतिमान आहे.

**फीद्रा :** बायांनो जरा शांत राहा पाहू!—बाई ग शेवटचा आघात कोसळला आहे.
**नारीवृंद कोरस :** आम्ही शांत राहतो, पण हे काहीतरी अशुभ वाटतंय!
**फीद्रा :** थांबा ग! ते काय—नक्की काय बोलताहेत ते मला ऐकायचे आहे.
**कोरस :** प्रासादात काहीतरी भयंकर घडत आहे. फीद्रा ते काय असेल ग!
**फीद्रा :** हाय! मलाच का एवढ्या यातना? हे सारं असह्य झालं आहे मला!

**नारीवृंद कोरस :** काय असह्य झालं आहे फीद्रा?
हा व्याकुळ स्वर कसला आहे?
आम्हांला सांग,
कोणता भयावह शब्द
दैवाच्या घणाघातासारखा तुझ्या कानावर पडला?

**फीद्रा :** तो—माझा मृत्यूच आहे तो! या दाराजवळ उभ्या राहा आणि ऐका. तिथे कसला कोलाहल उठत आहे तो तुम्हाला ऐकू येतो?

**नारीवृंद कोरस :** दाराजवळ तू आहेस?
हे घर तुझ्याकरिताच शब्द उच्चारीत आहे!
मग मला सांग,
कसला भयावह ध्वनी तू ऐकलास,
मला सांग,
काय घटना घडविली जात आहे?

**फीद्रा :** तो आश्वारूढ अमेझॉनचा पुत्र हिपॉलिटस माझ्या वृद्ध दाईला शिव्याशाप देतो आहे.

**नारीवृंद कोरस :** होय, मला आवाज ऐकू येत आहे खरा.
पण एकही शब्द नीट कळत नाही :
मला कसे उमगणार ते? घरातून आलेला शब्द
तुलाच स्पष्ट ऐकू आला!

**फीद्रा :** ऐका! मला अगदी स्वच्छ ऐकू येतंय! तो तिला अधम, कुलटा म्हणतो आहे; धन्याच्या शय्येशी द्रोह केल्याबद्दल तिचा धिक्कार करीत आहे.

**नारीवृन्द कोरस :** नाही, नाही! आपण काय करायचं आता?
राणी, तुझा विश्वासघात झाला आहे!
काय उपाय सुचवू मी तुला?
तुझे गुपित साऱ्या जगापुढे उघड झाले आहे,
तुझे जीवन अन् आशा, सखीच्या हाताने
धुळीस मिळविल्या गेल्या आहेत!

**फीद्रा :** तिने माझ्याविषयीचे दारुण सत्य त्याला सांगितले आहे. तिने ते माझ्यावरील प्रेमाने माझ्या यातना दूर करण्याकरिता केले; पण ते अयोग्यच होते.

**नारीवृन्द कोरस :** पण आता काय? यातून बाहेर पडण्याचा काही मार्ग आहे का? आता तू काय करशील?

**फीद्रा :** काही कळेनासं झालंय मला! एवढं मात्र स्पष्ट आहे. तात्काळ मृत्यूच या छळातून सुटण्याचा एकमात्र मार्ग आहे.

**हिपॉलिटस प्रवेश करतो. त्याच्या पाठोपाठ दाईही येते.**

**हिपॉलिटस :** हे धरतीमाते! हे सर्व सृष्टी प्रकाशमान करणाऱ्या सूर्यप्रकाशा! मी हे काय ऐकले! हे कसले अनुच्चारणीय शब्द उच्चारले गेले!

**दाई :** शांत हो, मुला, नाही तर हा गलका कुणीतरी ऐकील!

**हिपॉलिटस :** मी जे ऐकले ते ऐकल्यावर मी शांत कसा राहू?

**दाई :** मी भीक मागते, तुझे हस्तावघ्राण करते—लाडक्या मुला, तू शांत हो!

**हिपॉलिटस :** हात नको लावू माझ्या वस्त्रांना! खबरदार मला स्पर्श करशील तर!

**दाई :** देवाचे नाव घेऊन विनवते दया कर! मी तुला जे सांगितले ते कुणाला सांगू नकोस! माझे मरण ओढवेल नाही तर.

**हिपॉलिटस :** तुझे मरण ओढवेल? का बरं? तुझे शब्द निष्पाप आहेत असे तूच तर म्हणतेस!

**दाई :** माझ्या मुला, मी जे म्हणाले ते सर्वांनी ऐकण्याकरिता नव्हते.

**हिपॉलिटस :** खरे शब्द असे दडपून टाकू नयेत; ते सर्वांना ऐकू देत!

**दाई :** मुला, तू माझ्या साक्षीने घेतलेल्या शपथेची अवहेलना करू नकोस!

**हिपॉलिटस :** शपथ माझ्या जिभेने घेतली; ती माझ्या अंतःकरणाला बंधनकारक नाही.

**दाई :** तू काय करणार आहेस, मुला? तुझ्या सखीचा सर्वनाश करणार आहेस?

**हिपॉलिटस :** सखी! देव करो, मला असली सखी न मिळो!

**दाई :** क्षमा! क्षमा कर मुला! आम्ही माणसे आहोत, आमच्या हातून प्रमाद घडतात आणि आपण माणसं अगदी अगतिक असतो त्या बाबतीत.

**हिपॉलिटस :** हे झ्यूसदेवा! या जगात स्त्रीसारख्या नीच आणि निरुपयोगी प्राण्याचा उपद्रव का निर्माण केला आहेस? या जगात मर्त्य माणसांचा वंश निर्माण करण्याची तुझी मर्जी होती तर त्या वंशाचे पुनर्जनन करण्याची शक्ती स्त्रीच्या ठायीच का असावी? त्यापेक्षा पुरुषांनी तुझ्या मंदिरात यावे, ज्याला जेवढी परवडण्यासारखी असेल तेवढी किंमत मोजावी, सोने रुपे देऊन स्वतःकरिता गर्भावस्थेतील मुले विकत घेऊन, किंमत वसूल करावी, मग स्त्रियांशिवाय पुरुष आपआपल्या घरी स्वतंत्रपणे राहू शकतील. असे पाहा स्त्री ही एक दुष्ट उपाधी आहे याचा पुरावाच आहे हा. तिला जन्म देऊन वाढविल्यानंतर तिचा पिता तिला चांगले घर मिळावे म्हणून हुंडा मोजतो आणि तिच्या जबाबदारीतून मोकळा होतो. आणि

या सर्पिणीला जो आनंदाने उराशी कवळतो तो तिला एखाद्या पवित्र मूर्तीसारख्या हर्षभराने वस्त्राभूषणांनी नटवितो, तिरस्करणीय वस्तूवर सौंदर्याच्या राशी रचतो आणि स्वतःची वडिलोपार्जित संपत्ती उधळून टाकतो. गरीब बापडा! नाही तरी त्याला दुसरे काय करता येण्यासारखे असते? त्याने उच्चकुलातील स्त्रीशी विवाह केला तर त्राटिकेशी शय्यासोबत करून त्यातच जास्तीत जास्त समाधान मानण्याचा प्रयत्न करतो, किंवा त्याला गरिबाघरची चांगली वधू मिळाली तर तेवढ्यातच समाधान मानून तो त्याच्या दुर्दैवाला तोंड देतो. सुखी जीवन जगायचे असेल तर अगदी सामान्य मुलीशी विवाह करावा व निरुपयोगी आणि निर्बुद्ध अशी तिला एखाद्या चबुतऱ्यावर बसवून ठेवावी. स्त्रीजातीस न शोभण्याइतका विचार करणाऱ्या चतुर स्त्रीविषयी मला तिटकारा आहे, माझ्या घरात मी तिला ठेवणार नाही! कारण चतुर स्त्रीमध्ये वासनेतून दुष्टपणा सहजच निर्माण होतो; तर चातुर्याच्या अभावामुळे सामान्य स्त्रिया उच्छृंखलपणापासून अलिप्त ठेवल्या जातात. पत्नीच्या जवळ कुणाही चाकराला कधीही जाऊ देऊ नये. जे तिला समजूही शकणार नाहीत असे मुके रानटी पशूच तिच्या सेवेत असावेत. आहे या परिस्थितीत कुलटा स्त्रिया घरी बसून जारकर्माच्या योजना आखतात आणि त्यांच्या सेविका त्यांच्या योजना बाहेरच्या जगात पोहचव तात—तू एक त्यांच्यापैकीच आहेस—माझ्या पित्याच्या पत्नीशी मातृगमन करण्याकरिता मला पाचारण करण्याकरिता आलेली तू स्त्री सैतान आहेस! माझ्या कानातील तुझे पापी शब्द पाण्याच्या पुराने मी धुऊन काढतो! तुझे शब्द नुसते ऐकूनच कलंकित झाल्यासारखे मला वाटत असताना माझ्या हातून असे पापकर्म घडेल असे तुला वाटते काय?

ऐक! हे गुप्त राखण्याच्या शपथेच्या खोड्यात मी तुला मला स्वतःला अडकवू दिले आहे. मला देवाचे भय वाटते, आणि त्यामुळेच तू वाचली आहेस, नाही तर मी ही सर्व हकीकत माझ्या पित्याला तात्काळ सांगितली असती. त्याऐवजी मी आता ते परत येईपर्यंत हा प्रासाद सोडून जात आहे; आणि मी आता त्याविषयी काही बोलणार नाही, परंतु मी माझ्या पित्याबरोबर परत येईन आणि मग तू आणि तुझी मालकीण त्यांच्या डोळ्याला डोळा कसा भिडवता ते पाहतो. तू निर्लज्जपणे तो प्रसंग निभावून नेशील—तुझी जात मला माहीत आहे —तुम्हा स्त्रियांची सर्व जातच नरकात जाऊ दे. तुमचा कितीही तिरस्कार केला तरी मला तो पुरेसा आहे असे वाटत नाही. लोक म्हणतात मी नेहमीच हे असे बोलतो. तसंही असेल. पण असं दिसून येतं की, स्त्रियाही नेहमी त्याच त्या रूपात प्रकट होत असतात. म्हणून जो कुणी स्त्रीला चारित्र्यशुद्ध राहायला शिकवील तोच मला स्त्रीचे नाव पायदळी तुडविण्यास मना करू शकेल.

**जातो**

**नारीवृन्द कोरस :**

स्त्रीजन्माला येणं हा किती घोर शाप आहे !
कुणाला नाही आमच्याविषयी अनुकंपा वाटणार ?
एकदा पहिला तोल गेल्यानंतर
कसल्या हिकमती, कसल्या लटपटी
कसल्या आळवण्या
आम्हाला अपराधाच्या पकडीतून
सोडवतील ?

**फीद्रा :** माझे वर्तन ज्या दंडाला पात्र होते
तो आता माझ्या नशिबी आला आहे !
हे पृथ्वी, हे सूर्यप्रकाशा,
दैवाच्या पकडीतून मी कुठे उडून जाऊ
ते मला दाखवा !
माझी व्यथा मी कुठे लपवू !
कोणता देव
कोणता मनुष्य
माझ्या अपराधी आत्म्याला
रक्षण, सहाय्य, व दिलासा देईल ?
यातनाजालात
मी गुरफटले आहे.
जित्या जीवाची यातून सुटका नाही.
योगायोगाच्या तडाख्याखाली मी कोसळत आहे.

**नारीवृंद कोरस :** राणी, मी तुझ्या बरोबर अश्रू ढाळीत आहे. व्हायचा तो अपाय होऊन गेला आहे, तुझ्या सेविकेची योजना फसून अनर्थ झाला आहे.

**फीद्रा :** ( दाईला ) अधम, विश्वासघातकी कुत्ये, बघ, बघ. तू माझी काय अवस्था करून टाकली आहेस ! ज्याने मला जन्म दिला तो झ्यूसदेव तुझे अशनीपाताने भस्म करो, तुला मातीत चिरडून टाको, तू जो कट करीत होतीस त्याला मी प्रतिबंध केला होता ना ! या धुळीतून जे मला आता फरफटत ओढीत आहे त्याबद्दल एक शब्दही तू बोलू नकोस अशी मी तुला सक्त ताकीद केली होती ना ? तरीही तू बरळलीस, आणि तुझ्या विद्रोहाने

माझे अब्रूचे मरणही हिरावून घेतले. आता काही नवा डाव टाकला पाहिजे. संतापाने भडकलेला हिपॉलिटस आता तुझे बीभत्स शब्द त्याच्या बापाला सांगेल आणि माझी बदनामी करील; पिथ्यूसकडे गाऱ्हाणे घेऊन जाईल, त्याच्या प्रक्षोभक बहकण्याने सबंध प्रदेश दुमदुमून उठेल! तुझा सत्यानाश होवो! आपल्या मित्रावर परिणामी दुष्ट ठरणारी मदत लादून त्याचा नाश करणाऱ्या सर्व लुडबुडणाऱ्या मूर्खांचा नाश होवो!

**दाई** : बाईसाहेब, मी तुमच्या नाशाला कारण झाले आहे. तू मला खुशाल बोल लाव. या तुला झालेल्या जखमेच्या वेदना होताहेत आणि तुझ्या विवेकावर पगडा बसवीत आहेत. तरीही तू जर माझे ऐकून घेणार असशील तर मी माझी बाजू मांडते. मी तुझे संगोपन केले; मी तुझी हितकर्ती आहे. तुझ्या व्यथेवर उपाय शोधण्याचा मी प्रयत्न केला, आणि मी अपेशी ठरले. माझे नशीब अधिक चांगले असते तर मला सुज्ञ स्त्री म्हटले गेले असते. शेवटी शहाणपण म्हणजे तरी काय? केवळ योगायोगाने केलेला तर्क खरा ठरणे.

**फीद्रा** : अस्सं! ही तुझ्या मते तू केलेली, झालेल्या अपराधाची भरपाई! तर—तुझ्या कपटजालावर हा आणखी युक्तिवाद!

**दाई** : बोलण्यात आपण वेळ व्यर्थ घालवीत आहोत. मी मूर्खपणा केला हे कबूल करते पण मुली अजूनही आशा आहे, जगण्याची अजूनही आशा आहे.

**फीद्रा** : गप्प बैस! एक शब्दही बोलू नकोस! तू मला पूर्वीही सल्ला दिला होतास आणि मदतही केली होतीस; आणि ती दोन्हीही दुष्ट होती. माझ्या दृष्टीपुढून दूर हो! तुझ्या स्वतःच्या व्यापासाठी योजना करीत बैस, माझा व्याप मी निस्तरते.

## दाई निघून जाते

ट्रोझीनमधील उच्चकुलीन स्त्रियांनो, माझ्यावर एवढी कृपा करण्यास मी तुम्हाला विनविते. आज इथे जे तुम्ही ऐकले ते मनात खोल गाडून टाका.

**नारीवृंद** : झ्यूसची कन्या आर्टिमीझ शपथ तुजविषयी जे घडले त्यातील काहीही मी उघड करणार नाही.

**फीद्रा** : ते ठीक झाले. माझ्या सख्यांनो ऐका : मी हे पूर्वीही सांगितले आहे—माझ्या या आताच्या आपत्तीवर एक उपाय मजपाशी आहे. त्यामुळे माझ्या पुत्रांचे निष्कलंक उज्ज्वल भवितव्य निश्चित होईल आणि आजच्या अरिष्टात तो मलाही सहाय्यभूत होईल. क्रीटच्या राजघराण्याची प्रतिष्ठा माझ्यामुळे लयास जाणार नाही. या सर्व अपकीर्तीनंतर थीस्यूस समोर तोंड घेऊन जाणेही एका जीवनाचे फार मोठे मोल दिल्यासारखे होईल.

**नारीवृंद** : फार भयंकर आणि निर्णायक असे तू काय करणार आहेस?

**फीद्रा :** आत्महत्या करणार आहे मी. कोणत्या मार्गाने ते स्वतःशी मी ठरविणार आहे.

**नारीवृंद कोरस :** देवा रे नको ! नको असे बोलूस !

**फीद्रा :** तुम्ही सुद्धा मला या प्रसंगी कसे वागावे ते शिकविले पाहिजे. मला माझी भूमिका माहीत आहे. आता मी जीवनाचा त्याग करीन, आणि माझ्या अमर हंतकेला आनंद देईन. प्रीतीला दया नाही, पराभूत होऊन मी मरेन. पण माझा मृत्यू दुसऱ्या एकाच्या जीवाला शापभूत ठरेल. आणि माझे दुःख पायदळी तुडवायला नको होते असा धडा शिकवील. माझ्या यातनांत त्याचाही सारखाच वाटा राहीलआणि मग तो सहृदयता शिकेल !

**फीद्रा जाते.**

**नारीवृंद :**

**स्ट्रोफी एक**
सुटून इथून
उंच गुप्त कपारीत
लपून जायला मिळेल तर !
एखाद्या देवाच्या स्पर्शाने कायापालट होऊन
पक्ष्यासारखे उंच जाऊन
पिसांच्या पंखावर उंच उडणाऱ्या
पक्ष्यांच्या समुदायासवे आकाशगमन करता आले तर !
असं वाटतं अज्ञात सागरात जिथे एरिडॅनसचे
गुप्त झालेले जल
खोल वाहात जाते तिथे दूरवर मुक्त भ्रमंती करावी,
–जिथे मृत फिथॉनकरिता[१७] सूर्यकन्यांनी
ढाळलेले
करुण आसू
जांभळ्या प्रवाहात
तृणमण्याप्रमाणे चमकतात

### ॲन्टिस्ट्रोफी एक

आणि पश्चिम सागराजवळील
शांत उद्यानात
जिथे सुवर्ण सफरचंद वृक्षाच्या तळाशी
संध्येच्या कन्या गात असतात
तिथे जाता आले तर !
जिथे साहसी खलाश्याला
भटकता भटकता त्याचा जांभळ्या
उजाड सागरावरील पश्चिमेकडील मार्ग
सागराधिपतीने बंद केलेला आढळतो !
जिथे महाकाय ॲटलस
आकाशाच्या झाकळलेल्या सरहद्दी
रक्षीत असतो,
जिथे झ्यूसच्या प्रासादातील
अमृत मधुर झरे
स्वर्गीय प्रणयमंचका जवळून
वाहत असतात;
आणि पवित्र धरती
अमरदेवांच्या उपाहाराची
सुभगता वृद्धिंगत करण्याकरिता
अति दुर्लभ अस्वादांच्या
फलांच्या उदंड राशी रचीत असते

### स्ट्रोफी दोन

शुभ्र शिडांच्या ज्या जहाजाने
महोदया फीड्राला
तिच्या समृद्ध घरातून
धडका देणाऱ्या सागराच्या
उसळत्या क्षार लाटांवरून आणले.
वधूच्या आनंदाची प्रतीके

शुभ्र शिडे
दवा धरून बसलेली
कृष्ण दैवगती झाकण्याकरिताच जणू !
क्रीटपासून
मुख्यभूमीवरील नगरांची राज्ञी असलेल्या
अँथेन्सपर्यंतचा तिचा मार्ग
अपशकुनांनी भारावलेला होता,
पायरिअसला तिचे खलाशी
किनाऱ्यावर झेपावले
आणि त्यांनी वळलेल्या दोराचे फास
धक्क्यावर टाकले
म्युनिशिअनच्या खडकाळ बंदरातून
ते राजवंशियांचे जहाज
जेव्हा ट्रोझीनकडे वळले
तेव्हा पुनः घटिका काळवंडल्या

## ॲन्टिस्ट्रोफी दोन

तिथून पुढे फीड्रा दुर्दैवी शापात फसली
जेव्हा घातकी पापी कामवासनेने ॲफ्रॉडाइटीने
तिचे अगतिक अंतःकरण उद्ध्वस्त केले !
आता तिच्या व्यथेचा झंझावात
तिला या बुडणाऱ्या फुटलेल्या नौकेला—
एकाकी तिच्या शयनमंदिराकडे लोटीत आहे.
उंच तुळईवरून ती तिच्या
धवल मानेभोवती घट्ट फास आवळील,
हीच तिची एकमेव निवड,
मरण.
अशा तऱ्हेने तिच्या दैवी वैरिणीविषयीची
श्रद्धा आत्मसात करून
आणि कीर्तिधवल असे

आपले नाव मागे ठेवणे
जीवनाहून श्रेष्ठ मानून
आपल्या यातनामय प्रीतिपाशातून
तो आपल्या हृदयाची सोडवणूक करील.

**प्रासादातून ओरडण्याचा आवाज ऐकू येतो**

**आवाज :** हाय ! धावा, धावा ! घरात कुणी आहे का ? या धावा, मदतीचा हात द्या तिने गळफास लावून घेतला आहे—राणीने–थीस्यूसच्या पत्नीने !

**नारीवृंद :** हाय ! ते घडले तर ! तिने आपला शब्द खरा केला ! फीद्रा, फीद्रा ग ! ती गेली गेली ! राणी गेली ! गळ्याला फास बसलेल्या दोरात उंचावर लटकत आहे ती.

**आवाज :** लवकर या ! सुरी आणा, खड्ग आणा, तिच्या मानेभोवतीचा हा दोर कापण्याकरिता काहीही आणा !

**नारीवृंद अ :** सख्यांनो, आता आपण काय करायचं ? आपण आत जाऊन फास सोडवून तिची सुटका करायची का ?

**नारीवृंद ब :** का बरं ! तिच्या सेवेतले तरुण परिचारक कुठे आहेत ? लुडबुड करणे कधीही बिनधास्त नसते बाई.

**आवाज :** बिचारी राणी, मरण पावली आहे ती ! तिचा देह नीट सरळ करून ठेवा. किती भयंकर हकीकत आता आमच्या स्वामींना सांगावी लागेल !

**नारीवृंद :** तुम्ही ऐकलेत ना ? बिचारी फीद्रा. मेली शेवटी. ते आताच तिचा देह व्यवस्थित नीटनेटका ठेवीत आहेत.

**रक्षकांसह थीस्यूस प्रवेश करतो. देववाणीचा अनुकूल कौल मिळालेले लोक घालतात तसला पुष्पबंध त्याने मस्तकावर धारण केला आहे.**

**थीस्यूस :** मला सांगा बायांनो – प्रासादात कसली गडबड चालू आहे ? सेवकांच्या रडण्याचे आवाज मला ऐकू आले. ( सर्व गप्प राहतात ) विचित्रच आहे हे सगळे ! एक धार्मिक गंभीर कामगिरी आटपून घरी परतलो आहे मी – माझ्या घरी माझ्या स्वागताचा किंवा स्वस्तिवचनाचा एकही शब्द ऐकू येत नाही. माझे घर आपले दरवाजे बंद करून बसले आहे. पिथ्यूसला तर काही झाले नसेल ना ? त्याचे वय आता झाले आहे. तरी पण त्याचे या घरातून कायमचे जाणे मला अत्यंत शोककारक होईल.

**नारीवृन्द :** थीस्यूस, जे घडले आहे त्याचा वृद्धाशी काही संबंध नाही. जिच्या मृत्यूने तुझे काळीज फाटणार आहे ती व्यक्ती तरुणच आहे.

**थीस्यूस :** काय ? माझ्या मुलापैकी कुणाला काळाने माझ्यापासून हिरावून नेले आहे काय ?

**नारीवृंद :** तसे नाही; घडलंय ते त्याहूनही भयंकर आहे. त्यांची माता मरण पावली आहे.

**थीस्यूस :** काय म्हणता तरी काय तुम्ही ? माझी पत्नी मरण पावली ? काय झालं ?

**नारीवृंद कोरस :** तिने स्वतःच आपल्या गळ्याला दोराचा फास लावून घेतला.

**थीस्यूस :** पण का ? काही सुन्न करणाऱ्या शोकाघातामुळे तिने असे केले का ? इतके भयंकर कृत्य तिने करण्याला कारण तरी काय झाले ?

**नारीवृंद :** थीस्यूस, मला एवढंच माहीत आहे. मी आत्ताच तुझ्या हानीबद्दल शोक करण्यासाठी प्रासादात आलो आहे.

**थीस्यूस :** फीद्रा–मरण पावली ! तर मग मी ही पर्णमाला माझ्या मस्तकावर का धारण केली आहे ? हाच देववाणीचा मला मिळालेला कौल !–कोण आहे ! तिकडे कवाडे उघडा ! अडसर काढून सताड उघडा ! माझ्या मृत पत्नीला पाहू द्या मला–तिचा मृत्यू हा माझाच मृत्यू–माझ्या जीवनाचा अंत आहे !

**दारे उघडतात, मृत फीद्रा दिसते**

**नारीवृंद :**

राणीकरिता शोक करा,
तिच्या अश्रूत अश्रू मिळवा,
फीद्रा, तुझ्या यातना आणि
तुझे कृत्य–दोन्हीही
या घरातून शांतता हद्दपार करतील
इतक्या अमंगल,
इतक्या अघोर मृत्यूचे साहस कसे केलेस ग ?
स्वतःच्याच निर्दय हातांना तू बळी पडलीस ?
बापड्या जीवा,
कोणती शक्ती
मृत्यूत तुझे तेज मालवीत आहे ?

**थीस्यूस :** या जीवनाच्या यातना !
या परक्या नगरीत
माझ्यासाठी वाढून ठेवलेले दारुणतम दुःख

मला पहावे लागले,
हाय! दुर्दैव, एखाद्या निष्ठुर टाचेखाली
चिरडावे तसे मला आणि माझ्या घराला
चिरडून टाकते आहे.
पाठपुरावा करणाऱ्या कुणा पिशाच्चाचा
अनामिक, ओंगळवाणा,
भ्रष्टविणारा,
जीवन आणि जीवनासक्ती
नष्ट करणारा संसर्ग आहे हा!
माझ्या दुरिताच्या सागरावरून मी माझी
निराश दृष्टी फिरवीत, शिणवीत आहे
आणि सुरक्षित सुटकेची आशा
नष्ट होत आहे,
कारण किनारा दृष्टिपथापलीकडे आहे,
जीवन एक उंच उंच उसळणारी लाट आहे.
तिच्यावर आक्रमकतेने आरूढ होण्याची शक्ती
माझ्या ठायी नाही.
फीद्रा, कोणत्या कारणपरंपरेला
कोणत्या विद्वेषी योगायोगाला
कोणत्या विधिलिखित अदयतेला
मी दूषण लावू?
माझ्या हातून
एखादी पक्षिणी
उडून जावी तशी
तू नाहीशी झालीस;
द्रुत गतीने आणि धैर्याने
तू अंधाराच्या गर्तेत
झेप घेतलीस;
आणि माझ्यासाठी ठेवलेस केवळ
तुझ्या मृत्यूसाठी ढाळावे लागणारे अश्रू
तुझ्या मनात दाटलेल्या नैराश्याबद्दल तळमळ.

इथून खूप दूर
या फलिताने मूळ धरले.
फार पूर्वी एक पाप रुजले !
देवांनी ते फल पक्व केले
आणि आता ते दुःखाच्या रूपाने
माझ्या पदरी मी घेत आहे.

**नारीवृन्द :** राजा

हे दुःख एकट्या तुझ्याच जिवाला
पोखरते आहे असे नाही;
प्रिय पत्नी
हरपल्याच्या शोकात
अनेक सहभागी आहेत—

**थीस्यूस :** अंधारात जायचे !

आता मला मरून
धरती खालील जगात,
आनंदहीन अंधकारात जाऊ दे !
कारण प्रियतमे—
तू आता माझ्यासवे नाहीस,
आज तू जो मृत्यू—
सम धक्का मला दिलास
तो तुझा घास घेतलेल्या मृत्यूहून
अधिक भीषण आहे.
मला सत्य कोण सांगेल ?
ज्याचा हा निर्घृण घाला
तुझ्या संत्रस्त हृदयावर पडला—
प्रिय भार्ये
तो कुयोग कुठून ओढवला असावा ?
काय घडलं ?
मला कुणी सांगेल का ?

की माझ्या घराने
मिथ्याभाषी खिदमतगारांच्या
खिल्लारालाच आसरा दिला आहे ?
फीद्रा, माझं काळीज फाटून गेलं आहे ग !
मित्रांनो,
घर विराट दुःखाने
उद्ध्वस्त झालेले
पाहण्यास जगलेल्या माझ्यावर
दया करा !
शब्दांतून ती व्यथा व्यक्त करता येत नाही,
मानवी अंतःकरणाला ती साहवणार नाही
माझे जीवित संपले आहे.
माझे घर उजाड झाले आहे.
माझी मुले मातृहीन झाली आहेत.
नेत्रदीपक सूर्य
वा चांदण्यांचे नेत्र असलेली संध्या.
जे जे पाहते त्या सर्वांहून
अधिक लावण्यमयी असलेल्या
प्रियतमे
तू कायमची निघून गेली आहेस !

**थीस्यूस बोलत असतानाच फीद्राच्या मनगटाला बांधलेले एक पत्र नारी-वृन्दाला दिसते.**

**नारीवृन्द :** थीस्यूस, ज्या वादळाने तुझे घर उद्ध्वस्त केले आहे ते तुझ्यावर कोसळले म्हणून मला तुजविषयी करुणा वाटते. पण तरीही तुझे दुःख मी साश्रुनयनांनी पाहत असतानाच आगामी अरिष्टाच्या अधिक गंभीर भयाने माझा थरकाप होतो आहे.

**थीस्यूस :** पहा इकडे पहा ! तिच्या कमनीय हाताला एक पत्र बांधले आहे ! याचा अर्थ काय ? ते मला काही नवीन माहिती देईल काय ? निश्चितच तिने आपल्या मरणकाळच्या इच्छा लिहिल्या आहेत. आमच्या विवाहाची आणि आमच्या पुत्रांची आठवण ठेवण्याविषयी तिने विनवणी केली असेल. फीद्रा, तू निश्चित रहा ! माझ्या घरात आणि माझ्या शय्येवर अन्य स्त्रीला कधीही प्रवेश मिळणार नाही !– पहा तिच्या सुवर्णमुद्रिकेचा ठसा

मृतांकडून माझ्याकरिता स्वस्तिवचन घेऊन येत आहे! आता मी या मुद्रेपासून धागा सोडवतो, आणि या पत्राला मला काय सांगावयाचे आहे ते पाहतो.

**नारीवृन्द :** सर्वांवर कळस करणारी देवांनी पाठविलेली अधिक कठोर यातना आणि अधिक दारुण दुःख यामध्ये आहे! याच्या ठिकाणी मी असते तर सत्य माहीत झाल्यावर मी माझे जीवन कसे कंठू शकले असते? हे राजकुल कोसळून पडले आहे—सर्वनाश झाला आहे त्याचा—आता ते पुन्हा कधीही वर मस्तक करू शकणार नाही! देव दया करोत! देवांनो, हा घाव घालू नका! आमची प्रार्थना ऐका आणि आम्हाला सहाय्य करा...ती पहा सर्वनाशाची अभद्र पूर्व चिन्हे उदासपणे एकटक पाहणाऱ्या त्याच्या डोळयात दिसत आहेत!

**थीस्यूस :** अरेरे! अरिष्टावर अरिष्ट; घावावर घाव! असह्य, शब्दातीत! हाय!

**नारीवृन्द कोरस :** काय झालं आहे आता? आम्हाला ऐकण्यासारखे असेल तर आम्हाला सांग.

**थीस्यूस :** हे पत्र! किंचाळत आहे ते, आक्रोश करीत आहे—

कधीही पुसून न जाणारी यातना!
मी पार चिरडला गेलो आहे; कुठे पळून जाऊ?
मी जे पाहिले
त्याने माझे प्राण हिरावले गेले आहेत.
या पत्रातला आवाज बोलतो आहे—
काय भयंकर गोष्टी सांगतो आहे!
किती भयानक!!

**नारीवृन्द :** तू काय बोलतो आहेस—थीस्यूस? काही तरी भयंकर घडणार आहे यानंतर खचित.

**थीस्यूस :** हे इतके भीषण आहे की मी माझ्या जिभेकडून ते वदवूही शकत नाही. तरीही मी आता वाचतो. ऐका. हे नगरी! हिपॉलिटसने झ्यूसच्या पवित्र दृष्टीचा उपमर्द केला आहे आणि माझ्या पत्नीच्या अब्रूवर घाला घातला आहे!

होय पॉसायडान, माझ्या पित्या, तू मला तीन शापांचा उच्चार करण्याचे सामर्थ्य देण्याचे अभिवचन दिले आहेस : त्यापैकी एका शापाने माझ्या पुत्राचा घात कर! तू दिलेले शाप-सामर्थ्य जर खरे असेल—तर तो आजच्या दिवसाची अखेर पहायला जीवंत राहू नये.

**कोरस :** महाराज, देवांना स्मरून आपली प्रार्थना परत घ्या! तुमचे चुकते आहे—तुम्हाला ते नंतर समजून येईल; आता माझ्यावर विश्वास ठेवा!

**थीस्यूस :** परत घेणे नाही. मी त्याला केवळ शापच देणार नाही तर, त्याला या

राज्यातून हद्दपारही करणार आहे. एक शाप फसला तर दुसरा तरी त्याला भोगावाच लागेल. एकतर पॉसायडान मा.ा शाप खरा करील आणि हिपॉलिटसचे प्रेत जमिनीखाली जाईल—नाही तर आपल्या देशातून बहिष्कृत झाल्यावर परका मुसाफीर म्हणून तो जगभर भटकत राहील आणि त्याचे घृणास्पद जीवन शेवटच्या थेंबापर्यंत उपशीत राहील.

**नारीवृन्द** : अरे पण! हे काय? तो पहा! अगदी या क्षणी तुझा पुत्र स्वतःच इकडे येत आहे, हिपॉलिटस! राजा थीस्यूस, तुझा हा घातकी क्रोध आवर, आणि तुझ्या कुटुंबाचे कल्याण होईल असा सर्वोत्तम मार्ग कोणता याचा विचार कर.

**शिकाऱ्यांसह हिपॉलिटस प्रवेश करतो.**

**हिपॉलिटस** : तात, मी तुमचा आक्रोश ऐकला आणि तात्काळ आलो. कुठल्या संकटाने तुम्हाला क्लेश होत आहेत ते मला माहीत नाही : पण मला वाटतं तुम्ही मला ते सांगावे. पण हे काय पाहतो आहे मी? तात, ही तर तुमची पत्नी मृत झाली आहे? पण हे कसं शक्य आहे? मी आताच तर तिला इथे सोडून गेलो; अगदी थोड्या वेळापूर्वी ती जिवंत होती! काय झालं तिला? ती कशी मृत्युमुखी पडली? तात, मी तुम्हाला मला सांगा म्हणून म्हणतोय. तुम्ही बोलणार नाही का? गप्प बसण्याची ही वेळ नव्हे! अवेळी सर्व काही सांगण्याचा दुराग्रह धरण्याला रिकामी चौकशी म्हणतात हे मला माहीत आहे; पण मी तर मित्र आहे— मित्राहूनही अधिक जवळचा आहे, तात, तुम्ही दुःख माझ्यापासून निश्चित लपविणार नाही!

**थीस्यूस** : छे! माणसाचे अपेशी अज्ञान! एक आवश्यक ते शहाणपण माणसांना आत्मसात करता येत नसेल, एक हवे ते सावज त्यांना पकडता येत नसेल तर ती असंख्य कला कशाला शिकवतात, अनेक अन्य गोष्टींचा शोध कशाला घेतात, एवढी यातायात का करतात? पाशवी रानटी माणसास शहाणपण शिकविण्यातच खरे कौशल्य आहे.

**हिपॉलिटस** : मूर्ख माणसात शहाणपण निर्माण करील तो शिक्षक खरोखरच हुशार म्हटला पाहिजे. पण तात, ही वेळ तत्त्वज्ञानविषयक चर्चेची नाही. मला वाटतं, दुःख तुम्हांला असे भ्रमिष्टपणे बोलावयास लावीत आहे.

**थीस्यूस** : माणसे निश्चितपणे आपल्या मित्रांविषयी सत्य समजू शकतील—कोण एकनिष्ठ आहे, कोण कपटी आहे – हे सांगणारा माणसांच्या हृदयाची पारख करणारा कसोटीचा एखादा दगड कुठेतरी असायला हवा होता! प्रत्येक माणसाला दोन आवाज असायला हवेत, एक सत्य सांगायला आणि दुसरा त्याचा स्वतःचा अंगभूत नैसर्गिक, म्हणजे त्याच्या अंगभूत खोटे बोलणाऱ्या आवाजाचे खरे बोलणाऱ्या आवाजाकडून निराकरण होईल; आणि आपली प्रतारणा होणार नाही.

**हिपॉलिटस** : काय? तुमच्या मित्रांपैकी कुणी तुमच्याकडे माझी निर्भर्त्सना केली आणि

त्यामुळे तुम्हाला माझ्या निरपराधित्वाविषयी संशय येतो आहे काय? मी तर अगदी गोंधळून गेलो आहे, स्तंभित झालो आहे; तुमचे बोलणे वेडेपणाचे आहे. तुम्ही तुमच्या विवेकशक्तीचा निरोप घेतला आहे!

**थीस्यूस :** अरेरे, हे माणसाचे अंतःकरण! असा कोणता नीचपणा बाकी आहे की, ज्याच्यापासून ते परावृत्त होईल? निखालस दुष्टपणाला कधी त्याची परिसीमा सापडेल काय? प्रत्येक नव्या पिढीबरोबर जर अपराधी वृत्ती वाढणार असेल, युगायुगात कुटिलतेची नवनवी खोली प्रकट होणार असेल तर खोटे बोलणाऱ्यांना व कामपिपासूंना राहण्याकरिता देवांना दुसरे जग निर्माण करावे लागेल. या माणसाकडे पहा! हा माझा स्वतःचा पुत्र–तो माझी विवाहशय्या भ्रष्ट करतो—आणि तिच्या मृत हाताच्या निर्णायक लेखाने त्याचे अपराधित्व सिद्ध झाले आहे. चल ये पुढे घृणास्पद माणसा, तुझे तोंड दाखव. तुझ्या बापाच्या डोळ्याला डोळा दे! सर्व माणसातून देवांच्या संगतीत राहणारा असा—असा श्रेष्ठ तूच आहेस तर! पापाने मलीन न झालेले पवित्र चारित्र्य तुझेच आहे नाही का? तुझ्या वढाईवर कोण विश्वास ठेवतो? देव इतके अज्ञ आणि असमंजस आहेत असे कोण मानतो? मी खचित नाही! तर मग आता तुझ्या शुद्ध चारित्र्याचा दिमाख, तुझ्या निरामिष आहाराची भोंदुगिरी मिरव. ऑर्फिअसला तुझा स्वामी आणि गुरू मान आणि त्याच्या पोकळ बड-बडीच्या पिसाट भक्तीत गर्क होऊन जा. होय तुझे ढोंग आता उघडे पडले आहे! अशा माणसांची जगाने दखल घ्यावी आणि त्यांच्यापासून सावध राहावे. मोठे मोठे शब्द वापरून क्षुद्र कपटाने, धूर्तपणे ते आपल्या सावजाचा पाठपुरावा करतात—ती तर मेलीच आहे; परंतु त्यामुळे तू वाचशील असे तुला वाटते काय? नाही, नीच अपराध्या, तिचा मृत्यू तर तुझ्या अपराधाचा प्रमुख पुरावा आहे. कुठल्या शपथा आणि युक्तिवाद तिच्या पुराव्यावर मात करून तुला मुक्त करणार आहेत? ती तुझा तिरस्कार करीत होती;—अनौरस संतती आणि औरस संतती यांच्यात नेहमीच झगडा असतो—असे तू म्हणशील. ती काय इतकी अव्यवहारी सौदा करणारी होती काय की तुझ्या द्वेषाखातर ती आपल्या जीवनाचे सारे माधुर्य झुगारून देईल? का तू मला असे सांगणार आहेस की तरुण माणसे निर्दोष असतात आणि स्त्रिया मात्र जन्मजात मूर्ख असतात? माझी तर खात्री आहे की ॲफ्रॉडायटीने त्यांचे गरम रक्त एकदा का भडकविले की मग ही तरुण माणसे स्त्रियांपेक्षा काही अधिक अविचलित रहात नाहीत! खरे म्हणजे त्यांचे पौरुषत्व तर त्यांना अधिकच विकारवश करते. अरे पण तिचा मृतदेहच माझ्या डोळ्यापुढे त्याचा ढळढळीत पुरावा उभा करीत असता तुझा बचाव खोडून काढण्याचे मला प्रयोजनच काय? या देशातून तुला हद्दपार केले आहे! जा! चालता हो! देवांनी बांधलेल्या ॲथेन्स नगराच्या भिंती-जवळही फिरकू नकोस; ज्या सरहद्दीचे माझ्या खड्गाने रक्षण केले जाते त्या ओलांडून येऊ

नकोस ! मी तुला सांगतो आहे—या अत्याचारापुढे जर मी नमलो तर तो इस्थमिसचा लुटारू सिनिस, मी त्याला ठार केले हे नाकारील आणि मला बढाईखोर ठरवील, आणि जिथे स्किरॉनचा शेवट झाला ते समुद्राने धुतलेले खडक पापकर्म्यांवर उगारलेल्या माझ्या बाहूंचा धाक विसरतील.

**नारीवृंद :** कुणाही माणसाला सुखी कसे म्हणावे ? आजवर, हिपॉलिटस, तू भाग्यवंतात अग्रणी होतास, आता मात्र सगळे उलट फिरले आहे.

**हिपॉलिटस :** तात, तुमचा विकारी क्रोध भयंकर आहे; आणि तुम्ही म्हणता ते प्रथम-दर्शनी जरी खरे वाटले तरी तुम्हाला नंतर पटेल की सूक्ष्मतर तर्कशुद्ध चिकित्सेपुढे ते टिकाव धरणार नाही. जनसमुदायापुढे बोलण्याचे कौशल्य माझ्याठायी नाही तरी काही बरोबरीच्या माणसांत मी अधिक आत्मविश्वासाने बोलू शकतो, आणि हे स्वाभाविकच आहे; जी माणसे विद्वानांमध्ये मूर्ख वाटतात ती जनसमूहापुढे वाचस्पती ठरू शकतात. म्हणून आता ज्या अर्थी माझे सर्व जीवनच संकटात आहे. त्या अर्थी मी धीट होऊन बोलले पाहिजे.

आणि तुम्ही माझ्यावर जो पहिला आरोप केला आहे—ज्यामुळे मी गोंधळून अवाक होईन असे तुम्हाला वाटले होते—त्यापासून आरंभ करतो. या आकाशाकडे पहा, या पृथ्वी-वर पहा तुम्ही कितीही नाकारलेत तरी या टोकापासून त्या टोकापर्यंत तुम्हाला माझ्या-इतक्या शुद्ध अंतःकरणाचा माणूस सापडणार नाही. प्रथम मी देवांच्याविषयी श्रद्धा बाळगायला शिकलो, नंतर मी असे मित्र निवडले की जे आपले हात निष्कलंक ठेवतात; ज्यांची आत्मप्रतिष्ठा त्यांना माझ्या बाबतीत पापकर्म करू देणार नाही, किंवा माझ्याकडूनही तशी अपेक्षा ते करणार नाहीत. तात, मी ज्यांच्यात राहतो त्यांची कुचेष्टा करीत नाही. उपस्थित अनुपस्थित मित्रांना मी सारखेच वागवितो. जे पाप माझ्या हातून घडले आहे अशी तुमची धारणा आहे त्याचा माझ्या अंतःकरणालाही स्पर्श झालेला नाही. आजच्या दिवसापर्यंत माझा देह शुद्ध आहे; मला एकाही स्त्रीचा सहवास झालेला नाही. कधी माणसांनी बोललेले ऐकले असेल किंवा चित्रांतून पाहिले असेल, पण त्या पलीकडे या विषयात मला अधिक माहीत नाही; माझ्या मनाला कामवासनेचा स्पर्शही झालेला नसल्यामुळे, असली चित्रे पाहण्याचीही इच्छा मला होत नाही. मी पवित्र आहे हे मानण्याची कदाचित तुमची तयारी नसेल ! तर मग असा कोणता प्रबल मोह मला पडला ते दाखवून देण्याची जबाब-दारी तुमच्यावर आहे. इतर सर्व स्त्रियांहून तुमची पत्नी अधिक सुंदर होती काय ? की तिचे प्रेम संपादन करून तुमचा वारस होण्याची मला आशा वाटत होती ? अशी कोणतीही आशा व्यर्थ ठरण्यापेक्षा वेडेपणाचीच अधिक ठरायची. तुमच्या राजपदाची मला हाव होती काय ? सुज्ञ माणसाला राजसिंहासनाचे आकर्षण असत नाही, सत्तेमध्ये सुख मानणे म्हणजे तिच्यामुळे भ्रष्ट होणे आहे—अशी अनेक उदाहरणे घडलेली आहेत. नाही; माझी महत्त्वा-

कांक्षा भिन्न आहे. ग्रीक क्रीडांमध्ये मला अग्रस्थान मिळवायचे आहे.—मग राजकारणाला दुय्यम स्थान मिळाले तरी चालेल — आणि प्रामाणिक मित्रांच्या संगतीत मला सुखाने जीवन व्यतीत करायचे आहे. या मार्गाने मला माझे स्वतःचे जीवन माझ्या मनाप्रमाणे जगता येईल. मला संकटापासून मुक्त राहून जगायचे आहे, असे जीवन राजमुकुटाहून श्रेष्ठ असे वरदान आहे.

मला एवढेच सांगायचे आहे – एका गोष्टीशिवाय माझे निरपराधित्व सिद्ध करण्याकरिता कुणी साक्षी इथे बोलायला असता, आणि माझा बचाव ऐकण्याकरिता फीद्रा जिवंत असती तर त्या घटनेने अपराध्याला शोधण्यास तुम्हाला मार्गदर्शन झाले असते. आहे या परिस्थितीत शपथांचा रक्षक, झ्यूसची आणि पृथ्वीची शपथ घेऊन सांगतो की मी तुमच्या पत्नीला स्पर्शही केला नाही. तसला विचारही करण्याचे माझ्या मनात कधी येणे शक्य नव्हते. मी अशी प्रार्थना करतो की माझ्या मनात जर पाप असेल तर मला अनामिक अप्रतिष्ठेत, गृहहीन, ग्रामहीन परागंदा भटक्याचे मरण येवो — सागराने किंवा भूमीनेही माझ्या कलेवराचा स्वीकार करू नये ! फीद्रांने काही भयाने आत्मघात केला की काय ते मला माहीत नाही : याहून अधिक मला बोलता येत नाही. शीलाच्या सद्‌गुणाविना तिने आपले शील अभंग राखले. माझ्या ठायी सच्छीलाचा सद्‌गुण आहे, आणि त्याचे आचरणच माझ्या सर्वनाशाला कारण झाले आहे.

**नारीवृन्द** : तू जे म्हणालास ते तुला निर्दोषी ठरविण्यास पुरेसे आहे! तू गंभीरपणे घेतलेल्या देवांच्या शपथांवर विश्वास ठेवलाच पाहिजे.

**थीस्यूस** : आहे की नाही जादुगार, लफंगा ? स्वतःच्या बापाची जाहीर बेअब्रू करून वर स्वतःच्या साळसूदवृत्तीने माझ्या मनावर पगडा बसवण्याची त्याची उमेद आहे.

**हिपॉलिटस** : मला तुमच्याच साळसूदपणाचे आश्चर्य वाटते आहे, तात. तुम्ही माझे पुत्र असता, आणि मी तुमच्या जागी असतो, आणि तुम्ही माझ्या पत्नीला स्पर्श करण्याचे साहस केले असते तर मी तुम्हाला ठार केले असते : हद्दपार करून तुम्हाला नुसती शिक्षा लावली नसती.

**थीस्यूस** : असं का ? खरेच ! किती पण न्याय्य आहे हे ! नाही, तुला तसे मरण येणार नाही; तात्काल येणाऱ्या मृत्यूचा बऱ्याच अपराध्यांना आनंदच होईल. नाही तू स्वतःच स्वतःला शिक्षा सांगितली आहेस ! तेव्हा बहिष्कृत म्हणून तू या देशातून निघून जाऊन परक्या भूमीत जीवनाचे अखेरचे कटू क्षण वेचशील आणि अपयशाचे इनाम मिळवशील.

**हिपॉलिटस** : काय ? तुम्ही तसेच करणार आहात शेवटी ? मला दोषी ठरविण्याकरिता काळाचा पुरावा मिळेपर्यंतही थांबणार नाही ? आणि मला आजच हद्दपार करणार आहात ?

**थीस्यूस** : होय ! तुझे दर्शनच मला इतके घृणास्पद वाटत आहे की माझ्या ठायी तसे

सामर्थ्य असते तर दूरस्थ महासागरापलीकडे आणि पृथ्वीच्या सीमांपलीकडे मी तुला हद्दपार केले असते !

**हिपॉलिटस :** मी घेतलेल्या शपथेचा उपमर्द करणार आहात तुम्ही ? पुरोहितांचा तुम्ही सल्ला घेत नाही ? माझा यथायोग्य न्याय न करताच मला हद्दपार करणार आहात ?

**थीस्यूस :** पुरोहित ! हुं : आणि डोक्यावरून इकडे तिकडे उडणाऱ्या पक्ष्यांचे त्यांचे ते सूचक कौल ! मला त्यांचे काहीच महत्त्व वाटत नाही ! हे पत्र काही ज्योतिषाचे अगम्य कोडे नाही, आणि त्याने तुला अपराधी ठरविले आहे.

**हिपॉलिटस :** मी माझे ओठ का उघडीत नाही ? देवांनो माझी मुग्धता तुमची प्रतिष्ठा राखीत आहे, तुम्हीच माझा नाश करीत आहात ! नाही मी बोलणार नाही. मी आता काही बोललो तरी जिथे हवा तिथे त्याचा प्रभाव पडणार नाही. आता सत्य सांगणे म्हणजे शपथ भंग करणे, लाभ मात्र शून्य.

**थीस्यूस :** अजूनही तुझी ती दळभद्री शुचिता आहेच का ? तिने मला घुसमटल्यासारखे होते ! तू कशाची वाट पाहतो आहेस ? माझ्या देशातून चालता हो, म्हणतो ना ?

**हिपॉलिटस :** तुमच्या देशातून बाहेर ? कुठे जाऊ मी ? अशा आरोपाने हद्दपार झालेल्या माझा स्वीकार माझ्या मित्रांपैकी कोण करील ?

**थीस्यूस :** कोण ? कोणीही, दुसऱ्या माणसांच्या स्त्रिया भ्रष्ट करणाऱ्यांचे स्नेहपूर्वक स्वागत करणारा, सर्व अन्यायाचा जिवलग मित्र असा जो असेल तो करील !

**हिपॉलिटस :** जेव्हा माझा पिताच मी अपराधी आहे असे मानतो तेव्हा ती वेळ रडण्याची आणि काळीज फुटण्याची आहे खरीच !

**थीस्यूस :** तुझी रडण्याची आणि शहाणपणाने वागण्याची वेळ, तू तुझ्या पित्याच्या पत्नीची निर्लज्जपणे बेअब्रू केलीस तेव्हाच होती.

**हिपॉलिटस :** अरेरे ! या भिंतीना वाचा फुटली असती आणि त्या आकांताने माझ्याकरिता बोलू शकल्या असत्या आणि मी खरेच इतका अधम आहे की काय याचा निर्वाळा देऊ शकल्या असत्या तर !

**थीस्यूस :** आपल्या सहाय्यासाठी अचेतन वस्तूंची साक्ष काढण्याची तू खबरदारी घेतो आहेस. परंतु तू अपराधी आहेस ही वस्तुस्थिती सिद्ध करण्याकरिता कुठल्याही जिभेची आवश्यकता नाही.

**हिपॉलिटस :** त्रयस्थ म्हणून अलिप्त राहून स्वतःकडे पाहता आलं असतं आणि स्वतःच्या दुःखासाठी अश्रू ढाळता आले असते तर फार बरं झालं असतं. माझ्या या अनुकंपनीय अवस्थेत ( मला वाटतं की मला साक्षात कारुण्याची गरज आहे. ) दुसऱ्या कशाची अपेक्षा करणार मी !

**थीस्यूस :** निःसंशय ! आत्मसंयमन आणि आपल्या पित्याशी सभ्य वर्तन करण्यापेक्षा तुझा आत्मपूजनाचा अभ्यास अधिक आहे.

**हिपॉलिटस :** अरेरे, माझी अभागी माता ! दुःखाच्या कटुतेतच माझा जन्म झाला होता. माझे ज्यांच्यावर प्रेम आहे त्यांच्यापैकी कुणालाही ‘ अनौरस ’ म्हणवून घेण्याची वेळ कधीही न येवो.

**थीस्यूस :** रक्षक हो ! घेऊन जा याला ! तुम्हाला ऐकू येत नाही काय ? मी त्याला हद्दपार म्हणून केव्हाच घोषित केले आहे.

**हिपॉलिटस :** जो मला स्पर्श करील त्याची खैर नाही. तुमच्या मनात जर तसेच असेल तर तुम्हीच मला बाहेर घालवून द्या ना !

**थीस्यूस :** तू माझे आज्ञापालन नाहीच केलेस तर तसे मी करणारच आहे. तुझ्या हद्दपारीचे मला दुःख होत नाही.

**थीस्यूस निघून जातो**

**हिपॉलिटस :** तर मग माझी दैवगती निश्चित झाली. सत्य ज्ञात असूनही ते कसे सांगावे हे मला कळत नाही हे किती विषादकारक आणि निष्ठुर आहे. ( तो आर्टिमीझच्या मूर्तीकडे वळतो ) देवते, लेटोच्या कन्ये मृगयेतील प्रिय मित्र आणि साथीदार, वैभवशाली ॲथेन्समधून मला कायमचे हद्दपार होऊन जावे लागणार आहे ! माझ्या नगरी, तुला निरोपाचा प्रणाम असो; एरिक्थिअसच्या भूमी तुझा निरोप घेतो : यौवनाच्या विविध आनंद स्थानांनी समृद्ध असलेल्या ट्रोझीनच्या भूप्रदेशा, तुला प्रणाम ! मी तुझे अखेरचे दर्शन घेतो, माझे शेवटचे शब्द मी तुझ्याशी बोलतो; आणि माझ्याबरोबर इथेच वाढलेल्या युवकांनो, तुमच्याशीही. या, मला निरोप द्या आणि सरहद्दीपर्यंत मला सोबत करा. जरी माझ्या स्वतःचा पिता तसे मानीत नसला तरीही माझ्याइतका सच्छील मनुष्य तुम्हाला कधीही आढळणार नाही.

**हिपॉलिटस त्याच्या परिवारासह जातो**

**नारीवृन्द :**

**स्ट्रोफी एक**

जेव्हा मला स्मरते की
अनेक दुःखांच्या क्षणी
देव मानवी जीवांची चिंता करतात,
तेव्हा

त्या श्रद्धेने समाधान वाटते
दिलासा मिळतो मनाला !
जरी माझ्या आशेत माझी
उत्कंठित जाणीव खोलवर स्थित असते
तरी अनुभूती वाढते तशी
श्रद्धा मागे हटते :
माणसाचे दैव उंचावते आणि पडते
ते त्याच्या कृतीशी अनुरूपतेने
मात्र नव्हे.
बदला मागून बदल होतात;
परिचित भूमीतून
पाळेमुळे उखडून टाकते
आपली,
अंध अहेतुक नियती :
विसावा नसतो
भ्रमंती नि क्लेशातून
दीर्घतम जीवनीही !

## ॲन्टिस्ट्रोफी एक

ही आहे माझी प्रार्थना
सर्व कामना
अंतरीच्या माझ्या
फलित व्हाव्यात
साहाय्यभूत दैवगतीने
जीवन माझे
संपत्तीने संपन्न व्हावे.
दुःखापासून संरक्षिले जावे
माझ्या जिव्हारी बसणारे
आघात न व्हावेत.
निर्भर कठोर दृढनिश्चय

माझ्याकरिता नाही,
फसवा उद्देश झाकणारा
सात्विक मुद्रेचा
मुखवटाही नाही,
माझे मार्ग मी बदलीन
माझी सुलभ धर्मतत्त्वे
उद्याच्या गरजांनुरूप घेतीन,
नि माझे शांतस्थिर जीवन
दीर्घ संतोषात व्यतीत करीन.

## स्ट्रोफी दोन

मला आता असंदिग्ध विचार करता येईनासा झालाय,
जे पहावे लागेल
असे वाटले नव्हते
ते मी पाहिले आहे,
ॲथेन्स नगरीचा
सर्वांत तेजस्वी तारा
मी पाहिला,—
आश्रय शोधण्याकरिता
अन्य भूमीत
पित्याच्या क्रोधाने
हाकून दिलेला,
नगरतटाला विळखा घालणाऱ्या
वालुकामय
सागर किनाऱ्या,
तो आता तुला दिसणार नाही,
तो जिथे त्या अमर मृगयादेवतेच्या परिवारात
आपल्या सावजामागे
चपळ मृगयुश्वानांसह धावत असे
त्या पर्वत उतरणीवरील

ओकवनांनो,
तुम्हालाही,
आता तो दिसणार नाही.

## ॲन्टीस्ट्रोफी दोन

आता तो दिसणार नाही आम्हाला
शिस्तीतल्या थेसॅलिअन घोड्यांमागून झेपावत जाणारा,
किनाऱ्यालगतच्या दालदलीतून सपाट पायवाटेने
घोड्यांच्या टापांच्या जलद तालात धापा टाकीत.
छेडलेल्या तारातून प्रकटलेले अविरत संगीत
त्याच्या पित्याच्या महालात मूक होऊन जाईल,
आर्टिमीझला जिथे विसावणे प्रिय होते
त्या दाट वसंततृणात तू उधळलेल्या पुष्पमाला
आता सुकून जातील.
तुझ्या प्रीतीकरिता आसुसलेल्या
युवतींतील मत्सरी कलह
तू निघून गेल्याने
आता विषण्ण शांततेत विरून जातील

## एपोड

हिपॉलिटस तुझ्या करुण दैवगतीमुळे
माझेही जीवन आता
केवळ भासमय उरले आहे.
अश्रूशिवाय
अन्य विषयांत
ते रिते आहे
तुझ्या मातेची प्रसववेदना
आनंदाने उजळणारी स्वप्ने
आता विझून गेली आहेत.
अमर देवतांनो,
मर्त्य क्रोध तुमची निर्भर्त्सना करीत आहे !

हे ग्रेस[१६] भगिनींनो !
पितृगृहातून त्याला घालवून दिलेले
तुम्हाला कसे पाहवते ?
निरपराध असून बहिष्कृत झालेला—
सदाचारी आणि तरीही
उद्‌ध्वस्त जीवन झालेला.

**नारीवृन्द** : पहा ! पहा ! कुणीतरी इकडे धावत येत आहे ! तो हिपॉलिटसचा एक अनुयायी आहे ! आणि त्याच्या डोळ्यात अपार भय दाटलेले आहे !

**दूत प्रवेश करतो**

**दूत** : हे बायांनो, मला राजा कुठे भेटेल ? थीस्यूस कुठे आहे ? तुम्हाला माहीत असेल तर मला सांगा. तो आत आहे का ?

**नारीवृन्द** : तो पहा राजा, तो आता बाहेर येत आहे.

**थीस्यूस प्रवेश करतो**

**दूत** : थीस्यूस, मी अत्यंत दु:खद वार्ता आणली आहे. तुझ्या दृष्टीने आणि तुझ्या प्रजाजनांच्या दृष्टीने–मग ते ॲथन्सचे असोत वा ट्रोझीनचे असोत ती फारच चिंताजनक आहे.

**थीस्यूस** : तुझी वार्ता काय आहे ? आणखीही एखादी आपत्ती आमच्या दोन्ही नगरांवर कोसळली आहे काय ?

**दूत** : हिपॉलिटस मरण पावला आहे–निदान मरणोन्मुख तरी खचितच आहे. त्याचे प्राण राहतात की आताच जातात अशा दोलायमान अवस्थेत आहेत.

**थीस्यूस** : त्याला कुणी मारले ? त्याने आपल्या पित्याच्या पत्नीचे शील जसे भ्रष्ट केले तसे दुसऱ्या कुणाच्या पत्नीचे भ्रष्ट केले म्हणून त्याने त्याच्यावर सूड घेतला की काय ?

**दूत** : त्याच्या रथानेच त्याचे प्राण घेतले––आणि तुझ्या शापांनी––जे तुझा पिता–जो सागराधिपती त्याच्याकडून तुझ्या ओठांनी तू तुझ्या पुत्रावर ओढवून आणलेस.

**थीस्यूस** : देवाशपथ ! म्हणजे पॉसायडान, तू आपले पित्याचे कर्तव्य पार पाडलेस तर ! तू माझा शाप ऐकलास ! आणि हे कसे घडून आले ? मला सांग ! माझी बेइज्जत करणाऱ्या माणसाभोवती न्यायाचा फास कसा आवळला गेला ?

**दूत** : आम्ही समुद्रकिनाऱ्यावर––पाण्याच्या काठावरच घोड्यांना खरारा करीत आणि त्यांच्या आयाळी विंचरीत होतो, आणि आम्ही रडत होतो, कारण आम्हाला कळले होते की ट्रोझीनमध्ये येण्याजाण्याचे स्वातंत्र्य आता हिपॉलिटसला राहिले नव्हते. कारण हद्दपारीच्या

दैन्यावस्थेची शिक्षा तू त्याला दिली होतीस. हीच शोकप्रद कहाणी सांगत तो तिथे आमच्या-कडे आला; आणि त्याच्या मित्रांचा आणि त्याच्या अनुचरांचा—त्याच्या सारखेच तरुण असलेल्या अनुयायांचा मोठा परिवार त्याच्या बरोबर आला. थोड्या वेळाने तो रडायचा थांबला व तो आम्हाला म्हणाला, "हा सारा मूर्खपणा आहे, पण माझ्या पित्याच्या आज्ञा पालन केल्याच पाहिजेत. गड्यांनो, माझे घोडे रथाला जुंपा. आता ही माझी भूमी उरली नाही." नंतर आमच्या पैकी प्रत्येकजण हिरिरीने पुढे झाला आणि अगदी लवकरच त्याचे घोडे जुंपून, रथ सिद्ध करून आम्ही तो त्या राजपुत्राजवळ उभा केला. हाकण्याच्या कठड्या-वरून त्याने लगाम पकडले. मृगयेकरिता परिधान केलेल्या वस्त्रानिशीच रथात जाऊन आपल्या स्थानी उभा राहिला, आणि प्रथम त्याने आपले हात उंचावले व प्रार्थना केली, "झ्यूसदेवा, मी जर अपराधी असेन तर मला मृत्यू येवो! माझ्या मृत्यूनंतर तरी माझ्यावर त्याने कसा अन्याय केला आहे ते माझ्या पित्याला कळू दे." आणि लगेच त्याने अंकुश हाती घेतला आणि तो त्याच्या घोड्यांना चेतवू लागला; आणि आम्ही परिचारक, आमच्या धन्याला आरगॉस आणि एपिडॉरिआच्या सरळ मार्गावरून दौडत दौडत साथ करण्या-करिता त्यांच्या लगामाच्या बाजूने धावत होतो. आम्ही ट्रोझीन सरहद्द ओलांडून किनाऱ्या-वरील एका निर्मनुष्य स्थळी पोहोचलो. तुला माहीत आहे की त्याच्या पलीकडे पुळण, खाली सॅरोनिक समुद्राकडे जाते. तिथेच आम्ही झ्यूसच्या वज्राघातासारखा परंतु पृथ्वीच्या गर्भातून येणारा एक गंभीर गर्जनेसारखा भीषण ध्वनी ऐकला. घोड्यांनी आपले कान टवकारले आणि मस्तके वर उंचावली. ध्वनी कुठून आला असावा याचा अंदाज घेत आम्ही युवक घाबरून गेलो. पुळणीत फुटणाऱ्या लाटांकडे आम्ही पाहिले, आणि तिथे आम्हाला आभाळाकडे वर झेपावणारी एक प्रचंड अलौकिक लाट दिसली; माझ्या दृष्टिपथातून तिने केवळ स्किरॉनचीच भूमी झाकली असे नाही तर इस्थमस आणि ॲस्क्लेपिअसचे खडकही झाकले. नंतर आणखीच प्रचंड होत, सर्व बाजूंनी फेस उधळीत सरसरत आणि फूत्कारत ती उफाळून किनाऱ्याकडे झेपावली व त्या रथाकडे आणि चारही घोड्यांकडे तिने मोर्चा वळवला आणि आपटून फुटण्याच्या क्षणी त्या लाटेने एक राक्षसी रानवट बैल बाहेर फेकला. त्याच्या डरकाळीच्या धडकी भरविणाऱ्या प्रतिध्वनीने सबंध धरणी दुमदुमली. आणि त्याचे दर्शनही मानवी दृष्टीला अतिभयावह होते. पिसाट भयाने घोडे बुजले. घोड्यांना हाताळण्याच्या आपल्या दीर्घ अनुभवाचा उपयोग करून हिपॉलिटसने लगाम घट्ट पकडले व आपल्या पाठीमागे ते पिरगळून धरून वल्हेकरी ज्याप्रमाणे वल्ह्यावर ताकद लावतो त्याप्रमाणे त्याने त्यांच्यावर आपली सारी ताकद केंद्रीभूत करून ते खेचले. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. जणू काही सारथ्याचा हात आणि लगाम आणि खोगीर आणि तो जड रथ म्हणजे काहीच नव्हे अशा वृत्तीने बीडाची मुखयंत्रणे दातात पकडून घोडे पुढे उधळले! जेव्हा

त्याने त्यांचे चौखूर उधळणे मऊ गवताकडे वळविण्याची धडपड केली, तेव्हा त्यांना भयाने बेभान करण्याकरिता व पाठीमागे पिटाळण्याकरिता तो बैल त्यांच्यापुढे उभा ठाकला होता. जेव्हा ते खडकाकडे पिसाटपणे उधळले तेव्हा तो बैल त्यांच्या बाजूने अगदी जवळून आवाज न करता धावत होता. आणि मधून–मधून सरळ वाट सोडून रथाला अगदी भिडत होता. शेवटी त्याने रथाचा कणा खडकावर आपटून रथ हवेत भिरकावून दिला, नंतर तिथे भयंकर गदारोळ उठला–चाके, कणे, खिळे आणि चौकटी सगळीकडे वर उंच उधळल्या. लगामात गुरफटला जाऊन दोरांच्या गच्च गाठीत आवळला गेलेला हिपॉलिटस लांबवर फरपटला गेला––खडकावर त्याचे डोके जोराने आपटले, अंगाच्या चिंध्या झाल्या; कानांना भयंकर वाटणाऱ्या आवाजात तो घोड्यावर ओरडला. " थांबा ! माझ्या स्वतःच्या अश्व-शाळेत तुम्ही वाढलात. तुम्ही मला चिरडून मारणार आहात काय ? " नंतर तो आक्रंदत म्हणाला, " तात, तुम्ही मला का शाप दिलात ? मी निरपराध आहे ! माझ्या साहाय्यास कुणीच येणार नाही का ? "

खरोखर आमच्यापैकी बरेचजण साहाय्य करण्यास उत्सुक होते, परंतु आम्ही कितीही धावलो तरी मागेच पडत होतो. शेवटी–कसे घडले ते मला कळत नाही–त्याला जखडून टाकणाऱ्या लगामातून तो मोकळा होऊन बाजूस पडला. तो अजून श्वसन करीत होता. पण त्याचा प्राण अगदीच क्षीण होऊन गेला होता. घोडे दूर खडकाळ भागात अदृश्य झाले होते–कुठे गेले ते मी सांगू शकत नाही; त्याचप्रमाणे ते भयंकर अद्‌भुतही–तो बैल–अदृश्य झाले होते.

महाराज, मी आपल्या प्रासादातील केवळ एक गुलाम आहे, परंतु आपला पुत्र या भयंकर अपप्रकारात अपराधी होता असे मला कधीच वाटले नाही; आणि जरी अखिल स्त्री-जातीने स्वतःला फास लावून घेतला तरीही, आणि त्याच्यावर अरोप करणाऱ्या पत्रांची पर्वतप्राय रास पडली तरीही मला तसे वाटणार नाही; माझी खात्री आहे की हिपॉलिटस एक सदाचारी माणूस आहे.

**नारीवृंद :** दैवचक्र फिरत आहे; आपत्ती मागून आपत्ती कोसळत आहेत, दैवगती अनिवार्य आहे; तिच्यातून सुटका नाही.

**थीस्यूस :** ज्याने या मृत्युयातना भोगल्या त्या माणसाविषयी मला घृणा वाटत होती, म्हणून ते वृत्त ऐकले तेव्हा मला आनंद झाला; परंतु देवांच्या आठवणीने आता मला धाक वाटतो आहे. हिपॉलिटस माझ्या स्वतःच्या रक्तामांसाचा होता. जे घडले त्यामुळे आता मला संतोषही होत नाही आणि खेदही वाटत नाही.

**दूत :** आम्ही आता काय करावे ? मृत्यूच्या क्षणी तो इथे असावा म्हणून त्याला इकडे आणावे काय ? की–तुम्हाला कशाने समाधान होईल ? विचार करा : तुमचा पुत्र या

आघाताने घायाळ झाला आहे. माझा सल्ला माना आणि त्याच्याशी आता असे कठोरपणे वागू नका.

**थीस्यूस :** आणा त्याला इथं. माझ्या पत्नीची बेइज्जत केल्याचे नाकारणाऱ्या माणसाला समोरासमोर पाहू द्या मला. म्हणजे माझे शब्द आणि देवांची करणी याने त्याचे अपराधित्व प्रस्थापित होईल.

**दूत जातो.**

**नारीवृंद :** ॲफ्रॉडाइटी तू देवांच्या आणि माणसांच्या दुराग्रही
अंतःकरणांना बंदीवान करून
हवे तसे वळवितेस !
तुझ्या समवेत
चमकत्या पंखांनी इरॉस
आपल्या सावजाभोवती जलद घिरट्या घालतो,
पृथ्वीवर आणि क्षारसमुद्राच्या
स्फुट गीतावर तरंगतो,
जेव्हा तो वेडावलेल्या जीवांवर
आपल्या मधुर मोहिनीने झडप घालतो
तेव्हा पर्वतावरील छाव्यांनाही
त्याच्या सोनेरी पंखांचे सामर्थ्य प्रतीत होते.
मत्स्य आणि धरतीमातेच्या आचळांतून
जीवन प्राप्त करून घेणारे,
सूर्याच्या नेत्रांतून जिव्हाळ्याची
ऊब मिळविणारे असंख्य जीव
आणि—माणसांची हृदयेही
त्या विश्वमोहिनीला शरणागत होतात.
ॲफ्रॉडाइटी—सर्व जीवयात्रांची राज्ञी म्हणून
तू एकटी मात्र अधिसत्तेने आणि
प्रतिष्ठेने साम्राज्य करतेस.

**थीस्यूस आणि नारीवृंद ॲफ्रॉडाइटीच्या मूर्तिसन्मुख उभे आहेत; रंगमंचाच्या दुसऱ्या बाजूस आर्टेमीझ तिच्या स्वतःच्या मूर्तीजवळ प्रकट होते. ती बोलू लागल्यावर सगळे तिच्याकडे वळतात.**

**आर्टेमीझ** : थीस्यूस, इजिअसच्या राजपुत्रा! मी तुला आज्ञा करते.
ऐक, मी आर्टिमीझ, लेटोची कन्या बोलते आहे
अरे करंट्या! तू जे ऐकले आहेस त्याचा तुला
आनंद का होत आहे?
अत्यंत पापी वृत्तीने तू तुझ्या स्वतःच्या पुत्राचा वध केला आहेस.
पुराव्याशिवाय तू तुझ्या पत्नीच्या असत्य वचनांवर
विश्वास ठेवलास.
आता तुझ्या विनाशाची फळे तू कशी पदरात घेतो
आहेस ते सर्व जग पाहणार आहे!
आता नरकाच्या खोल गर्तेत
शरमेने तू तोंड लपविशील की नाही?
का दुर्दैवाची मालिका चुकविण्याकरिता
आकाशात उड्डाण करशील?
सज्जनांच्या सरळ जीवनात
तुला आता स्थान नाही.

**ती रंगमंचाच्या मध्याकडे येते.**

थीस्यूस तुझ्या अभागी जीवनाची वस्तुस्थिती मी तुला स्पष्ट करून सांगते; आणि माझ्या शब्दांनी तुझा मार्ग सुकर होणार नाही परंतु वेदना मात्र तीव्र होईल. इथे येण्याचा माझा पहिला हेतू तुझ्या पुत्राच्या अंतःकरणाचा प्रामाणिकपणा उघड करून दाखवायचा म्हणजे मृत्युसमयी त्याचे नाव निष्कलंक होईल; नंतर तुझ्या पत्नीचा उन्माद—किंवा एका अर्थाने तिची धीरोदात्तता उघड करायची होती. ज्या देवतेचा मी आणि कौमार्यावर भक्ती असलेले सर्व आत्यंतिक द्वेष करतात तिने सतावल्यामुळे व सारखी आरणी लावल्यामुळे फीद्राचे तुझ्या पुत्रावर प्रेम बसले. तिच्या सदसद्विवेक बुद्धीने विकारावर मात करण्याची धडपड केली. तिच्या इच्छेविरुद्ध आखल्या गेलेल्या योजनेमुळेच तिचा मृत्यू ओढवला; गुप्ततेची शपथ घ्यायला लावून राणीच्या दाईने राणीची व्यथा हिपॉलिटसला सांगितली. सच्छीलतेने त्याने तिच्या विनवण्याचा प्रतिकार केला; तू त्याच्यावर इतका अन्याय केलास तरी देवांवरील श्रद्धेमुळे त्याने शपथभंग केला नाही; परंतु तिचे गुपित उघड होईल म्हणून भयभीत होऊन फीद्राने ते खोटे पत्र लिहिले आणि कपटाने तुझ्या पुत्राचा वध केला—होय, कारण तुझा तिच्यावर विश्वास बसला.

**थीस्यूस** : माझ्या मुला! हाय! माझ्या मुला!

**आर्टेमीझ :** माझे शब्द जीव्हारी लागतात ना, थीस्यूस ? पुढे ऐक, कारण तुला अजून आणखी सोसायचे आहे. तू जाणतोसच की तुझ्या पित्याने तुला तुझ्या तीन शापवचनांच्या पूर्तीचे सामर्थ्य प्रदान केले होते ! पहिला शाप तू अत्यंत दुष्टपणे तुझ्या पुत्राला देऊन त्याचा दुरुपयोग केला आहेस अरे, तो तू एखाद्या शत्रूला द्यायला हवा होतास. तुझ्या पित्याने, सागराधिपतीने, जे देण्यास तो बांधला गेला होता, ते सर्व तुला दिले. त्याने वचन दिले होते : आणि म्हणून झाला तो मूर्खपणा त्याचा नव्हता. आता त्याच्या आणि माझ्या दृष्टीने तू दोषपात्र आहेस. पुराव्याची किंवा भविष्यदर्शी मार्गदर्शनाची वाट न पाहता, चौकशीला जागा न ठेवता किंवा काळाच्या संथ अन्वेषणाची प्रतिक्षा न करता अश्लाघ्य घाईने तू तुझा शाप भिरकवलास आणि तुझ्या पुत्राचा वध केलास.

**थीस्यूस :** हे देवते, मला आता मरण दे !

**आर्टेमीझ :** तू महापाप केले आहेस. तरीही तू केलेल्या पापालाही क्षमा मिळण्याची अजूनही शक्यता आहे. कारण ॲफ्राडाइटीने आपला रोष शमविण्याकरिता हे सर्व घडावे अशी योजना केली होती, आणि देवतांचा एक दंडक आहे की कुणीही दुसऱ्याचा हेतू असफल करण्याचा प्रयत्न करायचा नाही. परंतु त्याला जे काही करावयाचे असेल ते करू द्यावे. मी तुला स्पष्ट सांगते, झ्यूसचे आणि त्याच्या दंडकाचे मला भय वाटत नसते तर अलिप्तपणे बाजूस राहून हिपॉलिटस मृत्युमुखी पडत असलेला पाहण्याची मानहानी मी कधीही सहन केली नसती, कारण तो मला सर्व माणसांत अत्यंत प्रिय होता. तुला सत्य माहीत नव्हते. प्रथमतः ही वस्तुस्थिती तुला घोरतम अपराधाच्या दोषापासून मुक्त करते. नंतर तुझ्या पत्नीने स्वतःच्या मृत्यूने तिने केलेल्या आरोपाची सत्यासत्यता पडताळून पाहणे अशक्य केले. आणि अशा तऱ्हेने तुझा तिच्यावर विश्वास बसेल हे निश्चित केले, आणि याप्रमाणे दुर्दैवाचा हा महापूर मुख्यतः तुझ्यावर लोटला; परंतु मलाही दुःख होत आहे. कारण सज्जनांच्या मृत्यूचा देवांनाही आनंद होत नाही; परंतु पापी माणसाचा आम्ही त्याच्या पुत्रासहित, कुलासहित सर्वनाश करतो.

**नारीवृंद :** पाहा ! तो करुणास्पद अवस्थेत असलेला विकलांग राजपुत्र इकडे येत आहे, त्याचे उमदे अवयव विच्छिन्न झाले आहेत, त्याचे सुंदर मस्तक घायाळ झाले आहे. हे यातना भोगणाऱ्या राजकुला ! देवांच्या सत्तेने एका दिवसात तुझ्यावर दोनदा आघात केला आहे आणि तुझ्या नशिबी लिहिलेल्या दुःखाचा घोर कर्मभोग प्रत्यक्षात उतरवला आहे.

**शिकाऱ्याच्या आधाराने हिपॉलिटस प्रवेश करतो.**

**हिपॉलिटस :**

माझ्याकरिता शोक करा !

पित्याचा शाप नि पॉसायडानची शक्ती
यांनी विद्ध झालेल्या,
सारख्याच अन्यायी
देवांनी आणि माणसांनी
पायदळी तुडविलेल्या,
माझ्याकरिता शोक करा, रुदन करा,
भयंकर वेदनेने माझे मस्तक छिन्न झाले आहे,
यातनेच्या स्पंदनाने माझ्या मेंदूला झटके येत आहेत.
खूप झाले आता हे!
माझ्या डोळ्यांपुढे अंधेरी येत आहे.
मला खाली विसावू द्या.
( ते त्याला खाली ठेवतात )
माझ्या हाताने घास भरविलेल्या अश्वांनो!
तुमच्या करंट्या शक्तीने
माझा देह तुडवून
माझा प्राण घुसमटून टाकला आहे.
माझ्या गात्रांतून चैतन्य हिरावून घेतले आहे!
गड्यांनो, देवांना स्मरून तरी
जिथे मांस उघडे पडले आहे
तिथे हळुवारपणे स्पर्श करा.
माझ्या उजव्या बाजूला कोण उभे आहे?
घट्ट धरून मला सावकाश उचला.
माझ्या पित्याच्या अन्यायी शापाने अपराधाने विद्ध झालेल्या—
माझी यातना
झ्यूस, तुला दिसत आहे काय ?
मी पवित्र अंतःकरणाने देवांची आराधना केली,
मी निष्पाप आचरणात अग्रणी होतो,
तो मी आता जीवलोकापासून दूर
अंधाऱ्या जगाची वाटचाल करीत आहे.
आणि मी जात असताना
मृत्यूचे डोळे मला दिसत आहेत.

सहनशीलतेने मी माझ्या शेजाऱ्यावर प्रेम करून
त्याची सेवा करण्याचा प्रयत्न केला—
पण तो व्यर्थच झाला.
आता वेदनेने यातनामय पाय माझ्या शरीरावर
ठेवला आहे.
मला जाऊ द्या,
मला आता रोखू नका,
तर मृत्यूला येऊन माझी यातना बरी करू द्या;
आणि तुम्हाला जर माझी कणव येत असेल तर
त्वरित मरण्यास मला सहाय्य करा !
विद्ध करणाऱ्या भाल्यावर माझे प्रेम आहे;
ये कठोर धारे !
माझे हृदय भग्न कर.
आणि माझ्या जीवाला हळूहळू निद्राधीन कर !
आता माझ्या पित्याच्या घातकी शापातून,
विस्मृतीत लीन झालेल्या
पूर्वजांनी मिळविलेला
रक्तपाताच्या अपराधाचा कराल वारसा
अधीरतेने नियुक्त वारसावर झेपावत आहे.
तो माझ्यावर कोसळत आहे
का ?
पण का ?
मी तर काही अपकृत्य केलेले नाही !
काय म्हणू मी आता ?
माझ्या आत्म्याला दिलासा कसा लाभेल ?
आणि यातनांचा अंत कसा गाठू ?
मृत्यो : तुझ्या कठोर निश्चयी कराने
निशेच्या आणि निद्रेच्या भूमीत
मला चिरंतन खोल निजव !

**आर्टिमीझ :** बिचारा जीव, विकट जोखडाने विव्हल झाला आहे ! तुझ्या उदात्त अंतःकरणानेच तुझा नाश केला आहे.

**हिपॉलिटस** : आहा ! स्वर्गीय गंधाचा निःश्वास ! देवते तुझा स्वर कानी आला आणि माझी यातना हलकी झाली. आर्टिमीझ तूच का ती ? खरेच या स्थळी आली आहेस का ?

**आर्टिमीझ** : होय, बापड्या जीवा, मीच आहे ती. देवामध्ये तुला माझ्याहून अधिक जवळचा दुसरा मित्र नाही.

**हिपॉलिटस** : देवते, माझी अवस्था कशी आहे हे तू पाहते आहेस ना ?

**आर्टिमीझ** : पाहते आहे मी; परंतु माझ्या डोळ्यांना आसू ढाळता येत नाहीत.

**हिपॉलिटस** : मृगयेत तुझ्या सेवेला कुणी नाही.

**आर्टिमीझ** : कुणी नाही ! तू माझा आवडता सोबती होतास, आणि आता तू आसन्न-मरण आहेस.

**हिपॉलिटस** : तुझे घोडे कुरणात न्यायला, तुझ्या मूर्तीचे रक्षण करायला आता कुणी नाही.

**आर्टिमीझ** : ॲफ्रॉडाइटीच्या दुष्ट कपटकारस्थानाने हे घडवून आणले आहे.

**हिपॉलिटस** : ॲफ्रॉडाइटी ! असं ! तर मग मला कोणत्या देवतेने मारले हे मला आता उमगले.

**आर्टिमीझ** : तुझ्या तिजविषयीच्या बेपर्वाईचा तिला राग होता, आणि तुझ्या पावित्र्याचा ती तिरस्कार करीत होती.

**हिपॉलिटस** : आता मला ते स्पष्ट समजून आले आहे. तिने आम्हा तिघांचा सर्वनाश केला

**आर्टिमीझ** : तू आणि तुझा पिता, आणि तुझ्या पित्याची पत्नी.

**हिपॉलिटस** : माझ्या पित्याने माझ्यावर अन्याय केला तरीही मला त्याची दया येते आहे

**आर्टिमीझ** : त्याला फसविले गेले : एका देवतेनेच तशी योजना केली होती.

**हिपॉलिटस** : तात, आज तुम्हाला किती दुःख सोसावे लागते आहे !

**थीस्यूस** : माझ्या मुला, माझे काळीज फुटून गेले आहे रे ! आता जीवन मला घृणास्पद वाटते आहे.

**हिपॉलिटस** : तुमचेच जरी चुकले असले तरी मला माझ्यापेक्षा तुझ्याविषयीच अधिक अनुकंपा वाटते.

**थीस्यूस** : मुला, देवाने तुझ्या ऐवजी मला मृत्यू द्यावा !

**हिपॉलिटस** : तुमच्या पित्याच्या शापसामर्थ्य प्रदानापासून तुम्हालाही काहीच आनंद मिळाला नाही.

**थीस्यूस** : तो शाप माझ्या ओठांनी कधीच उच्चारला गेला नसता तर !

**हिपॉलिटस** : ते का ! तुम्ही तर त्या वेळी मला ठार मारले असतेत—तुम्ही तेव्हा इतके संतापला होतात !

**थीस्यूस :** देवांनी माझी फसवणूक करून रास्त विचारापासून मला दूर ठेवले.
**हिपॉलिटस :** माणसाच्या शापाचा देवावर परिणाम होत असता तर!
**आर्टिमीझ :** शापवाणी उच्चारण्याची तुला
आवश्यकता नाही.
पाताळातील अंधारी खोल गव्हरेही
ॲफ्रॉडाइटीच्या क्रोधाने
तुझ्या आत्म्यात्च्या पावित्र्यावरील
रोषाने
तुझ्या देहावर केलेल्या
या निष्ठुर अन्यायाचा प्रतिशोध
घेण्यात अडथळा आणू शकणार नाहीत.
मी तिच्यावर[२७] सूड घेईन.
या माझ्या अजिंक्य चापाने
माझा स्वतःचा हात
योग्य परतफेड करण्याकरिता
तिच्या हृदयाला अत्यंत प्रिय असलेल्या
मृत्युलोकीच्या पुरुषावर
घाव घालील
आणि तुला,
हे असहाय युवका,
ट्रोझीन नगरीत सर्वोच्च मानाचे स्थान
मी देईन.
अविवाहित युवती विवाहापूर्वी त्यांच्या कुंतलाची
बट तुझ्याकरिता कापतील!
युगानुयुगे
तुझ्या मृत्यूविषयीच्या
कुमारिकांच्या शोकगीतांसह
अश्रूंचे महापूर
तुझ्याकरिता लोटतील.
आणि त्यांचे संगीतनैपुण्य
तुझ्या शोककथांतून नित्य आविष्कृत होत राहील.

फीद्राचे नावही स्मृतीत राहील
आणि गीतांमधून तिच्या तुझ्यावरील
प्रीतीची प्रशंसा होईल.
थीस्यूअस, तुझ्या स्वतःच्या पित्याची,
इजिअसची आठवण कर :
तुझ्या पुत्राला आलिंगन देऊन
त्याला तुझ्या हृदयाशी घे.
त्याचा मृत्यू हे तुझे प्रेरित नव्हते.
देवांनी तसे विहित केले म्हणजेच
माणसाच्या हातून पाप घडते.
हिपॉलिटस,
तू तुझ्या पित्याचा तिरस्कार करू नकोस,
कोणत्या नियतीने तुझे जीवन नष्ट केले
ते तुला आता समजले आहे.
आता मी तुझा निरोप घेत आहे :
मला मृत्यूकडे पाहायचे नाही
किंवा मृत्यूच्या यातनांनी माझी दृष्टीही
कलंकित करायची नाही;
आणि आता तू तुझ्या अंताजवळ आहेस
हे मला दिसत आहे.

**हिपॉलिटस** : अखेरचे अभिवादन असो, अमर कुमारी !
आपली दीर्घ संगती
तोडून टाकणे तुला सोपे आहे ग !
जशा पूर्वी मी तुझ्या आज्ञा पाळल्या आहेत
तसेच तुझी इच्छा आहे म्हणून मी
माझ्या पित्याला क्षमा करतो.
अंधार आता माझ्या डोळ्यांवर झापड घालीत आहे.
तात, मला तुमच्याजवळ घ्या.
मला वर उचला.

**थीस्यूस** : हे काय मुला ? माझे काळीज चिरणार आहेस का तू ?

**हिपॉलिटस** : मी मृत्यूच्या दाराजवळ उभा आहे, आणि ती उघडताना मला दिसत आहेत.

**थीस्यूस** : आणि तू मला अपराधी आणि कलंकित असा ठेवूनच जाणार आहेस?

**हिपॉलिटस** : नाही, नाही! मी आज तुम्हाला माझ्या मृत्यूच्या उत्तरदायित्वातून मुक्त करीत आहे!

**थीस्यूस** : काय? तू मला रक्तपाताच्या लांच्छनातून मुक्त करणार आहेस?

**हिपॉलिटस** : आर्टिमीझच्या विजयी धनुष्याची शपथ, मी तुम्हाला दोषमुक्त करीत आहे.

**थीस्यूस** : प्रिय पुत्रा, तुझ्या पित्यापुढे तू किती उदार अंतःकरण उघड करीत आहेस!

**हिपॉलिटस** : तुमचे औरस पुत्र माझ्यासारखेच व्हावेत अशी प्रार्थना करा.

**थीस्यूस** : निष्कलंकपणे मरणाऱ्या उदारधी आत्म्या!

**हिपॉलिटस** : नमस्कार तात! नमस्कार! निरोपाचा प्रणाम घ्या!

**थीस्यूस** : माझा आता त्याग करून जाऊ नकोस रे! धीर धर! माझ्या मुला!

**हिपॉलिटस** : धीर धरण्याची माझी वेळ आता सरली आहे.

मी आता संपलो आहे तात,
त्वरित माझे मुख
माझ्या उपवस्त्राने झाका.

**तो प्राण सोडतो**

**थीस्यूस** : ॲथेन्सच्या भूमी, सुकीर्ती भूषित नगरीच्या

सरहद्दींनो!

याच्याहून थोर पुरुष कधी झाला होता का?
याहून अधिक दुःखद कहाणी कधी घडली होती का?
ॲफ्रॉडाइटी! तुझ्या कठोर कपटनीतीने

माझे अंतःकरण कसल्या अविरत
अश्रुपाताचे आणि व्यवस्थेचे
चिरंतन वसतिस्थान
होऊन राहणार आहे?

**नारीवृंद** : अनपेक्षित दुःखाने प्रत्येक हृदय

आता सारखेच ग्रासले गेले आहे.

सर्व नेत्रांतून ओघळणाऱ्या अश्रूंचा
शोकपूर्ण नाद निर्माण होईल.
तो उदारधी होता :
म्हणूनच
प्रत्येक जिव्हेवरून
दीर्घस्वराने उठणारी
स्तुती आणि शोक
साऱ्या भूलोकावर निनादत राहतील.

# परिशिष्ट

## संदर्भ टीपा

### १. थीस्यूस

इथ्राचा पुत्र, थीस्यूस अत्यंत बुद्धिमान, देखणा, बलवान आणि साहसी निपजला. तो मोठा होताच इजिअसच्या संकेताप्रमाणे इथ्राने त्याला त्याच्या पित्याविषयी सांगितले व निर्दिष्ट शिलेकडे नेले, त्याने ती शिला लीलया उचलली व आपल्या पित्याचे खड्ग व चढाव या वस्तू हस्तगत केल्या. इथ्राचा पिता पिथ्यूस याने त्याला ॲथेन्सला त्याच्या पित्याकडे जाण्याकरिता एक सुसज्ज गलबत देऊ केले. परंतु सुरक्षित जलमार्गाने ॲथेन्सला जांण्यापेक्षा साहसपूर्ण खुष्कीच्या मार्गाने जाण्याचा त्याने निश्चय केला. हर्क्युलीझ हा त्याचा चुलतभाऊ असल्यामुळे त्याच्या ठायी साहसीवृत्ती होतीच.

ट्रोझीन ते ॲथेन्सच्या मार्गावर लुटारूंचा फार उपद्रव असे. त्यांचा नायनाट करण्याची त्याची इच्छा होती. हे लुटारू ज्या पद्धतीने वाटसरूंचा वध करीत त्याच पद्धतीने त्यांचा शेवट करायचा असे त्याने ठरविले. इस्थमस जवळ **सिनीस** राहात असे. तो इतका शक्तिमान होता की पाईनवृक्ष वाकवून त्यांचे शेंडे जमिनीला टेकवीत असे. जवळजवळचे असे दोन वृक्ष वाकवून वाटसरूचे दोन्ही हात दोन वृक्षांना बांधून तो ते वृक्ष सोडून देत असे. ते वृक्ष वरती जाताच उतारूची दोन शकले होत असत. सिनीसला थीस्यूसने त्याच प्रकारे मारले.

पुढे प्रवास करीत तो समुद्रकिनाऱ्याजवळील उंच कपारीकडे आला. तेथे **स्किरॉन** हा लुटारू राहात असे. तो एका खडकावर बसत असे व वाटसरूंना त्याचे पाय धुवावयास लावीत असे. वाटसरू पाय धुण्याकरिता वाकताच त्याला लाथ मारून कपारीवरून समुद्रात ठोकरून देत असे. थीस्यूसने त्याचे पाय धुण्याचे नाकारले व त्यालाच उचलून समुद्रात फेकून दिले. त्याने इतर अनेक लुटारूंचा असाच शेवट केला.

ॲथेन्सला पोहोचण्यापूर्वीच त्याची कीर्ती इजिअसपर्यंत पोहचली होती. परंतु हा युवक आपला पुत्र आहे हे त्याला माहीत नव्हते. मीडिआ त्या वेळी इजिअस जवळ राहात होती. तिला इजिअसपासून मेडस हा पुत्र झाला होता. थीस्यूसला तिने ओळखले होते व मत्सराने तिने त्याला इजिअसच्या हातूनच विषप्रयोग करण्याची योजना आखली, परंतु ऐनवेळी थीस्यूसने आपले खड्ग उपसले व खड्गाची खूण पटून इजिअसने त्याला आपला पुत्र म्हणून ओळखले. तोच ॲथेन्सचा वारस ठरला.

**क्रीटचा** राजा **मिनॉस** याचा पुत्र ॲन्ड्रोजिअस अतिथी म्हणून इजिअसकडे आला असताना इजिअसने त्याला एका साहसाच्या कामगिरीवर पाठविले, त्यात तो मारला गेला

या मृत्यूचा सूड घेण्याकरिता मिनॉसने अथेन्सवर स्वारी केली व इजिअसचा पराभव केला. तहाची एक अट म्हणून अथेन्सने खंडणी म्हणून दर नऊ वर्षांनी सात युवक व सात युवती क्रीटला पाठविण्याचे इजिअसने मान्य केले. हे कैदी पॅसिफीला वृषभापासून झालेल्या मायन्टॉरला बळी म्हणून पाठविले जात. थीस्यूस अथेन्सला आल्यावर हे बळी पाठविण्याची तिसरी खेप लवकरच आली. या युवकयुवतींच्या मातापित्यांचा शोक पाहून थीस्यूसने आपण स्वतः एक बळी म्हणून जायचा निर्णय घेतला. मॉयन्टॉरला ठार मारण्याचा त्याचा निश्चय होता. मोठ्या अनिच्छेने इजिअसने या साहसाला अनुमती दिली. हे बळी काळी शिडे लावलेल्या गलबतातून पाठवीत असत. थीस्यूस यशस्वी होऊन आला तर परतताना पांढरी शिडे लावायची असा संकेत ठरला.

**ॲरिॲड्नी :** गलबत क्रीटला पोहचल्यानंतर मिनॉसची कन्या ॲरिॲड्नीने त्याला पाहिले व तिचे त्याच्यावर प्रेम बसले. "तू जर मला अथेन्सला तुझी पत्नी म्हणून घेऊन जाशील तर मॉयन्टॉरला ठार करण्यात साहाय्य करीन" असा तिने थीस्यूसला गुप्तपणे निरोप पाठविला. त्याने तिची मागणी मान्य केली व तिने डिडॅलसच्या साहाय्याने निर्मिलेल्या भूलभूलैय्यातून बाहेर पडण्याची युक्ती त्याला सांगितली, त्याने मायन्टॉरला ठार मारले, व ॲरिॲड्नीला घेऊन तो गलबतातून अथेन्सला परत निघाला. नॅक्सॉस या बेटावर थीस्यूसने तिला सोडून दिले, किंवा त्यांची चुकामूक झाली असेल. परंतु ॲरिॲड्नी अथेन्सला पोहोचली नाही खरी. कुणी म्हणतात डायोनिससने त्याला स्वप्नात धमकी दिली. डायोनिससचे ॲरिअड्नीवर प्रेम होते—आणि डायोनिससच्या भयाने त्याने ॲरिॲड्नीचा त्याग केला. डायोनिससने तिच्याशी विवाह केला. तिच्या मृत्यूच्या अनेक कथा आहेत.

या सर्व प्रकारांत थीस्यूस आपल्या गलबताला पांढरी शिडे लावावयास विसरला. वृद्ध इजिअस त्याची उत्कटतेने प्रतीक्षा करीत होता. त्याने गलबताची काळी शिडे पाहिली व समुद्रात उडी घेऊन जीव दिला म्हणून त्या समुद्राला इजिअन समुद्र म्हणतात. असे म्हणतात की थीस्यूसने हर्क्युलीझच्या अमेझॉन विरुद्धच्या यशस्वी मोहिमेत भाग घेतला व लुटीतील त्याचा भाग म्हणून अमेझॉनची राणी ॲन्टिओपी त्याला मिळाली. ती त्याची पत्नी नव्हती, परंतु त्याच्यापासून तिला हिपॉलिटस झाला. ॲन्टिओपीची बहीण ओरेथिया हिने थीस्यूसवर सूड घेण्याकरिता अथेन्सवर स्वारी केली. या युद्धात ॲन्टिओपी थीस्यूसची प्रेयसी म्हणून त्याच्या बाजूने शौर्याने लढली. मॉलपॅडिआने या युद्धात तिला ठार मारले अशी कथा आहे. परंतु या युद्धातून ती वाचली असावी. पुढे त्याने क्रीटचा राजा ड्यूकॅलिअन याच्याशी तह केला त्या वेळी डेल्फीच्या आज्ञेनुसार त्याने ॲन्टिओपीला ठार केले व ॲरिॲड्नीची व ड्यूकॅलिअनची धाकटी बहीण फीद्रा हिच्याशी विवाह केला.

यापुढील कथाभाग प्रस्तुतच्या 'हिपॉलिटस' या शोकनाटकात आला आहे.

## २. अमेझॉन

अमेझॉन या एअरीज आणि नाइअड हर्मोनिआ यांची संतती होत. हर्क्युलीझच्या नवव्या कामगिरीत युरिस्थिअसची कन्या अड्मेटी हिच्याकरिता अमेझॉन राणी हिपॉलाइटीचा सुवर्णाचा कमरपट्टा आणण्याकरिता तो थीस्यूस आणि इतर वीरांबरोबर अमेझॉनच्या राज्यात गेला होता. या मोहिमेतील त्याचा लुटीचा वाटा म्हणून हर्क्युलीझने अमेझॉनची राणी अँन्टिओपी थीस्यूसला दिली. परंतु त्यांची ही युती सुखावह ठरली. अँन्टिओपीच्या मनात थीस्यूसविषयीची प्रेमभावना निर्माण झाली होती. थीस्यूस आणि अँन्टिओपीच्या भेटीच्या बऱ्याच कथा प्रचलित आहेत. अँन्टिओपीला सोडवून आणण्याकरिता पुढे अमेझॉनांनी अथेन्सवर स्वारी केली. परंतु थीस्यूसने त्यांचा पराभव केला. या युद्धात अँन्टिओपी त्याच्या बाजूने मोठ्या शौर्याने लढली. परंतु तिच्या बहिणीच्या ओरेथिआच्या, हातून ती मारली गेली.

परंतु सत्य हेही असण्याची शक्यता आहे की अँन्टिओपी त्या युद्धात मारली गेली नाही. थीस्यूसला तिचा पुढे वध करावा लागला. कारण डेलफीच्या देववाणीने त्याला तशी आज्ञा केली. हा वध त्याने क्रीटचा राजा ड्यूकॉलिअन याच्याबरोबर मैत्रीचा तह केला त्या वेळी थीस्यूसने ड्यूकॉलिअनची बहीण फीद्रा हिच्याबरोबर विवाह केला. अँन्टिओपी ही थीस्यूसची धर्मपत्नी नव्हती. थीस्यूसच्या फीद्राबरोबरच्या विवाहसमारंभात ती सशस्त्र शिरली व पाहुण्यांचा वध करण्याची तिने धमकी दिली. थीस्यूस व त्याच्या मित्रांनी निकराच्या झुंजीत तिला ठार केले. तिने थीस्यूसला हिपॉलिटस या पुत्राचा लाभ करून दिला होता.

## ३. पिथ्यूस

पिथ्यूस आणि ट्रोझन हे पेलॉप्सचे पुत्र होते. ते पीझाहून एटिअस राज्यात सहभागी होण्याकरिता आले. एटिअसने ॲन्थिआ आणि हायपेरिआ या नगरांची स्थापना केली, परंतु त्याला सत्ता फार काळ भोगता आली नाही. ट्रोझीनच्या मृत्यूनंतर पिथ्यूसने दोन्ही नगरांचे संयुक्त राज्य स्थापिले आणि त्याला ट्रोझीन हे नाव दिले. पिथ्यूस हा त्याच्या काळातील एक विद्वान तत्त्वज्ञ पुरुष होता.

तो पीझा येथे असतानाच बेलरफॉनने याची कन्या इथ्रा हिला मागणी घातली होती, परंतु विवाहापूर्वीच अप्रतिष्ठा होऊन त्याला कॅरिआला निघून जावे लागले. या प्रकाराने पिथ्यूस दुःखी झाला होता. मीडिआच्या मंत्रप्रभावाने त्याने इजिअसला मद्यपानाच्या नशेत इथ्राच्या शय्येवर पाठविले. त्याच रात्रीच्या उत्तर भागात पॉसायडाननेही तिचा उपभोग घेतला. इजिअस जागा झाला तेव्हा आपण इथ्राच्या शय्येवर आहोत असे त्याला आढळले. त्याने तिला सांगितले की तिला जर पुत्रलाभ झाला तर त्याचे ट्रोझीन येथेच गुप्तपणे पालन करावे. त्याने आपले खड्ग व चढाव एका प्रचंड शिलेखाली लपवून ठेवले व त्याचा पुत्र मोठा होऊन

ती शिला उचलू शकला तर त्या वस्तू घेऊन त्याला अथेन्सला त्याच्याकडे पाठवावे असा संकेत सांगितला.

इथ्राला पुत्रलाभ झाला व तो मोठा झाला. तोच थीस्यूस. पॉसायडनने त्याच्या पितृत्वाचा मान उदारमनाने इजिअसकडे दिला. पण ही कदाचित पिथ्यूसने हेतुपुरःस्सर पसरविलेली अफवाही असण्याची शक्यता आहे. थीस्यूसने अमेझॉनला झालेल्या हिपॉलिटसला लहानपणा-पासून पिथ्यूसकडेच ठेवले होते.

## ४. फीद्रा

राजा मिनॉसपासून पॅसिफीला अँड्रोजिअस, कॅट्रिअस व ग्लॉकस हे पुत्र व अॅक्कॅलीझ, ॲरिॲड्नी व फीद्रा या कन्या झाल्या. फीद्राचा थीस्यूसबरोबर विवाह झाल्यानंतर थीस्यूसने हिपॉलिटसला पिथ्यूसकडे पाठविले. पीथ्यूसने त्याचा ट्रोझीनचा भावी वारस हिपॉलिटस म्हणून घोषित केले व त्याचा संभाळ केला.

त्याची अमेझॉनमाता ॲन्टिओपी हिच्याकडून हिपॉलिटसच्या ठायी कुमारी देवता आर्टि-मीझ हिच्याविषयी अनन्यसाधारण भक्ती उत्पन्न झाली होती. त्याने ट्रोझीन येथे अर्टिमीझचे नवे मंदिर बांधले. ॲफ्रॉडाइटीला हा आपला घोर अपमान झाला असे वाटले. म्हणून फीद्रा जेव्हा एल्यूशिअन विधीला उपस्थित राहील तेव्हा तिच्या मनात हिपॉलिटसविषयी अनिवार प्रेमभावना निर्माण करावयाची असा ॲफ्राडाइटीने निश्चय केला. त्या विधीला हिपॉलिटस शुभ्रवस्त्रे परिधान करून आला. त्याच्या मस्तकावर पुष्पमाला होत्या, आणि जरी त्याचे रूप राकट मर्दानी होते तरी फीद्राला तो आवडला.

त्या वेळी थीस्यूस पिरिथॉसबरोबर थेसलीला गेला होता. किंवा टार्टरसला गेला होता. हिपॉलि-टसच्या पाठोपाठ फीद्रा ट्रोझीनला गेली. तिथे तिने ॲफ्रडाइटीचे मंदिर बांधले. त्या मंदिरातून ती हिपॉलिटसच्या व्यायामशाळेत चोरून पाहत असे. तिथे हिपॉलिटस संपूर्ण विवस्त्रावस्थेत क्रीडा करीत असे. त्या मंदिरात एक पुराणा मर्टलवृक्ष होता. हिपॉलिटसचे मर्दानी रूप पाहून फीद्रा व्यर्थ आवेगाने आपल्या केसातील रत्नजडित कटा त्या वृक्षाच्या पानात खुपसत असे आणि अजूनही त्या पानांना छिद्रे असतात. फीद्राने या मंदिराचा असा उपयोग केला म्हणून त्या मंदिराला चोरून पाहणाऱ्या ॲफ्रडाइटचे मंदिर असे म्हणतात. पुढे हिपॉलिटसने अखिल अथेन्सच्या क्रीडा समारोहात भाग घेतला तेव्हाही फीद्राने अॅक्रोपोलिसवरील ॲफ्रॉडाइटच्या मंदिराचा असाच उपयोग केला. त्या वेळी तो थीस्यूसच्या प्रासादातच राहिला होता.

या पुढील कथाभाग 'हिपॉलिटस' या प्रस्तुत शोक नाटकात आला आहे.

## ५. पॅलॅन्टाईडस :

इजिअसच्या मृत्यूनंतर थीस्यूस ॲथेन्सच्या गादीवर आला. आपली सत्ता निर्वेध करण्याकरिता त्याने पॅलस व त्याचे उरलेले पन्नास पुत्र सोडून आपल्या सर्व विरोधकांची हत्या केली. ( पॅलसच्या पुत्रांना पॅलॅन्टाईडस म्हणत असत. ) पुढे त्याने पॅलसच्या पुत्रांचीही हत्या केली. या हत्याकांडाबद्दल ॲपोलोच्या मंदिरात त्याच्यावर दोषारोपण करण्यात आले. त्याने 'समर्थनीय हत्येचा' बचाव पुढे केला व तो निर्दोष सुटला. तोपर्यंत हत्या व सदोष मनुष्यवध यामध्ये कायदेशीर फरक केला जात नव्हता. परंतु या पापक्षालनार्थ त्याने स्वेच्छेने एक वर्ष देशान्तर करण्याचे प्रायश्चित्त स्वीकारले. त्या काळात तो ट्रोझीन येथे राहिला होता. त्याचा अमेझॉनपासून झालेला पुत्र हिपॉलिटस टोझीनवर राज्य करीत होता.

## ६ कोरस

कोरस हा शब्द ग्रीक choreuein ( नृत्य करणे ) यावरून आला आहे. कोरस म्हणजे वृन्द. मुखवटे ( masks ) घातलेल्या वृन्दाच्या संगीतप्रधान धार्मिक नृत्यप्रकारातून ग्रीक शोकनाट्याचा उदय झाला असे मानतात. कोरसमधे भाग घेणाऱ्या व्यक्तींची ( नटांची ) संख्या निश्चितपणे मर्यादित केलेली नव्हती. ईस्किलसने आपल्या 'सप्लायंट' या नाटकातील कोरसमधे पन्नास नटांचा समावेश केला आहे. तर 'पर्शिअन'मधे १२ ते १५ नटांचा केला आहे. 'ओड' या काव्यप्रकाराचा वृन्दगानाकरिता उपयोग केला जात असे—त्याला कोरल ओड ( choral ode ) असे म्हणत असत. या काव्याच्या पंक्ती गाइल्या जात असताना कोरसमधील सर्वच्या सर्व किंवा काही थोड्या व्यक्तीच गायनात सामील होत असत.

ग्रीक शोकनाट्याचे ( व हास्यनाट्याचेही ) धार्मिक व सामूहिक स्वरूप विचारात घेतल्यास कोरसच्या मूळप्रवृत्तीही लक्षात येण्यासारख्या आहेत. इ.सनाच्या पाचव्या शतकात ग्रीक नाट्याला धर्मातीत स्वरूप प्राप्त झाले तरीही कोरसचे नाट्यातील स्थान ढळले नाही किंवा त्याचे पारंपरिक स्वरूपही बदलले नाही. परंपरागत धर्माचे आणि समाजजीवनाचे उद्‌गान त्यातून अविरतपणे उमटत राहिले. नाट्यातील कोरसच्या कार्यामुळे कोरसला सतत बळकटी मिळत गेली, कारण कोरस नाट्यवस्तूतील घटनांत समाजाचे संक्षेपाने प्रतिनिधित्व करीत असे. व्यक्तीच्या जीवनातील घटनांचा सामाजिक आशय व्यक्त करीत असे. व्यक्तीच्या जीवनातील चढउताराबरोबर ग्रीक नाट्यातील कोरसच्या भावना समरस होत. भय, आश्चर्य, शोक, आणि आनंद या व्यक्तिजीवनातील भावनांशी तद्‌रूप होऊन नाट्यातील घटनांवर सामाजिक व नैतिक प्रकाश टाकण्याचे कार्य कोरसच्या माध्यमातून नाटककार साधत असत.

कोरस हे नाट्यामधील नियोजित भावनिक परिणाम साधण्याचे कवींचे एक अत्यंत प्रभावी साधन होते. कवींनी त्याचा उपयोग विविध हेतूंनी विविध प्रकारे केला आहे.

( १ ) भूतकाळाचे अन्वेषण करून वर्तमानकाळावर भाष्य करण्याचा व भवितव्यात डोकावून पाहण्याचा प्रयत्न कोरसमधून नाटककारांनी केला आहे. ( २ ) भिन्न कालखंड जोडण्याचे कार्य कोरसमुळे साधता येते. घटनांचे क्रमवार दर्शन रंगमंचावर घडविले असता काळाची तीव्र जाणीव होत असते. कोरसच्या प्रयोगामुळे काळाच्या अस्तित्वाची ही जाणीव नष्ट होते किंवा क्षीण होते. ( ३ ) कोरसमुळे परंपरागत सामाजिक, धार्मिक व नैतिक मूल्ये व्यक्त करण्याचे प्रभावी साधन उपलब्ध होते; व प्रेक्षकांना रंगमंचावरील नाट्यपूर्ण घटनांत आपले प्रतिनिधित्व झाल्यासारखे वाटते. ( ४ ) व्यक्तीच्या जीवनातील नाट्यपूर्ण घटनांना सामान्य जनमानसाची पार्श्वभूमी लाभते व नायक आणि नायिका यांचे स्थान उंचविण्यास मदत होते. ( ५ ) शोक आणि भय या भावनांना शुद्ध काव्याची पार्श्वभूमी प्राप्त होऊन. शोकाचे संगीतात व भयाचे शांतरसात रूपांतर होते. ( ६ ) माणसाच्या वास्तवातील जगापासून नाट्यसृष्टीतील व्यक्तिजीवन अलग करण्याचे कार्य कोरसमुळे शक्य होते. ( ७ ) शोक नाटकातील धीरोदात्त नायक आणि नायिका व सामान्य माणसे यांच्यामध्ये एक दुवा जोडला जातो ( ८ ) भावना द्विगुणित करून शोकनाट्याचा परिणामकारकता वाढविली जाते.

कोरस समाजाचे संक्षेपाने प्रतिनिधित्व करीत असल्यामुळे त्याची घटनांतील समज मर्यादित असते. कोरसने व्यक्त केलेला सामाजिक आशयही मर्यादित व सांकेतिक असतो. नाटककार कोरसचा उपयोग एक पात्र म्हणूनच करीत असल्यामुळे सामान्य व्यक्तीच्या सर्व मर्यादा कोरसवरही येतात. म्हणून कोरस सर्वज्ञ नसतो व द्रष्टाही नसतो. नाट्यवस्तूतील उत्कंठा कायम ठेवण्याकरिता नाटककाराला आवश्यक वाटणारी गुपिते व रहस्ये कोरसने प्रकट करायची नसतात. ( हिपॉलिटसमध्ये नारीवृन्द्र कोरसला फीद्राच्या मृत्यूचे कारण विचारतो तेव्हा म्हणूनच कोरस ते उघड करत नाही. )

नाट्यातून कोरसचा उपयोग कमी झाल्यानंतर अधुनिक नाटककारांना वेगळ्या साधनांचा उपयोग करावा लागला.

## ७ स्ट्रोफी–ॲन्टिस्ट्रोफी—एपोड

स्ट्रोफी–ॲन्टिस्ट्रोफी–एपोड हे ‘ ओड ’ या प्राचीन ग्रीक काव्यप्रकाराचे तीन घटक भाग आहेत. aeidein या ग्रीक शब्दावरून ओड हा शब्द आला आहे. त्याचा अर्थ ‘ गीत गाणे ’ असा आहे. पिण्डार ( इ. पू. ५२२–४४२ ) हा या काव्यप्रकाराचा प्रणेता होता. समूहगानाकरिता ( choric song ) व नृत्यगानाकरिता ओडची रचना केली जात असे म्हणून हा प्रकार संगीतप्रधान व तालबद्ध आहे. ग्रीक शोकनाट्यात समूहगान ( choric song ) म्हणून उपयोग केला जात असल्यामुळे या काव्यप्रकाराला गेयतेबरोबरच एक प्रकारची शुचिता, प्रतिष्ठा, भव्योदात्तता प्राप्त झाली. ओडच्या ग्रीक शोकनाट्याशी असलेल्या

या अनन्यसाधारण सहचर्यामुळे या काव्यप्रकाराची मूलभूत प्रवृत्तीच गंभीर व चिंतनशील आहे.

पिण्डारपासून युरायपिडीज, सोफोक्लस, ॲस्किलस या कवींनी अत्यंत कौशल्यपूर्वक 'ओड' रचना केली आहे. या काव्यप्रकाराचे सामूहिक रूप ( FORM ) आणि औपचारिकताही कळू शकते. काव्य, संगीत व नृत्य या तीन्ही कलांचा आविष्कार ललित काव्यात केवळ ओड-मधेच आढळतो.

स्ट्रोफी ही एक अत्यंत गुंतागुंतीची वृत्तात्मक रचना असून तिच्यातील ओळींची लांबी ( मात्रांची संख्या ), संख्या आणि मांडणी नृत्यातील तालानुसार प्रत्येक ओडमधे भिन्न असते. स्ट्रोफीमधील सर्व संगीत ताल आणि ध्वनी यांचा पुनराविष्कार ॲंटिस्ट्रोफीमधे ( ओडचा दुसरा भाग ) होतो, आणि एपोडमधे ( ओडचा तिसरा भाग ) समाप्त होतो.

ओडचा विस्तारही दीर्घ असतो ( ग्रीक ओडचा ५०० ओळींचा एक खंड उपलब्ध आहे) आणि त्यामधे मूळ त्रिखंडात्मक रचनेची वृत्तबद्ध पुनरावृत्ती असते.

## ८. हेकटी :

हेकटी हे आर्टिमीझचेच ( डायना ) दुसरे रूप मानिले आहे. आर्टिमीझची तीन रूपे आहेत. आकाशस्थ सेलिनी, भूलोकी आर्टिमीझ व पाताळात व जेव्हा पृथ्वी आणि तिचा चन्द्र अंधारात लुप्त झालेले असतात तेव्हा पृथ्वीवरही हेकटी अशी ती तीन रूपे होत. म्हणून ती अंधाराची आणि अंधारात दडलेल्या चन्द्राची देवता आहे. अंधारातील कृष्ण कृत्यांची आणि दुष्ट शक्तींनी ग्रासलेल्या आडवाटांची दुष्ट देवताही आहे. वनातून मृगया करणाऱ्या प्रसन्न निरागस खेळकर कुमारी देवतेपासून चन्द्रदेवता-अंधारी कृष्ण कृत्यांची दुष्ट देवता हा देव-देवतांच्या बाबतीतील विरोधाभास सत् आणि दुष्ट प्रवृत्तीतील अनिश्चितता दर्शविणारा आहे.

## ९. पॅन :

पृथ्वीवर वास्तव्य असलेल्या दुय्यम देवतांमध्ये पॅनचे स्थान वरचे आहे. तो हार्मिसचा पुत्र. गाणारा, बडबडणारा आनंदी वृत्तीचा हा देव अर्धमानव अर्धपशू होता. त्याला मेंढ्याची शिंगे व पाय होते. म्हणून तो मेंढपाळांचा देव व वनदेवतांचा नृत्यातील साथीदार होता. त्याला वनराई प्रिय आहेत. त्यातही आर्काडी अधिक प्रिय. तो श्रेष्ठ संगीतकारही होता. त्याच्या पाव्यावर तो रम्य गीते गात असे. तो नित्य कुठल्याना कुठल्यातरी वनदेवतेच्या ( Nymph ) प्रेमात पडलेला असे, पण त्याच्या रूपामुळे नेहमी आव्हेरला जात असे.

वनात अंधारात भयभीत झालेल्या पांथस्थाच्या कानावर येणारे चमत्कारिक आवाज पॅनच निर्माण करीत असे म्हणून अशा भयाला त्याच्या नावावरून पॅनिक ' Panic ' हा शब्द प्राप्त झाला आहे.

## १०. कोरिबॅन्टिज :

कोरिबॅन्टिज हे फ्रिजिअन देवता सायबेली हिचे पुरोहित होते. मोठ्याने ओरडून जयघोष करीत झांजा आणि ढोल वाजवीत, नाचत ते तिची पूजा करीत. ग्रीक सायबेलीला महामात म्हणत. तिला मॅटर टरिटा असेही म्हणत, कारण तिचा मुकुट छोट्या तटबंदीसारखा दिसत असे.

## ११. पॅसिफी :

ॲस्टरिअसच्या वधानंतर मिनॉस क्रीटच्या सिंहासनावर आला. सिंहासनावरील आपला हक्क सिद्ध करण्याकरिता आपण केलेली कोणतीही प्रार्थना देव मान्य करतील अशी बढाई त्याने मारली. प्रथम त्याने पॉसायडोनकरिता एक वेदी बांधली, बलिदानाची सर्व सिद्धता केली आणि नंतर समुद्रातून एक बैल बाहेर येवो अशी प्रार्थना केली; ताबडतोब एक तेजस्वी बैल पोहत किनाऱ्यावर आला. परंतु त्याच्या सौंदर्याने तो इतका मोहित झाला की, तो त्याने आपल्या गोशाळेत ठेवला व दुसरा बैल बळी दिला.

पुढे मिनॉसने हेलिअस आणि वनदेवता क्रीट यांची कन्या पॅसिफी हिच्याशी लग्न केले. परंतु मिनॉसने केलेल्या अपमानाचा बदला घेण्याकरिता पॉसायडोनने पॅसिफीच्या मनात त्या बैलाविषयी अनावर कामवासना निर्माण केली. पॅसिफीने आपली भावना डिडॅलसला सांगितली. डिडॅलस हा ॲथेन्समधील एक श्रेष्ठ यंत्रशिल्पी होता. त्याच्या साहाय्याने पॅसिफीने आपली वासना त्या बैलाशी अगम्यगमन करून तृप्त केली. त्यातून तिला अर्धमानव अर्धवृषभ मायन्टॉर झाला.

पॅसिफीच्या या अनैसर्गिक कामवासनेविषयी अनेक कथा आहेत. कुणी म्हणतात मिनॉसने झ्यूसचा उपमर्द केला. कुणी म्हणतात पॅसिफीने ॲफ्राडाइटीची नित्य आराधना केली नव्हती म्हणून तिचा पॅसिफीवर रोष झाला.

## १२. ॲरिॲडनी :

फीद्राची मोठी बहीण ॲरिॲडनी. पाहा थीस्यूसावरील तळटीप.

## १३. सेमिली :

झ्यूसचे मर्त्यरूपामधे थीब्जचा राजा कॅडमस याची कन्या सेमिली हिच्याबरोबर प्रेमप्रकरण होते. मत्सरी हेरा ( झ्यूसची पत्नी ) म्हाताऱ्या शेजारणीच्या रूपात सेमिलीकडे गेली. सेमिली त्या वेळी सहा महिन्याची गर्भवती होती. त्या शेजारणीने सेमिलीला असा सल्ला दिला की, तिने तिच्या प्रियकराला त्याच्या खऱ्या रूपात प्रकट होण्याचा आग्रह करावा.

तो कदाचित राक्षसही असेल. सेमिलीने त्याप्रमाणे झ्यूसकडे हट्ट धरला. झ्यूसने तिची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. तिने त्याला शय्यासोबत देण्यास नकार दिल्यावर संतापाने झ्यूस त्याच्या खऱ्या रूपात प्रकट झाला व त्याच्या तेजाने ती भस्म झाली. परंतु हर्मिसने तिचा गर्भ वाचविला व झ्यूसच्या मांडीत शिवून टाकला. तिथून यथावकाश डायोनिससचा जन्म झाला. पुढे डायोनिससने तिची पाताळलोकातून मुक्तता केली व स्वर्गात देवामधे प्रस्थापना केली.

## १४. उषादेवी ( ऑरोरा ) आणि सेफॅलस :

उषादेवी ही ग्रीक देवता 'ऑरोरा'. टिथोनस हा तिचा पती. तिचा पुत्र मेम्नॉन हा इथिओपिआचा राजपुत्र ट्रोजनांच्या बाजूने लढताना ट्रॉय येथे मारला गेला. ऑरोराने आपल्या पतीकरिता झ्यूसदेवापाशी अमरत्वाची मागणी केली. ते त्याला प्राप्त झालेही, परंतु अमरत्वाबरोबरच त्याच्याकरिता चिरयौवनही मागायला ती विसरली. परिणामी तो सतत वृद्ध होत राहिला आणि शेवटी झिजून झिजून नुसते माणसाचे टरफल उरले. अखेर मृत्यूने मुक्ती प्राप्त न होणाऱ्या त्याचे ऑरोराने गवतावरील टोळात रूपांतर केले.

सेफॅलस हा वायुमंडलाधिपती इओसचा पुत्र. त्याचा प्रोक्रिसशी विवाह झाला होता परंतु विवाहानंतर काही दिवसांतच ऑरोराने त्याला पळवून नेले. तो एक निष्णात शिकारी होता. ऑरोराने त्याला अनेक वेळा वनात पाहिले होते, व तिचे त्याच्यावर प्रेम जडले. तथापि सेफॅलस तिला वश झाला नाही. शेवटी तिने त्याला परत प्रोक्रिसकडे जाण्यास अनुमती दिली. परंतु त्याच्या अनुपस्थितीत सुंदर प्रोक्रिस त्याच्याशी प्रामाणिक राहिली असेल काय असा संदेह तिने त्याच्या मनात निर्माण केला. सेफॅलसच्या मनात पत्नीच्या चारित्र्याविषयी शंका निर्माण झाली. त्याने वेषांतर करून तिची परीक्षा घ्यायचे ठरविले व प्रोक्रिसची दीर्घकाल प्रियाराधना केली. तिचे एकच उत्तर होते. "माझा पती दूर असला तरी मी त्याचीच आहे." परंतु एकदा तिचा नकार किंचित क्षीण वाटला म्हणून सेफॅलस प्रकट झाला व त्याने तिच्यावर बदफैलीपणाचा नीच आरोप केला. प्रोक्रिसने त्याच्याकडे एकदाच पाहिले आणि पाठ फिरवून त्याला सोडून निघून गेली. त्याला पश्चात्ताप झाला आणि त्याने तिचा खूप दीर्घकाल शोध घेतल्यावर ती त्याला सापडली आणि महत्प्रयासाने त्याने तिचे प्रेम आणि विश्वास परत मिळवला. तिने त्याला एक अचूक भाला भेट दिला. दोघेही एकदा वनात शिकार करीत असता योगायोगाने परस्परांपासून अलग झाले. सेफॅलसला झुडपात हालचाल दिसली. सावज समजून त्याने आपला दैवी भाला फेकला परंतु त्या भाल्याने प्रोक्रिसचा बळी घेतला.

युरायपिडीजने प्रस्तुतच्या शोकनाट्यात मूळच्या कथेत बदल केला आहे. वृद्ध दाई आपल्या

दाखल्यात ऑरोरा व सेफॅलस आपल्या व्याभिचारी प्रेमाने आकाशात चिरंतन सुखात राहिले असे म्हटले आहे ते फीड्राच्या मनातील अशा प्रेमाविषयी असलेली रास्त आढी दूर करण्याकरिता.

## १५. आयोली :

धनुर्विद्येच्या स्पर्धेत जिंकलेली ओकॅलिआची राजकन्या आयोली हर्क्युलीझला देण्यास तिचा पिता राजा युरिटस याने नकार दिला म्हणून हर्क्युलीझने त्याच्या राज्यावर स्वारी केली, त्याचा पराभव केला व आयोलीला कैद केले. परंतु हर्क्युलीझला आत्मदान करून शरणागत होण्यापेक्षा तिने आपल्या सर्व कुटुंबाची आपल्या डोळ्यादेखत हर्क्युलीझला हत्या करू दिली व स्वतः नगरभिंतीवरून उडी टाकली. परंतु ती मेली नाही. तिच्या झग्यात हवा शिरली व ती अलगद खाली आली. हर्क्युलीझने तिला इतर कैद्यांबरोबर डिआनीराकडे ( हर्क्युलीझची पत्नी ) पाठविले व तो सेनॅइअमकडे गेला.

आयोली लावण्यवती होती आणि डिआनीरा आता जरी वयस्कर झाली होती व हर्क्युलीझचे सुंदर स्त्रियांचे वेड तिला माहीत होते तरी आयोली आणि तिने एकाच घरात राहण्याची कल्पना तिला रुचण्यासारखी नव्हती. म्हणून तिने निससने तिला दिलेल्या स्वतःच्या मंतरलेल्या रक्तात रंगवून एक अंगरखा हर्क्युलीझकडे पाठविला ( हर्क्युलीझ आणि डिआनीराचा विवाह झाल्यावर तो तिला घेऊन आपल्या घरी निघाला असता एक नदी ओलांडावी लागली. सेन्टॉर निसस प्रवाशयांना पैलतीरी पोहचवीत असे. डिआनीराला पाठीवर घेऊन जात असताना निससने मध्यप्रवाहात तिचा उपमर्द केला, ती किंचाळली व हर्क्युलीझने त्याला पैलतीरावरूनच मारले. मरताना निससने तिला सांगितले की हर्क्युलीझ जर कधी परक्या स्त्रीच्या प्रेमात पडला तर त्याच्या रक्ताचा त्याच्यावर प्रयोग करावा. डिआनीराने त्याचे थोडे रक्त जवळ ठेवले होते. ) तो अंगरखा अंगात घालताच हर्क्युलीझचे सर्व शरीर होरपळू लागले व त्यातच त्याचा अंत झाला. डिआनीराला या मंत्रसिद्धीचा असा परिणाम होईल हे माहीत नव्हते. निससचे कपटही तिला उशीरा कळले. मृत्यूपूर्व हर्क्युलीझने आल्कमिनीचा पुत्र हायलसला बोलावून घेतले व त्याला आयोलीला माऊंट ओटावर घेऊन जाण्यास सांगितले व त्याच्या मृत्यूनंतर आयोलीशी विवाह करण्यास सांगितले हर्क्युलीझच्या मृत्यूचे वृत्त कळताच डिआनाराने आत्महत्या केली.

## १६. डर्सिअनझरा :

थीब्जची एक राजकन्या ॲन्टिओपी हिने झ्यूसपासून झिथस आणि ॲम्फिअन या दोन पुत्रांना जन्म दिला, परंतु पित्याच्या भयाने त्यांना एका पर्वतावर टाकून दिले. एका मेंढपाळाला ती मुले सापडली. त्याने त्यांचे पालन केले. थीब्जचा राजा लायकस आणि राणी डर्सी यांनी ॲन्टिओपीचा फार छळ केला. ती पळून गेली ती योगायोगाने त्या

मेंढपाळाच्या दारी. तिच्या मुलांनी तिला किंवा तिने त्यांना ओळखले. त्यांनी आपल्या मित्रांची टोळी घेऊन आपल्या आईवर झालेल्या जुलमाचा सूड घेण्याकरिता राजवाड्यावर हल्ला केला. त्यांनी लायकसचा वध केला व डर्सीचे केस एका बैलाला बांधले व तिला हालहाल करून ठार केले. तिचे प्रेत त्यांनी एका झऱ्यात फेकून दिले तेव्हापासून त्या झऱ्याला तिचे नाव प्राप्त झाले.

**१७. फिथॉन :**

फिथॉन हा क्लायमेनी आणि हेलिअस ( सूर्य ) यांचा पुत्र. क्लायमेनी मानवी होती. फिथॉन सूर्याकडे बोट दाखून ' तो माझा पिता ' असे आपल्या बालमित्रांना सांगत असे व ते त्याला चिडवीत असत. त्याने आपल्या आईला विचारले. ' तू सूर्यालाच ( हेलिअसलाच ) विचार ' असे तिने त्याला सांगितले, म्हणून हेलिअस स्वर्गातील सुवर्ण प्रासादात गेला. त्याने सूर्याला विचारले. सूर्याने ते मान्य केले व त्याचा पुरावा म्हणून फिथॉनला काहीही माग म्हणून सांगितले व स्टीक्सची शपथ घेतली. फिथॉनने सूर्याची जागा एक दिवस मागितली. सूर्याने मोठ्या अनिच्छेने आपले वचन पाळले. परंतु फिथॉन रथातून जात असता उष्णतेने पेटला, रथाचे घोडे उधळले. रथ खाली कोसळला तर सबंध विश्वच पेटेल म्हणून झ्यूलने आपले वज्र फेकले. फिथॉन खाली इरिडॅनस नदीत कोसळला. नायडनी त्याचे दफन केले. त्याच्या बहिणी हेलिॲडीस त्याच्या समाधीजवळ शोक करू लागल्या. तिथे त्यांचे इरिडॅनसच्या किनाऱ्यावर पॉप्लर वृक्षात रूपांतर झाले.

**१८. ऑर्फिअर्स :**

ऑर्फिअस हा थ्रेसचा राजा ऑइग्रस व कलादेवता कॅलिओपी यांचा पुत्र होता. तो सुप्रसिद्ध कवी आणि संगीतकार होता. त्याची पत्नी युरिडाईसी हिला सर्पदंशाने मृत्यू आला तेव्हा पाताल लोकात जाऊन तिला परत आणण्याचा त्याने प्रयत्न केला. त्याच्या संगीताच्या मोहिनीने लुब्ध होऊन प्ल्यूटोने तिला घेऊन जाण्यास संमती दिली. अट एकच होती. ती त्याच्या मागून चालत जाईल व पातालोकाच्या मार्गातून बाहेर पडेपर्यंत त्याने मागे वळून पाहायचे नाही. त्याला शेवटपर्यंत धीर धरवला नाही व तो तिला कायमचे हरवून बसला अशी कथा आहे.

परंतु ऑर्फिअसचा इथे जो उल्लेख आहे तो वेगळ्या संदर्भात. ऑर्फिअस अपोलोच्या मंदिराचा पुरोहित होता व समलिंगी प्रेमाचा पुरस्कार करीत असे. हिपॉलिटसचा स्त्रीद्वेष व ब्रह्मचर्याचे व्रत या वैशिष्ट्यावर हा वक्रप्रकाश थीस्यूसने टाकला आहे. समलिंगी संबंधाचा उल्लेख ग्रीक पुराणात आढळतो.

थीस्यूसला नव्या पिढीचे हे वेडाचार पसंत नसल्यामुळे त्याने असा टोमणा हिपॉलिटसला मारला आहे.

**१९. ग्रेसेस :**

ग्रेसेस तीन होत्या. ॲग्लाइआ ( वैभव ), युफ्रझाईन (हास्य) आणि थॅलिआ ( आनंद ). त्या युरिनोम आणि झ्यूसच्या कन्या होत्या. युरिनोम ही ओशन या टायटनची कन्या होती. त्या भिन्न देवता मानल्या जात नसत, परंतु एकच त्रयी अशा मानल्या जात. अपोलोच्या लायरच्या ( वीणेच्या ) तालात त्या नृत्य करू लागल्या म्हणजे देवांना आनंद होत असे. त्यांच्या दर्शनाने मानवांना सुख प्राप्त होत असे. त्या जीवनाला बहर आणतात, नऊ कलादेवता त्यांच्या सवंगडी होत्या.

**२०. ॲडॉनिस :**

हिपॉलिटसच्या मृत्यूचा सूड आर्टिमीझने ॲफ्राडाइट्चा प्रियकर ॲडॉनिसचा याचा बध करून घेतला.

बिब्लसचा राजा सिनायरस याच्या पत्नीने एकदा तिची कन्या स्मायर्नाही ॲफ्रडाइटीहूनही सुंदर आहे अशी बढाई मारली. या अपमानाचा सूड ॲफ्रडाइटीने स्मायर्नाच्या मनात आपल्या स्वतःच्या पित्याविषयी वासना निर्माण करून घेतला. सिनायरस त्या वेळी मद्याच्या नशेत होता, परंतु सावध होताच संतप्त होऊन तो स्मायर्नाला ठार मारण्यास धावला. अफ्राडाइटीला कृतकर्माचा पश्चात्ताप झाला व तिने स्मायर्नाचे मिरा वृक्षात रूपांतर केले. स्मायर्नाला ॲडॉनिस झाला. त्याला एका पेटीत बंद करून ॲफ्राडाइटीने पर्सीफोनीच्या स्वाधीन केले. तिने ती पेटी उघडून पाहिली तेव्हापर्सिफोनी सुंदर अडॉनिसच्या प्रेमात पडली. ॲफ्राडाइटीला हा प्रकार कळल्यावर तिने झ्यूसकडे तक्रार केली. या दोन महान देवतांच्या वादात पडायला नको म्हणू त्याने ते प्रकरण कलादेवता कॅलिओपीकडे सोपविले. तिने वर्षाचे तीन ऋतू केले व त्याने एक ऋतू, वसंत ॲफ्रडाइटीकडे व एक पर्सिफोनीकडे व एक स्वतः करिता असे व्यतीत करायचे असे ठरले. परंतु ॲफ्राडाइटी अशी धूर्त की ती आपली मंत्र-सिद्ध मेखला घालून ॲडॉनिसच्या स्वतःच्या ऋतूतही त्याला स्वतःजवळच ठेवून घेत असे.

ॲडॉनिसला मृगयेची आवड होती आणि ॲफ्राडाइटी आपला हंसाचा रथ सोडून अनेक वेळा त्याच्याबरोबर वनात जात असे. एकदा मात्र ती आपल्या रथातून आकाशात विहार करीत असता ॲडॉनिस पृथ्वीवर एका वक्रदंत वराहाच्या मृगयेत मग्न होता. त्याने आपला भाला त्याच्यावर फेकला, परंतु तो मत्त वराह केवळ जखमी झाला व त्याने ॲडॉनिसवर हल्ला चढविला. आकाशात ॲफ्राडाइटने त्याचे विव्हळणे ऐकले परंतु ती आली त्या वेळी तो आसन्नमरण होता.

वराह हा त्याच्या वक्रदंतामुळे ( चंद्राकृती ) आर्टिमीझला ( चंद्रदेवता ) प्रिय आहे.

■

## हेकॅबी

**पॉलिडोरसचे पिशाच्च**

प्रायम आणि हेकॅबी यांचा मृत पुत्र

**हेकॅबी**

ट्रॉयनगरीची भूतपूर्व राणी

**पोलायक्झेना**

हेकॅबीची कन्या

**ओडिमिअस**

एक ग्रीक सेनाधिकारी

**टॅलथिबिअस**

ग्रीक सेनेचा संदेशवाहक अग्रदूत

**ॲगॅमेमनोन**

ग्रीक सेनेचा प्रमुख सेनानायक

**पोलायमेस्टर**

थ्रेसचा राजा

**एक वृद्ध स्त्री**

हेकॅबी राणीची दासी

**कोरसमधील नारी वृन्द**

ॲगॅमेमनोनने गिरफदार केलेल्या ट्रोजन स्त्रिया

[ ट्रॉयपासून सामुद्रधुनीच्या विरुद्ध बाजूला असलेल्या थ्रेसिअन द्वीपकल्पानजिकचा समुद्रकिनारा. या किनाऱ्याजवळ मोकळ्या जागेत ॲगॅमेमनोन या प्रमुख ग्रीक सेनानायकाचा तंबू असून अन्य मोकळ्या जागेत ग्रीक सेनेने तळ ठोकलेला आहे. पडदा वर जातो नि सेनाप्रमुख ॲगॅमेमनोनच्या तंबूवरील अधांतरी जागेत पॉलिडोरसचे पिशाच्च प्रकट होते. ]

**पॉलिडोरस :** देवांच्या सहवासापासून खूप दूर, हेडीज आपल्या वसाहतीवर सत्ता गाजवीत आहे – तेथील मृतांमधून मी आलो आहे, रहस्यमय, गूढ अशा भूमातेच्या धूसर उदासवाण्या गिरिगव्हारातून, काळोखाच्या काळ्याशार प्रवेशद्वारातून.

मी आहे पॉलिडोरस, हेकॅबी आणि राजा प्रायमचा पुत्र. ज्यावेळी ग्रीक वीरांच्या भाल्यांनी ट्रॉय नगरीला वेढले होते तेव्हा शहर शत्रूच्या हाती पडेल या भीतीने माझ्या पित्याने मला या द्वीपकल्पाच्या सुपीक मैदानात शेती करून आपल्या समशेरीच्या ताकदीवर घोडेस्वारांच्या एका जमातीवर स्वामित्व गाजविणारे वडिलांचे खूप जुने स्नेही पोलायमेस्टर यांच्या थ्रेस येथील राजवाड्यात लपवून छपवून गुप्तपणे आणून ठेवले. माझ्या वडिलांनी माझ्याबरोबर सुवर्णाचा गुप्त खजिनाही पाठविला होता. हेतू हा की, जर ट्रॉयचा पाडाव झाला तर त्या लढाईतून वाचलेल्या आपल्या मुलांपाशी हलाखीतून डोके वर काढायला पुरेल इतके द्रव्य बाजूला ठेवलेले असावे. प्रायमच्या पुत्रांमध्ये मी सर्वांत धाकटा; त्यासाठीच त्यांनी मला दूर पाठवले. समशेर वा शिरस्त्राण पेलण्याइतका मी मोठा किंवा दणकट नव्हतो. म्हणूनच जोपर्यंत ट्रॉय नगरीच्या तटबंदीची बाहेरील भिंत भक्कमपणे उभी होती, तिचे उंच उंच बुरुज ढासळलेले नव्हते व माझा भाऊ हेक्टर समरांगणावर विजयोत्साहाने तळपत होता तोपर्यंत माझ्या पित्याच्या थ्रेसवासी स्नेह्यासमवेत मी आनंदी जीवन जगत होतो. भविष्याची जाण नसलेला मी, एखाद्या नीट जोपासल्या जाणाऱ्या कोवळ्या रोपट्यासारखा वाढत होतो.

पण जेव्हा ट्रॉय पडलं, हेक्टरला वीरगती लाभली, प्रायमचा राजप्रासाद धुळीला मिळाला व निओटॉलमेसच्या पाखंडी समशेरीला बळी पडून पवित्र स्थंडिलाला कवटाळीत

राजा प्रायम स्वतःच्याच रक्तात कोसळला त्याचवेळी माझ्या पित्याचा स्नेही व माझा यजमान पोलायमेस्टर याने माझ्याबरोबर आलेला सुवर्णखजिना मिळवावा व स्वतःजवळ ठेवता यावा म्हणून मला ठार मारले. आणि मला ठार केल्यावर त्याने माझा जड देह सागरात भिरकावून दिला. आता अटीतटीने धावणाऱ्या प्रवाहावर मागेपुढे ढकलला जात, खारट फेसावर तरंगत, कुणी आसवं ढाळली नाहीत, कुणी मूठमाती दिली नाही अशा अवस्थेत मी या रेताडावर पहुडलो आहे. माझा जड देह सोडून, यातना सहन करणाऱ्या माझ्या प्रिय मातेच्या, हेकॅबीच्या मस्तकावरून, जवळून घिरट्या घालण्यासाठी मी येथे आलो आहे. या सैनिकांनी तिला ट्रॉयहून येथे आणल्यापासून आतापर्यंत, म्हणजे तीन दिवस मी तिच्या आवतीभोवती तरंगतो आहे.

दरम्यानच्या काळात ॲकाइआचे हे रहिवासी थ्रेसच्या या सागरकिनाऱ्यावर तळ ठोकून आहेत. त्यांची गलबते थंडावली आहेत. कारण आपल्या सर्व सैनिकांना गलबतावर घेऊन ग्रीक नौदल मायदेशी प्रयाणास निघण्यासाठी वल्ही मारण्याच्या तयारीत होते, त्याच वेळी पेलिअसचा पुत्र ॲकिलीस आपल्या स्वतःच्या थडग्यातून वर प्रकट झाला आणि त्याने त्या ॲकिअन नौदलाला थांबवले; त्याने अशी मागणी केली की त्याच्या थडग्यासाठी मानाची देणगी म्हणून माझी भगिनी पोलायक्झेना हिला तिथे बळी देण्यात यावे. ही त्याची मागणी पुरविण्यात येईल. कारण त्या सर्वांची त्याच्यावर भक्ती होती. म्हणून तो जी जी मागणी करील ती ती हे त्याला देतील. नियती आजच तिला तिच्या अखेरीकडे ओढून नेईल. मग माझी माता, माझे व माझ्या बहिणीचे, अशी आपल्या दोन अपत्यांची दोन शरीरे आपल्या नजरेसमोर निर्जीव येऊन पडलेली पाहील. कारण मी माझ्या जन्मदेच्या हाती पडून तिच्या हातून मला मूठमाती मिळावी अशी याचना मी अधोलोकातील शक्तींजवळ केलेली आहे. आता तदनुसार मी तिच्या दृष्टीपुढे येईन. सागरातून बाहेर फेकल्या गेलेल्या मला तिची एक दासी पाहील आणि मग माझा हा अभागी जडदेह पुरला जाईल, तसं झालं म्हणजे माझी इच्छा होती त्याप्रमाणे मला सगळं मिळाल्यासारखं होईल.

ॲगॅमेमनोनच्या तंबूतून बाहेर येताना माझी माता मला दिसते आहे. मी आता तिला सोडून दूर जातो. माझी आभासमय मूर्ती तिने आपल्या स्वप्नात पाहिली आहेच आणि त्यामुळे ती बेचैन आहे. आई ! आई ग ! एकेकाळी आलिशान प्रासादात वावरणाऱ्या तुझी ही अवस्था ! ही गुलामी ! सर्वांत उच्च स्थानावरून अतीव खोल तळाशी ! कुणा देवाने तुझे गतवैभव पाहिले आणि समतोल साधण्यासाठी तुला या विनाशगर्तेत आणून सोडलं ?

[ पॉलिडोरसचे पिशाच्च अंतर्धान पावते. हेकॅबी तंबूतून प्रवेश करते. तिला दोन तरुण मुलींनी आधार दिला आहे. ]

**हेकॅबी :** मला संभाळा ग माझ्या पोरींनो ! मला म्हातारीला नीट सावरून धरा. ही तुमची एकेकाळची राणी ! ट्रॉयच्या नागरिकांनो, तुमच्याबरोबर मी आता गुलाम झाले

आहे. माझ्या दंडांना धरा आणि मला घेऊन चला. माझ्या सांगाती राहा नि मला आधार द्या. मी आता वृद्ध झाले आहे. मला आता या आकडीच्या काठीवर भार टाकावा लागतो आहे नि मरगळलेली पावले व आखडलेले सांधे जरा जलद हलावेत म्हणून धडपड करावी लागते आहे. हे दिवसाच्या झगझगणाऱ्या देदीप्यमान प्रकाशा! हे रात्रीच्या घनांधकारा! सतत भेडसावणाऱ्या भीतींनी अन् भासमय दृश्यांनी का मी अशी दचकून उठते अन् वतारल्यासारखी होते?

हे पवित्र भूदेवी! काळेकुट्ट पंख असलेल्या स्वप्नांना जन्म देणाऱ्या माते! मी जे देखिले, ते भीतिदायक दृश्य घेऊन जा ना माघारी! सुरक्षिततेसाठी थ्रेस येथे पाठविलेला माझा पुत्र पॉलिडोरस आणि माझी लाडकी कन्या पोलायक्झेना यांच्याबद्दलचे स्वप्न पडले मला.

हे अधोलोकातील देवगणांनो! त्या थंड पर्वतराजीत, ज्याठिकाणी त्याच्या पित्याचा स्नेही त्याचे रक्षण करतो आहे, तिथं त्याला सुरक्षित ठेवा. आमच्या घराण्याचा आधार असा एवढाच अंकुर शिल्लक आहे आता!

आधीच अश्रूंनी भारावलेल्या डोळ्यांना पुन्हा रडायला लावणारी काहीतरी नवी आपत्ती येऊ पाहाते आहे असे दिसते आहे. पूर्वी कधीही वाटली नव्हती अशी भीती माझ्या हृदयाला धडका देत आहे.

माझ्या सख्यांनो! हेलेनस अगर कॅसान्ड्रा, यांच्यापैकी कुणी जर इथे असतं, तर अदृष्टात काय आहे हे जाणण्याच्या आपल्या दैवीशक्तीने त्यांनी माझ्या स्वप्नांचा अर्थ मला सांगितला असता. माझ्या मांडीच्या आधाराने विसावलेल्या एका हरिणशावकाला कुणीतरी क्रूरपणाने हिसकावून घेतल्याचे व लांडग्याच्या कराल दातांनी त्याचे तुकडे तुकडे झाल्याचे मी स्वप्नात पाहिले. भीतीचे हे दडपण काही केल्या माझ्यावरून दूरच होत नाही. ॲकिलीसचे पिशाच्च त्याच्या थडग्यावर प्रकट झाले नि यज्ञीय बळी म्हणून त्याने कुमारिकेच्या रुधिराची मागणी केली. आमच्यापैकीच एखाद्या पीडित ट्रोजन स्त्रीचा बळी हवा असणार त्याला. म्हणून हे देवगणांनो! मी याचना करते, हा दुर्दैवाचा फेरा चुकवा. माझ्या लेकरांना त्याची छळ लागू देऊ नका.

[ नारीवृन्द प्रवेश करतो. ]

**नारीवृन्द** : हेकॅबी! युद्धातील लूट म्हणून ग्रीकांनी आम्हाला ट्रायमधून हाकलीत इथे आणलं. नंतर चिठ्ठ्या टाकल्यावर गुलाम म्हणून ॲगॅमेमनोनच्या वाट्याला गेल्यानंतर, ट्रायनगरीतून बाहेर पडल्यावर आम्ही ॲगॅमेमनोनच्या तंबूतच आहोत. तिथून तुला भेटण्यासाठी म्हणून मी झटकन निसटून आले आहे. मी देणार असलेली बातमी तुझ्या वेदना कमी करू शकणारी नाही. अशी वार्ता आणणे हे सुद्धा आम्हाला तापदायक ओझेच आणि ती ऐकणे ही तुला न सोसवणारी भयानक यातनाच. असे म्हणतात की सर्व एकिअन्सनी जमून आपल्या सभेत ॲकिलीसला तुझ्या कन्येचा बळी द्यायचा ठराव केला आहे.

तुला आठवत असेल, शिडे दोऱ्यांनी ताठ उभारून, गलबते जलप्रवासाला निघायल जेव्हा जय्यत तयार केली होती त्या वेळी सुवर्णाचे चिलखत घातलेल्या अॅकिलीसने आपल्य थडग्यावर उभे राहून सागरप्रवासाला निघालेल्या गलबतांना रोखून धरण्यासाठी ओरडून गर्जना केली, "कुठे निघालात हे ग्रीकांनो! नजराणा न देता माझ्या थडग्याला इथे सोडून जाता?"

त्यानंतर ग्रीक भालाइतांच्या मंत्रिमंडळात दोन तट पडून लाटेवर लाट आपटावी तशी भीषण हमरीतुमरी झाली. एक बाजू गरजली, 'बळी द्यायलाच हवा!...' दुसरी बाजू ओरडली, 'बळी मिळणार नाही.

तुझी बाजू घेतली ती अॅगॅमेमनोन याने. त्या भ्रान्तचित्त भविष्यवादिनीच्या प्रीतीशी तो प्रामाणिक राहिला आहे. परंतु, दोघे अथेन्सवासी, थिसिअसचे पुत्र, जरी दोन वेगवेगळे पर्याय मांडीत होते, तरी अॅकिलीसच्या थडग्यावर जिवंत व्यक्तीचा रुधिराभिषेक व्हावा याबाबत दोघांचेही मतैक्य होते. 'अॅकिलीस'च्या भाल्यापेक्षा कॅसान्ड्राच्या शय्येला अधिक महत्त्व देणे हे चूकच आहे असे ते म्हणाले.

युक्तिवादाचा जोर दोन्ही बाजूंनी सारखाच होता. पण अखेरीस जनसामान्यांना रुचेल अशी वरवर साखरपेरी मायावी भाषणे करणाऱ्या धूर्त ओडीसिअसने त्यांना आग्रहाने बजावलं की, एका गुलामाचा गळा यमपाशातून सुटावा म्हणून ग्रीकांच्या सर्वांत शूर लढवय्या वीराचा अपमान करणे उचित ठरणार नाही. तो ओरडून म्हणाला, 'पर्सेफॉनी-समोर दाखल झालेल्या मृतांच्या आत्म्यांनी असे उद्‌गार काढावेत काय, की, ग्रीक, ग्रीकाचे ऋण विसरून जातात? ट्रॉयच्या रणमैदानातून आपण परतलो ते, जे आपल्या मातृभूमीसाठी हुतात्मे झाले त्यांचा विसर पडून! त्यांची अवहेलना करून!...असे त्या हुतात्म्यांना वाटावे काय?"

तुझ्या मिठीतून तुझी लेक हिसडून घेण्यासाठी, हातातले हात ओढून काढून तिला घेऊन जाण्यासाडी ओडीसिअस लवकरच येथे येईल. म्हणून म्हणते, अशी पुढे ये! या वेदीसमोर गुडघे टेक. अॅगॅमेमनोनच्या चरणाशी शरणार्थी म्हणून नतमस्तक हो! स्वर्गातील देव-देवतांचा आणि अधोलोकातील स्वामींचा धावा कर. कुणी सांगावं! या प्रार्थनांमुळे तुझ्या-पासून तुझी लेक इतक्या क्रूरपणे हिसडली जाणार नाही. जर तसं केलं नाहीस तर तिच्या कुंवार, अश्राप गळ्यातून सोनेरी मोहनमाळेवर ठिपकणारे काळपट रक्त चमकते आहे अशी थडग्यासमोर पडलेली, रक्ताचा पाट वहावणारी आपली कन्या तुला पहावी लागेल.

**हेकॅबी :** केवढे हे अरिष्ट! हाय रे दुर्दैवा! आता बोलण्यासारखं काय उरलंय! कुठला आर्त उद्‌गार, कुठला हुंदका, मदतीला धावून येणार आहे या दुःखी जरठ हतभागिनी-साठी! असह्य गुलामगिरीत जखडलेली मी! कोण सहाय्य करणार आता मला? मला नाही अपत्य, नाही भूमी हक्काची, गेला माझा पती, गेले माझे सारे, सारे पुत, कोणता मार्ग

शिल्लक आहे मला मदतीसाठी ? कोणता देव, कोणती अस्मानी शक्ती धावून येणार आमच्या साहाय्याला ! हे बायांनो काय वार्ता घेऊन आलात ही ! कसली सांगितलीत ही बातमी ! काही...काही उरलं नाही माझ्या जीवनात आता ! चला, उठा ! म्हाताऱ्या असलात तरीही उठून उभं राहिलं पाहिजे तुम्हाला.

तिच्याकडे पाहायला हवं !

बाळ पोलायक्झेना ? ये ! बाळ, बाहेर ये. या तुझ्या दुर्दैवी मातेकडे ये. ऐक नीट मी काय तुला सांगते ते ! पोरी ! काय भयानक थरकाप उडविणारी बातमी आणलीय त्यांनी माझ्याकडे ! तुझ्या जीविताबद्दलची ग !

[ पोलायक्झेना प्रवेश करते ]

**पोलायक्झेना :** आई ! आई ग ! का अशी रडते आहेस ? कशाकरता एवढ्या मोठ्याने हाक मारलीस मला ? एखाद्या झुडपात विसावलेल्या पाखराला भिववून उठवून लावावं ना, तशी ओरडलीस बघ !

**हेकॅबी :** हाय ! माझ्या बाळे !

**पोलायक्झेना :** काय, झालंय तरी काय ? काही तरी भयंकर घडलेलं दिसतंय.

**हेकॅबी :** हाय ! बाळे ! तुझ्या जीविताबद्दलच ग ! तुझ्या प्राणाचा प्रश्न आहे हा.

**पोलायक्झेना :** बोल ! सरळ सरळ सांग आई ! काहीही लपवून ठेवू नकोस. तुझ्या आक्रोशातून सूचित होणाऱ्या अनर्थाची मला भीती वाटते ! फार घाबरले आहे ग मी.

**हेकॅबी :** हाय ! लाडक्या बाळे ! किती ग यातना भोगाव्या लागताहेत आपल्याला !

**पोलायक्झेना :** काय ? सांगणार आहेस तरी काय ?

**हेकॅबी :** पेलिअसच्या पुत्राच्या थडग्यासमोर तुला ठार मारायचा एकमुखी निर्णय घेतला ग्रीकांनी !

**पोलायझेना :** आ ऽ ऽ ई ऽ ऽ ! असं भयंकर बोलवतं तरी कसं तुला ? सरळ सरळ सगळं सांग ना मला ! आई ! सांग की ग सगळं काही !

**हेकॅबी :** तेच तर सांगते आहे ना ! जे दुष्ट सत्य मी ऐकले तेच सांगत्येय तुला. आर्गास या रहिवाशांनी तुझा प्राण घ्यायचा ठराव केलाय !

**पोलायक्झेना :** बिचारी माझी आई ! गरीब, दुःखी आई ! किती ग यातना सोसल्यास तू ! कुणा दुष्ट शक्तीने, भयानक, उच्चारूही नये असा हा केवढा दारुण आघात शोधून काढलाय तुझ्या मस्तकावर भिरकावण्यासाठी ? तुला आता यापुढे कन्याच असणार नाही. गुलामगिरीतील या आपदांत यापुढे मी तुझी सहकारी होऊ शकणार नाही. तुझ्या म्हातारपणी तुझी काळजी घ्यायलाही असणार नाही मी. डोंगरदऱ्यातलं एखादं बछडं त्याच्या मातेपासून हिसकावून घेतलं जावं, तसं तुझ्यापासून मला ओढून नेताना तुला पाहावे लागणार ! हेडीजच्या साम्राज्यात, खोल खोल काळोखात मी प्रवेश करीन आणि गळा कापलेल्या

अवस्थेत तिथे मृतांच्या सहवासात पडून राहीन.

तुझ्या दुःखाबद्दल, आई ! मी शोक करते आहे, धाय मोकलून रडते आहे. पण स्वतःच्या प्राणाबद्दल म्हणशील तर, जे जीवन आता केवळ शरमिंदे व कष्टमय झाले आहे, त्याबद्दल कशासाठी रडायचं ? मला रडूच येत नाही. मला मरणाला तोंड द्यायचं आहे आणि सध्याच्या स्थितीपेक्षा तेच अधिक सुखाचं !

[ ओडीसिअस येताना दिसतो. ]

**नारीवृन्द** : इकडे बघ हेकॅबी ! तो पाहा ओडीसिअस, तुझ्याशी बोलण्यासाठी घाईगर्दीने इकडेच येताना दिसतो आहे मला.

**ओडीसिअस** : बाईसाहेब ! मला वाटतं ग्रीक सेनेच्या सभेत मतदारांनी संमत केलेला निर्णय आपण जाणता ! तरीदेखील सांगायला हवं म्हणून मी सांगतो आहे. ॲकिलिसचे थडगे असलेल्या उंच टेकाडावर आपली कन्या पोलायक्झेना, हिचा बळी द्यायचा निर्णय त्यांनी घेतला आहे. या ठिकाणी येऊन तिला येथून तिकडे घेऊन जाण्यासाठी त्यांनी माझी नियुक्ती केलेली आहे. या बलिदानासाठी उपाध्याय आणि सर्व बाबतींत देखरेख करणारा म्हणून ॲकिलीसच्या पुत्राची निवड झालेली आहे. तेव्हा या संबंधात काय करायला हवं हे आपण जाणताच. तिच्यापासून आपल्याला जबरदस्तीने ओढून काढण्याची वेळ येऊ देऊ नका. तसेच आपली ताकद माझ्याशी अजमावून पाहू नका. आपल्यात आता काही सामर्थ्य उरले नाही, याची जाणीव असू द्या. आपली सद्दी संपली आहे. जेव्हा परिस्थिती पराकाष्टेची विपरीत होते, तेव्हा विवेकबुद्धीच्या कौलानुसार वागणे नेहमीच शहाणपणाचे ठरते.

**हेकॅबी** : खरोखर केवढा भीषण पेचप्रसंग उभा राहिला आहे माझ्यापुढे ? शोकार्त उद्गारांनी गदगदलेला आणि आसवांनी अंधारलेला ! माझा देह यापूर्वीच पडायला हवा होता. पण मी मेले नाही. प्रत्येक नवीन यातना, प्रत्येक अनर्थ, आणखी यातनामय व आणखी अनर्थकारी होत असलेला पाहाण्यासाठी झ्यूसने मला अजून जिवंत ठेवलंय, पण ज्यामुळे त्रास होणार नाही अथवा भावना दुखावणार नाहीत असे प्रश्न, स्वतंत्र व्यक्तीला जर एक गुलाम व्यक्ती विचारू शकत असेल तर, मेहेरबानी करून माझे ऐकून घ्या. आणि जेव्हा माझे विचारून होईल तेव्हा आपण काय बोलाल ते ऐकून घेणे, हे माझे कर्तव्यच ठरेल.

**ओडीसिअस** : जे काही विचारायचं असेल ते विचारायला आपण स्वतंत्र आहात. आपणासाठी वेळ खर्च करावा लागला तर मला त्याचे वैषम्य वाटणार नाही.

**हेकॅबी** : आपण एकदा ट्रॉयला आला होता, गुप्त हेर म्हणून. आठवतंय आपल्याला ? डोळे आणि चेहेरा, ठिकठिकाणी मार लागलेला, गलिच्छ, मलिन चिंध्यांचा वेष धारण केलेला, दाढीवरून रक्त ठिबकत होते ... अशा अवतारात !

**ओडीसिअस :** आलो होतो खरा! आठवतंय!

**हेकॅबी :** आणि हेलनने आपल्याला ओळखलं नि माझ्याशिवाय दुसऱ्या कुणालाही त्याबाबत सांगितलं नाही.

**ओडीसिअस :** होय, त्या दिवशीच्या त्या धोकादायक परिस्थितीचा माझ्यावर जाणवेल असा चांगलाच परिणाम झाला होता.

**हेकॅबी :** एखाद्या विनीत शरणार्थीसारखी आपण माझ्या गुडघ्याभोवती मिठी घातलीत!

**ओडीसिअस :** माझ्या हातांनी तुमच्या कपड्यांची अशी पकड घेतली होती, ते इतके लगडून राहिले होते की जणू काय त्यांचे मूळच तिथे रुजले होते!

**हेकॅबी :** त्या दिवशी आपण माझ्या ताब्यात होता–माझे गुलाम होता–तेव्हा मला उद्देशून काय म्हणाला होता आपण?

**ओडीसिअस :** माझे प्राण आपण वाचवावे म्हणून तेव्हा मी वीस युक्तिवाद शोधून काढले होते.

**हेकॅबी :** आणि मीच आपल्याला जीवदान दिलं. दिलं ना? आणि ट्रॉयहून आपली परत पाठवणी केली.

**ओडीसिअस :** खरोखरीच आपण तसं केलंत म्हणूनच मी आज येथे जिवंत खडा आहे

**हेकॅबी :** आणि आपण जिवंत राहिल्याचे श्रेय मला असल्याचे जे आपण आपल्या स्वतःच्याच तोंडाने कबूल करीत आहात तेच तुम्ही, आता मात्र आमच्याविरुद्ध अशी भेकडासारखी कपटकारस्थाने रचता आहात? तुम्हाला करता येईल इतक्या अधमतम पापकृत्याने तुम्ही सत्कृत्याची परतफेड करता आहात? काय म्हणावं तुम्हाला? तुमची जातच हलकी, नीच, तिरस्करणीय आहे. तुमच्या कुळीतल्यांचीच धडपड असते सवंग लोकप्रियता काबीज करण्याची. बाजारबुणग्यांना खूष करील अशा एखाद्याच वाक्यासाठी आपल्या मित्रांना बेफिकिरपणे दगा द्याल तुम्ही! अशांची ओळख नसलेलीच बरी. तुमचे ग्रीक बांधव! या बाळीच्या रक्ताचा अभिषेक करायला हवा, असा ठराव पसार करायला आपल्याला नेटकी सबब सापडली आहे असं त्यांना कदाचित वाटलं असेल! यासाठी खरे म्हणजे एखाद्या बलीवर्दाचं हवन जास्त योग्य. ते धुडकावून लावून या थडग्याला मानवी बळीच हवा, असे त्याला जास्त महत्त्व देण्याचे काय कारणाने ठरवले त्यांनी? ही काय त्यांच्या कार्यतत्परतेची जाण? का ॲकिलीसला त्याच्या प्राणाच्या मोबदल्यात मानवी प्राणच हवा होता? आणि बळी म्हणून याच मुलीची निवड करणे किती न्याय्य आहे पण!! माझ्या मुलीने असा काय त्याचा अपराध केला होता? आपल्या थडग्यासमोर द्यायचा बळी म्हणून खरोखरी त्याने हेलनची मागणी करायला हवी होती! तिनेच त्याचा प्राण घेतला होता. कारण तो ट्रॉयला आला होता तो तिच्याचसाठी. बळी म्हणून कैदी स्त्रियां-

मधूनच एखाद्या अप्रतिम लावण्यलतिकेची निवड तुम्हाला करायची असेल तर त्यासाठी आमच्यामधूनच का शोध करता? हेलन ही आम्हा सर्वांपेक्षा जास्त उठून दिसणारी सौंदर्यसम्राज्ञी, आणि तिनेच त्याचा नाश केला, नि तुम्हा सर्वांचाही. तुमच्या न्यायीपणाच्या खोट्या देखाव्याला हेच चपखल उत्तर आहे. पण आता ऐका, माझ्या प्रार्थनेला उत्तर म्हणून तुमच्या कृतज्ञताबुद्धीला काय करायला हवं, ते आपणच कबूल केलंत त्याप्रमाणे आपण माझा हात घट्ट धरलात, माझ्यापुढे गुडघे टेकलेत आणि माझ्या गालांना स्पर्श केलात. मी आता आपल्यापुढे गुडघे टेकते आहे नि आपल्या हातांना, गालांना स्पर्श करते आहे. त्यावेळी आपण जी याचना केलीत, तीच, आज मी पुन्हा करते आहे. मी आपल्याला कासावीस होऊन विनविते आहे की माझ्या बाळीला माझ्यापासून हिसकावून घेऊ नका. तिला ठार मारू नका. मृत्यूचे थैमान पुरे झालं आता! या मुलीतच आता माझा जीवनानंद आहे. तिच्या दर्शनाने मी माझी संकटे विसरून जाते आणि मी जे गमावलं आहे, त्या साऱ्याबद्दलचा दिलासा मला तिच्यामुळेच मिळतो. तीच आता माझी नगरी, तीच माझी परिचारिका, माझी म्हातारपणची काठी, माझी मार्गदर्शिका. जे न्याय्य नाही ते कार्यवाहीत आणण्यासाठी बलवन्तांनी आपली शक्ती वापरू नये, आज दैव त्यांना अनुकूल असले तरी तसे ते नेहमीच त्यांच्या बाजूने राहील या भ्रमात त्यांनी राहू नये. मी ही एकेकाळी नशिबवान होते पण आज आता तशी राहिलेली नाही. ते सुख, ती धनदौलत ते सारं एका दिवसात हिरावलं गेलं. म्हणून म्हणते, आता आपणच माझे सुहृद व्हा, हितकर्ते व्हा. नशिबाचा हा खेळ पाहून आपल्याला वाटणारी कातरता व अनुकंपा आपल्या अंतः-करणाला पाझर फोडू दे. ॲकिअन सैनिकांकडे जा. युक्तिवादाने त्यांची समजूत घाला आणि त्यांना पटवून द्या की ज्या बायकांना आपण त्यावेळी वेदीपासून ओढून काढताना ठार केले नाही तर उलट दया दाखविली, त्यांनाच जर आता आपण ठार मारले तर आपली केवढी छी थू होईल! तुमच्या राष्ट्राच्या कायद्यानुसार ठार मारणे म्हणजे ठार मारणे! त्या बाबतीत काही स्वतंत्र आणि गुलाम असा भेदभाव असू शकत नाही. बोला त्यांच्याशी. समाजातील तुमची प्रतिष्ठा मोठी असल्याकारणाने तुम्ही जरी गुळमुळीत विधाने केलीत तरी त्यामुळे त्यांचे मत बदलेल. ज्यांना जनता मानते त्यांच्या तोंडातून येणाऱ्या शब्दांचा दुप्पट प्रभाव पडतो.

**नारीवृन्द :** तुमची विनवणी आणि दयनीय असे दुःखोद्गार यांनी सद्गदित होणार नाही असे फत्तरासारखे कठीण मानवी काळीज असूच शकणार नाही.

**ओडीसिअस :** ऐक! हेकॅबी, ऐक आणि नीट समजावून घे. जो तुला हिताचा सल्ला देतो आहे त्यालाच क्रोधवश होऊन आपला शत्रू समजू नकोस. तू मला जीवदान दिलंस, मीही तुला जीवदान द्यायला तयार आहे. शब्द दिला समज. पण, 'आता आपण ट्रॉय जिंकून घेतले आहे; तेव्हा आपल्या सेनेतील प्रथम क्रमांकाचा वीर ॲकिलीस, आमच्याकडे

तुझ्या कन्येचा बळी मागतो आहे, त्याची मागणी मान्य करायलाच हवी,' असं जे मी जाहीर सभेत सांगितलं, त्यापासून मी परावृत्त होऊ शकत नाही. बहुतेक देशांतून हीच शोचनीय गोष्ट आढळून येते की, जे शूर आणि देशभक्त असतात, त्यांच्याही वाट्याला अंगचोर लोकांपेक्षा काही जास्त मान येत नाही. आम्ही ग्रीक, ज्याने हेलाससाठी आपल्या प्राणांचे बलिदान केले त्या ॲकिलीसला अन्य कुणापेक्षाही जास्त मान देतो. तो हयात होता तेव्हा आम्ही स्वतःला त्याचे स्नेही म्हणवून घेत होतो. आता तो मृत झाल्यावर जर आम्ही त्याचे स्नेही, हितकर्ते राहिलो नाही, तर त्यासारखी लाजिरवाणी गोष्ट कोणती ? आता असं समज की, पुन्हा एकदा सैन्याची जमवाजमव करून आम्हाला शत्रूशी लढायचं आहे. तर अशावेळी एखादा माणूस स्वतःलाच प्रश्न करील, ' जे युद्धात कामी येतात, त्यांचा खास गौरव केला जात नाही; असं असता सैन्यात भरती होऊन मी शत्रूशी दोन हात करू का घरीच आरामात राहून स्वतःला सुरक्षित ठेवू ? '

माझ्या स्वतःबद्दल विचारशील तर जोवर मी जिवंत आहे, तोवर दैनंदिन गरजा भागवायला लागेल इतकं अल्पस्वल्प मिळालं तरी मी खूष आहे. पण जेव्हा मी इहलोक सोडीन तेव्हा माझे थडगे असे असायला हवे की जनतेने त्याच्याकडे आदराने टक लावून बघत उभे राहावे. शाश्वत टिकणारी अशी हीच गौरवशाली देणगी – आणि हेकॅबी ! आपलीच अवस्था काय ती शोचनीय, अशी जर तुझी भावना असेल, तर मला सांगावंसं वाटतं की आमच्याही घरात अशा म्हाताऱ्या आणि म्हातारे आहेत की ज्यांचे दुःख तुझ्याहून जराही कमी नाही. ज्यांचे शूर जवान पती, येथे या ट्रॉयच्या मातीत पुरले गेले आहेत अशा गतधवा तरुणीही आहेत. हे सगळं तुला सहन करायलाच हवं. आता आमच्यापुरतं सांगायचं तर आमच्या या शूर सैनिकांचा गौरव आम्ही करणे हे कुणाला चुकीचं वाटत असेल तर त्याच्याकडून आमच्यावर केला जाणारा मूर्खत्वाचा आरोप स्वीकारायला आम्ही तयार आहोत आणि तुम्ही परदेशीय आपल्या हितचिंतक मित्रांनाच मित्रासारखी वागणूक न देण्याचे खुशाल चालू ठेवा, आणि ज्यांनी उदात्तपणे देह ठेवले त्यांचा अवमान करीत जा. म्हणजे मग आमचा हेलास, थोरपदाला चढेल आणि तुम्ही मात्र आपल्या कृतघ्नतेची फळे चाखत राहाल.

**नारीवृंद** : हाय ! हाय ! देव हो ! काय दयनीय अवस्था गुलामांची ही ! जेत्यांचा दुष्टपणा सहन करणं भाग पडतं त्यांना !

**हेकॅबी** : हाय ! माझ्या मुली ! तुझे प्राण वाचविण्यासाठी केलेल्या माझ्या सर्व विनवण्या व्यर्थ गेल्या. निष्फळ ठरल्या, वाऱ्यावर उधळल्या गेल्या. कुणी सांगावं ! कदाचित तुझे शब्द माझ्यापेक्षा अधिक प्रभावी ठरतील. बोल त्यांच्याशी. आपले प्राण परत मिळविण्यासाठी बुलबुलाचा सगळा गोडवा गळ्यांत आणून बोल. त्याचा कठोरपणा वितळून त्याला कणव येऊ दे. त्याच्या पायाशी लोळण घे. त्याच्या गुडघ्यांना मिठी घाल. त्यालाही मुलेबाळे आहेत, त्यांची याद दे त्याला. कदाचित त्याला तुझी अजूनही कीव येईल.

**पोलायकझेना :** ओडीसिअस ! आपला उजवा हात अंगरख्याखाली दडवीत आपण आपला चेहेरा त्याबाजूला वळवीत आहात; कदाचित मी आपल्या दाढीला स्पर्श करीन या भीतीने ! पण निश्चिंत राहा. आपल्याला पेचात टाकणारी कोणतीही विनंती माझ्याकडून होईल ही भीती बाळगू नका. मी आपल्याबरोबर येईन — कारण मला यायलाच पाहिजे हे खरंच, पण शिवाय मी येणार आहे, ती मरावं हीच माझी मनीषा आहे म्हणून. तसं मी केलं नसतं तर प्राणाला वाजवीपेक्षा फाजील किंमत देणारी भ्याड म्हणून मी बदनाम झाले असते. कारण माझ्या लेखी या जीवितात आता अर्थ तरी काय आहे ? माझा जन्म झाला तेव्हा माझे वडील संपूर्ण फ्रीजियावर सत्ता गाजवीत होते. भावी काळातील भव्य, तेजस्वी सुख-स्वप्ने पाहाण्यात गुरफटून गेलेली मी, एखाद्या राजकुमाराची पत्नी व्हावे, अशा अपेक्षेने व पद्धतीने जोपासली जात होते. परस्परांशी स्पर्धा असलेले सिंहासनाधिष्ठित, राजप्रासादाचे स्वामी, मीं कुणाचे राज्ञीपद स्वीकारावे यासाठी आपापसांत झगडत होते. ट्रॉय नगरीतल्या पुरंध्री, आपली स्वामिनी म्हणून माझ्याकडे माथा नमवीत होत्या. तरुण मुली माझ्याकडे असूयेने पाहात असत. ' मी मर्त्य मानव आहे ! ही उणीव वगळली तर सर्व दृष्टींनी मी देवताच ठरले होते. आता मात्र मी गुलाम आहे. गुलामीचे हे नामाभिधानच, मला अगदी अपरिचित असल्याने मृत्यूबद्दलची माझी जवळीक वाढवीत आहे. या परिस्थितीत योगायोग मला कदाचित अशा एखाद्या कठोर वृत्तीच्या धन्याच्या हवाली करील की, माझ्याबद्दलचे पैसे मोजलेले असल्याने तो मला आपल्या पाकगृहांत पाठवून तिथले काम करायला लावील. हेक्टरची आणि राजघराण्यात जन्म घेतलेल्या अनेकांची मी भगिनी – त्या मला भाकरी भाजावी लागेल, घरातले केरवारे करावे लागतील, वस्त्र विणीत मागापाशी उभं राहावं लागेल. एका पाठोपाठ एक असे हृदयाला झोंबणारे दारुण दिवस कंठावे लागतील. ज्या माझ्या शय्यासोबतीच्या सुखासाठी एके काळी राजांनी प्रार्थना केल्या होत्या त्या सुखावर एखादा विकत घेतलेला गुलामही उद्या आपला हक्क सांगेल. नाही ! तसे मी कधीही होऊ देणार नाही. दिवसाच्या या स्वच्छ सूर्यप्रकाशाला मी माझ्या अद्यापि स्वतंत्र असलेल्या अशा डोळ्यांतून कायमचा निरोप देईन. माझ्या देहाचा ताबा हेडीजलाच घेता येईल. व्हा ! असे पुढे व्हा ! ओडीसिअस ! माझ्या मृत्यूच्या कामगिरीतली आपली भूमिका पार पाडा. भवितव्यता मला स्वच्छ, स्पष्ट दिसते आहे. या पुढील आयुष्य सुखमय आहे असे आश्वासन, इच्छा वा कल्पनाशक्ती अजिबात देऊ शकत नाही. आई ! तू काहीही बोलू नकोस. मला थांबवून धरण्यासाठी काहीही करू नकोस. शत्रूकडून बेअदबी होण्यापूर्वी – कारण ती वाट्याला यावी असे आपण काहीही केलेले नाही— मी बळीच गेले पाहिजे. यासाठी आपली संमती दे. दुर्दशेचा अनुभव घेण्याची ज्याला पूर्वी कधी वेळच आलेली नसते तो ती सहन करतो. पण त्याची मान त्या जोखडाखाली अडकली की त्याला यातना होतात. अशा माणसाला जगत राहाण्यापेक्षा मृत्यूतच अधिक समाधान वाटतं. अपमानाने लडबडलेल्या अशा जीवनात

कडवट, जहरी क्षणाशिवाय दुसरं काय असणार !

**नारीवृन्द :** राजवंशात जन्म मिळणं हा एक निरपवाद चमत्कारच म्हणावा लागेल. आणि जेव्हा हे उच्चकुलीन, आपली उदात्तता आचरणातही प्रगट करतात तेव्हा तर हा चमत्कार आणखीच कौतुकास्पद वाटू लागतो.

**हेकॅबी :** माझ्या बाळे ! फार धीरोदात्त वक्तव्य केलंस तू. पण या उदात्त वक्तव्याचे मोल फार भीषण आहे ग ! ( ओडीसिअसला उद्देशून ) जर ॲकिलीस संतुष्टच व्हायला हवा असेल आणि जर तुम्हा ग्रीकांवर ठपका यायला नको असेल, तर मलाच घेऊन चला त्याच्या थडग्यासमोर ! ठार करा मला ! कशासाठी हवाय हा संदेह ? माझ्या मुलीला ठार मारू नका. ज्याने आपल्या धनुष्याने ॲकिलीसवर बाण फेकून त्याचा मृत्यू घडवून आणला, त्या पॅरिसला मीच जन्म दिला होता !

**ओडीसिअस :** ॲकिलीसने मागणी केलीय ती आपल्या लेकीची ! आपली नव्हे !

**हेकॅबी :** मग तिच्याबरोबर मलाही ठार मारा, म्हणजे ही भूदेवता आणि रुधिराभिषेकावरच हक्क सांगणारा तो मृतात्मा – दोघांनाही दुप्पट घुटके घेता येतील.

**ओडीसिअस :** हा एक बळीही द्यावा लागला नसता तरी बरं झालं असतं ! आणखी एक बळी वाढवणं गैरच ठरेल. शिवाय तुझ्या मुलीचा एक बळी पुरेसा होणार असताना तर दुसरा देण अगदीच गैर.

**हेकॅबी :** मला मरायला हवं. तिच्याबरोबरच मरेन मी.

**ओडीसिअस :** असं ! मला कल्पना नव्हती की मला तुमच्या इच्छांची अंमलबजावणी करावी लागेल !

**हेकॅबी :** ओकवृक्षाला आयव्ही लता बिलगते तशी तिला घट्ट बिलगून राहीन मी.

**ओडीसिअस :** तुमच्यापेक्षा जास्त जाणत्या माणसाचा सल्ला मानलात तर तुम्ही असं काही करणार नाही.

**हेकॅबी :** मी तिला कधीही दूर जाऊ देणार नाही.

**ओडीसिअस :** आणि तिला इथेच सोडून मीही कधी माघारी जाणार नाही याबद्दल खात्री बाळगा.

**पोलायक्झेना :** आई ! मला जरा आता तुझी समजूत घालू दे. महाशय जरा सबुरीने घ्या ! माझी आई जे कळवळून सांगते आहे त्याला तशीच सयुक्तिक कारणे आहेत, नाही का ? प्रिय आई, बळजबरी करण्याची ताकद त्यांच्या बाजूला आहे. तिच्याशी सामना देऊ नकोस. एका तरुण माणसाकडून तुझ्या वृद्धत्वाचा अपमान व्हावा, तू सपशेल खाली पडून फरफटत ओढली जावीस, जायबंदी होऊन ओढाताण होत धक्के खात ढकलली जावीस – असं व्हायला हवं का तुला ? तसंच वागवील तुला तो, म्हणून म्हणते, झगडू नकोस. तुला शोभून दिसणार नाही ते. लाडके आई, तुझा प्रिय हात माझ्या हातात दे. तुझा गाल,

माझ्या गालाला अगदी जवळून भिडव. असा पूर्ण वर्तुळाकार, असा देदीप्यमान तेजस्वी रविराज मी पुन्हा पाहू शकेन अशी हीच अखेरची वेळ. माझ्या लाडक्या माते, हाच तुला माझा निरोपाचा अखेरचा प्रणाम. निघाले मी आता काळ्याकुट्ट तिमिराकडे.

**हेकॅबी** : आणि बाळ या तळपत्या सूर्यप्रकाशात मी इथे जगणार आहे, ती मात्र गुलाम म्हणून.

**पोलायक्झेना** : विवाह-मंगलाष्टके गायिली गेली नाहीत, वल्लभाचे प्रणयी कूजन नाही. कसल्याच इच्छा-आकांक्षांची परिपूर्ती झाली नाही ...

**हेकॅबी** ; गरीब अश्राप मुली! किती शोचनीय आहे ग हे सगळं! आणि मी...केवढे दुःखभोग आले माझ्या नशिबी!

**पोलायक्झेना** : तुझ्यापासून ताटातूट होणार आता माझी! मी असणार माझ्या थडग्यात चिरनिद्रा घेत!

**हेकॅबी** : हाय! देवांनो! करू तरी काय मी? माझ्या जीविताची अखेरी तरी कशी होणार आहे?

**पोलायक्झेना** : स्वतंत्र पित्याची, स्वातंत्र्यात जन्म घेतलेली स्वतंत्र मी – मरणार मात्र! गुलाम म्हणून!

**हेकॅबी** : आणि माझी सर्व लेकरं! सगळी हिरावून घेतली ग माझ्यापासून!

**पोलाक्झेना** : हेक्टर आणि प्रायमपिताजी, यांना तुझा असा कोणता निरोप सांगू?

**हेकॅबी** : सांग त्यांना! म्हणावं सर्व स्त्रियांमध्ये सर्वांत हतभागी, दुःखी स्त्री म्हणजे मी.

**पोलायक्झेना** : छातीशी धर मला. याच प्रिय छातीने एकेकाळी मला आधार दिला माझे पोषण केले.

**हेकॅबी** : प्रिय बाळे! तारुण्याच्या नव्हाळीत मरायचं...नियती देवतांनीच तुला ही शिक्षा दिली का ग?

**पोलायक्झेना** : येते हं आई! कॅसान्ड्राचा पण निरोप घे माझ्यावतीने– सुखी रहा सारी!

**हेकॅबी** : बाकी सारी 'सुखी' आहेतच, पण या निरोप घेण्याच्या शब्दात माझ्यापुरता तरी काहीच अर्थ नाही.

**पोलायक्झेना** : माझा भाऊ पॉलिडोरस – त्यालाही माझा "सुखी राहा" असा निरोप दे. किती दूर आहे तो तिकडे थ्रेस मध्ये

**हेकॅबी** : तो अजून जिवंत असला तर! निदान एवढा तरी सुखाचा धागा शिल्लक राहील का माझ्यासाठी?

**पोलायक्झेना** : तो नक्कीच जीवंत आहे आई. आणि तू जेव्हा शेवटचा श्वास सोडशील तेव्हा तुझे डोळे, तो आपल्या हाताने झाकील.

**हेकॅबी** : दुःख आणि आपदा, यांनी माझा निकाल लावून टाकलाय. जवळजवळ

मृतातच जमा आहे मी आता !

**पोलायक्झेना :** चला, घेऊन चला मला ओडीसिअस ! माझा हा पायघोळ झगा लपेटा माझ्या मस्तकावरून. मृत्यू तर माझ्यासमोर उभा आहेच. पण मध्यंतरी माझ्या आईची आसवं माझ्या अंतःकरणाचे पाणीपाणी करून टाकीत आहेत आणि माझी आसवे पाहून तिचे काळीज द्रवते आहे. हे देदीप्यमान प्रकाशज्योती ! हे शब्द मी अजूनही उच्चारू शकते आहे. पण आता माझ्या वाट्याला येणारा प्रकाश म्हणजे हा चालू क्षण आणि ॲकिलीसच्या थडग्याजवळची समशेर यांच्यामध्ये काय सामावेल तेवढाच.

(ओडीसिअस आणि पोलायक्झेना दोघेही जातात.)

**हेकॅबी :** सावरा मला कुणीतरी. मूर्च्छा येते आहे मला. माझी सर्व शक्ती मला सोडून गेली आहे. बाळे लांब कर तुझा हात ! आणि स्पर्श कर मला. कुठाय ग तुझा हात. जाऊ नकोस ना ! पोलायक्झेना ! माझ्या एकुलत्या एक मुली ! नको ग सोडून जाऊस मला या वेळी !

(हेकॅबी मूर्च्छा येऊन जमिनीवर पडते)

**नारीवृन्द**

वाऱ्यांनो, सागरीवाऱ्यांनो !
जलदीने नेता तुम्ही दर्यावर्दी गलबतें
सतत खळखळणाऱ्या लाटांच्या उभारीवरून
कोणत्या ठिकाणावर नेऊन सोडाल मला ?
घेतला आहे ज्याने माझा नवथर ताबा
अशा कुणाच्या वास्तूत प्रवेश करू मी !
पेलोपोनीजच्या एखाद्या बंदर गांवात
जाऊन पोचेन का मी ?
स्फटिकासम स्वच्छ जलाच्या स्वामीने
ॲपिडेनसने सुपीक केली आहे म्हणतात जेथील शेतजमीन
त्या थेसॅली प्रदेशात जाईन का मी ?
की बेटाबेटातून, सागराच्या
खारट जलमार्गावरून
प्रवास करीत असताना आमची गलबते;
आढळेल का मला, आमचे ते
दुःखी कष्टी घर ?
जिथे रोवला होता पहिला तालवृक्ष
आणि ‘लेटो’ला आपल्या प्रसूतिवेदनासमयी

निवारा मिळावा—
झ्यूसच्या अपत्यांचा जन्मकाल शोभायमान रहावा,—
म्हणून जिथे पहिल्या लॉरेल वृक्षाने
आपल्या पवित्र फांद्या पसरल्या होत्या तिथे ?
आपल्या धनुष्याने सुसज्ज आणि
सुवर्णाचे भूषण भालप्रदेशावर धारण केलेल्या
अशा आर्टिमीस देवतेची स्तवने गाणाऱ्या
डेलॉस कन्यकांत सामील होईन का मी !
कदाचित जाईन मी वास्तव्य करायला
अथीनीच्या शहरात
आणि तिथे पॅलसच्या केशरी झग्यावर
पुष्पाकृती झगमगीत धागे विणीत
तिच्या देदीप्यमान रथाला अश्व जुंपीत.
अथवा ज्यांचा उपशम झाला क्रोनोसपुत्र झ्यूसने
पाठविलेल्या विद्युल्लोळात,
अशा उन्मत्त टायटन दानवांच्या वंशांची
चित्रे गुंफीन
अरे माझ्या बछड्यांनो ! माझ्या लहानग्यांनो !
माझा अभागी पिता ! माझा देश !
प्रत्येक वास्तू धुमसणाऱ्या आगीने उद्ध्वस्त !
प्रत्येक जीव, कैदी—
सर्व आरगॉसच्या माणसांसाठी युद्धातली लूट !
आणि गुलामीचे नामाभिधान बाळगणारी मी—
परदेशात असलेली—
आशियापासून उखडली जाऊन खूप दूर अशा
युरपमधील वास्तूत रुजणार असलेली—
जिवंतपणीच हेडीजमधील मृतांचे जीवन कंठणार आहे.

(टाल्‌थीबिअस प्रवेश करतो. त्याच वेळी एक ट्रॉयवासी वृद्ध दासी तंबूतून येते व हेकॅबीकडे जाते)

**टालथीबिअस :** हे तरुण स्त्रियांनो, ट्रॉयची भूतपूर्व राणी मला कुठे बरं भेटू शकेल ?

**नारीवृन्द :** टाल्‌थीबिअस ! ही काय तुझ्या शेजारीच जमिनीवर पडली आहे ! तिच्या वस्त्रांनी तिचा चेहरा झाकून टाकला आहे.

**टालथीबिअस :** हे देवा झ्यूस ! काय आहे तरी काय सत्य ? पाहातो आहेस ना तू मानवांचे जीवित ? का देवावर असलेली आमची सर्व श्रद्धा म्हणजे एक थोतांड आहे ? मूर्खपणाने उरी जपलेलं एक असत्य ? का केवळ एक आंधळा योगायोग सर्वांवर सत्ता गाजवतो आहे ? हीच का ती हेकॅबी ? सुवर्णनगरी फ्रिजियाची राणी ? संपत्ती आणि सत्ता यासाठी महशूर असलेल्या प्रायमची हीच होती का सहचारिणी ? आता कुठल्या अवस्थेला येऊन पोचलं आहे ट्रॉय ? युद्धात जिंकलं गेलेलं – संपूर्ण विनाश पावलेलं · आणि ही वयातीत, अपत्यहीन, गुलामगिरी प्राप्त झालेली स्त्री, इथे जमिनीवर पडली आहे ! आपले गलित, दयनीय मस्तक धुळीने माखून घेऊन ! हं ऽ ऽ ! ठीक, ठीक ! मी ही वय झालेला म्हातारा माणूसच. पण अशा अवस्थेस पोचण्यापेक्षा मरण यावं अशी मी प्रार्थना करीन. हेकॅबी, ऊठ, उभी राहा बरं आता ! पिकल्या केसांनी झाकलेलं आपलं मस्तक जमिनीवरून वर उचल.

**हेकॅबी :**

कोण आहे हा !
माझं शरीर इथे निवान्त पडलंय
ते ही न पाहवणारा ?
फार मोठ्या दुःखात आहे मी !
कशाकरिता मला डिवचतो आहेस ?
कोण ? कोण आहेस तू ?

**टालथीबिअस :** मी टाल्थीबिअस ! ग्रीक सेनेचा अग्रदूत बाईसाहेब ! ॲगॅमेमनोनने मला पाठवलंय. आपल्याला नेण्यासाठी आलोय मी !

**हेकॅबी :** मित्रा ! ग्रीकांनी मलाही बळी द्यायचा ठराव केला आहे काय ? मला वेदीकडे घेऊन जाण्यासाठी का आला आहेस ? स्वागत असो तुझे. आता बिलकूल वेळ दवडावयाचा नाही. टाल्थीबिअस, मला वाट दाखव.

**टालथीबिअस :** हेकॅबी ! आपली कन्या निजधामास गेली. ॲट्रिअसचे दोन पुत्र आणि ग्रीक सेना यांच्या हुकुमावरून तुझ्या कन्येचे अंत्यसंस्कार करण्यासाठी तुला घेऊन जायला आलोय मी.

**हेकॅबी :** मला वाटलं होतं, मला ठार मारण्यासाठी म्हणून तिकडे घेऊन जाण्यासाठी आलायस तू ! त्याऐवजी हे सांगतो आहेस मला ? बाळे ग ! तुला त्यांनी आपल्या जन्मदात्रीपासून ओढून नेलं आणि तुला ठार मारलं नि एकटी मीच मागे राहिलेय तुझ्यासाठी आसवं ढाळायला ! कशी रे ठार मारलीत तिला तुम्ही ? नीट सन्मानाने तरी ठार केलीत का ? का, वध्यजीव ही तुमची दुष्मन असल्यामुळे कुठलाही क्रूर भयानक प्रकार करायचा शिल्लक ठेवला नाहीत ? सांग ! सगळं सगळं सांग ! ते सगळं ऐकण्याइतकी सहनशक्ती आहे मला !

**टालथीबिअस :** आपल्या कन्येबद्दल वाटणाऱ्या अनुकंपेमुळे मला दुप्पट आसवं ढाळायला सांगता आहात बाईसाहेब आपण! ती जेव्हा आपल्याला मुकली, तेव्हा एकदा रडलो मी, नि आता ते सर्व सांगताना पुन्हा एकदा रडायला येणार मला!

तिथे ॲकिलीसच्या थडग्यापुढे बलिदानाचा हा प्रसंग पाहाण्यासाठी ॲकिअन सैन्याचा सगळा समुदायच उभा ठाकला होता. पोलायक्झेनाच्या हाताला धरून ॲकिलीसच्या पुत्राने तिला उंचवट्याच्या शिखरापर्यंत नेले. मी शेजारीच उभा होतो. जर तिने सुटून जाण्यासाठी धडपड केली, तर तिला पकडता यावी या तयारीने आमच्याच पाठीमागे ॲकिअन तरुणांचा निवडक गट खडा होता. ॲकिलीसच्या पिशाच्चाला अर्घ्य देण्यासाठी मदिरेने काठोकाठ भरलेला सोन्याचा एक प्याला, तिथे ठेवला होता. त्याच्या पुत्राने तो प्याला उंच उचलला नि जमलेल्या सर्व सैन्याला स्तब्ध राहाण्यासाठी मला हुकूम करायला सांगितलं—मी उठून उभा राहिलो आणि उच्चस्वराने म्हणालो, ' ॲकिअन्सहो, शांत राहा! सबंध सेनेतून एकही शब्द वा आवाज ऐकू येता कामा नये. "

त्यांना गप्प करून मी त्यांना निश्चल उभं राहायला लावलं. मग तो ( ॲकिलीसचा पुत्र ) भाषण करता झाला. तो म्हणाला, ' माझ्या पित्या! पेलेअसच्या पुत्रा! हे जग सोडून अधोलोकात गेलेल्या मृतात्म्यांना आवाहन करणारे, हे दिलासा देणारे मद्य! आपण माझ्या हातून याचा स्वीकार करा! मग तसेच या आणि मी व ही सर्व सेना आपणास समर्पित करीत असलेले या कुमारिकेचे हे निष्कलंक काळेशार रक्त स्वीकारा! आणि आपल्या कृपाकटाक्षाचा लाभ आम्हाला मिळू द्या. आम्हास वरदान द्या, की नांगरापासून सोडविलेली आमची गलबते, उत्कृष्टपणे प्रवास करून आपल्या देशाला सुखरूप पोचतील. "

अशा शब्दांत होती त्याची ती प्रार्थना! सर्वांनीच त्याच्याबरोबर प्रार्थना केली. मग आपल्या समशेरीची सोनेरी मूठ त्याने घट्ट पकडली. म्यानातून ती बाहेर काढली व त्याकामासाठी आधीच नियुक्त केलेल्या तरुणांना तिला पकडून ठेवण्यास खुणावले. पोलायक्झेनाने हे सर्व बघितलं नि ती जे बोलली ते असं, " ज्यांनी माझ्या नगरीची धूळदाण केली त्या ग्रीकांनो! मी स्वखुषीने मरायला तयार आहे. माझ्या अंगाला कुणीही हाताने स्पर्श करू नये. माझी मान न डगमगता मी समशेरीखाली देईन. म्हणून देवाची शपथ, मला मोकळी उभी राहू द्या आणि मग मला ठार मारा. म्हणजे स्वतंत्रपणे, मी स्वतंत्र म्हणून मरून जाईन. मी राजघराण्यातील असल्याने माझी गणना, मृतात गुलाम म्हणून झाली तर त्यात मला कमीपणा वाटेल. "

त्यावर सर्व सैन्याने मोठ्याने गर्जना करून आपली मान्यता दर्शविली ॲगमेमनोनने त्या तरुणांना तिला मोकळे सोडण्यास सांगितले. तिने ते ऐकले आणि लगेच आपल्या झग्याला हात घातला. खांद्यावरील बंधापासून कमरेपर्यंत तिने तो फाडून काढला. आणि एखाद्या अत्यंत रमणीय पुतळ्यासारखी असलेली नाभीपर्यंतची आपली गोंडस काया आणि आपले

उरोज अनावृत्त केले. मग एका गुडघ्यावर टेकून ती खाली बसली नि आत्यंतिक वीरतेचे असे शब्द बोलली. ती म्हणाली, ' ॲकिलीसच्या पुत्रा ! ही आहे इथे माझी छाती ! तुला जर या इथेच घाव घालायची इच्छा असेल तर घाल घाव ! किंवा कंठावर घाव घालायचा असेल तर ही माझी मान तयार आहे इथे. मात्र नीट मर्मावर सरळ घाव घाल." मग अनुकंपा आणि दृढनिश्चय यांच्या पकडीत सापडलेल्या त्या मुलाने आपल्या समशेरीने तिच्या श्वासनलिकेतून सरळ छेद घेतला. रुधिराचा फवारा वर उसळला आणि मरता मरता-सुद्धा खाली पडताना तिने अशी खबरदारी घेतली होती की, पुरुषाच्या नजरेस येऊ नये असा शरीराचा भाग उघडा पडू नये.

भग जेव्हा जीवघेण्या घावाने तिचा अखेरचा श्वास बंद केला, तेव्हा प्रत्येक आर्गाइवने तिचा सन्मान करण्यासाठी स्वतःचा असा मार्ग शोधून काढला. काहींनी तिच्या देहावर ताजी पानं विखरून टाकली. कांहींनी फांद्या आणून चिता तयार केली आणि जे नुसतेच हात हलवीत उभे होते त्यांना बाकीच्यांचे अपशब्द ऐकावे लागले. ते सगळे ओरडले, ' पोलायुकझेनासाठी तुम्ही काहीच आणलं नाहीत, याचा अर्थ तरी काय ? तिच्या सन्मानार्थ वहाण्यासाठी तुमच्याजवळ काय वस्तू नाही की अलंकार नाहीत ! सर्वांत धैर्यशील आणि उदार अंतःकरण होतं तिचं !

तर असा हा सारा प्रकार आपली कन्या परलोकी गेली त्याचा. सर्व स्त्रियांत अतिउदात्त अशी अपत्ये आपलीच. त्याचबरोबर सर्व स्त्रियांत अत्यंत खडतर असं नशीबही आपलंच.

**नारीवृन्द :** प्रायमचे घराणे आणि ट्रॉय, यांना काय भयंकर यातनांनी गुदमरून टाकले आहे ! पण देवांनीच त्यांच्या नशिबी लिहिल्या आहेत या यातना. त्यातून सुटका नाही.

**हेक्बी :** माझी बाळ ! इतकी संकटे उभी आहेत इथे ! दुःख तरी कशाकशाचे करायचे ! एका दुःखाकडे लक्ष पुरवीन म्हणेन, तर दुसरे दुःख, मला तसे करू देत नाही. आणि त्या दुसऱ्या दुःखापासून मनाला ओढून काढायला तिसरे दुःख पुढे उभेच असते. सारखे दुःखामागोमाग दुःख, आणि आता तुझ्या भीषण शेवटाच्या वेदना माझे मन व्यापून टाकीत आहेत. तुझ्या मृत्यूबद्दल आसवे ढाळणे जरी अटळ असले तरी अत्यंत यातनामय काळजाला डागण्या देणाऱ्या वेदनांपासून तू मला वाचवलं आहेस. कारण, ' तू अत्यंत धीरोदात्तपणे मरण स्वीकारलेस ', असं सगळीच सांगतात.

काय चमत्कार आहे ! देवांनी योग्य वेळी पर्जन्यवृष्टी करून जर आवश्यक तो सूर्यप्रकाश पुरवला तर नापीक भूमीही सस्यश्यामल होते; नि सुपीक जमीन आवश्यक त्या गोष्टीपासून वंचित राहिली तर वांझ बनते. पण मानवी स्वभाव मात्र अंतरंगात असा अविचल आहे की वाईट माणूस हा नेहमी वाईटच राहातो. त्याच्यात बदल होऊन तो अन्य प्रकारचा होऊ शकत नाही आणि एखादा माणूस भला, म्हणजे तो नेहमी भलाच असतो. त्याचा भलेपणा

दुर्दैवाच्या आघाताने विकृत होऊच शकत नाही. त्याचा मोठेपणा सदैव, शाश्वत टिकणारा असतो.

का पडावा हा फरक ? याला जबाबदार आनुवंशिकता का वय वाढताना झालेले संस्कार ? सुसंस्कारपरिपूर्ण वातावरणात बालक जर जोपासले गेले तर त्याला निदान सत्‌तत्त्वाची जाण येते आणि सत्‌तत्त्वाच्या तुलनेने असत् काय, हे त्याला उमजू शकते. ओः ! असं हे विचारमंथन मनात इतस्ततः चालू राहाते ! पण काय उपयोग त्याचा ? टालथीबिअस माझ्या वतीने ग्रीकांना असं सांग की, माझ्या बाळीला कुणाच्याही हाताचा स्पर्श होऊ देऊ नका, सगळ्या, सगळ्यांना दूर ठेवा तिच्या मृतदेहापासून. सैनिक आणि खलाशी ही शिस्त नसलेली दांडगी जात आणि ते जमावाने असले म्हणजे तर भडकलेल्या आगी पेक्षाही रानटी. त्यापैकी एखादा कुणी सौजन्याने वागू लागला तर त्याच्या नशिबी शिव्याशापच यायचे.

[ टाल्थीबिअस जातो. हेकॅबी आपल्या वृद्ध दासीकडे पाहाते आणि तिला म्हणते ]

**हेकॅबी** : म्हातारबाई ! नीट ऐकून घे काय सांगते ते. एक घट घेऊन खाली समुद्रा-काठी जा. तिथल्या ताज्या खाऱ्या पाण्याने तो भरून घे आणि इकडे आण; माझ्या बाळीच्या मृतदेहाला अखेरचे स्नान घालायला, तिचे छिन्नभिन्न अवयव नीट जुळवायला गेलं पाहिजे मला. एका विवाहित कुमारिकेला, एका अविवाहित वधूला अखेरची मानवंदना द्यायला हवी. तिच्या प्रतिष्ठेप्रमाणे हे सगळं करायला माझ्याजवळ ना धन ना सत्ता; तरीही जे शक्य होईल ते मी करणार आहे तिला अलंकृत करायला हवं. त्यासाठी माझ्याबरोबर कैदी झालेल्या स्त्रियांना मी विचारणार आहे की, आपल्या नव्या मालकांची नजर चुकवून घरून आणलेले काही दागदागिने त्यांनी जवळ ठेवले आहेत की काय ? असतील तर ते सर्व, पोलायक्झेनाच्या अंतिम सन्मानासाठी त्यांनी द्यावेत, म्हणून सांगेन मी त्यांना.

हाय ! आमचा तो भव्य शाही राजप्रासाद, ते एकेकाळचे सुखी घर, अगणित संपत्ती-साठी ख्यातनाम असलेला राजा प्रायम; साऱ्या पृथ्वीवर ज्यांना जोड नाही अशा मुलांचा पिता म्हणून त्याचे नाव गाजत होते आणि माझेही - त्यांच्या वृद्ध मातेचे.

कसं सगळं, सगळं नाहीसं झालं – शून्यात मिळून गेलं ! त्या जुन्या गौरवाची वस्त्रे, आमच्या नावावरून गळून पडली आणि तरीही आम्ही माणसं – आम्ही क्षुद्र मानव गर्वाने फुगून जातो. एकाद्याला आपल्या संपत्तीचा आणि घरातल्या वैभवाचा ताठा असतो, दुसरा कुणी नागरिक त्याला 'भला रे भला' म्हणून मोठेपणा देतात, म्हणून चढून गेलेला असतो. या अशा गोष्टींना काहीही अर्थ नसतो. काळजीपूर्वक रचलेले व्यूह, घमेंडखोरांच्या वक्तृत्वपूर्ण दर्पोक्ती, सर्व निरर्थक ! जो माणूस संकटांना, आपत्तींना बगल देऊन दिवसामागे दिवस असे आयुष्य व्यतीत करीत असतो तोच खरा सर्वसुखी म्हणायचा.

[ हेकॅबी आत जाते ]

**नारीवृन्द :**

गुलामी लिहिलेलीच होती माझ्या अदृष्टांत,
ज्या दिवशी ट्रॉयचा राजपुत्र पॅरिस,
याने सोनेरी सूर्यकिरणांत,
आजपर्यंत चमकली नसेल अशा अद्वितीय
लावण्यमयी स्त्रीची – हेलनची –
शय्यासोबत मिळावी म्हणून
ग्रीसच्या जलप्रवासासाठी गलबत बांधण्यासाठी
इडापर्वतावरील देवदार वृक्षराजीतील
लाकूड तोडून नेले,
त्याच दिवशी ठरला अटळ,
माझ्या आयुष्याचा सत्यानाश,
आता आहेत दुःख आणि कठोर जुलूम जबरदस्ती
आमच्याभोवती अभेद्य कडे करून

सिमॉइस नदीच्या सलिलावर
तृषा शमविणारे एक संपूर्ण राष्ट्र,
एका माणसाच्या मूर्खपणामुळे
परराष्ट्राच्या हल्ल्याने नष्ट झाले,
पार जमीनदोस्त झाले.

जेव्हा तीन अमरदेवतांच्या कलहातील निर्णय
इडा पर्वतावर दिला गेला
तेव्हा त्या तिघींतील भांडण
एका मेंढपाळाने सोडवले
त्याच निर्णयात्मक उत्तराने संगर अटळ होऊन
विनाश ओढवला
व माझ्या घरादाराचे वाटोळे झाले
आणि या इथेच नव्हे, तर
स्वच्छ जलाने परिपूर्ण अशा
युरोटास नदीच्या काठावरील आपल्या वरकुलात
एखादी स्पार्टातील गृहिणी,
आसवे ढाळीत, हुंदके देत
दुःखात चूर होऊन बसलेली असेल

आणि
केसांचे वाख झालेली एखादी वृद्ध माता,
आपल्या मृत पुत्राबद्दल
दुःखाने आपले मस्तक पिटीत असेल;
आणि नखे रक्ताळली जाईपर्यंत गाल ओरबाडून घेत असेल.

( समुद्रावरून पाणी आणायला पाठविलेली वृद्ध दासी परत येते. तिच्यामागे आच्छादून आणलेले मृत शरीर घेतलेल्या काही दासी आहेत )

**वृद्ध दासी :** बायांनो ! कुठे आहे हेकॅबी ! दुर्दैवी दुःखी हेकॅबी ! जन्माला आलेल्या कुणाही अन्य पुरुषाने वा स्त्रीने असं दुःख भोगलं नसेल ! त्याबाबत तिने कळस गाठला आहे ! कुणीच तिची बरोबरी करू शकणार नाही.

**नारीवृन्द :** आता काय आणखी ? तुझी ही अभद्रसूचक वडबड काय आपदा घेऊन आलीय ? दुष्ट वार्तांना कधी विसावाच घेता येत नाही की काय ? आणखी भर घालणार आहेस की काय तू त्यात ?

**वृद्धा :** माझी दुर्वार्ता हेकॅबीसाठीच आहे. साऱ्या बाजूंनी संकटानी, वेढा घातलेला असताना, दुर्दैवाची ग्वाही देणारे शब्द टाळणे, सांगणाराला अवघड होऊन बसते.

**नारीवृन्द :** ती पाहा हेकॅबीच बाहेर येते आहे. सांग तिला तुझी बातमी.

**वृद्धा :** हेकॅबी ! आधीच केवढे दुःख सहन करते आहेस तू ! आणि त्यात अगदी शेवटचे नि सर्वांत वाईट घडलंय ते हे ! काही .... काही राहिलेलं नाही तुझं आता ! मुलं, नवरा, नगरी, प्रकाश आणि जीवित – सगळंच हरवून बसली आहेस तू.

**हेकॅबी :** तुझी कठोर वार्ता मला नवीन राहिलेली नाही. सगळं समजलंय मला, पण गतप्राण झालेल्या माझ्या पोलायक्झेनाला इकडे काय म्हणून घेऊन आलीस तू ! तिचे थडगे उभारायच्या कामात ग्रीक गर्क आहेत असं म्हणत होते सगळेजण.

**वृद्धा :** [ नारीवृन्दाला उद्देशून ] काहीच ठाऊक नाही तिला. पोलाय्कझेनाचाच विचार चाललाय तिच्या डोक्यात. बिचारा दुर्दैवी जीव ! दुर्दैवाचा हा फटका अजून तिला जाणवायला लागलेला नाही.

**हेकॅबी :** देवा रे ! कुणाचा आहे हा देह ? ॲपोलोवर भक्ती करणारी भविष्यवेत्ती– तिचा का ? तुम्ही आणलेली ही कॅसान्ड्रा का आहे ?

**वृद्धा :** कॅसान्ड्रा हयात आहे. पण तुझ्या आसवांची वाट पाहात हा मृतदेह तिष्ठत आहे. मला त्याच्या दुर्दैवी शरीरावरचे आच्छादन काढू दे ! पाहा ! तुझ्या परिचयातला आहे हा चेहरा ! पण हा असा पाहावा लागेल अशी कल्पनाही नसेल आली कधी तुला !

**हेकॅबी !** हा तर माझा मुलगा ! हा पॉलिडोरस ! होय त्याचाच निष्प्राण देह हा ! माझ्या-साठी त्याचे रक्षण करा ! अशी विनंती करून त्याला मी थ्रेसच्या राजाकडे पाठवला

होता. आता मात्र अखेरी झाली माझ्या अभागी जीवनाची ? हाय ! काय करू आता मी !

माझ्या लाडक्या बाळा रे।
तुझ्याबद्दल आता मी म्हणत असलेले हे शोकगीत
मला स्फुरलेले आहे
मला हे आधीच ज्ञात होते
कारण
आपणा सर्वांनाच छळणाऱ्या त्या पिशाच्च्याने
स्वप्नात हे सारं सांगितलं होतं मला.

**वृद्धा :** दुर्दैवी हेकॅबी ! आपला मुलगा मृत झाला हे तुला आधीच माहीत होतं ?

**हेकॅबी :** मी तसं ऐकलं होतं पण, त्यावर विश्वास ठेवला नव्हता. आता मी प्रत्यक्षच पाहात आहे तरीही त्यावर माझा विश्वास बसत नाही.

दुःखामागोमाग दुःख !
दुःखाचे विव्हळणे आणि अश्रू
यांवाचून एकही दिवस सुना जात नाही

**नारीवृन्द :** हेकॅबी ! काय काय भयंकर गोष्टी आमच्यावर कोसळताहेत ग !

**हेकॅबी :**

पॉलिडोरस। माझ्या दुर्दैवी बाळा।
कशाप्रकारचं क्रूर मरण आलं रे तुला ?
कोणत्या शोचनीय दैवदुर्विलासाने घाव घातला तुझ्यावर ?
कुणी ठार मारलं असेल रे तुला ?

**वृद्धा :** मला खरंच काही माहीत नाही; मला हा समुद्र किनाऱ्यावर पडलेला आढळला.

**हेकॅबी :** बुडाल्यानंतर सागरानेच याला बाहेरच्या मऊशार पुळणीवर आणून टाकला का ? का कुणाच्या तलवारीला बळी पडला असावा हा ?

**वृद्धा :** समुद्रातून उचलून लाटांनीच त्याला वर आणून टाकला.

**हेकॅबी :** असं ! आता मला समजला माझ्या स्वप्नांचा अर्थ. माझ्या नजरेसमोर येऊन उभी राहिलेली काळ्याकुट्ट पंखांची ती आकृती मला स्वच्छ सांगत होती की, माझ्या मुला, दिवसाचा प्रकाश पाहायला तू हयात नाहीस आता.

**नारीवृन्द :** कुणी ठार केला असावा त्याला ? स्वप्नांचा अर्थ लावण्याचे तुझे कसब, यावर काही प्रकाश टाकू शकते का ?

**हेकॅबी :** माझ्याच विश्वासातला मित्र होता तो, थ्रेसमधला घोडेस्वार; त्याच्याच घरी प्रायमने या मुलाला गुप्तपणे पाठवला होता.

**नारीवृन्द :** पोलायमेस्टरने याला जीवे मारले? का? कशाकरिता? सुवर्णाचा तो खजिना आपल्यालाच मिळावा म्हणून?

**हेकॅबी :** वर्णन करायला पुरेसे कठोर शब्दच सापडणार नाहीत असा हा गुन्हा! जे जे काही पवित्र मानलं जातं त्याची अवहेलना! वक्तव्य, आश्चर्य आणि सहनशक्ती सान्यांना लुळे पाडणारे अपकृत्य! मैत्री, सौहार्द, या शब्दांना मान, मूल्य उरलेच कुठे?

अरे माणुसकीला वंचित झालेल्या, किळसवाण्या माणसा! पाहा! तुझ्या पोलादी पात्याने छिन्नभिन्न झालेल्या आणि करवतून काढलेल्या या मांसाच्या गोळ्याकडे! काही दयामाया नाही का रे आली तुला?

**नारीवृन्द :** मानवजातीत सर्वात जास्त यातना, सर्वात जास्त दुःख, तू सहन करते आहेस हेकॅबी! ईश्वरी इच्छेनेच हा एवढा दुःखभार तुझ्यावर पडला आहे. सख्यांनो! एक शब्दही बोलू नका आता. आपला धनी, ॲगमेमनोन, इकडेच येतो आहे.

[ सेनातळावरून आलेला ॲगमेमनोन प्रवेश करतो. ]

**ॲगमेमनोन :** आली का नाहीस हेकॅबी तू? तू स्वतःच तिला मूठमाती देणार असल्याने कुणाही ग्रीकमाणसाने तुझ्या कन्येला स्पर्श करू नये; हा तुझा निरोप टाल्थीबिअसने मला सांगितला. म्हणून हातही न लावता आम्ही तिला तशीच तिथे राहू दिली आहे आणि आता तुला तिकडे यायला इतका उशीर लागावा याचे आश्चर्य वाटतंय मला. चल! जा आता! आम्हाला चांगली वाटली तेवढी सगळी व्यवस्था आम्ही केलेली आहे. बाकी या सर्व, कटू दुःखद प्रसंगात चांगले तरी कशाला म्हणायचे म्हणा! अरे! हा मृतदेह, माझ्या तंबूपाशी काय म्हणून पडला आहे? ज्या आवरणात त्याला गुंडाळले आहे, त्यावरून हा ट्रॉयवासी असावा. ग्रीक नाही दिसत!

**हेकॅबी :** हेकॅबी! माझ्या अत्यंत दुःखी कष्टी जीवा! काय करणार आहेस आता? ॲगमेमनोन समोर गुडघे टेकणार? का सगळं मुकाट्याने सोसणार?

**ॲगमेमनोन :** काय घडलंय ते सांगण्याऐवजी माझ्याकडे पाठ करून अशी शोक करीत का उभी राहिली आहेस? कोण आहे हा?

**हेकॅबी :** [ स्वतःशी ] एक गुलाम आणि दुष्मन; याच दृष्टीतून कदाचित पाहील हा माझ्याकडे; म्हणजे मग माझ्या दुःखात आणखी दुसऱ्या दुःखाची भर.

**ॲगमेमनोन :** काय चाललं आहे तुझ्या मनात? तू सांगितल्याशिवाय, तुझ्या विचारांची दिशा काय आहे, हे शोधून काढायला मी काही मनकवडा द्रष्टा नाही!

**हेकॅबी :** [ स्वतःशी ] या माणसाने खरे म्हणजे माझा द्वेषच केला पाहिजे. पण माझा अंदाज चुकीचाही असण्याचा संभव आहे. कदाचित तो माझा शत्रू ठरणार नसेलही शेवटी.

**ॲगमेमनोन :** या प्रकाराबाबत जर काही सांगावं, असं तुला वाटत नसेल तर...ठीक आहे! यातलं काही ऐकायचं नाही असं ठरवायला माझीही तितकीच तयारी आहे.

**हेकॅबी :** [ स्वतःशी ] याच्या मदतीशिवाय खून झालेल्या माझ्या मृत पुत्राच्या वधाचा सूड घेण्याची मला कधी आशाच करायला नको. कशाकरिता माझ्या मनाची ही अशी चलबिचल होते आहे ? यश येवो वा अपयश येवो, मला धीटपणे बोललेच पाहिजे.

[ ती गुडघे टेकते ]

ॲगमेमनोन ! दीनवाणीने मी तुझ्यापाशी याचना करते आहे. गुडघे टेकून, तुझ्या दाढीला हात लावून, तुझा विजयी उजवा हात पकडून मी भीक मागते आहे.

**ॲगमेमनोन :** काय इच्छा आहे तुझी ? गुलामगिरीतून मुक्त करून मी तुला स्वातंत्र्य द्यावं अशी का विनंती आहे तुझी ? ते मी दिलंच म्हणून समज, खुषीने, तत्परतेने !

**हेकॅबी :** स्वतंत्रता ? छे ! ती नको आहे मला, पण मला हवाय प्राणघातक्यावरचा सूड ! त्यासाठी मी युगायुगाची गुलामगिरी स्वीकारीन.

**ॲगमेमनोन :** म्हणजे कशा प्रकारची मदत हवी आहे तुला !

**हेकॅबी :** मी ज्या प्रकारची मदत मागेन असं तुला वाटतंय, तसली कोणतीही मदत मला अभिप्रेत नाही ॲगमेमनोन ! मी ज्याच्यासाठी शोक करतेय तो हा मृतदेह पाहिलास ना तू ?

**ॲगमेमनोन :** होय ! पुढे काय म्हणणार आहेस आता ?

**हेकॅबी :** या पुत्राला माझ्या उदरात मी नवमास वाहिला. हा माझा पुत्र होता.

**ॲगमेमनोन :** अरेरे ! हेकॅबी ! तर मग तुझा सर्व पुत्रांमधला हा कुठला म्हणायचा ?

**हेकॅबी :** जे ट्रॉयच्या तटबंदीसमोर कामी आले त्यापैकी नव्हे हा.

**ॲगमेमनोन :** म्हणजे ? त्याशिवाय आणखी मुलगे होते तुला ?

**हेकॅबी :** फक्त हा एवढाच ! त्यालाही आचवले मी आता !

**ॲगमेमनोन :** ट्रॉय शहराचा पाडाव झाला तेव्हा होता कुठे हा ?

**हेकॅबी :** त्याचे प्राण वाचावेत म्हणून त्याच्या वडिलांनी त्याला ट्रॉयबाहेर पाठविला होता.

**ॲगमेमनोन :** याच्या सर्व भावांमधून याला एकट्यालाच पाठवला होता ?

**हेकॅबी :** होय !

**ॲगमेमनोन :** कुठे पाठवला होता त्याला त्यांनी ?

**हेकॅबी :** इथेच ! या थ्रेसमध्येच, आणि इथेच तो आढळून आला मृत झालेला.

**ॲगमेमनोन :** तुम्ही त्याला ज्याच्याकडे धाडला होतात तो राजा म्हणजे पोलायमेस्टरच का ?

**हेकॅबी :** होय ! पोलायमेस्टरच ! आम्ही त्याच्याबरोबर सुवर्ण खजिनाही पाठविला होता. त्या खजिन्यासाठीच त्याला आपल्या प्राणाचे मोल द्यावे लागले.

**ॲगमेमनोन :** का ? त्याला झालं तरी काय ? कुणी ठार मारलं याला ?

**हेकॅबी** : कुणी ? अरे–कोण मारणार दुसरं ? आमचे थ्रेसचे स्नेहीच.

**ॲगॅमेमनोन** : स्नेही कसला ? खुनी ! हे सर्व सुवर्णसाठ्यासाठी ?

**हेकॅबी** : होय ! ट्रॉय पडल्याचं त्याला समजल्यावर त्याने हे कृत्य केले.

**ॲगॅमेमनोन** : त्याला इथे आणला कुणी ? कुठे सापडला हा ?

**हेकॅबी** : या बाईला समुद्रकिनाऱ्यावर आढळला तो.

**ॲगॅमेमनोन** : त्याला शोधायलाच गेली होती ती तिथे, का आणखी काही कामाकरिता ?

**हेकॅबी** : माझ्या मुलीच्या मृतदेहाला स्नान घालण्यासाठी मला समुद्राचे पाणी हवे होते, त्यासाठीच ती गेली होती.

**ॲगॅमेमनोन** : यावरून असं दिसतं की, तुमच्या स्नेह्याने त्याला ठार मारलं नि बाहेर फेकून दिलं.

**हेकॅबी** : प्रथम त्याच्या कायेच्या चिंधड्या केल्या नि मग पुढे कुठे तरी वहात जावा म्हणून दिला ढकलून समुद्राच्या पाण्यात !

**ॲगॅमेमनोन** : अभागी हेकॅबी ! काय अनंत यातना सहन केल्या आहेस तू !

**हेकॅबी** : माझं काळीज म्हणजे निर्जीव फत्तर झालाय फत्तर. काळीज उरलंच नाही दुःख सहन करायला.

**ॲगॅमेमनोन** : एवढी विपरीत दैवगती आली असेल का, कधी कुणा स्त्रीच्या वाट्याला ?

**हेकॅबी** : कुणाही स्त्रीच्या वाट्याला आली नसेल, खुद्द दुर्दशेनेच स्त्री रूप घेतलं तरच या दुःखाची बरोबरी होईल बरं ! पण आता माझी मागणी ऐका; त्यासाठीच मी आपणापुढे गुडघे टेकले आहेत. मला जे भोगावे लागते ते न्याय्यच आहे – त्याला मी पात्रच आहे, असेच आपणाला वाटत असेल, तर मग माझे काहीच म्हणणे नाही, मग मी 'आलिया भोगासी, 'असावे सादर' म्हणून गप्प राहीन. पण ...... जर तसं वाटत नसेल तर ज्याने स्वर्गातल्या वा अधोलोकातल्या देवांचीही भीती न बाळगता अत्यंत गर्हणीय असे हे विश्वासघाताचे कृत्य केले आहे, अशा या खोटी शपथ घेणाऱ्या निमकहराम, द्रोही माणसावर सूड उगवण्यासाठी मला सहाय्यभूत व्हा. अनेकदा याने माझा पाहुणचार घेतला होता; माझ्या मेजावर मझ्या पंक्तीला बसला होता; माझ्या जीवश्चकंठश्च मित्रमंडळातला एक समजला जात होता; योग्य अशा साऱ्या सन्मानाने त्याचे स्वागत केले जात होते. आणि असा हा माणूस कपट कारस्थान रचतो नि खून करतो ! नंतर खुनाच्या भरीला त्याच्यासाठी थडगे उभारायचे सौजन्यही दाखवीत नाही आणि माझ्या मुलाला समुद्रात भिरकावून देतो ! मी तर बोलून चालून गुलामाचेच जिणे भोगते आहे, म्हणून मी कमकुवत असेन पण देव समर्थ आहेत आणि त्यांच्यावर हुकमत गाजविणारा दैवी कायदाही समर्थ आहे. देवांच्या अस्तित्वावरील आपली श्रद्धा, याच दैवी कायद्यावर आधारलेली असते. आपले जीवनही याच श्रेष्ठ कायद्यानुसार चालते. त्याच्या आधारेच आपण सत्यासत्याचा

निवाडा करतो. या दैवी कायद्यालाच जर तुम्ही आपल्या न्यायासनापुढे उभे केलेत आणि तिथे त्याचा अपमान करून त्याला दोषी ठरवलेत; माणसे जर विश्वासाने आलेल्या पाहुण्याला ठार मारू लागली, देवालये लुटू लागली आणि तरीही त्यांबद्दल त्यांचा जर धिक्कार झाला नाही तर मग या भूतलावर न्यायच उरला नाही असे होईल. या सुव्यवस्थेची शरम तुम्हाला मार्गदर्शन करू दे. स्वतःच्या इभ्रतीचे भान, माझ्या न्याय्यकार्याला मदत करण्यासाठी तुम्हाला प्रवृत्त करो. पाहा! बघा माझ्याकडे! साक्षात विपदेचे दर्शन होईल आपल्याला माझ्या चेहेऱ्यावर! जरा मागे सरकून, अंतरावरून एखाद्या चित्रकारासारखे माझ्या या विपदेचे निरीक्षण करा; मग अनुकंपा वाटेल तुम्हाला माझ्याबद्दल. एकेकाळी मी होते राणी–आज आहे आपली गुलाम. एकेकाळी अनेक पुत्र आणि कन्या, यांची माता असलेली मी—आता अपत्यहीन, जरठ, गाव नाही, स्नेही नाहीत अशी, मानवातली सर्वांत दुर्दैवी मी!

दयेच्या नावाने विचारते – माझ्यापासून आपले तोंड असे बाजूला का फिरवता? माझे शब्द, माझे अश्रू, यांचा काहीच परिणाम होत नाही असे दिसते. मी हताश झाले आहे. मन वळविण्याची कला मी का बरे आत्मसात केली नाही? किती मूर्ख असतो आपण? आपण दुसरी सारी कसबे शिकतो, त्यासाठी श्रम घेतो, त्यांच्या अभ्यासाला आपणाला वाहून घेतो – पण मानवी कलांची सम्राज्ञी शोभावी अशी मन वळविण्याची कला – जर कधी माणसाचे मन अंकित करून आपल्याकडे वळवायची आपली महत्त्वाकांक्षा असेल, आणि आपल्याला जे हवे ते मिळवायचे असेल, तर आपण या कलेचा मागोवा घेतला पाहिजे, त्यासाठी जरूर ते मूल्य मोजले पाहिजे – पण, या कलेचे हे सर्वश्रेष्ठ ज्ञान आपण दुर्लक्षित ठेवतो – मग यश वा सिद्धी प्राप्त होण्याची आशा कशाच्या आधारावर करायची!

माझी सर्व मुले गेली, माझ्या गौरवाला काळोखी फासली गेली! लाटेसारखी वळणे घेत ट्रॉय शहरावर उंचावणारा धूर पाहात कैदी म्हणून दूर नेली गेले मी. [ स्वतःशीच ] अजून माझ्याजवळ आणखी एक युक्तिवाद आहे. कदाचित त्याचाही उपयोग होणार नाही. तरीही मी प्रयत्न करून पाहाणार आहे. प्रीतीला वश न होणारा असा तो काही मुक्तात्मा नाही. (उघड) ॲगमेमनोन! ट्रोजन जिला 'अपोलोची वाणी' म्हणतात, ती माझी मुलगी कॅसान्ड्रा, आपल्याला आपल्या बिछान्यात शय्यासुख देते. आपल्या रात्री सुखाच्या खुशबूने दरवळत व्यतीत होत असतात – होय की नाही, सांगा ना ॲगमेमनोन? आपल्या मदभरी आलिंगनाच्या बदल्यात माझ्या मुलीने कसल्याच अनुग्रहाची आशा बाळगू नये काय? तसेच तिने माझ्याकडूनही 'भले' म्हणवून घेतले जाऊ नये काय? तर मग ऐका! या मृत मुलाकडे पाहा. रक्तसंबंधाने तो आता आपल्याला जवळचा झाला आहे. त्याचा तुमच्यावरचा हक्क, हा आता नात्यातल्या माणसाचा हक्क बनला आहे. तर मग त्या

हक्काला मान द्या. आता माझे हे अखेरचे सांगणे ऐका. ओः! माझ्या शरीराच्या प्रत्येक भागात, – बाहूंवर, हातांवर, केसागणिक आणि पायात जिभा असत्या, आणि डेडॅलसच्या अथवा देवाच्याच अंगी असणाऱ्या कलेचा उपयोग करून त्या मला चालवता आल्या असत्या तर त्या सर्वांच्या विविध वाक्‌चातुर्याने तुमचे कठीण हृदय मी गदगदा हलवले असते – त्यांनी आपल्या गुडघ्यांना घट्ट मिठी घालून आक्रोश केला असता! महाराज! हेलासच्या लोकोत्तर तेजोभास्करा! ऐका माझं! काहीच किंमत नसलेली मी—एक उपेक्षित वृद्धा! तरीही मी मागते आहे ते तुझे सूड उगवण्यास समर्थ असे बाहूबल मला उसने दे. जे न्याय आहे त्याला उचलून धरणे आणि सर्वकाळ सर्वत्र अन्यायी दुर्वृत्ताला शासन करणे हे सत्प्रवृत्त माणसाचे कर्तव्यच आहे.

**नारीवृन्द** : किती नवलाची गोष्ट आहे ही की मानवी जीवनात विरुद्ध टोकेही एकत्र येतात व मानवसंमत कायद्यानुसार प्रीती आणि द्वेष, रूपे पालटतात, या कायद्यांनी कट्टर दुष्मन मित्र होतात, फार दिवसांचे मित्र वैरी बनतात.

**ॲगॅमेमनोन** : तुझ्यावर आलेली घोर संकटे, खुन्यांकडून ठार झालेला तुझा पुत्र आणि मदतीसाठी तू केलेली याचना – हेकॅबी! या सगळ्यांनी माझे हृदय हेलावून गेलंय, मला न्याय आणि देव, दोघांचेही समाधान व्हायला हवंय; आणि तुझ्या या खुनी स्नेह्याला त्याच्या पापाचे योग्य प्रायश्चित्त द्यायला मला आवडेल – पण कॅसान्ड्राच्या प्रेमाखातर पोलयमेस्टरच्या वधाकडे मी कानाडोळा केला अशी ग्रीक सैनिकांना थोडीसुद्धा शंका येणार नाही असा काही मार्ग आपल्याला काढता येत असेल तर पाहू या! शिवाय आणखी एक मुद्दा मला विशेष सतावतो आहे. या पोलायमेस्टरला ग्रीक आपला मित्र मानतात, आणि तुझा मुलगा त्यांना शत्रूसारखाच वाटणार! तो तुझा पुत्र आहे या वस्तुस्थितीचे भान ते अजिबात ठेवणार नाहीत; म्हणून काय करायचंय, याचा तूच विचार कर. मी तुला मदत करायला उत्सुक आहे याची खात्री बाळग. पण ग्रीकांकडून ज्यावर टीका होईल अशी कोठलीही कृती करताना मात्र, माझा उत्साह मंदावेल.

**हेकॅबी** : स्वतःच्या इच्छेने वागायला मोकळा असा स्वतंत्र माणूस – अशी चीजच अस्तित्वात नाही का कुठे? सर्वच माणसे गुलाम असतात. कुणी धनदौलतीचे गुलाम, कुणी प्रारब्धाचे अंकित, आणि आणखी दुसऱ्या काहीना जमावाच्या कलाने वा कायद्याच्या धाकाने स्वतःच्या स्वभावाशी विसंगत असे वागणे भाग पडते – मग ज्या अर्थी आपण भीत आहात नि बाजारबुणग्यांच्या मनाला इतका उच्च मान देता आहात, त्या अर्थी माझ्या मुलाला ठार करणाराला शासन करण्याच्या माझ्या योजनेत सहभागी होणाऱ्या संभाव्य धोक्यातून मी आपल्याला मुक्त करीत आहे. मी काय करणार आहे ते माहीत असू दे तुम्हाला, पण त्यात तुमचा प्रत्यक्ष हात मात्र नको. आणि या थ्रेसवासीयाला जे शासन व्हावयाचे आहे ते जेव्हा होईल त्यावेळी जर ॲकिअन बंड करून उठले, वा त्याच्या मदती-

साठी गोळा झाले, तर त्यावेळी त्यांच्यावर नियंत्रण घाला. बाकीच्या गोष्टींबाबत बिलकूल चिंता करूं नका– मी पाहून घेईन सगळं.

**ॲगॅमेमनोन :** पण कसं? काय करणार आहेस तूं? तुला तलवार चालविता येईल आणि या थ्रेसवासीयाला ठार मारता येईल? कां विषप्रयोग करणार आहेस त्याच्यावर तूं? कोठल्या मदतीची, कुणाच्या सहाय्याची अपेक्षा करीत आहेस तूं? कुणी स्नेही आहेत कां तुझे?

**हेकॅबी :** या तंबूत कैद असलेल्या ट्रॉसच्या स्त्रिया-- तेच माझे स्नेही-- खूप जणी आहेत त्या. त्यांच्या मदतीने मी माझ्या खुन्याचा समाचार घेऊ शकेन.

**ॲगॅमेमनोन :** या कैदी बायका? त्या काय पुरुषाशी झुंज देऊन त्याला गारद करू शकतील?

**हेकॅबी :** संख्याबल आणि छुपा कावा, यांची जोडी जमली की तिच्यावर कुणालाच मात करता येत नाही.

**ॲगॅमेमनोन :** संख्याबल मी समजू शकतो; पण स्त्रिया—त्या काही करू शकणार नाहीत.

**हेकॅबी :** का नाही? इजिप्टसूच्या पन्नास पुत्रांची वाट बायकांनीच नाही का लावली? लेमनॉस बेटातून पुरुषांचा संपूर्ण निःपात केला तो स्त्रियांनीच–पण जाऊ द्या. सोडून देऊ ही वादावादी. आता एक करा. या स्त्रीला लष्करी तळातून सुरक्षितपणे बाहेर जाता येईल अशी व्यवस्था करा.

[ ती वृद्ध दासीकडे वळते. ]

माझा हा निरोप घेऊन माझ्या थ्रेसवासी स्नेह्याकडे जा. म्हणावं, "हेकॅबी-ट्रॉयची एकेकाळची राणी–'आपण तिच्याकडे यावे आणि बरोबर आपल्या मुलांनाही आणावे अशी विनवणी करीत आहे.' आपण आणि आपले चिरंजीव, दोघांचाही ज्यांत संबंध आहे, असे तिला काही सांगायचे आहे. तिच्या स्वतःपेक्षाही आपला व आपल्या मुलांचाच जास्त संबंध आहे त्या गोष्टीशी! म्हणून त्यांनाही ते ऐकायलाच हवे.'

[ दासी जाते. ]

ॲगॅमेमनोन! पोलायक्झेनाच्या अंत्यसंस्काराला थोडा उशीर होऊ द्या–म्हणजे बहीण आणि भाऊ–माझी दुहेरी हानी एकाच चितेवर ठेवता येतील आणि त्यांची रक्षा एकाच थडग्यात राहील.

**ॲगॅमेमनोन :** तू म्हणतेस तसं करण्यात येईल. जर वारा अनुकूल असता आणि गलबते निघाली असती तर हे सगळं तुझ्यासाठी मला करता आलं नसतं. पण देवांनीच वादळी हवा पाठविलेली असल्याने आम्हाला थांबणेच भाग पडले. मला आशा आहे की या सगळ्यातून काहीतरी चांगलेच निष्पन्न होईल. व्यक्ती आणि राज्य या दोघांच्या दृष्टीने

पापकर्म्याला शासन व्हावे नि सत्प्रवृत्त माणसाला त्याच्या सत्कृत्याचे पारितोषिक मिळावे ही गोष्ट फार महत्त्वाची आहे.

[ हेकॅबी आत निघून जाते. ॲगॅमेमनोन सेनातळाकडे परततो. ]

**नारीवृन्द :**

ट्रॉय, हे माझी पितृभूमी !
कधीही लुटल्या न गेलेल्या शहरांच्या नामावलीत
तुझा नामनिर्देश होणार नाही यापुढे
ग्रीकांची वादळी मेघराशी
झाकून ठेवते आहे तुला आमच्या दृष्टीपासून
आणि त्यांच्या भाल्यांनी
तुझा सत्यानाश केला आहे
तुझा उंच बुरुजांचा मुगुट, ढासळला आहे
काळ्याकुट्ट कीटणाने माखलेला आहे
तुझा छिन्नविछिन्न चेहेरा मोहोरा !
गरीब बिचाऱ्या ट्रॉय !
तुझ्या वीथींवरून विहरणे
कुठले नशिबी आता माझ्या, यापुढे ?

मध्यरात्री होता, क्षण माझ्या मृत्यूचा
समय होता रात्रीच्या भोजनानंतरचा
जेव्हा मधुमधुर निद्रा सर्वांच्या डोळ्यांवर विसावते.

गीतगान संपले होते, हवन आणि मोदप्रमोद —
पार पाडले होते यथासांग सगळे माझ्या भ्रताराने
आणि पहुडला होता तो त्याच्या मंचकावर.
त्याचा भाला खिळ्याला लटकत होता.
ट्रॉयच्या मैदानावर मनःपूत संचार करणाऱ्या
परकीय खलाशांच्या झुंडी
दृष्टिपथात यायच्या थांबल्या होत्या
मी माझे केस आवरीत
सावरीत होते--
माझ्या टोपीखाली त्यांना गुंतवून ठेवीत होते

माझ्या सोनेरी आयन्याच्या
अवीट झळाळीत निरखून पाहात होते
अंथरुणावर अंग टाकायच्या तयारीतच होते, –
इतक्यात ट्रॉयच्या रस्त्यावरून
ट्रॉयनगरीभर आरोळी उठली –
आमच्या कानावर युद्धगर्जना आदळली
"हेलासच्या शूर मर्दांनी ! हीच आहे वेळ !
ट्रॉयचे गढीकोट ढासळवून टाका
मग तुम्ही सगळे घरोघर जायला मोकळे व्हाल !"

मी शय्या सोडली – माझी प्रिय शय्या !
आणि स्पार्टन मुलीप्रमाणे फक्त झगा घालून
आर्टीमिसच्या वेदीजवळ बसले –
थरथर कापणारी एक शरणार्थी !

पण त्या वेदीने केले नाही माझे रक्षण
माझ्या नजरेसमोर ठार झाले माझे पती
आणि सागरमार्गे येथे आणलं गेलं मला.

आणि माझ्या जन्मभूमीपासून
माझी ताटातूट करीन, जेव्हा
जहाज मार्ग आक्रमू लागले हेलासच्या दिशेने
तेव्हा मनोव्यथेने हतबल होत
मी माझ्या आसवांमधून
ट्रॉयकडे वळून पाहिले.
आणि मग मी शापवाणी उच्चारली
स्वर्गीय जुळ्याची बहीण हेलन
आणि 'इडा' वरील मेंढपाळ —
ट्रॉयवरील केवळ अरिष्ट असा पॅरिस
यांना उद्देशून –
कारण त्यांचा तो विवाह ! विवाह कसला !
तो तर होता नियतीच्या एका पिशाच्च्याचा

थयथयाट !
त्यानेच मला माझ्या घरापासून, संसारातून
समूळ उखडून टाकलं आणि ट्रॉयमधून
मी गुलामगिरीच्या नरकपुरीत येऊन पडले —
ऐका माझा शाप !
हेलन आपल्या पित्याच्या घरीं कधीही न पोचो !
तिला खाऱ्या समुद्रात जलसमाधी मिळो !
हीच माझी देवतांपाशी प्रार्थना !

[ तंबूतून हेकॅबी प्रवेश करते. सेनातळाकडून आपले दोन लहान पुत्र व बरेचसे शरीरसंरक्षक यांच्यासह पोलायमेस्टर प्रवेश करतो. ]

**पोलायमेस्टर** : हाय रे प्रायम ! परम जीवलग मित्रा ! हेकॅबी ! तितकीच प्रिय मला ! तीळमात्र कमी नाही– तुझ्या आणि ट्रॉयनगरीच्या वाट्याला आलेला कर्मभोग, आणि तुझ्या लाडक्या लेकीचा मृत्यू माझ्या नेत्रात आसवं आणीत आहेत. काहीच शाश्वत नाही या जगात ! उज्ज्वल यश आणि वैभव, दोघांची उलथपालथ होते. गडबड गोंधळ उडवीत देव, वाकड्यातिकड्या मार्गांनी आपल्या भाग्याच्या रेषा रेखाटित असतात. उद्देश असा की अज्ञात भविष्याच्या भीतीमुळे आपण त्यांच्याबद्दल पूज्यभाव ठेवावा. तर मग शोक तरी कशासाठी करायचा ? आपल्या अडचणीवर मात करावयास कुणालाही त्याचा उपयोग होत नाही. तू जेव्हा प्रथम इकडे आलीस तेव्हा असं घडलं योगायोगाने— मी होतो देशाच्या दूर अंतर्भागात. तेव्हा मी तुला भेटायला आलो नाही म्हणून तुला दुखावल्यासारखं झालं असेल तर मला माफ कर. मी परत आल्यावर तुझ्याकडे यायला म्हणून निघणारच होतो — इतक्यात तुझी दासी मला दारातच भेटली. तिने मला तुझा आदेश दिला तो मी पाळला आणि आता हा इथे आलो –

**हेकॅबी** : पोलायमेस्टर ! अरिष्टांच्या भाराखाली मी इतकी चिरडून गेलीय की वर नजर उचलून तुमच्याकडे पहाणेसुद्धा कष्टमय होते आहे. तुम्ही मला ओळखीत होतात ती राजप्रासादात अधिष्ठित अशी. आज तुमच्यासमोर बंदीवान म्हणून उभं रहायचं ! मला गोंधळून टाकीत आहे हे सारे. माझी नजर तुमच्या नजरेला सरळ सरळ भिडू शकत नाहीय, कारण माझ्या मनातला भावनांचा कल्लोळ, मला तसं करू देत नाही. पोलायमेस्टर ! तुमच्या बद्दलच्या दुस्वासामुळे तसे घडत आहे, असा त्याचा अर्थ घेऊ नका बरं ! शिवाय स्त्रीची नजर पुरुषाच्या नजरेला भिडता कामा नये अशी रूढी पण आहे ना ? ते ही अंशतः कारण आहेच माझ्या या अधोदृष्टीचे.

**पोलायमेस्टर** : मला सगळं समजतंय बरं. गैरसमजाला जागाच नाही. पण मला असं सांग, मी इथे यावं म्हणून मला निरोप का पाठवलास तू ? तुझ्यासाठी मी काही करू

शकतो का ?

**हेकॅबी :** मला तुमच्याशी आणि तुमच्या मुलांशी खाजगीत काही बोलायचं आहे. तुमच्या शरीरसंरक्षकांना बाहेर थांबायला सांगा.

**पोलायमेस्टर :** [ शरीरसंरक्षकांना ] तुम्ही जा बाहेरच्या बाजूला. इथे पूर्ण सुरक्षितता आहे. भीतिदायक असं, अन्य कुणीही नाही आसपास.

[ शरीरसंरक्षक बाहेर जातात. ]

[ हेकॅबीला ] तू माझ्या सुहृदांपैकी आहेस आणि ग्रीक सैन्याशीही माझा मित्रभाव आहे. मला भीती कशाची ? आता मला सांग, ज्याचे जीवन सदैव उत्कर्षाच्याच मार्गावर आहे असा माणूस विपदावस्थेत असणाऱ्या आपल्या सुहृदांसाठी काय करू शकतो ? मी तुझ्या हुकुमाचा ताबेदार आहे.

**हेकॅबी :** पॉलिडोरसबद्दल बोला प्रथम. त्याच्या वडिलांनी आणि मी, त्याला जपणुकी-साठी आपल्याकडे सोपविला होता. तो जिवंत आहे का, हे आधी सांगा. बाकीचं मग मी नंतर विचारीन.

**पोलायमेस्टर :** अर्थातच ! त्याच्याबद्दल चिंताच नको तुला.

**हेकॅबी :** किती आल्हाददायक शब्द हे ! तुम्ही सच्च्या स्नेह्यासारखंच बोलताहात ! तुम्ही आहातच सच्चे स्नेही माझे !

**पोलायमेस्टर :** तुमचा पुढला प्रश्न काय आहे ?

**हेकॅबी :** माझा मुलगा माझ्या आठवणी काढतो का ?

**पोलायमेस्टर :** हो तर ! तुमच्याकडे यावं अशी इच्छा होती त्याची– अर्थात लपूनछपून.

**हेकॅबी :** आणि ट्रॉयहून येताना त्याने स्वतःबरोबर सुवर्णनिधी आणला होता, तो खजिना सुरक्षित आहे ना ?

**पोलायमेस्टर :** माझ्या राजवाड्यात अगदी सुरक्षित आहे भक्कम पहाऱ्यात –

**हेकॅबी :** सुरक्षित ठेवा तो ! आणि लोभ धरू नका त्याचा.

**पोलायमेस्टर :** भलतंच ! मी कसा लोभ धरीन त्या परस्वाचा ! जे माझे स्वतःचे आहे त्याचाच नितांत उपभोग घ्यावा अशीच माझी आकांक्षा आहे.

**हेकॅबी :** आता तुम्हाला नि तुमच्या मुलांना, मला सांगायचं आहे ते हे –

**पोलायमेस्टर :** काय – काय आहे एवढं ? मला सांग ना !

**हेकॅबी :** तुमच्यासारख्या जिवलग अशा मित्रावर मी सोपवणार आहे . . .

**पोलायमेस्टर :** बोला, बोला, पुढे बोला काय सोपवणार आहात ?

**हेकॅबी :** प्रायमच्या घराण्यातील पूर्वसूरींचा परंपरागत सुवर्णनिधी, फार फार पूर्वी पुरून ठेवलेला आहे.

**पोलायमेस्टर :** या सुवर्णनिधीबद्दल तुझ्या मुलाला कळवावे म्हणून का तू मला हे

सांगत आहेस ?

**हेकॅबी :** होय ! त्याला तुम्ही सांगायलाच हवं. तुम्ही देवाला भिणारांपैकी एक आहात.

**पोलायमेस्टर :** याबद्दल माझ्या मुलांनाही माहीत असावं, असं का वाटतं तुम्हांला ?

**हेकॅबी :** समजा ! तुमचं कांही बरंवाईट झालं, तर त्यानांही ज्ञात असावं, हे उत्तम !

**पोलायमेस्टर :** बरोबर आहे तुमचं. तेच जास्त शहाणपणाचं.

**हेकॅबी :** एकेकाळी जिथे ॲथिनीचे देवालय उभे होते, ते ट्रॉयमधील स्थळ माहीत आहे तुम्हाला ?

**पोलायमेस्टर :** तिथे आहे तो सोन्याचा साठा ? त्याचा छडा लागावा म्हणून तिथे काही खूण आहे का ?

**हेकॅबी :** आहे तर ! जमिनीच्या पातळीबाहेर डोकावणारा एक काळा फत्तर आहे.

**पोलायमेस्टर :** या खजिन्याबाबत तुला आणखी काही गोष्टी सांगायच्या आहेत मजजवळ ?

**हेकॅबी :** मी जेव्हा दूर निघून आले तेव्हा येताना काही गोष्टी माझ्याबरोबर आणलेल्या आहेत. त्या तुमच्या स्वाधीन करायच्या आहेत मला.

**पोलायमेस्टर :** कुठे ठेवल्या आहेत त्या दडवून ! त्या तुम्ही आपल्याबरोबरच बाळगता का दुसरीकडे कुठे ठेवून देता ?

**हेकॅबी :** त्या तंबूत चिलखतांच्या ढिगाऱ्याखाली त्या सगळ्या दडवून ठेवलेल्या आहेत.

**पोलायमेस्टर :** काय ? त्या तिथे ? एकिअन जहाजांच्या इतक्या जवळ !

**हेकॅबी :** त्यांच्यापैकी कोणताही माणूस आमच्या राहात्या जागेत पाऊल टाकीत नाही. आमचे अगदी खाजगी जीवन आहे इथे.

**पोलायमेस्टर :** अस्सं ! म्हणजे इथे त्या अगदी सुरक्षित आहेत तर !

**हेकॅबी :** आम्ही स्त्री कैदी– आम्हाला कुणी त्रास देत नाही. आत या ! घरी जाण्याच्या तयारीत म्हणून आपल्या जहाजांची शिडे उभारण्याच्या घाईगर्दीत आहेत ग्रीक ! म्हणून तुमचे इथले काम व्यवस्थित पार पडले म्हणजे, तुम्ही आणि तुमची मुले, तुम्ही माझ्या मुलाला जिथे आसरा दिला आहात तिथे जाण्यासाठी म्हणून बरोबरच प्रस्थान ठेवू शकाल

[ पोलायमेस्टर आणि त्याचे दोन पुत्र, तंबूत प्रवेशतात. हेकॅबी त्यांच्या पाठोपाठ जाते. ]

**नारीवृन्द :** अजून समय प्राप्त झालेला नाही
तुझे देणे देऊन टाकण्याचा.
पण तो येईलच
एखादा माणूस जसा पडतो खोल पाण्यात कुशीवर
आणि मग सापडत नाही त्याच्या पायांना आधार –
तसा पतन पावशील तू अंतःकरणातील

आकांक्षांपासून दूर दूर ...,
आणि गमावशील आपला प्राण!

न्यायाचेही असते देणे
आणि ऋण असते देवांचेही
जिथे या दोन्हीचेही एकत्रीकरण होते
तिथेच परतफेड होते अंतिम आणि संपूर्ण.

हा प्रवास केला आहेस तू अभिलाषेने
पण तुला चकवणार आहे ही अभिलाषा
तुझ्या दळभद्री आयुष्याला अखेरी मृत्यूकडे नेत.

दुर्बल मानले गेलेले तुझ्या ताकदीवर
वरताण करणार आहेत
ज्यांना लढाई कशाशी खातात हे सुद्धा ठाऊक नाही,
तेच तुझ्यावर मात करणार आहेत.

**पोलायमेस्टर** : [ तंबूतून ] कुणीतरी मदतीला या! धावा! धावा! त्या, माझे डोळे फोडताहेत!

**नारीवृन्द** : सख्यांनो! ऐकलंत ना!
थ्रेसचा राजाच आक्रंदतो आहे.

**पोलायमेस्टर** : [ आतून ] धावा हो कुणीतरी! धावा! वाचवा माझ्या मुलांना. त्यांना ठार करताहेत हो त्या!

**नारीवृन्द** : सख्यांनो! भयानक गोष्टी करण्यात आलेल्या आहेत.

**पोलायमेस्टर** : [ आतून ] तुम्ही पळून जाल दूर, पण माझ्या हातून सुटणार नाही कधी तुम्ही. तोडून फोडून टाकीन सगळे. भुईसपाट करून टाकीन तुमचं हे वस्तीचं ठिकाण.

**नारीवृन्द** : ऐका, ऐका त्याचे बडबडणे! तो भलताच ताकदवान आणि हिंसाचारी आहे. असं वाटतं का तुम्हाला की आपण आत घुसायला हवं आणि हेकॅबी व तिच्या अनुचारिका यांना मदत करायला हवी? त्या सगळ्याच महान संकटात आहेत.

[ हेकॅबी प्रवेश करते. ]

**हेकॅबी** : तडफड लागेल तेवढा, लाथाडून टाक सगळ्या भिंती, छिन्नभिन्न करून टाक दरवाजे. किती धडपडलास तरी तुझ्या अंधारलेल्या डोळ्यांत तुला परत कधीही तेज आणता

येणार नाही – आणि ज्यांना मी ठार मारलेले आहे, त्या तुझ्या पुत्रांना कधीही पुनश्च जिवंत पाहू शकणार नाहीस तू !

**नारीवृन्द :** काय ! खरोखरीच मात केलीत त्याच्यावर तुम्ही आणि सत्यानाश केलात त्याचा ? बाईसाहेब ! जे काही आता म्हणालात, तसं सारं खरोखरीच केलंत ?

**हेकॅबी :** तुम्ही स्वतः पहालच त्याला लवकर. तो बाहेर येईल, आंधळ्यासारखी वाट चाचपडत, चाचपडत आणि या शूर स्त्रियांच्या सहाय्याने मी ज्यांना ठार मारलं, त्या त्याच्या दोन पुत्रांचे जडदेहही पाहाल तुम्ही शेवटी मी उगवला त्याच्यावर सूड ! हा पाहा : इकडेच येतो आहे तो. त्याच्या वाटेतून मी बाजूला उभी राहते. खास थ्रेस पद्धतीच्या उफाळणाऱ्या रागात तो जळफळतो आहे. धोका आहे मला त्याचेकडून !

[ पोलायमेस्टर, अंध झालेल्या अवस्थेत प्रवेश करतो. ]

**पोलायमेस्टर :** धावा ! मदतीचा हात पुढे करा !
कुठे जाता येईल मला ?
कुठे उभा राहू मी स्वसंरक्षणार्थ ?
चतुष्पाद पशूसारख
मला माझ्या हातांवर रांगत राहणे भाग पडणार आहे का ?
त्यांच्या पदरवांचा शोध घेत ?
त्यांना रस्त्यातून दूर करीत
कोणत्या दिशेला वळू मी !
या बाजूला की त्या बाजूला ?
पकडलंच पाहिजे मला त्यांना
त्या ट्रॉयच्या खुनी थेरड्या जखणींना !
सत्यानाश केला माझा त्यांनी
तळपट होवो त्यांचे
निःसंतान होवो त्यांचे !
फरीजियातल्या निर्लज्ज म्हशी !
कुठे बसल्या आहेत दडी देऊन माझ्यापासून !
कुठे बसल्या आहेत दबा धरून ?

हे तेजोभास्करा ! आंधळा झालो आहे मी !
नाहीच का बरा करू शकणार मला तू !
रक्ताश्रू गाळणाऱ्या माझ्या डोळ्यांतला प्रकाश
परत आणू शकणार नाहीस तू ?

ओः खामोष ! चोर पाऊल ऐकले मी आता –
ती त्यांच्यातलीच एक !
जर मी तिला पकडली तर तिचं मांस ओरबाडून
काढीन –
आणि हाडं मोडीन तिची.
या रानटी कैदाशिणींना खाऊन, गिळून
मी साजरी करीन मेजवानी !
त्यांनी जे मला केलंय, तेच करीन त्यांना मी.
मी सूड उगवीन त्यांच्यावर.

कुठे जाऊ मी ?
माझ्या मुलांना इथेच टाकून जावं लागणार का मला ?
त्या मृत्युपूजक राक्षसिणींकडून
त्यांच्या चिंधड्या चिंधड्या होतील हो !
कुत्र्याचे भक्ष्य म्हणून सोडून देऊ त्यांना ?
त्यांचे रक्ताळलेले मांस, कडेकपारीवर फेकलं जाणार का ?
सागरावर चालणाऱ्या जहाजासारखा
शिडे गुंडाळून घेऊन कुठे थांबू मी ? कुठे विसावू ?

जिथे माझी मृत मुले पडली आहेत
ती जागा मला शोधू द्या
आणि त्यांचे रक्षण करायला
धावत, दौडत जाऊ द्या.

**नारीवृन्द :** दुःखी माणसा ! कठीण आहेत
तुझ्या वेदना सहन करायला.
पण जिथे गुन्हाच राक्षसी असतो
तिथे शिक्षाही जबरदस्त असणार

**पोलायमेस्टर :** थ्रेसवासियांनो ! ऐका माझी हाक
थ्रेसवासियांनो ! धावा तुमचे भाले घेऊन,
तुमची चिलखते, तुमचे अश्व घेऊन
थ्रेसच्या शूर वीरांनो ! ॲरिसच्या जिवलगांनो !, धावा
ग्रीकांनो ! मला मदत नाही करणार ?

ॲट्रिअसच्या मुलांनो, मला मदत करा।
धावा मदतीसाठी हाकारतो आहे मी!
चला, या! देवाची शपथ आहे तुम्हाला!
ऐकू येतो आहे ना माझा धावा!
तरीही कुणी येत नाही का?
आहात कुठे तुम्ही सारे?
या स्त्रियांनी मला ठार मारलं आहे हो!
पाहा! काय केलीय त्यांनी माझी अवस्था ती!
या स्त्रियांनी—या तुमच्या कैद्यांनी!
कुणाकडे वळू मी! कुठे जाऊ मी!

जेथे देदीप्यमान सिरिअस आणि ओरायन
आपल्या डोळ्यांतून प्रकाशझोत टाकताहेत
त्या, स्वर्गातील उच्च राजप्रासादापर्यंत
मला उड्डाण करता येईल तर—
कां, अधोलोकाच्या काळोख्या सीमारेषेजवळ
काळनदीमध्ये, हताश होऊन
बुडी घेणेच नशिबी आहे माझ्या?

**नारीवृन्द :** माणसाच्या वेदना जेव्हा ओलांडतात
सहनशक्तीच्या मर्यादा—
तेव्हा त्याने त्याच्या हतभागी जीवनाचा
एकदम शेवट करणे, हे क्षम्यच होय.

[ ॲगॅमेमनोन सेवकांसह प्रवेश करतो. ]

**ॲगॅमेमनोन :** मी एक भयकारी ओरडा ऐकला. डोंगरकपारीचे अपत्य, एको (प्रतिध्वनी) सबंध सेनातळामध्ये गोंगाट गाजवीत होती; गडबड गोंधळ उडवून देत होती. ग्रीक सैन्याने ट्रॉय सर केलेले आहे आणि तिच्या सर्व तटबंदी भुईसपाट झालेल्या आहेत याबद्दल जर आमची खात्री नसती तर या अशा कलकलाटाने भलताच घबराट फैलावला असता.

**पोलायमेस्टर :** आऽहा! माझा जीवश्चकंठश्च मित्र! ॲगॅमेमनोन! होय! मी ओळखतो तुमचा आवाज! पाहात आहात ना माझी काय अवस्था केलीय त्यांनी ती?

**ॲगॅमेमनोन :** अरेऽ! कोण? पोलायमेस्टर? कशामुळे झाली तुझी ही अशी अवस्था? अन् तुझे डोळे? कुणी केलं तुला आंधळं? आणि या मुलांना कुणी ठार मारलं? ज्यांनी

कुणी हे कृत्य केले असेल, त्यांना तुझ्याबद्दल आणि त्यांच्याबद्दल भयंकरच आकस असला पाहिजे!

**पोलायमेस्टर :** हेकॅबीचं हे कृत्य! हे सारं केलं तिने आणि तुमच्या या स्त्री कैद्यांनी. तिने ठारच केले आहे मला म्हणा ना! छे! ठार मारण्यापेक्षाही भयंकर! फार फार भयंकर!!

**ॲगॅमेमनोन :** काय? हेकॅबीने केले हे? खरं आहे का हे? अशक्य! हेकॅबी! तू स्वतः हे क्रूरकर्म पार पाडायचं साहस केलंस?

**पोलायमेस्टर :** काय? काय म्हणालात? हेकॅबी इथं माझ्याजवळ आहे? कुठाय, कुठाय ती? झटकन दाखवा मला. सांगा मला. माझ्या हातांची पकड पडू दे एकदा तिच्यावर! मग तिच्या देहाची लक्तरे लोळवून टाकतो मी.

**ॲगॅमेमनोन :** हं ऽ हं ऽ ऽ – सबूर! अरे, अरे – पुढे सरकू नकोस. आहेस तिथेच उभा रहा पाहू!

**पोलायमेस्टर :** देवाची शपथ आहे तुम्हाला – मला तिला पकडू द्या – भ्रमिष्ट होईन नाहीतर मी!

**ॲगॅमेमनोन :** हा हो! संयम बाळग जरा. आपण रानटी आहोत हे विसरून जरा सुसंस्कृतपणे वागा, आणि आपली बाजू मांडा. मी तुमचं आणि तिचं दोघांचेही क्रमाक्रमाने ऐकेन. आणि या परिस्थितीच्या मुळाशी असलेल्या कारणांचा योग्य तो न्याय-निवाडा करीन.

**पोलायमेस्टर :** मी सांगतो तुम्हाला सारं. हेकॅबीला एक मुलगा होता. पॉलिडोरस त्याचे नांव. हा तिचा सर्वात धाकटा मुलगा. ट्रॉय सर केले जाईल या भीतीने, माझ्या घरात सुरक्षित रहावा म्हणून प्रायमने त्याला ट्रॉयपासून दूर माझ्याकडे पाठवून दिला. ठीक! मी त्याला ठार मारलं. पण मी हे का केलं, किती अचूक शहाणपणाने मी वागलो, हे मी स्पष्ट करतो. मला अशी भीती वाटली, की हा मुलगा – तुमचा शत्रू – जर जिवंत ठेवला तर तो ट्रॉय रणकंदनातून बचावलेल्या माणसांना एकत्रित करील व ट्रॉयनगरीचे पुनवर्सन करील नि मग, प्रायमचा एक पुत्र अजून हयात आहे हे कळून आल्यावर ॲकिअन्स पुन्हा इथे सेना आणतील आणि सगळ्या ग्रेसभर चोरी लुटालूट करीत धुमाकूळ घालतील आणि मग आम्हा ट्रॉयच्या शेजाऱ्यांना आज ही सारी वर्षे जे सहन करावं लागलं तेच पुन्हा एकदा सहन करावं लागेल! ठीक! मग हेकॅबीला कळून आलं की आपला मुलगा मेला आहे मग, प्रायमच्या वंशजांनी साठवलेले सोने, ट्रॉयच्या भग्न अवशेषाखाली अद्यापही भरून ठेवलेले आहे अशा दंतकथा सांगून तिने मला इथे येण्याबाबत भुरळ पाडली – इतर कुणालाही माहीत होऊ नये म्हणून माझ्या दोन मुलांसह मला एकट्यालाच या तंबूत आणलं. तिथे कोचाच्या मध्यभागी मी अगदी आरामांत मोकळेपणाने बसलो होतो. आणि ट्रॉयमधल्या

त्या बायका, माझ्या अंगरख्याच्या खास थ्रेसमधील पोताचे, तो उंच उजेडात धरून कौतुक करीत, जणू काय मी त्यांचा सोबती आहे अशा थाटात, काही माझ्या डावीकडे व काही माझ्या उजवीकडे बसल्या होत्या. बाकीच्या माझ्या भाल्यांचे निरीक्षण करीत होत्या आणि याप्रमाणे माझ्या दोन्ही भाल्यांपासून मी दुरावलो होतो. त्यातल्या ज्या माता होत्या त्यांनी माझ्या मुलांना उचलून आपल्या बाहूंवर घेतले नि ती माझ्यापासून खूप दूर राहातील अशी खबरदारी घेत त्या मुलांचे कौतुक करीत त्यांना त्यांनी एकीकडून दुसरीकडे असे फिरविण्यास सुरुवात केली.

आणि मग अचानक– हे सारे सौम्य, साधे संभाषण चालू असताना कल्पना तरी येईल. तुम्हाला ?– त्यांनी आपल्या वसनांमधून कट्यारी उपसल्या नि माझ्या मुलांना भोसकले. त्यातल्या काही माझे बाहू आणि पोटऱ्या यावर जमावाने आडव्या पडल्या. मी, माझ्या मुलांच्या बचावासाठी जायची धडपड केली. मस्तक वर उचलले– पण त्यांनी माझ्या झिंज्या धरून मला खाली दाबून ठेवलं. माझे हात हलविण्याचा मी प्रयत्न केला, पण त्या वीस बायकांविरुद्ध मी काहीही करू शकलो नाही. अखेरीस– आणि पूर्वीच्या सर्व प्रकारा-पेक्षाही अत्यंत भयंकर– असे क्रूर कृत्य त्यांनी केले. त्यांनी आपल्या वस्त्रांना टाचलेल्या टोकदार पिना काढल्या व त्या माझ्या डोळयांत भोसकून, माझे डोळे छिन्न-भिन्न केले. अरेरे ! माझे हतभागी डोळे !

आणि मग त्या माझ्यापासून दूर पळून गेल्या. मी एखाद्या हिंस्र श्वापदासारखी उसळी घेतली नि त्यांच्यामागे धावलो– त्या रक्तपिपासू कुत्र्यांमागे– एखाद्या शिकाऱ्यासारखा, सभोवार कडाकडांनी शोध घेत, हाती लागेल ते गद्‌गदा हलवीत, ठोकीत. आणि ॲगॅमेमनोन, जो तुझा शत्रू होता, अशा एकाला ठार मारल्यामुळे तुझ्याच कार्यसिद्धीसाठी मला हे सारे भोगावे लागले.

थोडक्यात सांगायचं तर मी एवढंच म्हणेन– गतकालात पुरुषांनी स्त्रियांवर अपशब्दांचा जो वर्षाव केला आहे, किंवा ते सर्व, जे काही सांप्रत म्हणत आहेत अगर यापुढे नेहमीच म्हणत राहतील, त्याची गोळाबेरीज, मी एका वाक्यात करीन–

भूतलावर अगर सागरात
स्त्रियांसारखा दुसरा विलक्षण क्रूरकर्मा
अद्याप निपजलेला नाही.
आणि ज्यांचा स्त्रियांशी विशेष संबंध आलेला आहे
ते सारे हे चांगले ओळखून आहेत.

**नारीवृन्द :** तुला दुःख भोगावे लागते आहे
म्हणून काय तू एका सर्वसाधारण दोषारोपात

इतक्या बेमुर्वतखोरपणे
सर्वच स्त्रियांचा समावेश करावास ?

**हेक्यूबी :** ॲगॅमेमनोन ! माणसांच्या कृतींपेक्षा त्यांचे शब्दच नेहमी जास्त जोराने गर्जवित व मनात भरावेत हे खरोखरीच गर्हणीय आहे. खरे म्हणजे सत्कृत्यांनीच केवळ ती कर-णाराला वक्तृत्वाची देणगी बहाल करावी आणि दुष्कृत्यांनी फुसके, कुचके युक्तिवाद पांघरावेत, आपल्या वाक्पाटवाने आपल्या किळसवाणेपणाला सुंदर रंगाची झूब देऊ नये. पण अशा रंगदार वक्तव्याला आपल्या सराईतपणाला, उच्च सुसंस्कृत कलेचे स्वरूप देणारी माणसे आहेतही. त्यांची तथाकथित चलाखी दीर्घकाल टिकू शकत नाही. त्या सर्वांचे, अगदी एकाही अपवादाशिवाय, अखेरीस अधःपतन होतेच. तर ॲगमेमनोन, अशा प्रकारे इतका वेळ तुला उद्देशून मी बोलले. आता मी याच्याकडे वळते आणि अगदी एकेक घेऊन त्याच्या प्रत्येक मुद्द्याला उत्तर देते.

– तू म्हणतोस, ग्रीकांना दुसऱ्यांदा रणकंदनाचे श्रम पडू नयेत, ॲगमेमनोनच्या कार्यात मदत व्हावी म्हणून तू माझ्या मुलाला ठार मारलेस. आता पहिली गोष्ट म्हणजे तुझे जंगली राष्ट्र हेलासचे कधीतरी मित्र होऊ शकेल का ? दुसरी गोष्ट ग्रीकांना मदत करायचा हा अत्युत्कट उत्साह कुठून उपटला तुझ्यामध्ये ?

तुझा त्यांच्याशी काही आप्तसंबंध ! का तो तसा होण्याची तुला आशा होती ? – कदाचित काही विवाह योजना करून ? मग होतं तरी काय कारण ? ग्रीकांच्या दुसऱ्या चढाईने तुमच्या पिकांची नासाडी झाली असती असे तू म्हणतोस ? अरे कुणाला हे पटवून देऊ शकशील अशी कल्पना आहे तुझी ? खरं ते सांगायला का तयार होत नाहीस ?

अरे माझ्या मुलांचा बळी गेला सुवर्णामुळे – सुवर्ण व त्याबद्दलची तुझी हाव यामुळे माझ्या मुलाला आपला प्राण गमवावा लागला ! चल, सांग हे सगळं स्पष्ट करून. जेव्हा ट्रॉय सर्व शक्तिमान होते, सगळीकडून रुंद तटबंदीने संरक्षिले जात होते, प्रायम अद्याप जिवंत होते व हेक्टरची विजयी समशेर तळपत होती – जेव्हा माझा मुलगा तुझ्या घरात अतिथी म्हणून राहात होता – तुला जर ॲगॅमेननोनची खुशामत करून त्याची मर्जी मिळवायची तळमळ होती तर त्याच वेळी का रे तू त्याला ठार मारलं नाहीस ? किंवा जिवंतपणीच त्याला ग्रीकांच्या हवाली का केला नाहीस ? पण आम्ही जेव्हा विपदेच्या तिमिरात कोसळलो, ज्या वेळी ट्रॉयवरील धूमशिखांनी आमच्या शत्रूचा विजय उद्घोषित केला, त्याच वेळी तुझ्या घराच्या उबदार आश्रयात विसावलेल्या अतिथीला तू ठार केलंस.

एवढ्यानेच सर्व संपलंय असे नाही. तुझा दुष्टपणा सिद्ध करायला आणखीही काही आहे इथे. हे सोने, जे माझ्या मुलाच्या मालकीचे आहे, तुझे नाही असे तूच कबूल करतोस, ते सोने – तू जर ग्रीकांचा खराच मित्र असशील तर ते घेतल्यानंतर तू ते त्यांनाच नेऊन द्यायला हवं होतंस; घरापासून इतके दिवस दूर असल्याने त्यांनाच त्याची अधिक गरज

होती. पण छे ! तसे तू केले नाहीस – अजूनसुद्धा ते आपल्या हातून जावे ही कल्पना तुला सहन होत नाहीय. ते अद्यापही तुझ्याच घरात आहे. अरे, असे पाहा – समज, माझ्या मुलाला द्यायला हवी होती ती माया आणि त्याची घ्यायला पाहिजे होती ती काळजी तू जर दिली घेतली असतीस तर – जेव्हा स्नेहीसोबती सवंग असतात अशा वैभवाच्या कालखंडात नव्हे तर, पराजय आणि सर्वनाश अशा परिस्थितीत – तर ज्याने आपले मोल दाखवून दिले, असा एकनिष्ठ मित्र म्हणून प्रत्येकाने तुझी स्तुतिस्तोत्रे गायिली असती आणि माझा पुत्र ! जर तू दारिद्र्याच्या गर्तेत पडला असतास आणि तो सधन असता तर तो तुझ्या सहाय्याला उभा ठाकला असता आणि तुझ्या गरजांना पुरा पडला असता एखाद्या भरगच्च भांडारासारखा. पण आता पॉलिडोरस तुझा मित्र राहिलेला नाही. त्या सुवर्णाचाही आता तू उपयोग करून घेऊ शकत नाहीस. तू तुझ्या पुत्रांना अंतरला आहेस आणि आंधळा होऊन बसला आहेस. ॲगमेमनोन ! जर तुम्ही या माणसाला मदत करणार असाल तर तुम्ही एका धर्मलंड, प्रतिज्ञाभंजक आणि भ्रष्ट राजद्रोह्याला मदत केल्यासारखे होईल आणि अशा प्रकारे दुरिताला उचलून धरून तुम्ही आपले उज्ज्वल नाव कलंकित कराल – पण – तुम्ही माझे धनी आहात तेव्हा मी माझ्या शब्दांचा वापर, संयमाने केला पाहिजे.

**नारीवृन्द** : कार्य सच्चे असले म्हणजे ते आपल्या प्रामाणिक वकिलीला हवा तेवढा युक्तिवाद पुरवते.

**ॲगमेमनोन** : अन्य माणसांच्या दुष्कृत्यांचा न्यायनिवाडा करणे हे मला त्रासदायक व कंटाळवाणे वाटते. पण तरीही यावेळी मला तो करायलाच हवा. हे सारे ऐकून घेण्याची जबाबदारी एकदा स्वीकारल्यावर बाईटपणा घेतल्याशिवाय ती मी अंगाबाहेर टाकू शकत नाही. म्हणून, पोलायमेस्टर, मी हा असा न्यायनिवाडा करतो. प्रथम म्हणजे, तू तुझ्या अतिथीला ठार मारलेस ते माझ्याकरिता किंवा ग्रीकांसाठी नाही तर तुला हे सुवर्ण स्वतः-च्याच घरात ठेवून घेता यावे म्हणून. आत्ताच्या कठीण परिस्थितीत सापडल्यामुळेच तुला हा वरवर तर्कशुद्ध वाटणारा, फसवा, बचावाचा युक्तिवाद सुचला. अतीथिला जीवे मारणे ही बाबत थ्रेसमध्ये कदाचित मामुली समजली जात असेल, पण हेलासमध्ये आम्ही त्या गोष्टीला एक अत्यंत नीच, घृणास्पद गुन्हा समजतो. तुला जर निर्दोषी म्हणून मी जाहीर करीन, तर मी स्वतःच दोषी ठरेन. तुझा गुन्हा अत्यंत किळसवाणा होता. परिणामी तुझ्या वाट्यास आलेला कर्मभोग तुला सहन करायलाच हवा.

**पोलायमेस्टर** : माझा कर्मभोग ! वा रे कर्मभोग ! ! एका स्त्रीकडून तुडवले जाणे – तिच्याकडून स्वतःवर अत्याचार करून घेणे ? एक राजा मी – आणि मला मान तुकवावी लागावी, एका गुलामगिरीत रुतलेलीच्या सुडबुद्धीपुढे !

**हेकॅबी** : तुझ्या दुष्टपणामुळेच ही शिक्षा तुझ्या वाट्याला आली आहे व ती न्यायच आहे.

**पोलायमेस्टर :** हाय रे! ठार झालेली माझी गरीब बिचारी मुले! हाय रे माझे निकालात निघालेले डोळे!

**हेकॅबी :** तुला यातना भोगाव्या लागताहेत! मग, त्याचं काय एवढं मोठं? मी नाही सोसतेय माझ्या मुलासाठी यातना?

**पोलायमेस्टर :** रक्तलांच्छित हडळी! माझी विटंबना करण्यात गंमत वाटते तुला?

**हेकॅबी :** मी तुला योग्य ते शासन करू शकले आहे, म्हणून माझा आनंद रास्तच आहे.

**पोलायमेस्टर :** फार काळ टिकणार नाही तो आनंद! सागर बसला आहे दबा धरून तुझ्यासाठी!

**हेकॅबी :** मला हेलासकडे घेऊन जाण्यासाठी ना?

**पोलायडोरस :** छे! डोलकाठीवरून अधोमुख होऊन तू खाली कोसळशील तेव्हा तुला पोटात घ्यायला.

**हेकॅबी :** आणि ही असली पिसाट उडी मारायला कोण भाग पाडणार आहे मला?

**पोलायमेस्टर :** दुसरं कोण कशाला? तू स्वतः होऊनच डोलकाठीच्या टोकापर्यंत चढून जाशील.

**हेकॅबी :** ती कशी काय? मला काय पंख फुटणार आहेत?

**पोलायमेस्टर :** वटारलेल्या पिंगट डोळ्यांची एक कुत्री होशील तू.

**हेकॅबी :** माझे रूपांतर अशा प्रकारे होईल हे तुला कळले कसे?

**पोलायमेस्टर :** थ्रेसमध्ये आमचा एक भविष्यवेत्ता आहे – डायोनिसस नावाचा— त्याने सांगितले मला.

**हेकॅबी :** आज तुझी काय स्थिती होणार आहे याबाबतची पूर्वसूचना त्याने तुला दिली नाही?

**पोलायमेस्टर :** नाही ना! अन्यथा ह्या फसव्या कृतीने इतक्या सहजासहजी तुझ्या जाळ्यांत मी फशी पडलो नसतो.

**हेकॅबी :** आणि मी एकदम मरेन का माझे ते तसले आयुष्य जगत राहीन?

**पोलायमेस्टर :** तू मरशील. तुझं थडगं तुझ्या नावाने ख्यातनाम होईल.

**हेकॅबी :** माझ्यातल्या स्थित्यंतराचा उल्लेख असेल त्या नावात?

**पोलायमेस्टर :** सिनॉसेमा कुत्रीचे थडगे, खलाशांसाठी एक मार्गदर्शक खूण.

**हेकॅबी :** मी कशाचीही पर्वा करीत नाही. माझा सूड घेऊन झाला आहे.

**पोलायमेस्टर :** आणखीही आहे सांगण्यासारखे! कॅसेन्ड्रासुद्धा ठार मारली जाईल!

**हेकॅबी :** नाही! कधीही नाही असं होणार!! हे असले शब्द, देव तुझ्याच बाबतीत खरे करोत.

**पोलायमेस्टर :** अस्वस्थ, तळमळत, घरी वाट पाहात असलेली ॲगॅमेमनोनची पत्नीच

तिला ठार करील.

**हेकॅबी :** देवच आळा घालोत अशा माथेफिरूपणाला!

**पोलायमेस्टर :** ती आपली कुन्हाड उंच उचलील आणि ॲगॅमेमनोनलाही ठार करील.

**ॲगॅमेमनोन :** ए! अरे वेड लागलं की काय तुला! का आणखी जास्त शिक्षा व्हायला हवीय?

**पोलायमेस्टर :** मला मारा ठार! पण रक्ताचा पूर वाहवणारे पापविमोचन वाट पाहातंय तुमची ॲरगॉसमध्ये!

**ॲगॅमेमनोन :** सैनिकांनो.– धरा याला, घेऊन जा इथून दूर!

**पोलायमेस्टर :** भविष्यात डोकावल्याने संतोष नाही वाटत तुम्हाला?

**ॲगॅमेमनोन :** बोळा कोंबा यांच्या थोबाडात!

**पोलायमेस्टर :** करा बंद माझे तोंड! मला बोलायचं होतं, ते मी बोलून घेतलंय.

**ॲगॅमेमनोन :** घेऊन जा त्याला तावडतोब आणि द्या फेकून एखाद्या निर्जन बेटावर! असह्य झाला आहे त्यांचा उर्मटपणा!

[ संरक्षक पोलायमेस्टरसह जातात. ]

दुर्दैवी हेकॅबी! जा आता नि दे मूठमाती तुझ्या दोघा मुलांना – तुम्ही इतर स्त्रिया! प्रत्येकीने आपल्या नव्या धन्याच्या तंबूत जावे. आम्हाला घरी न्यायला अनुकूल असा वारा सुटू लागला आहे असे दिसते. देव करो आणि आमची आता सर्व अडचणींतून सुटका होवो. निर्विघ्न प्रवास होवो आणि अखेरीस स्वगृही आम्हाला सुख व शांती लाभो!!

**नारीवृन्द :** सख्यांनो! जायला हवं आपल्याला आता
बंदरावर आणि ग्रीकांच्या तंबूत
सुरू होणार आहेत
आपले दास्यातील दुःखकष्ट आता
आपल्या प्रारब्धानेच लोटलं आहे आपल्याला याच्यात
प्रारब्धाचा मुकाबला कोणीच करू शकत नाही
बायांनो!

[ सर्व जातात ]

# हेकॅबी ( टिपणे )

## युरायपिडीजच्या हेकॅबी या शोकांतिकेतील व्यक्ती व स्थलांबाबतची माहिती

**(१) हेकॅबी :** ( Hecabe ) सर्वसाधारणपणे हेक्यूबा ( Hecuba ) या नावाने परिचित; मात्र ग्रीकमध्ये हेकॅबी म्हणूनच ओळखली जाते. ट्रॉयचा राजा प्रायम याची ही पट्टराणी. हेक्टरची आई. काहींच्या मते हेकॅबी ही फ्रीजियाचा राजा डायमस ( Dymas ) याची कन्या. ट्रॉयचा पाडाव झाला आणि प्रायमला ठार करण्यात आल्यावर ग्रीकांनी तिला कैद केले. युद्ध चालू असताना तिचा एक मुलगा पॉलिडोरस याला आश्रयासाठी थ्रेसचा राजा पोलायमेस्टर याच्याकडे धाडण्यात आले होते. वेळी उपयोग व्हावा म्हणून त्याच्याबरोबर सुवर्णसाठाही पाठविला होता. पण पोलायमेस्टर विश्वासघातकी निघाला. सुवर्णसाठ्याच्या लोभाने त्याने पॉलिडोरसला ठार मारले. लाडकी लेक पोलायक्झेना व एकमेव हयात असणारा पुत्र पॉलिडोरस गेल्यावर शोकाकुल झालेल्या या राणीने मोठ्या धैर्याने शोक आवरून पोलायमेस्टरवर सूड उगवला. त्याचे डोळे फोडले व त्याचे दोन्ही पुत्र ठार मारले. सूड उगविल्याचे समाधान मिळालेल्या या दुर्दैवी राणीची अखेर फार वाईट झाली. पिंगट डोळ्यांच्या एका गुरगुरणाऱ्या कुत्रीत तिचे रूपांतर झाले व गलबताच्या डोलकाठीवरून पडून तिला मृत्यू आला कुत्रीच्या रूपातील तिची समाधी गॅलिपोली ( Gallipoli ) द्वीपकल्पाच्या पूर्वेस आहे. ती समाधी मार्गदर्शक खूण म्हणून खलाशांना उपयोगी पडत असे.

**( २ ) ॲकिलीज :** ( Achilles ) हा पेलिअस व थेटीस यांचा पुत्र. ॲगेमेमनोनच्या सेनेतील सर्वांत शूर, देखणा आणि चपलगती वीर. होमरच्या वर्णनानुसार त्याच्या आईने त्याचे व त्याचा चुलतभाऊ पेट्रोक्लस ( Patroclus ) यांचे एकत्रच संगोपन केले. त्याच्यावर फिनिक्स ( Phoenix ) व चेअरोन ( Cheiron ) या शिक्षकांनी संस्कार केले. त्याशिवाय त्याच्याबद्दल काही पारंपरिक दंतकथाही प्रचलित आहेत. त्या दंतकथांनुसार त्याची आई थेटीस ही जलदेवता होती. तिला सात अपत्ये होती या मुलांना अमर करावे यासाठी तिने प्रत्येकाला अग्नीत व कढईत टाकले होते. पण दुर्दैवाने सहाही अपत्ये मेली व एकटा ॲकिलीज वाचला. तोही आयत्यावेळी त्याच्या वडिलांनी म्हणजे पेलिअसने आपल्या पत्नीच्या या राक्षसी कृत्याला विरोध केला म्हणूनच.

दुसरी कथा अशी की त्याच्या आईने म्हणजे थेटीसने त्याला स्टिक्स ( Styx ) नदीच्या पाण्यात बुडविले, त्यामुळे तो अजिंक्य झाला. पाण्यात बुडविताना तिने त्याच्या टाचा फक्त हातात धरल्या होत्या, त्यामुळे पाण्यात न बुडालेल्या त्याच्या टाचा मात्र अजिंक्य होऊ शकल्या नाहीत. ' ॲकिलीजच्या टाचा ' ( Heel of Achilles ) हा वाक्प्रचार त्यावरूनच

आला असावा.

आणखी एक आख्यायिका अशी की, आपला मुलगा ॲकिलीज हा ट्रॉयच्या लढाईत मारला जाईल अशी भविष्यवाणी पेलिअसला कळली होती. त्यामुळे त्याने व थेटीसने ॲकिलीजला लिकॉमिडीज (Lycomedes) राजाच्या दरबारी पाठविले व त्या ठिकाणी त्याला स्त्री वेषात राजकन्यांमध्ये रहाण्यास सांगितले. पण हेलनचा एक प्रेमिक युलिसीस याला ही बातमी लागताच तो स्वतः एका व्यापाऱ्याचे सोंग घेऊन लिकॉमिडीजच्या दरबारी गेला. उंची उंची वस्त्रे पहाणाऱ्या राजकन्यांच्या समूहात स्त्री वेषातील ॲकिलीजही होताच. युलिसीसने उंची कापडासमवेत सहज म्हणून काही शस्त्रे बरोबर आणली होती. स्त्रीवेषातल्या ॲकिलीजला कसे स्वस्थ बसवणार? त्याने ती शस्त्रे निरखून पाहायला सुरुवात केली. युलिसीसने तत्काळ त्याला ओळखले व समजुतीचे चार शब्द सांगून त्याला तो समरभूमीवर घेऊन गेला.

ट्रॉयचे महायुद्ध नऊ वर्षे चालले होते. दोन्ही बाजूंनी आळीपाळीने हारजीत होत होती. अंतिम निकाल कोणाच्या बाजूने हे सांगता येत नव्हते. अशाच वेळी ग्रीक सेनेचा प्रमुख ॲगॅमेमनोन व ॲकिलीज यांच्यात वितुष्ट आले. होमरच्या 'ईलीअड' हा महाकाव्याचा प्रारंभ या वितुष्ट प्रकरणापासूनच आहे. ट्रॉयजवळील गावांच्या लुटीत ॲगॅमेमनोनच्या वाट्याला क्रिसीस या नावाची देखणी तरुणी आली होती. क्रिसीसचा बाप हा ॲपोलोचा महान भक्त होता. त्याने विनंती केल्यावरून ॲपोलोने स्पार्टन सैन्यात एक भयंकर साथ सुरू केली. ही साथ थांबवावयाची असेल तर एकच उपाय, तो म्हणजे ॲगमेमनोनने क्रिसीसला तिच्या वडिलांकडे परत पाठवावी, असा सल्ला ॲकिलीजने दिला. ॲगमेमननोत त्याप्रमाणे क्रिसीसला तिच्या वडिलांकडे पाठविण्यास तयार झाला पण त्याबद्दल ॲकिलीजने लुटीत मिळविलेली ब्रीसीस (Brises) त्याला द्यावी या अटीवर. ॲकिलीज या गोष्टीला तयार नव्हता, पण त्याला सर्वांच्या आग्रहाला मान द्यावा लागला. 'अतःपर युद्धात भाग घ्यायचा नाही' असे ठरवून त्याने ब्रिसीसला ॲगमेमनोनच्या हवाली केले.

आपल्या मुलाचा हा अपमान त्याची आई थेटीस हिला आवडला नाही. तिने झ्यूसकडे जाऊन स्पार्टन लोकांचा पराभव करण्यास त्यास भाग पाडले. पराभूत स्पार्टन जहाजांच्या आश्रयाला आले. शेवटी जय हवा तर ॲकिलीज हवा. युलिसीससारख्यांनी प्रयत्न करूनही ॲकिलीज दाद देईना. स्पार्टन सैन्य पराभूत होत होते. शेवटी नेपच्यूनच्या कृपेने कॅल्चस (Calchas) नावाच्या भविष्यवेत्त्याने स्पार्टन सैन्यात प्रवेश केला व त्यांना उज्ज्वल भविष्य सांगून त्यांच्यात वीरश्री उत्पन्न केली. शेवटी ॲकलीजचा स्नेही पेट्रॉक्लस याने ॲकिलीजचे मन वळविले पण ॲकलीज स्वतः गेलाच नाही त्याने आपले चिलखत व सैन्य त्याला दिले पुढे रणमैदानात पेट्रॉक्लस ठार झाला. तेव्हा आपला मित्र शत्रूंनी मारला याचा संताप येऊन ॲकिलीज स्वतः रणांगणावर गेला व हेक्टरला ठार मारून त्याने मित्राच्या

वधाचा सूड उगवला.

प्रायमची एक कन्या पोलायक्‌झेना ही अतिशय देखणी होती. ॲकिलीज तिच्यावर अनुरक्त होता. त्या दोघांचे ॲपोलोच्या देवळात विवाहासंबंधी बोलणे चालू असता संधी साधून पॅरिसने ॲकिलीजच्या टाचेवर एक विषारी बाण मारला. ॲकिलीजचा तेवढाच भाग अमर नसल्याने विषारी बाणांचा परिणाम होऊन ॲकिलीज मरण पावला. पण पुढे पिशाच्च योनीत गेल्यावर त्याने थ्रेसजवळून सागरप्रवास करणाऱ्या ग्रीक सेनेस अडवून धरले व ग्रीक सेनेने ट्रॉयहून आणलेल्या कैदी स्त्रियांत तरुण पोलायक्‌झेना होती, तिचा बळी मागितला व स्पार्टन लोकांनी तो दिला.

( ३ ) **ॲकिअन्स** : ( Acheans ) म्हणजे प्राचीन ग्रीक. यांच्या उत्पत्तीबद्दल म्हणजे यांचे अस्तित्व केव्हापासून हे सांगता येत याही. होमरच्या म्हणण्याप्रमाणे ॲकिअन्स म्हणजे थेसली ( Thessally ) च्या उत्तरेकडील ग्रीक. पण प्राचीन काळात कोरिन्थ ( Corinth ) चे आखात व अर्काडिया ( Arcadia ) पर्वतरांगा यांच्यामधील पेलोपेनिसस ( Peloponesus ) चा उत्तर किनाऱ्यावरील जमिनीच्या एका तुकड्यात रहाणाऱ्या रहिवाशांपुरताच यांचा निर्देश केला जाई.

Pellene, Aegira, Aegae, Bura, Helice, Aegium, Rhypae, Patrae, Pharae, Olenus, Dyme & Tritaca या बारा राष्ट्रांनी परस्पर संरक्षणाच्या हेतूने एका समाईक राष्ट्रसंघाची स्थापना केली. ॲकिअन्सने म्हणावा तसा उत्साह दाखविला नाही. पुढे Corinth, Megaris, Epidaurus, Troezen & Sparta यांनीही या राष्ट्रसंघात प्रवेश केला व हा राष्ट्रसंघ ग्रीसमध्ये एक प्रबल राजकीय सत्ता म्हणून ओळखला जाऊ लागला. पण पुढे ख्रिस्तपूर्व १४६ मध्ये रोमन सैनिकांनी ॲकिअन सेनाप्रमुखाचा पराभव करून राष्ट्रसंघाचे त्या काळातले प्रमुख ठिकाण कोरिन्थ हे जाळून बेचिराख केले. त्यानंतर दक्षिण ग्रीसचा हा भाग रोमन साम्राज्यात एकिआ प्रांत म्हणून ओळखला जाऊ लागला.

( ४ ) **ट्रोजन** ( Trojans ) : ट्रॉय, इलियम किंवा ट्रोड ( Troy, Ilium or Trod ) या नावाने ओळखले जाणारे ख्यातनाम शहर; एशियामायनरमधील मिसिआ ( Mysia ) चा वायव्येकडील भाग. ट्रॉयचे रहिवाशी ते ट्रोजन.

प्राचीन दंतकथेप्रमाणे या देशाचा सर्वांत प्राचीन राजा ट्युसर ( Teucer ); त्यांच्या नावावरूनच ट्रोजन्सना Teucri किंवा Teucriceus म्हणून म्हणण्यात येत असे. त्याच्या मुलीने शेजारच्या डार्डानस ( Dardanus ) नावाच्या एका शूर पुरुषाशी विवाह केला, त्यामुळे ट्रोजन्स हे डार्डानीड ( Dardanide ) म्हणजे डार्डानसचे मुलगे म्हणून ओळखले जाऊ लागले. डार्डानस हा ट्रॉसचा आजोबा. ट्रॉसचा मुलगा इलस ( Ilus ) यानेच इलियम किंवा ट्रॉय हे शहर अस्तित्वात आणले. ' ट्रोड ' मधले हे सर्वांत मोठे शहर होते व

त्याची संरक्षण व्यवस्थाही भक्कम होती. इलस नंतर लाओमेडन ( Laomedan ) हा ट्रॉयचा राजा झाला. राजा प्रायम हा याचाच पुत्र.

प्रायमच्या कारकीर्दीतच ट्रॉयचे सुप्रसिद्ध युद्ध झाले. स्पार्टाचा राजा मिनिलास याच्या पत्नीला प्रायमचा मुलगा पॅरिस याने पळविले व तिला घेऊन तो ट्रॉयमध्ये आला. त्यावरून भडकलेले हे महायुद्ध जवळजवळ दहा वर्षे चालले होते. कधी स्पार्टन जिंकत तर कधी ट्रोजन्सची सरशी होई. असे होताहोता अखेरीस ट्रॉयचा पाडाव होऊन ट्रोजन्स संपूर्णपणे हरले. हेक्टर, पॅरिस व इनिअस या ट्रोजन वीरांनी या युद्धात भीमपराक्रम केला.

ट्रॉयच्या लढ्याची ही कथा होमरच्या इलिअड या महाकाव्याचा विषय आहे. यातील काही भाग व्हर्जिलच्या इनिइडमध्ये घेतलेला आहे.

हेक्टर हा सर्वांत श्रेष्ठ पुरुष. इतका उदात्त पुरुष सर्व ट्रोजन युद्धात आढळून येत नाही. आपला भाऊ पॅरिस याने दुसऱ्याची पत्नी पळवून आणून अत्यंत अन्यायी गोष्ट केली आहे. त्यामुळे आपल्या बाजूला कधीही जय मिळणार नाही असे त्याला वाटत होते. हेक्टरशिवाय इनिअस, डायफॉबस, ग्लॅास, सर्पेडान्स आदी ट्रोजनवीर प्रायमच्या सेनेत ट्रॉयकडून लढत होतेच.

( ५ ) **हेलेनस** ( Helenus ) : ग्रीक दंतकथेनुसार हेलेनस हा ट्रॉयचा राजा प्रायम व राणी हेकॅबी यांचा पुत्र. तो हेक्टरचा भाऊ आणि भविष्यवादिनी केसान्ड्राचा जुळा भाऊ. त्याचे वर्णन होमरने एक योद्धा व भविष्यद्रष्टा म्हणून केले आहे. अशीही दंतकथा आहे की तो व त्याची बहीण कॅसान्ड्रा ही दोघेही ॲपेलोच्या देवालयात गाढ झोपलेली असताना काही दैवी नाग तिथे आले व त्यांनी त्या दोघा बहिणभावांचे कान चाटून पुसून स्वच्छ केले. त्यामुळे त्यांना भविष्य कळू लागले. तसेच पक्ष्यांची भाषाही त्यांना कळू लागली. ट्रॉयचा पाडाव होण्यासाठी तीन गोष्टींची आवश्यकता आहे असे त्याने ग्रीकांना सांगितले होते. त्या तीन गोष्टी म्हणजे ( १ ) ॲथिनी देवतेची ट्रॉयमधील मूर्ती ( मिनर्व्हाचा 'पॅलेडियम' नावाचा पुतळा ) ( २ ) हर्क्युलसचे धनुष्य व ( ३ ) ॲकिलीजचा मुलगा नोप्टोलेमस याचे साहाय्य.

अशी दंतकथा आहे की ( Neohtolemus ) ग्रीकांना मिळाला व लाकडी पोकळी घोडा तयार करण्यासाठी त्यानेच स्पार्टन्सना सांगितले. ट्रॉयच्या पाडावानंतर तो व हेक्टरची विधवा पत्नी या दोघांनाही नोप्टोलमसने कैद केले. मग ते ( Epirus ) एपिरस येथे गेले. तिथे नोप्टोलेमच्या मृत्यूनंतर हेलेनसने हेक्टरच्या पत्नीशी म्हणजे ॲन्ड्रोमेके इच्याशी पुनर्विवाह केला व त्या देशाचा तो राजा झाला.

( ६ ) **कॅसान्ड्रा** : ( Cassandra ) ट्रॉयचा शेवटचा राजा प्रायम व त्याची राणी हेकॅबी यांची ही कन्या. ॲपोलोचे तिच्यावर प्रेम होते व भविष्य जाणण्याची शक्ती आपण तुला देऊ' असे त्याने तिला वचन दिले होते, पण त्यासाठी तिने त्याची इच्छा पूर्ण

करायला हवी होती. कॅसान्ड्राने त्या गोष्टीला संमती दिली. भविष्य जाणण्याची विद्या आधी हस्तगत केली व मग त्याच्या इच्छेला वाटाण्याच्या अक्षता लावल्या. ॲपोलो भयंकर संतापला व त्या भरात 'तुझ्या भविष्यावर कुणीही विश्वास ठेवणार नाही' असा शापही त्याने तिला दिला. ट्रॉयच्या पाडावानंतर ॲजेक्स नावाच्या स्पार्टन योद्ध्याने अॅथिनीच्या देवालयात तिच्यावर पाशवी अत्याचार केले. युद्धातील लूट वाटून घेताना ती ग्रीक सेनेच प्रमुख ॲगॅमेमनोन याच्या वाट्याला आली व पुढे त्याच्या पहिल्या पत्नीकडून त्याच्याबरोबर ठार केली गेली. अपोलोबरोबर अलेक्झांड्रा या नावाने तिचीही पूजा करण्यात येत असे.

(७) **ओडीसिअस** (Odysseus) हा होमरच्या काव्यात युलिसिस या नावाने उल्लेखिलेला आहे. बुद्धिमत्ता, अनुभव, सहनशीलता व समयसूचकता हे याचे विशेष गुण. स्पार्टाचा राजा इकेरिअस याची नीतिमान कन्या पेनिलोपी ही त्याची पत्नी. तिच्या सहवासात तो इतका रमला होता की, हेलनच्या संकटकाळी तिला मदत करण्यात ज्या तरुणांनी एक दिलाने शपथ घेतली होती त्या तरुणात हा ओडीसिअस तथा युलिसिस प्रमुख असूनही पत्नीच्या प्रेमाने तो युद्धावर जाण्याची टाळाटाळ करू लागला. त्याने वेड्याचे सोंग घेतले पण ते उघडकीस आले. शेवटी तो स्पार्टन वीराकडून ट्रॉयविरुद्धच्या लढाईत सामील झाला व त्याने भीमपराक्रम केला. ॲगॅमेमनोन व ॲकिलीज यांच्या भांडणात परिस्थिती ओळखून त्याने ॲगॅमेमनोनला सहाय्य केले. ॲकिलीजच्या मृत्यूनंतर त्याचे चिलखत ओडिसिअसला मिळाले. शिष्टाईची बोलणी करण्यात अनुभवी माणूस म्हणून त्याला विशेष मान होता. 'हेकॅबी' या नाटकात मात्र त्याची भूमिका काहीशी पाषाणहृदयी राजकारणी व्यक्तीसारखी आहे.

(८) **पर्सेफॉनी** (Persephone) : ही प्रॉसर्पिना म्हणूनही ओळखली जाते. अधोलोकाचा राजा हेडीज म्हणजेच प्लूटो याने तिला आपल्या राज्यात पळवून नेली. तिची आई डिमीटर हिने मुलगी परत मिळत नाही असे पाहून पृथ्वीवर सगळीकडे दुष्काळ पाडला, त्यामुळे भुकेने माणसे मरणार असे दिसू लागले. अशा वेळी झ्यूसने मध्यस्थी करून प्रॉसर्पिनाला भूतलावर पाठविण्यास सांगितले. प्लूटोने संमती दिली पण ती अशी, की तिने आईबरोबर सहा महिने पृथ्वीवर राहावे व सहा महिने नवऱ्याबरोबर पाताळात राहावे.

(९) **हेलास** (Hellas) : ड्युकेलिऑन व त्याची पत्नी पिऱ्हा (Deucalion & his wife Pyrrha) यांनी जे मानव निर्माण केले ते हेलेनीज या नावाने ओळखले जातात. त्याचे वास्तव्य असलेल्या प्रदेशाला हेलास म्हणतात. ग्रीकांचा वंश या हेलेनीज पासूनच. पुढे ज्या ज्या ठिकाणी ग्रीकांनी वसाहती उभारल्या त्या सर्वांना हेलास अशी संज्ञा आहे. हा भाग म्हणजे सर्वसाधारणपणे दक्षिण थेसलीचा प्रान्त.

(१०) **फेअर-वेल** (Fare-Well) : पोलायक्झेनाचा बळी देण्याचे निश्चित होते. बळी जायला निघण्यापूर्वी ती, आईचा म्हणजे राणी हेकॅबीचा अखेरचा निरोप घ्यायला येते.

ती सर्वांची आठवण करते. तेव्हा राणी हेकॅबी तिला सांगते, 'ठीक आहे, तू प्रेमाचा अखेरचा निरोप दिलास, फेअर-वेल म्हणालीस, त्यांचे तुझ्या इच्छेप्रमाणे भले होईल'. ( Fare-Well चा अर्थ 'तुमचे भले होवो' असाही होतो. ) पण तुझे भले होवो ' हे तुझे शब्द माझ्या लेखी कसे खरे ठरणार ?' Fare well – निरोप घेताना म्हणतात. Goodbye प्रमाणे त्याच्या शब्दशः अर्थावर – तुमचे भले होवो – ही कोटी आहे.

**थेसिली** ( Thessaly ) : प्राचीन ग्रीसचा सर्वात मोठा भाग, पीनीअस ( Peneus ) नदी व तिचे कालवे यांनी थेसिली प्रान्ताला पुरेसे पाणी मिळते. अंदाजे लांबी ७० मैल. सर्व बाजूंनी संरक्षणासाठी डोंगराची रांग उभी आहे. ईशान्य भागात ओसा ( Ossa ) हा ऑलिम्पसपासून विभागला जातो तिथे फक्त टेम्पे ( Tempe ) या नावाची खिंडीसारखी एक डोंगराळ वाट आहे.

**पेलेपोनीज** ( Peleponnese ) : म्हणजे पेलोप्सचे बेट. याला मोरिआ ( Morea) असे म्हणतात. ग्रीसचा दक्षिण भाग. मुख्य शहरे स्पार्टा व ॲड्गॉस, पत्रास ( Patras ) हे मुख्य बंदर. क्षेत्रफळ : ८३५४ चौ. मैल. लोकसंख्या १,१२९,०००.

(१३) **लेटो** (Leto) : ही कोअस ( Coeus ) व फीबी ( Phobe ) यांची कन्या व ॲपोलो आणि आर्टीमिसची आई. लेटोला झ्यूसपासून दिवस राहिले. त्यानंतर तिला प्रसूतीसाठी योग्य अशी जागा हवी होती. खूप भटकल्यावर ती डेलॉस ( Delos ) या निर्जन बेटावर आली. हे बेट म्हणजे एक फिरता खडक होता. पण मग सदर बेट समुद्राच्या तळाशी स्थिर करण्यात आले व मग यथाकाली लेटोने ॲपोलो व आर्टीमिस यांना जन्म दिला. डेल्फी या नगराची स्थापना याच वेळी झाली. टेम्पे आणि डेल्फी या पवित्र मार्गावर टायटन्स दैत्यांनी लेटोला खूप त्रास दिला पण त्या सर्व दैत्यांना ॲपोलो व आर्टीमिस यांच्या अमोघ बाणांनी पळून जावे लागले.

(१४) **डेलॉस** ( Delos ) : तीन मैल लांबी व दीड मैल रुंदीचे एक छोटेसे बेट. त्याचे सांप्रतचे नांव Mikra Dili.

आख्यायिका अशी की, हे बेट एकाएकी पाण्यावर उठून आले व तरंगत राहिले. झ्यूसने या बेटाला सागरात स्थिर केले व याच बेटावर लेटोची प्रसूती व्हावी असे निश्चित करण्यात आले. याच बेटावर ॲपोलो व आर्टिमिस यांचा जन्म झाला. ॲपोलोच्या भक्तांना ही जागा फार पवित्र वाटते.

(१५) **पॅलस** ( Pallas ) : ग्रीक देवता ॲथीना हिचे एक गौरवात्मक नाव, बहुशः कुमारिका या अर्थाचे.

(१६) **ॲथीना** ( Athena ) : पॅलस ॲथीना किंवा नुसतीळ पॅलस या नावाने सर्वसाधारणपणे ओळखली जाणारी ग्रीक देवता. ही झ्यूसची मुलगी. हिच्या आईचे नाव मेटिस ( Metis ). झ्यूसने ॲथीनाच्या आईला म्हणजे मेटिसला गिळून टाकले; पण नंतर सशस्त्र

अशी ॲथीना झ्यूसच्या मस्तकातून अवतरली.

ॲथीनाचे विशेष महत्त्व म्हणजे –

( १ ) ती अथेन्सची हितकर्ती व संरक्षक होती.

( २ ) तिचा जन्म झ्यूसच्या मस्तकातून झाला यामुळेही असेल पण ती ज्ञान, शहाणपण, प्रज्ञा यांची देवता मानण्यात येते. राजघराण्यातील हस्तकला, व्यवसाय यांची ती अधिष्ठात्री देवता मानण्यात येत असे; पण अथेन्समध्ये उद्योगव्यवसायाची भरभराट होताच ॲथीना, ही सर्व प्रकारच्या कलाकुसरीच्या कामाची देवता समजली जाऊ लागली व मग तिचे वर्चस्व फक्त बौद्धिक क्षेत्रापुरतेच मर्यादित राहिले.

( ३ ) ती कुमारी देवता म्हणून समजण्यात येते. या देवतेला प्रेमविवाहाचे वावडे आहे. तरीही अथेन्सची पालक देवी म्हणून प्राणी व वनस्पती यांच्या उत्पत्तीबद्दलची जबाबदारी तिच्याकडेच होती.

( ४ ) ती युद्धाची देवता समजली जाई. दर चार वर्षांनी अथेन्स येथे ऑगस्ट महिन्यात तिची जत्रा भरते. रोमन लोक तिला मिनर्व्हासदृश समजतात.

**(१७) आर्टेमिस** : ( Artemis ) ही ग्रीक देवता झ्यूस व लेडा यांची कन्या व ॲपोलोची जुळी बहीण. रानटी जीव, मानवी जन्म व पिके यांची भू-देवता म्हणून ती हेलेनिकपूर्व ग्रीस, एशिया मायनर व क्रीट येथे पूजिली जात असे.

**(१८) टायटन्स** : ( Titans ) ही युरॅनस व गेआ ( Uranus & Gaea ) यांची अपत्ये. सहा पुत्र व सहा कन्या. आईच्या सांगण्यावरून या सर्व मुलांनी आपल्या जन्मदात्याला हुसकावून लावले व आपल्यापैकी सर्वांत धाकटा जो क्रोनस त्याला राज्यपद दिले. आपल्या अपत्याकडून आपण राज्यभ्रष्ट होणार असे कळल्यामुळे त्याने आपली सगळी मुले गिळून टाकली. यानंतर जन्माला आलेला पण त्याचा सर्वांत धाकटा मुलगा झ्यूस यानेच क्रोनसला राज्यावरून दूर केले व स्वतःकडे सर्व अधिकार घेतले. नंतर त्याने फेटिसकडून एक औषध आणले. या औषधाने ओकारी होत असे. झ्यूसने हे औषध क्रोनोसला पाजले व त्याला आपल्या सर्व भावंडांना ओकावयास भाग पाडले. मग आपल्या भावंडांच्या सहाय्याने झ्यूसने टायटन्सविरुद्ध प्रचंड लढा दिला.

**(१९) झ्यूस** ( Zeus ) ऑलिम्पिअन देवांमधील सर्वांत प्रमुख देव. ग्रीसमधील देवांमध्ये अत्यंत पूजनीय. झ्यूस हे निरभ्र, स्वच्छ आकाश याचे एक रूपकच होय. पिकांना समृद्धी देणारा पाऊस, झ्यूसच पाठवितो. दंतकथेतील माहितीप्रमाणे झ्यूस हा क्रोनस व ऱ्हेआ यांचा पुत्र. त्याचा जन्म क्रीट बेटावर झाला व त्याचे संगोपन डिक्टी ( Dicte ) पर्वतावर क्यूरेटस ( Curetus ) कडून केले गेले. भावांच्या मदतीने झ्यूसने क्रोनोसला अधिकारपदावरून दूर केले व सर्व हक्क आपणांकडे घेतले. डिमीटर, हेरा व हेस्टिआ या झ्यूसच्या बहिणी. झ्यूसने सात विवाह केले. अपोलो, आर्टेमिस, आरीस,

ॲथीना या प्रमुख व अन्य कमी महत्त्वाच्या देवदेवता यांचा हा पिता.

होमरच्या वर्णनानुसार झ्यूस हा येसिलीमधील ऑलिम्पस पर्वतावर रहातो. या पर्वतावरून थेट स्वर्गाला जाता येते. झ्यूसला देव व मानव यांचा पिता समजतात. अमर देवदेवतांत झ्यूस हा सर्वांत समर्थ देव आहे. आपल्या सल्लागारांच्या सहाय्याने तो कायदा, सुव्यवस्था व अन्य सर्व घडामोडींवर नजर ठेवतो. गडगडाट व विद्युत्पात ही त्याची शस्त्रे असून वादळाचा जनकही तोच आहे. गरुडपक्षी, ओकवृक्ष व पर्वतांची शिखरे ही त्याची प्रतिके आहेत. तर शेळी, बैल व गाय हे त्याचे आवडते बळी आहेत.

**(२०) क्रोनोस** : (Cronos) हा एक ग्रीक देव. प्राचीन ग्रीकांच्या पूर्वीही या देवांचे अस्तित्व होते. या देवाचा संबंध शेतीशी येतो. स्वर्ग आणि पृथ्वी (Uranas & Gaea) यांचे हे अपत्य. स्वर्गाचे बहुतेक पुत्र हे राक्षसी कृत्ये करणारे असल्याने त्यांना तो जन्मतःच पृथ्वीच्या पोटात दडवीत असे. आपल्या वडिलांवर सूड घ्यावा म्हणून पृथ्वीमातेने मुलांना विनंती केली, पण क्रोनोसशिवाय तिला कुणीही होकार दिला नाही. क्रोनोसने वडिलांवर सूड उगवला व स्वर्ग पृथ्वीपासून वेगळा काढला. पण 'तुझीच अपत्ये तुला राज्यभ्रष्ट करतील' असे त्याला त्याच्या वडिलांनी सांगितल्यावरून त्याने आपले पुत्र, आपणच स्वाहा करायला सुरुवात केली. पण झ्यूसचा जन्म झाला तेव्हा त्याची आई ऱ्हेआ हिने त्याला क्रीट बेटावर दडवून ठेवला व मुलाऐवजी क्रोनोसला दगड खाण्यास दिले. शेवटी झ्यूसने क्रोनोसचा पराभव केल्यानंतर एका दंतकथेप्रमाणे क्रोनोस कैदी म्हणून राहिला तर एका दंतकथेप्रमाणे तो सुवर्णयुगाचा राजा झाला. त्याच्या कारकीर्दीत माणसे सुखी होती व मशागत न करताच पृथ्वी धान्य देत होती.

**(२१) तीन अमर देवतांचा कलह** : पोलिअस व थेटीस यांचा विवाह होता. सर्व देवतांना निमंत्रण गेले होते. पण इरीस या देवतेला निमंत्रण द्यायचे राहून गेले. इरीसला त्याचा राग आला. आधीच ही देवी भांडणे लावण्यात पटाईत, त्यात हे घडले. तिने एक कपटी खेळ रचला. तो असा – तिने एका झाडावरचे एक सोनेरी फळ तोडले व लग्नाला जमलेल्या वऱ्हाडी मंडळींत ते टाकून दिले. त्या फळावर 'सर्वांत देखण्या स्त्रीसाठी' एवढेच लिहिलेले होते.

'फळ कुणी घ्यायचे' म्हणून स्त्रीवर्गात शब्दाशब्दी सुरू झाली. ज्यूनो, व्हीनस व मिनर्व्हा तिघीही देखण्या खऱ्या, पण प्रत्येकीला वाटे, मीच सर्वांत अधिक देखणी. मग न्यायनिवाड्यासाठी त्या तिघीही ज्यूपिटरकडे गेल्या. ज्यूपिटर खरा शहाणा. एकीलाच सर्वांत देखणी म्हणून अन्य दोघींचा रोष तो कशाला ओढवून घेतो! त्याने त्या तिघींना 'इडा' या नावाच्या पर्वतावर जायला सांगितले. त्याप्रमाणे त्या तिघीही त्या पर्वतावर गेल्या. तिथे कोण असणार! तरी त्यांना एक मेंढपाळ दिसला. हा मेंढपाळ देखणा होता. तो आपला एकटाच मेंढ्या चारीत होता. चरणाऱ्या मेंढ्यांकडे पाहात बसला होता.

या तिघींनीही त्याला घेरले. त्याचे नाव होते पॅरिस. त्या तिघी त्याला म्हणाल्या, 'आमच्या तिघींत सर्वांत देखणी कोण ? तूच ठरव आणि तिला तुझ्याच हाताने हे सुवर्ण फळ दे.'

'माझ्यासारखा निर्णय दिलास तर मी तुला अगणित पैसा व सत्ता देईन! असे ज्यूनो म्हणाली, तर 'मानवी युद्धात नेहमी तुलाच जय मिळेल.' असे मी करीन, असे मिनर्व्हाने आश्वासन दिले. व्हीनस म्हणाली, 'माझ्या बाजूने निर्णय दिलास तर या भूतलावरील सर्वांत देखणी स्त्री, मी तुला मिळवून देईन.'

पूर्ण विचारांती सर्वांत देखणी स्त्री मिळविण्याच्या हव्यासाने पॅरिसने 'व्हीनस हीच सर्वांत सुंदर' असा निर्णय देऊन ते सुवर्णफल व्हीनसच्या करकमलात टाकले. व्हीनसची मैत्री मिळाली पण अन्य दोन देवतांचे वैर स्वीकारावे लागले.

व्हीनसच्या सांगण्यावरून पॅरिस, मग स्पार्टा शहरात गेला. तिथला राजा मिनेलास याने पॅरिसचे शाही स्वागत करून त्याला थाटाचा पाहुणचार केला; मिनेलॉसची रतितुल्य पत्नी हेलन, हिच्यावर पॅरिसचे मन गेले. व्हीनस देवतेच्या सहाय्याने त्याने तिला ट्रॉय शहरात पळवून आणले.

ग्रीस देशातील महाकाव्याचा विषय झालेल्या महायुद्धाला हे हेलन प्रकरणच कारणीभूत झाले.

**(२२) डिडॅलस :** ( Daedalus ) मूर्तिशिल्प व वास्तुशिल्प यांचा जनक असा हा एक ग्रीक कारागीर. त्याने मिनॉस राजाकरिता एक चमत्कारिक चक्रव्यूह ( Labyrinth ) बांधला होता. या चक्रव्यूहात प्रवेश करता येत असे, पण बाहेर पडणे महाकठीण होते. या चक्रव्यूहात एक राक्षस असे. तो अर्धा बैल व अर्धा राक्षस अशा स्वरूपात असे. या राक्षसाला अथेन्स शहरातून वर्षाला सात तरुण व सात तरुण कुमारिका खंडणी म्हणून द्याव्या लागत. थीसीअसने या राक्षसाला ठार केले व चक्रव्यूहाचा भेद केला.

मिनॉसची मर्जी उतरली व त्याने डिडॅलस व त्याचा मुलगा इकॅरस यांना उंच मनोऱ्यावर कैदेत टाकले. डिडॅलसने यातूनही युक्ती काढली. पंखांच्या सहाय्याने त्याने आपली व आपल्या मुलाची तुरुंगातून सुटका करून घेतली व हवेतून मार्ग काढीत पळायला सुरुवात केली. डिडॅलस सुखरूपपणे इटलीस पोचला. पण इकॅरस वाटेत समुद्रात बुडून मरण पावला. मुलगा मरण पावला त्या प्रदेशाला इकेरिया नाव देऊन डिडॅलस सिसिलीत गेला. डिडॅलस हा विविध प्रकारची जहाजे व गलबते यांचाही जनक होता. अनेक इमारती व पुतळे यांचा सुबकपणा व वैशिष्ट्यपूर्ण रचना यासाठी त्याचा नामनिर्देश करण्यात येतो. लाकडाचा उपयोग ज्या काळात प्रामुख्याने होत होता त्या काळाचा तो प्रतिनिधीच होता.

**(२३) इजिप्टस :** ( Aegyptus ) हा इजिप्तचा राजा व बेलस ( Belus ) चा पुत्र. डानॉस ( Danaus ) हा एजिप्टसचा जुळा भाऊ. एजिप्टसला पन्नास पुत्र होते तर तर डानसला पन्नास कन्या होत्या. एजिप्टसच्या पन्नास पुत्रांच्या भीतीने डानॉसला

आपल्या पन्नास कन्यांसह पळ काढावा लागला. तो ॲर्गास येथे जाऊन राहिला. एजिप्टसच्या पन्नास पुत्रांनी त्याचा पाठलाग केला व पन्नास कन्यांची लग्नासाठी मागणी केली. डानॉसने त्यांची विनंती वरकरणी मान्य असल्यासारखे दाखविले. त्याने प्रत्येक कन्येला एक एक कट्यार दिली व लग्नाच्या पहिल्याच रात्री प्रत्येकीला आपापल्या नवऱ्याला ठार मारायला सांगितले. सर्व मुलींनी त्याप्रमाणे केले. एजिप्टसचे एकोणपन्नास पुत्र ठार झाले. फक्त लिन्सेअस ( Lynceus ) हा एकच पुत्र वाचला. कारण त्याची पत्नी हायपरम्नेस्ट्रा ( Hypermnestra ) हिने तसे करण्यास विरोध दर्शविला होता.

**(२४) आर्गाइव्ज** : ( Argives ) होमरच्या काव्यात आढळणारे अखिल ग्रीकांचे अभिधान. आर्गासचे रहिवाशी ते आर्गाइव्ज. ॲगममनोन हा आर्गासचा राजा. मायसिनी ही त्याच्या राज्याची राजधानी.

**(२५) एपिडानस** ( Apidanus ) : थेसली मधील एका नदीचे नाव.

**(२७) स्वर्गीय जुळ्यांची भगिनी** : ( Sister of Heavenly Twins )

हेलन ही जगातील सर्वांत देखणी स्त्री, ट्रोजन युद्धाची ही जननीच. झ्यूस हे हिचे वडील व लेडा ही आई. कॅस्टर व पोलक्स ( Caster and Pollux ) या जुळ्या भावांची ही बहीण तसेच ॲगमेमनोनची पत्नी क्लायटेमेन्स्ट्रा ( Clytemnestra ) ही पण हेलनची बहीण.

ती अगदी लहान असताना तिला थीससने स्पार्टाहून पळवली व ॲटिका येथे नेली. त्यावेळी तिच्या वरील दोन भावांनी तिला परत आणली. देवतुल्य असे हे दोघे जुळेभाऊ फार पराक्रमी होते.

हेलन मोठी झाल्यावर तिने तिला मागणी घालायला आलेल्या अनेकांपैकी मिनिलॉस ( Menelaus ) शी विवाह केला. तिथे ती सुखात होती. पण पॅरिस तिथे गेल्यावर त्याच्या मोहात पडून त्याच्याबरोबर ती ट्रॉयला पळून आली. पॅरिस हा ट्रॉयचा राजा प्रायस याचा पुत्र. हेलनवरून सुरू झालेलं ट्रोजन युद्ध दहा वर्षे चालले होते. पॅरिस मारला गेल्यावर तिने पॅरिसचा भाऊ डायफोबस ( Deiphobus ) याच्याशी लग्न केले. व्हर्जिलच्या ईलिअडमधील माहितीनुसार हेलनने मिनिलॉसशी विश्वासघाताचे वर्तन केले व ती पॅरिसबरोबर पळून गेली तरी ट्रॉय शत्रूने सर केल्यावर ती मिनिलासबरोबर परत स्पार्टाला आली व तेथे ते दोघेही मरेपर्यंत सुखाने राहिले.

आणखी एक कथा अशी की, हेलन वैधव्याचे जिणे कंठीत असताना तिच्या सावत्र मुलांनी तिला हाकलून दिली; त्यामुळे ती ऱ्होडस् ( Rhodes ) येथे पळून गेली. तिथली राणी पोलिक्सो ( Polyxo ) ही तिची मैत्रीण; पण आपला नवरा, ट्रोजन युद्धात कामी आला. यामुळे अस्वस्थ झालेल्या पोलिक्सोने हेलनला फासावर लटकावले.

स्टेसिकोरस ( Stesichorus ) हा कवी लिहितो की हेलन व पॅरिस हे पळता पळता इजिप्तच्या किनाऱ्यावर आले व तिथे राजा प्रोटीअस ( Proteus ) याने तिला अडवून

धरले. म्हणजे हेलनला ट्रॉयला पळवून नेण्यात आले ही हकीगत कपोलकल्पितच म्हणायची. खरी हेलन ही इजिप्तला होती व युद्ध संपल्यावर तिचा नवरा तिला परत स्पार्टाला घेऊन गेला. युरायपीडीजने आपल्या हेलन या नाटकात याच माहितीचा उपयोग केला आहे.

हेलनही पूजनीय असून तिची जत्रा Therapnae येथे भरते. तसेच तिचे देऊळ ऱ्होडसमध्येही आहे. तिथे तिची तिच्या भावांप्रमाणेच मुक्त देवता म्हणून पूजा होते. खलाशांची ती आवडती देवता.

**(२८) इडा :** ( Ida ) एशियामायनरमधील पर्वतराजी; फ्रिजियापासून मायसियापर्यंत पसरलेली. ट्रॉयचे मैदान येथून दिसते. गार्गारिस, हे सर्वांत उंच शिखर ( ५७४८ फूट ) या शिखरावर सिबिलीचे देवालय आहे.

**(२९) ॲट्रीअस :** ( Atreus ) दंतकथेनुसार पेलोप्स ( Pelops ) व हिप्पोडामिआ ( Hippodamia ) यांचा मुलगा व थेटिसचा भाऊ. ख्रिसिपस ( Chrysippus ) या आपल्या सावत्र भावाच्या खुनाच्या आरोपावरून ॲट्रीअस व थेटीस या दोघांना मायसिनीत पळून जावे लागले. तिथे ॲट्रीअस हा राजा झाला. थेटिसने आपल्या भावाची पत्नी एरोपे ( Aerope ) हिला फूस लावली. त्यामुळे त्याला मायसिनीतून बाहेर हाकलण्यात आले. ॲट्रिअसला पहिल्या पत्नीपासून एक पुत्र होता. त्याचे नाव प्लेस्थेनीस ( Pleisthenes ). थेटीसने या प्लेस्थोनिसला आपल्या वडिलांना ठार मारण्यासाठी पाठविले. पण ॲट्रिअसने मुलाला ओळखले नाही व त्याला ठार केले. खरी हकीकत कळल्यावर ॲट्रिअस अस्वस्थ झाला व थेटीसचा सूड घेण्याचे मनसुबे रचू लागला. त्याने थेटिसशी तह करण्याचे नाटक केले व मेजवानीच्या प्रसंगी थेटिसचे दोन मुलगे ठार केले.थेटिस घाबरून पळाला. पुढे ॲट्रिअसने थेटिसच्या मुलीशी विवाह केला.

ॲगमेमनोन व मिनिलीस या दोघांनी थेटिसला पकडून वडिलांच्या हवाली केले. ॲट्रिअसने थेटिसला कैदेत टाकले व इजिस्थस ( Aegisthos ) ला त्याचा वध करायला पाठविले. पण इजिस्थस हा आपलाच मुलगा हे थेटिसने ओळखले व मग दोघेही एक होऊन ॲट्रीअसचा काटा काढायचा विचार करू लागले.

**(३०) सिरिअस** ( Sirius ) **:** डॉगस्टार या नावाने ओळखली जाणारी व्याधाची चांदणी. ही चांदणी इतर सर्व चांदण्यांपेक्षा प्रखर प्रकाश देते.

**(३१) ओरायन** ( Orion ) **:** आकाशातील अत्यंत तेजस्वी तारा. मृगपुंज या नावाने ओळखला जाणारा. दंतकथेप्रमाणे ओरायन हा नेपच्यूनचा मुलगा. उत्तम शिकारी. तो समुद्रावरून चालू शकत असे. किऑस बेटाचा राजा ईनोपिऑन याच्या मिरोपी या देखण्या मुलीवर त्याचे प्रेम होते. तिला तो बलात्काराने घेऊन जात असता राजा ईनोपिऑनने त्याचे डोळे फोडले पण पुढे त्याला दृष्टी आली. नंतर तो डायनाच्या बाणाला बळी पडला, डायनाला वाईट वाटले व तिने त्याला आकाशात तारा म्हणून जागा दिली.

**(३२) सायमोसिना** (Cynossema) : कुत्रीचे थडगे या अर्थाचे नाव असलेले थ्रेस-मधील एक उंच भूशिर. हेकॅबी ही ट्रॉयची राणी. तिचे रूपांतर एका गुरगुरणाऱ्या कुत्रीत झाले. कुत्रीत रूपांतर झाल्यावर ती गलबताच्या उंच डोलकाठीवर चढली व तेथून खाली पडून मरण पावली. कुत्रीचे थडगे या नावाने ओळखली जाणारी तिची समाधी गॅलीपोली (Gallipoli) द्वीपकल्पाच्या पूर्वेस आहे. ही समाधी खलाश्यांना मार्गदर्शक म्हणून उपयोगी पडते.

■

युरायपिडीज लिखित

# हेराक्लीज [ HERACLES ]

## पात्र-परिचय

**ॲम्फिट्रिओन** [ Amphitryon ]
हेराक्लीजचा पिता म्हणून ज्ञात

**मेगारा** [ Megara ]
हेराक्लीजची पत्नी व थीब्सचा भूतपूर्व
राजा क्रेओन याची कन्या

**लिकस** [ Lycus ]
अन्यायीमार्गाने राज्य बळकावणारा
थीब्सचा राजा

**हेराक्लीज** [ Heracles ]
झ्यूस आणि ॲल्कमीनी यांचा पुत्र

**इरीस** [ Iris ]
हेरा या देवतेची दूती

**उन्माद देवता** [ Madness ]

**दूत** [ Messenger ]

**थीसीअस** [ Theseus ]
अथेन्सचा राजा

**तीन तरुण मुलगे**
हेराक्लीजचे तीन पुत्र

**थीब्समधील श्रेष्ठीवृन्द** [ Chorus ]

[**दृश्य :** थीब्समधील शाही प्रासादा-समोरील विस्तीर्ण प्राकार. रंगमंचाच्या पुढल्या भागाजवळ उद्धारकर्त्या झ्यूस देवाची वेदी आहे. ॲम्फिट्रिओन, मेगारा, आणि हेराक्लीजपासून तिला झालेले तीन पुत्र, त्या वेदीभोवती वाटोळे बसलेले आहेत. ]

**ॲम्फिट्रिओन :** माझ्याबद्दल ज्याने ऐकले नाही, असा कुणी मानव या पृथ्वीतलावर आहे काय ? ज्याच्या शय्येने झ्यूसचे स्वागत केले तो मी, ॲरगॉसचा ॲम्फिट्रिओन, अल्का-कसचा पुत्र, पर्सिअसचा नातू आणि हेराक्लीजचा पिता. पेरलेल्या माणसांचे पीक पूर्ण वाढ होऊन जमिनीतून तरारून उठले तेव्हा ॲरीसने त्यांच्यापैकी काही थोड्यांनाच जीवदान दिले; त्यांच्याच मुलांच्या मुलांनी थीब्स गजबजून गेले, त्या वेळेपासून मी या थीब्सशहरात राहात आहे. मेनीसिअसचा पुत्र क्रेओन, जो अगदी परवापरवापर्यंत या थीब्सचा राजा होता तो यांचा वंशज.

ही आहे मेगारा, क्रेओनची कन्या. फार वर्षी, जेव्हा एकत्र जमलेल्या थीब्सवासीयांच्या कंठातून आणि बासरीवादनातून विवाह–संगीताचे सूर निनादले, त्यावेळी विश्वविख्यात हेरा-क्लीजने तिला आपली नववधू म्हणून माझ्या घरी आणले. नंतर, माझ्या पुत्राने आपली पत्नी मेगारा आणि तिचा सर्व परिवार, मी जिथे स्थाइक झालो त्या या थीब्समध्ये ठेवला आणि ॲरगॉसमधली सायक्लॉप्सची गढी, ही आपलीच वास्तू असा वारसा हक्क सांगण्याच्या उत्कट इच्छेने त्याने प्रस्थान ठेवले आहे. इलेक्ट्रिओनला मी ठार मारले तेव्हाच मी ॲर-गॉस सोडले. आणि म्हणून माझ्या देशोधडीचा अंत करण्यासाठी आणि स्वतःला वाड–वडिलांच्या भूमीत परत येता यावे म्हणून हेराक्लीजने या पृथ्वीवरील पाशवी अत्याचार निपटून काढायचे काम पत्करले. ॲरगॉस येथील आपल्या पुनर्वसनासाठी युरिसथिअसला त्याने ही फार मोठी किंमत देऊ केली. मग त्या हेराच्या मत्सरी दुष्टाव्यामुळे त्याच्यावर या अशा कष्टमय कामगिऱ्या लादल्या गेल्या की विधिलिखित तसं होतं म्हणून, हे कोण सांगू शकेल ? शेवटची एक वगळता त्याने त्या सर्व कामगिऱ्या तडीस नेल्या आहेत. आणि आता, तीन देह असणाऱ्या सेरबेरस या अधोलोकीच्या श्वानाला वर सूर्य प्रकाशात ओढून आणण्या-साठी तो अधोलोकात टिनॅरसच्या जबड्यामधून गेला आहे; आणि त्याच्या परत येण्याची आम्ही वाट पाहात तिष्ठत आहोत.

आता खूप खूप वर्षांपूर्वी—असं थीब्समधील दंतकथा सांगते—श्वेत अश्वांचे रथ चालविणारे झ्यूसचे ते पुत्र—अम्फिऑन व झेथस या सात बुरुजांच्या शहरावर राज्य करीत होते. त्याच्याही आधी, या शहराचे सिंहासन, डिर्सेचा पती, कुणी एक लिकस, याच्या ताब्यात होते. त्याच्या त्याच नांवाच्या वंशजाने [ युबिआचा रहिवासी. थीब्सचा नव्हे ] थीब्सवासीय नागरिक एकमेकांचा गळा घोटायला निघालेले आहेत असे पाहून या शहरावर स्वारी केली, क्रेओनला ठार मारलं आणि स्वतःच सत्ता बळकाविली आहे. आणि आता मृत राजाबरोबरचे आमचे स्नेहसंबंध हाच आम्हाला धोका होऊन बसला आहे. माझा पुत्र दूर आहे, भूगर्भाच्या पोकळीत बेपत्ता आहे असे पाहून हा बहाद्दर लिकस—आता थीब्सचा स्वामी—एक खून दडपून टाकण्यासाठी आणखी खून करण्याचा मनसुबा करतो आहे आणि हेराक्लीजचे पुत्र मोठे होतील व आपल्या ठार झालेल्या कुटुंबियांच्या वधाचा बदला घेतील, या भीतीने त्यांचा नाश करावयाचे ठरवतो आहे. त्याला मेगारालाही ठार मारायचं आहे आणि मला देखील—मला—माणसाची केवळ एक वृद्ध क्षीण सावली असलेल्याला !

अधोलोकाच्या काळ्याकभिन्न अनंत तिमिरात माझा पुत्र हेराक्लीज याने प्रवेश केला तेव्हा आपल्या आपत्यांच्या रक्षणासाठी त्याने मला येथे स्वगृही ठेवले. आता तारणहार झ्यूसचे शरणार्थी म्हणून—मिनईवर मिळविलेल्या विजयाचे दिवशी गौरवास्पद विजयचिन्ह म्हणून जी उभारली गेली-त्या या वेदीभोवती आम्ही बसलो आहोत. आम्ही बसून आहोत येथे अन्नपाण्याला स्पर्शही न करता—वस्त्रांतरही न करता, ही खडबडीत भूमी हीच आमची एकमेव शय्या, राजप्रासाचे दरवाजे आमच्यासाठी पक्के मिटलेले आहेत; सहाय्य आणि उमेद, ही आता नजरेच्या टप्प्याबाहेर आहेत. ज्यांना आम्ही मित्र मानीत होतो, त्यांनी आम्हाला डावलले आहे आणि आमचे सच्चे ठरलेले स्नेही दुबळे ठरले आहेत. आपदा हीच मित्रांची अचूक ठरणारी कसोटी. माझ्या कोणत्याही मित्रापासून देव संकटांना दूरच ठेवोत !

**मेगारा :** ज्यांनी फार पूर्वी टॅफिअन्सविरुद्धच्या लढ्यात थीब्सवासीयांचे धुरीणत्व केले होते, ते हे वृद्ध ऑम्फिट्रिओन ! किती गहन आणि चमत्कारिक असतात देवांचे माणसाशी वागण्याचे मार्ग ! मी काही जन्मापासून अशी निराश्रित नव्हते ! माझे जन्मदाते क्रेओन, म्हणजे ऐश्वर्य, सत्ता आणि सद्भाग्य यांचा निदर्शक असा परवलीचा शब्दच. ज्याच्या अभिलाषेने भाग्यवंत ऐश्वर्याधीशांच्याविरुद्ध लांबरुंद भाले, अहमहमिकेने फेकले जातात, ते सर्व काही त्यांच्या आधीन होते. मुलाबाळांचे लेणेही त्यांना लाभले होते आणि त्यांनी मला राजघराण्यातील वधू व्हावी म्हणून, हेराक्लीजला – तुमच्या पुत्राला अर्पण केली. पण आता ते सर्व जीवन वाऱ्यावर विरून गेले आहे, ते वैभव निर्माल्य झाले आहे; आणि तुम्ही, मी व मातेच्या पंखाखाली विसावणाऱ्या पिलांसारखे या वेदीला बिलगणारे हे हेराक्लीजचे तीन पुत्र,

आपण सगळीच मृत्यूच्या दारी उभे आहोत. ही बालके मला आळीपाळीने पुनः पुन्हा प्रश्न विचारीत आहेत, " आई ! " ती विचारतात, " कुठे गेले आहेत ग ते ? आमचे पिताजी काय करताहेत ? केव्हा परत येतील ते ? "

त्यांना त्यांच्या वडिलांशिवाय चुकल्याचुकल्यासारखं झालं आहे. त्यांच्या कोवळ्या बुद्धीला काहीच उमजेनासे झाले आहे. मी उत्तर देण्याची टाळाटाळ करते. त्यांचे समाधान करण्यासाठी त्यांना काहीतरी कल्पित कथा ऐकवते. तो भव्य दरवाजा उघडल्याचा आवाज जेव्हा जेव्हा कानी पडतो तेव्हा तेव्हा आपले वडील तर नसतील, म्हणून त्यांच्याकडे धावत जाण्यासाठी ती ताडकन् सिद्ध होतात.

तर मग पिताजी ! आपले प्राण वाचविण्यासाठी कुठली आशा व कोणते उपाय घोळताहेत तुमच्या मनात ? माझी मदार आता फक्त तुमच्यावरच आहे. शिवेवरून निसटून जाणे हे तर अशक्यच; प्रत्येक मार्गावर संरक्षक सैनिक खडे आहेत. स्नेह्यांकडून साहाय्य मिळेल ही आशा तर याउपर बाळगावयासच नको. सांगा तर मग स्पष्ट, काय आहे तुमच्या मनात ? मला भीती वाटते, आपण आपला वेळ गमावतो आहो—पण मृत्यूदेव मात्र त्याचा वेळ फुकट घालवणार नाही.

**ॲम्फिट्रिओन** : मुली ! अशा कठीण प्रसंगी सल्लामसलत देणे ही काही सोपी गोष्ट नव्हे. योग्य खबरदारीशिवाय उतावीळपणाने कार्यास सिद्ध होणे निरर्थकच ठरायचे.

**मेगारा** : म्हणजे ? परिस्थिती याहूनही भीषण व्हायला हवी की काय ? तुमची जीवन जगण्याबाबतची सगळी प्रीती संपुष्टात आली का ?

**ॲम्फिट्रिओन** : छे ग ! मुळीच नाही. मला माझ्या—जीवनात रस आहे तर ! आणि मी आशेला घट्ट बिलगून आहे अजून.

**मेगारा** : मी सुद्धा. पण आपण अशक्याची आशा करता कामा नये.

**ॲम्फिट्रिओन** : ध्यानात ठेव ! मरण लांबणीवर पडणं म्हणजे कदाचित् मरण टाळणंच ठरेल.

**मेगारा** : खरं ते—पण हा प्रतीक्षाकाळ असह्य होतो.

**ॲम्फिट्रिओन** : मुली : आपल्या सर्व संकटातून पार पाडून अनुकूल वारा अजूनही आपल्याला सागराच्या पल्याड सुखरूप नेऊन पोचवील. माझा पुत्र, तुझा पती परत येण्याची शक्यता अजूनही आहे. आधी स्वतः शांत हो, आणि तुझ्या बालकांचे आसवांनी डबडबलेले नेत्र पुसून काढ. तुझ्या शब्दांनीच तू त्यांचे सांत्वन करायला हवे. तुझे शब्द कितीही दर्दभरी असले तरी त्यांनी त्यांच्या विचारांना अन्यत्र वळवायला हवं. अग ! दुर्दैवालाही अखेरी छळ करायचा कंटाळा येतो. वादळे खूप थैमान घालतात पण कालपरत्वे आपोआप शमतात. पाळीपाळीने माणसाच्या वाट्याला भाग्य येतच. प्रत्येक गोष्ट काही

काळानंतर बाजूला सरून दुसऱ्या गोष्टीला जागा करून देते. निराशा हा भ्याडपणा आहे. शूर माणूस आपला आत्मविश्वास आणि उमेद यांना घट्ट चिकटून राहातो.

[ थीब्सवासी श्रेष्ठीवृन्द प्रवेशतो ]

**श्रेष्ठीवृन्द :**

मी आलो आहे या उंच उंच कमानदार राजप्रासादात
या वन्दनीय राजाच्या विश्रामधामात
माझ्या दण्डावर माझा सारा भार टाकीत
दुःख आणि शोक यांनी भारावला आहे माझा स्वर
एखाद्या स्थविर राजहंसाच्या गीतासारखा
उरला आहे माझा आता केवळ विरल छायादेह
आवाजाला नाही भरीवपणा
एखाद्या स्वप्नात विहरणाऱ्या आकृतिसारखा
भासतो आहे मी !
माझा स्वरसुद्धा थरथर कापतो
पण तो आहे मात्र स्नेहाने परिपूर्ण
पित्याशिवाय पोरक्या झालेल्या बाळांनो !
मी आसवे गाळतो आहे तुमच्यासाठी
ॲम्फिट्रिओन ! तुमच्यासाठीसुद्धा
आणि तुझ्यासाठीसुद्धा दुःखीकष्टी माते—
अधोलोकांत लुप्त झालेल्या पतीसाठी
शोक करणाऱ्या भार्ये—
[ अन्य प्रौढाला उद्देशून ]
चल, ये ! एखाद्या चढणीवर खडकाळ मार्गावरून
चाके लावलेल्या गाड्यांचा भार, कष्टाने ओढणाऱ्या
अश्वाप्रमाणे
सारे बळ खर्चून दमदार पाऊल पुढे टाक
आणि ज्याचे पाऊल असेल दुबळे
वा पडत नसेल पुढे ठामपणे
त्याने घट्ट पकडावे
नजिकच्या माणसाच्या दंडाला वा अंगरख्याला
ज्यावेळी आपण सर्व होतो तारुण्याच्या भरात
आणि उतरत होतो एक जुटीने समरांगणात

आपल्या यशोधवल नगरीचे मुख उज्ज्वल राखीत
सतत...
त्या वेळी जो लढला खांद्याला खांदा लावून
भाल्याशी भाला सरसावून समरेषेत
त्या स्नेह्याला करावे सहाय्य प्रत्येकाने
[ श्रेष्ठीवृन्दातले बरेचजण क्रमाने म्हणतात ]
—पहा या बालकाकडे
नाचते आहे जळजळीत तेज याच्या नजरेत
त्याच्या पित्यासारखेच
—अरेरे ! आणि या बालकाच्या पित्याचे दुर्दैवही
गेले नाही अजून सोडून त्याच्या पुत्रांना
—पित्याचा देखणेपणाही अजून खुलतो आहे
त्याच्या पुत्रांच्या मुखावर
—हे हेलास भूमी ! जर तू अंतरलीस
या बालकांना
तर वंचित होशील तू, तीन महानुभाव
तारणहारांना
पहा, पहा ! लिकसच दिसतोय हा !
राजवाड्याकडेच येताना दिसतो आहे
थीब्सचा हा राजा.
[ लिकस प्रवेश करतो ]

**लिकस :** तू हेराक्लीजचा पिता आणि तू – त्याची पत्नी. आता ऐका, मी प्रश्न करणार आहे तुम्हाला ते. आणि तुमचा मी राजा असल्याने मला काय वाटेल ते मी तुम्हाला विचारीन. येथे असे बसून आपले आयुष्य किती वाढेल अशी उमेद आहे तुम्हाला ? कुठल्या सहाय्याची अपेक्षा करता आहा तुम्ही ? या मुलांचा बाप परत येईल असा विश्वास अजूनही बाळगता आहा तुम्ही ? अहो, तो तर संपला. [ मेगारा रडते ] आता आपण मरणार म्हणून रडायचे काय ? असा आकांत करायला शरम नाही वाटत तुम्हाला ? ए, तुला म्हणतोय मी – साऱ्या हेलासभर तू पोकळ डांगोरा पिटतो आहेस की विवाह आणि प्रजोत्पत्ती याबाबत आपण झ्यूसचे संबंधी सहकारी आहोत म्हणून ! आणि तू ग – वीरश्रेष्ठाची सहचारिणी म्हणून दिमाख मिरवितेस ? काय पण वीरश्रेष्ठ ! ! काय ग ! काय होते ते. तुझ्या नवऱ्याचे – हेराक्लीजचे अद्‌भुत पराक्रम ! म्हणे दलदलीतल्या सापाला किंवा निमिआच्या सिंहाला ठार केलं ! त्या सिंहाची आपण आपल्या हातानी गळेचेपी केली, अशी फुशारकी

मारतो तो; पण त्याने त्या सिंहाला सापळयातच पकडला. असली ही त्याची कर्तृत्वे, त्याच्या पुत्रांच्या प्राणरक्षणार्थ तुमचे जोरदार युक्तिवाद म्हणून पुढे करता काय? हेराक्लीजने पशूंशी लढून कीर्ती मिळविली. इतर कोणत्याही बाबतीत तो शूर वीर नव्हता. अगदी नगण्य होता तो इतर बाबतींत. त्याच्या डाव्याबाहूने कधी ढाल पेललीच नाही शत्रूच्या भाल्याला त्याने कधीही तोंड दिले नाही. त्याने वापर केला धनुष्याचा — भेकडाचे आयुध ते — पळ काढायला फार सोयीचे. शौर्यधैर्याची कसोटी धनुष्य वापरण्यातल्या कसबाने होत नसते; तर सैन्याची फळी तेज भालाफेकीने फोडीत असता ज्याची नजर झुकत नाही व घट्ट रोवलेला पाय ढळत नाही तोच खरा शूर धीर. तीच त्याची खरी कसोटी.

माझी या वेळची वागणूक म्हणचे निलाजरेपणा नव्हे, ॲम्फिट्रिओन! तर सावधानता, या स्त्रीच्या बापाला, क्रेओनला मी ठार मारलं आहे याची परिपूर्ण जाण मला आहे. मी त्याचे सिंहासन बळकावले आहे; म्हणूनच या मुलांना मोठे होऊ द्यावे व माझ्यावर सूड उगविण्यासाठी जीवंत ठेवावे अशी माझी इच्छा नाही.

**ॲम्फिट्रिओन :** तर मग आपल्या पुत्राच्यावतीने झ्यूसलाच काय ती कृती करू दे! हेराक्लीज, तुझ्यावतीने बोलायचे काम फक्त आता मी माझ्यावर घेतो आणि हा माणूस किती खालच्या पातळीवर पोचला आहे, ते मी दाखवून देतो. आता त्याच्या कुटाळकीला उत्तर दिल्याशिवाय तशी मोकळी सोडणार नाहीच मी!

तेव्हा देवांनाच साक्षी ठेवून प्रथम मला त्याच्या मुख्य बदनामीचे खंडन केले पाहिजे— होय हेराक्लीज! तुला भ्याड म्हणणे गर्ह्यतम बदनामी आहे. ( लिकसकडे वळून ) अरे, प्रत्यक्ष झ्यूसचे वज्रच हेराक्लीजच्या वीरकृत्यांची गाथा गाईल. भू-जन्य राक्षसांच्या छाताडात पक्षधारी शरांचे आरोपण करण्यासाठी तो ज्या वायुगती रथातून लढाईवर गेल- आणि ज्या रथातूनच परत फिरून देवासमवेत विजयाची स्तवने गायला, तो रथच साक्ष देईल त्याच्या वीरश्रीची! किंवा, हे दुष्ट राजा! जा त्या फोलीपर्वताकडे आणि विचार त्या रानटी जमातीला—त्या चार खूर असणाऱ्या सेन्टॉरांना की या भूतलावर ते सर्वात शूर कुणाला लेखतात? माझ्या पुत्राशिवाय दुसऱ्या कुणाचे नाव घेणार ते? नकली वीर म्हणतोस त्याला तू? तुझं मूळ गाव यूबिआ तर मग तिथले रहिवासी डर्फी काय बोलतात तुझ्याबद्दल? तिथले लोक काय शूरमर्द म्हणतात तुला? अरे, संपूर्ण यूबिआत अशी एकही जागा नाही, की, जी तुझ्या एकाद्यातरी शूर कृत्याची याद करील!

आणि त्या उत्कृष्ट शोधाबद्दल, धनुष्याबद्दल तू तुच्छतेने बोलतोस? ऐक मी थोडा शहाणपणा शिकवणार आहे तुला! भाला आणि ढाल वापरणारा माणूस आपल्याच हत्यारांचा दास असतो. समजा! शेजारच्या, डाव्या किंवा उजव्या माणसाचा धीर सुटला तर इतरांच्या अवसानघातामुळे त्याला स्वतःलाच ठार मरावं लागतं. त्याच्या भाल्याचा दांडा जर मोडला तर तो स्वतःचे रक्षण कसे करू शकेल? आपले स्वतःचे एकमेव संरक्षक

हत्यार तो गमावून बसतो ना! उलट निष्णात धनुर्धराचा दोन महत्त्वाच्या गोष्टीने फायदा होतो. प्रथम म्हणजे तो हजारो बाण मारू शकतो आणि तरीसुद्धा त्याच्याजवळ स्वतःच्या रक्षणासाठी आणखी बाण शिल्लक असतातच. दुसरे म्हणजे त्याची लढत पूर्णपणे शत्रूच्या टप्प्याबाहेर असते. आपण संपूर्णपणे सुरक्षित राहून, सावध शत्रूला तो स्वतःला दिसून येत नाहीत अशा जखमा करू शकतो आणि शत्रूला प्रतिहल्ला करायची संधीच देत नाही. आपल्या टप्प्यातील प्रत्येक गनिमावर वार करणे आणि आपली स्वतःची कातडी मात्र अक्षत ठेवणे हे युद्धातील साधे व्यवहार ज्ञान आहे, तेव्हा या युक्तिवादात माझे शब्द तुझ्या शब्दांना खोटे पाडीत आहेत आणि तुझ्या प्रतिपाद्य गोष्टीच्या अगदी उलट गोष्ट सिद्ध करताहेत आणि आता या मुलांबद्दल बोलतो. कशासाठी तू त्यांना ठार मारणार आहेस? काय केलंय त्यांनी! हां! तू तर एक भेकड! तेव्हा तू या शूर वीराच्या मुलांना घाबरावंस हेही कदाचित् सयुक्तिक असेल म्हणा! पण तुला आम्ही ठार मारण्याऐवजी—झ्यूस जास्त सच्च्या पक्षाला यथा योग्य न्याय देता तर याच कर्मभोगाला तुला सामोरे जावे लागले असते—तुझ्या भ्याडपणाचे बळी म्हणून आम्हालाच ठार व्हावं लागणार आहे, हा मात्र दुर्धर दैवदुर्विलास आहे खरा. जर थीब्सचे सिंहासन स्वतःच्याच ताब्यात ठेवण्याचा तुझा निर्धार असेल तर आम्हाला निर्वासित म्हणून बाहेर पडू दे. रक्त सांडू नकोस; अन्यथा जेव्हा कालान्तराने देवांच्या मर्जीप्रमाणे परिस्थिती पालटेल तेव्हा तुझेही रक्त सांडले जाईल. हे कॅड्मसच्या भूमी! होय! तुलाही उद्देशून मी आता अत्यंत कडवट दोषारोपाचे शब्द उच्चारणार आहे! मिनिईच्या अखिल जमातीविरुद्ध ज्याने एकट्याने लढा दिला आणि थीब्सला निर्भीड, निर्भय नजरेने पुन्हा एकवार जगापुढे सन्मुख ठाकण्याचं सामर्थ्य दिलं तो तुझा कैवारी—हेराक्लीज आणि त्याचे पुत्र यांना तू देऊ केलीस ती हीच का मदत? हेलासवर सुद्धा मी आता दोषारोप करणार आहे. आणि तो करताना कुणीही माझे तोंड बंद करू शकणार नाही. हेलासचे कर्तव्य होते जाळपोळ करून आणि समशेर गाजवून चढाई करण्याचे, म्हणजे अविरत परिश्रम करून सागर आणि भूमी यांना निर्विघ्न करणाऱ्या त्यांच्या वडिलांच्या ऋणाची परतफेड झाली असती! पण बाळांनो! थीब्सही नाही नि हेलासही नाही तुमची बाजू घेत! तुम्ही माझ्याकडे पहाता आहा—पण मी म्हणजे केवळ एक बडबडणारी जिभली दुसरे काय? मी तुमच्यावर माया करतो पण तुम्हाला सहाय्य करू शकत नाही. बाळांनो! एकेकाळी माझ्या अंगी असलेली सर्व ताकद आता नष्ट झाली आहे. म्हातारा झालो आहे मी आता! माझे सारे अवयव थरथर कापताहेत. माझ्यातले सारे तेज निमाले आहे. मी जर तरुण असतो आणि एकेकाळी होते तसे माझे स्नायू बलशाली असते तर माझ्या समशेरीने मी याचे हे देखणे कुरळे केस केव्हाच रक्तरंजित करून टाकले असते, आणि भयभीत होऊन अटलान्टिक सागराच्या किनाऱ्याकडे पळ काढला असता त्याने.

**श्रेष्ठीवृन्द :**

माणसाला मर्दाचे काळीज हवे, मग
अडखळणाऱ्या जिभेलासुद्धा वाक्पाटवाची धार चढते

**लिकस :** वा रे वाक्पाटव! हो ना! बोलते राहा! मनोऱ्यासारखे शब्दावर शब्द रचा! तुमच्या आकसाने भरलेल्या शब्दांची मी फेड करणार आहे प्रत्यक्ष कृतीनेच. इकडे या रे सैनिकांनो! चला! काहीजण पार्नासिसकडे जा, काहीजण हेलिकॉनला जा, लाकूडतोड्यांकडून ओकवृक्षाचे ओंडके तोडून घ्या आणि ते इकडे घेऊन या. या वेदीभोवती ते रचा आणि पेटवून द्या त्यांना. हे पाच देह जाळून भस्मसात करा. समजू द्या त्यांना, की मी आहे आता थीब्सचा सांप्रतचा राजा—तो मरण पावलेला हेराक्लीज नव्हे.

आणि तुम्ही श्रेष्ठी हो! तुम्ही माझ्या उद्दिष्टांना विरोध करता आहा नाही का? या बालकांसाठी तुम्ही रडता आहात? दम धरा! तुम्हाला दुसऱ्या कशासाठी तरी अश्रुपात करायची वेळ लवकरच येणार आहे! तुमची जमीनदोस्त झालेली घरेदारे—होय, हीच ती गोष्ट. मगच समजून येईल तुम्हाला की मी आहे तुमचा राजा आणि तुम्ही आहात माझे गुलाम.

**श्रेष्ठीवृन्द :** हे भू–जन्य थीब्सवासीयांनो! ॲरिसने नागराजाच्या खादाड जबड्यातून उपटलेल्या आणि या सुपीक जमिनीत पेरलेल्या त्या दातांचेच तुम्ही पुत्र नाही का? जर तसे असेल तर त्या फळकुटांवर—भाल्यांवर—नुसते टेकून उभे राहू नका. वर उचला ते आणि या घातक्याचे मस्तक रक्ताळवून टाका. तो काही कॅडमसचा अंश नाही. अस्सल बीजाचे थीब्सचे रहिवासी काय या क्षुद्र परकीयांसमोर नतमस्तक होणार? [ लिकसकडे वळून ] माझ्यावर जुलूमजबरस्ती करणे तुम्हाला लाभदायक होणार नाही आणि मी ज्या-साठी झगडलो ते तुमच्या ताब्यात कधी येणार नाही. जिथून आलात तिथेच परत जा; आपला बढाईखोरपणा तिथे मिरवा. माझ्या शरीरात जोपर्यंत प्राण आणि श्वास आहे. तो-पर्यंत तू या मुलाला ठार मारू शकणार नाहीस. हेराक्लीज या मुलांना येथे सोडून गेला खरा; पण भूमीमध्ये त्याने इतकी काही खोल दडी मारलेली नाही की आम्ही त्याला विसरूनच जावे! ज्याचा तू नायनाट केला आहेस तो त्याचा प्रदेश तुझ्या ताब्यात आहे. ज्याने या प्रदेशाला ऊर्जितावस्था आणली व वैभवाला चढवले त्याला मात्र योग्य पारितोषिक मिळाले नाही. जेव्हा मदतीची आत्यंतिक गरज आहे त्यावेळी आपल्या मृत मित्राला सहाय्य द्यायला सिद्ध होणे म्हणजे नसती लुडबूड करणे काय? माझ्या उजव्या हाता! किती उत्सुक झाला आहेस तू पुन्हा भाला हाती घट्ट पकडायला! पण दुबळा झाल्यामुळे तुझ्या आकांक्षा फुकट गेल्या आहेत! मी जर तरुण असतो तर ‘ गुलाम ’ हा तुझा शब्द तुला गिळायला लावला असता; नि जिथे तू आता मजा करतो आहेस त्या थीब्समध्ये आम्ही सुराज्य प्रस्थापित केले असते. दुफळी आणि मौर्ख्य यांनी थीब्सचे माथे फिरले आहे. अन्यथा या देशाने राजा

होण्याची संधी तुला कधीच दिली नसती.

**मेगारा :** मी तुमचे आभार मानते. आमची कड घेऊन सच्चे स्नेही म्हणून तुम्ही क्रोधाविष्ट झाला आहात ते वाजवीच आहे. पण आपल्या कोपयुक्त शब्दांनी स्वतःला अडचणीत आणू नका. ॲम्फिट्रिओन ! माझ्या मनात काय आले आहे ते ऐका ! मग त्याला काय किंमत असेल ती असो ! मी माझ्या मुलांवर माया करते--सहाजिकच आहे ते. मी त्यांना जन्म दिला आणि बालपणापासून त्यांची जोपासना केली. मरण म्हणजे मला एक भयंकर गोष्ट वाटते. तरीही जे अटळ आहे त्याच्याशी झगडणे हा मी मूर्खपणा समजते. मरायचं तर आहेच-पण आगीत होरपळून आक्रसून नको मरायला. त्यामुळे वैऱ्यांना आमची कुचेष्टा करायला संधी मिळेल आणि ते तर अधिक खेदजनक वाटेल. आपण राजघराण्यात जन्म घेतला आहे. त्या घराण्याची इभ्रत संभाळण्याचे ऋण आपल्या शिरावर आहे. तुम्ही नाव मिळवलेले योद्धे होता. तुम्हाला भ्याडाचे मरण यावे-छे ! कल्पनाही सहन होत नाही ती. आणि जर या मुलांनी आपल्या नावाला कालिमा आणला तर त्यांच्या बचावासाठी आपला हातही उचलणार नाही अशी ज्याच्या सुकीर्तीची ग्वाही घोषित करण्यास साक्षीदाराची गरज नाही, अशा एकाची मी वीरपत्नी आहे. आपल्या पुत्रांच्या इभ्रतीला लांच्छन लागेल या कल्पनेने महानुभव कातर, व्यथित होतात. माझ्या पुढेही त्यांचेच उदाहरण आहे आणि मी त्याचाच कित्ता गिरवायला हवा. भूगर्भातून आपला पुत्र माघारी येईल अशी जी आशा आपण उरी बाळगता तिला किती महत्त्व द्यायचे ते मी तुम्हाला सांगते. त्या तमोमय दुनियेतून कोणता मृत मानव पुन्हा सजीव होऊन परत आला आहे ? शिवाय लिकसला आपल्याबद्दल विनवणीच्या शब्दांनी करुणा येईल असे का वाटते तुम्हाला ? अशक्य आहे ते ! आपला वैरी जर इभ्रतदार असेल, उच्चकुलात जन्मलेला असेल, तर त्याला शरण जा. कदाचित त्याचे हृदय तुम्ही हेलावू शकाल व तो तुम्हाला उदारपणाची वागणूक देईल. पण तो जर एक हलक्या कुळातला, लाजलज्जा नसलेला माणूस असेल तर मात्र सावध असा त्याच्यापासून, माझ्या मनात आत्ताच विचार आला-या तीन मुलांना मृत्युदंड देण्याऐवजी त्यांना हद्दपार करा, अशी आपण याचना करू शकणार नाही का ? पण त्यामुळे काय होईल त्यांचे प्राण वाचतील नि नंतर त्यांच्या शिरावर दारिद्र्याचे ओझे लादले जाईल. छे ! त्यासारखी दुसरी दीन अवस्था नसेल. म्हटलंय ते सत्यच आहे, की, जे निर्वासित स्नेह्यांकडे सहाय्यासाठी तोंड वेंगाडतात त्यांना लवकरच समजून येते की आपल्या स्नेह्यांचे ते आतिथ्यशील जिव्हाळयाचे हास्य फक्त एक दिवसापुरतेच आहे. तर मग आमच्याबरोबर मृत्यूला धैर्याने तोंड द्या. काही झाले तरी तुमची मृत्यूशी गाठ पडणार आहेच. आमच्यासारखे तुमचेही रक्त राजवंशीय आहे आणि आम्ही तुम्हाला हे आव्हानच देतो आहे. जेव्हा देव, एखाद्या जाळ्यासारखे दुर्दैव आपल्याभोवती पसरतात तेव्हा त्यातून बाहेर येण्यासाठी धडपडणे हे शूरत्वापेक्षा मूर्खपणाचे आहे. कारण जे व्हायचे ते होणारच.

ते कुणीही फिरवू शकत नाही.

**श्रेष्ठीवृन्द :** माझा उजवा बाहू जेव्हा बलिष्ठ होता तेव्हा जर कुणी तुमची अशी दुर्दशा केली असती, तर त्याला तेथल्यातेथेच खिळवून टाकला असता. पण तो काळ केव्हाच मागे पडला. माझ्या कर्तृत्वाला आता कायमचा पूर्णविराम मिळाला आहे. तुला लवकरच पूर्ण घेरून टाकणाऱ्या नियतीच्या सापळ्यातून बाहेर निसटायचा कुठला मार्ग उत्तम, हे तुझे तूच पाहायला हवेस.

**ॲम्फिट्रिओन :** मृत्यूपासून मला मागे खेचतो आहे तो माझा भ्याडपणा किंवा जगण्याचा हव्यास नव्हे. माझ्या पुत्रासाठी या बालकांना वाचवायचे एवढीच फक्त माझी उत्कट इच्छा आहे. पण ही इच्छा विफल आहे मी त्यांना वाचवू शकणार नाही. [ तो वेदीपासून दूर होतो. ] ही माझी गर्दन, सिद्ध आहे. इथे तुझ्या समशेरीसमोर. तीक्ष्ण टोकाने अगर धारदार पात्याने पण सरळ मर्मावर घाव घाल; अगर खडकाळ डोंगरावरून मला खाली फेकून दे. राजा ! एवढीच एक मला आणि तिला दयेची भीक घाल. मुलांच्या आधी आम्हाला ठार मार. त्यांचा मृत्यू आमच्या दृष्टीसमोर व्हायला नको, आणि ' आजोबा ! ' अशा त्यांच्या हाका आमच्या कानावर पडायला नकोत. ते सोसण्याची शक्ती आमच्यात नाही. बाकीचे सर्व काही तुझ्या लहरीनुसार कर. आता आम्हाला मदतीची वा सुटकेची आशाच उरलेली नाही.

**मेगारा :** मी सुद्धा आपल्यापुढे पदर पसरते. आणखी एक दुसरा अनुग्रह करा. दोघांवरही, त्यांच्यावर नि माझ्यावर. राजवाड्याच्या दरवाज्याची कुलपे काढा. हे दरवाजे आम्हाला सांप्रत बंद आहेत. आत जाऊन प्रेतवस्त्रे घेऊन ती मला माझ्या मुलांच्या अंगावर चढवू द्या. त्यांच्या वारसा हक्काचा म्हणून हा एवढा लहानसा भागच देऊ शकते मी त्यांना.

**लिकस :** करू शकता तुम्ही तेवढं. सेवकहो ! दरवाज्यांची कुलपे काढा. हं ! जा आत तुम्ही ! वस्त्रे परिधान करा. हवे असतील ते झगे घ्या. तुमची वस्त्रे परिधान करून झाली की मी परत येईन नि तुम्हाला अधोलोकात धाडून देईन.

( लिकस रंगमंचाच्या एका बाजूला निघून जातो. )

**मेगारा :** मुलांनो ! माझ्या सांगाती या ! आपल्या पित्याच्या घरात या. आता दुसरेच स्वामी आहेत त्याच्या मौल्यवान संपत्तीचे; पण आपल्याजवळ अद्याप आहे त्याचे उज्ज्वल नाव.

( मेगारा, मुलांसह राजवाड्यात जाते. )

**ॲम्फिट्रिओन :** झ्यूस ! ऐककाळी माझी अशी समजूत होती की, तू माझा प्रभावी मित्र आहेस माझ्या विवाहात तूं सहकारी झालास, तसाच हेराक्लीजच्या माझ्या पितृत्वातही पण हे सगळं अर्थहीन ठरलं. कारण तूं जेवढा प्रभावी वाटला होतास तितका तुझा प्रभाव

अनुभवास आला नाही. आणि मी, एक मानव. तुला देवाला लाजवीत आहे. हेराक्लीजच्या पुत्रांशी मी काही कृतघ्न झालो नाही. जिथे येण्यासाठी तुला कुणीही आमंत्रण दिले नव्हते तिथे माझ्या शय्येत चोरपावलाने शिरण्याचा आणि अन्य कुणाच्यातरी पत्नीसमवेत शय्या-सुख घेण्याचा मार्ग तेवढा तुला ज्ञात होता पण हरएक स्नेहबंधनाने जी तुझ्याशी निगडीत आहेत, त्यांना बचावण्याचा मार्ग मात्र तुला माहीत नाही! देवाच्या ठायी असे अज्ञान खरो-खरीच विचित्र आहे. किंवा कदाचित असेही असावे की तुझा मूळ प्रकृतिस्वभावच 'विहित' आणि 'अविहित' यातला फरक जाणत नाही.

[ ॲम्फिट्रिओन राजवाड्यांत जातो. ]

**वाद्यवृन्द :**

खणखणून उठत आहे जेव्हा ॲपोलोचा स्वर,
रसभरीत संगीत छेडले जात आहे जेव्हा
त्याच्या वीणेमधून त्याच्यां सोनेरी नखीने,
त्यावेळी संमीलीत केले जात आहेत
ते हर्षाचे सूर,
आसवाने माखलेल्या शोकगीतांबरोबर
मी देखील गाईन त्याचीच स्तुतिस्तवने
प्रवेश केला आहे ज्याने अधोलोकातील यामिनीत
[ काय देऊ नांव त्याला मी?
झ्यूसोद्भव का ॲम्फिट्रिआनचा पुत्र? ]

आणि करीन गौरव त्याच्या कर्तृत्वाचा
गीतमाला गुंफून
त्यांच्या उदात्त कृतीचा गुणगौरव
हीच ठरते परलोकी गेलेल्यांची यशोगाथा

पूत केली त्याने प्रथम झ्यूसची वनराई
जिथे वनराजाने घातला होता धुमाकूळ
सिंहाचे भुरे पिवळसर कातडे
पांघरले त्याने आपल्या पाठीवर
आणि त्या सिंहाचे विक्राळ जबडे
महिरप बनले त्याच्या देखण्या मस्तकाची

नंतर आपल्या जीवघेण्या शरांनी
घाव घातला त्याने डोंगरी जमातीच्या
रानटी सेन्टॅारांवर

आणि नाश केला त्यांचा आपल्या पक्षधारी शरांनी
पेनेअसचा चमचमणारा प्रवाह
जिच्यातून अजून पीक काढलंच नाही,
अशी ती रूंद, सपाट, शेतजमीन
पेलिऑन पर्वतातील दऱ्या
भाल्यांसाठी जिथून छिनल्या फांद्या पाइनवृक्षांच्या
आणि दौडले वीर लुटालूट करीत थेसिलीच्या मैदानावर
त्या होमोलेच्या हिरव्यागार उतरणीवरील
मेंढपाळांच्या झोपड्या—
ही सर्व त्याच्या विजयाची साक्ष देतील,

नंतर अखिल भूभागाचा ज्याने केला होता सत्यानाश
त्या सोनेरी शिंगाच्या चित्रविचित्रांग अबलख काळवीटाला
ठार केले हेराक्लीजने आणि अर्पण केले त्याला
शिकारीची देवता इनोए हिच्या चरणी!

आणि तो झाला आरूढ डिऑमिडीजच्या रथावर
नि त्याने काटेरी लगामाने
जे लोभावले होते अनैसर्गिक खाद्यांना
ताव मारीत होते आकंठ मानवी मांसावर
माखून घेत होते आपले जबडे नि गव्हाण्या
मानवी रक्ताने
अशा चार रानटी हयांवर मिळविले प्रभुत्व!

मिसिनीच्या राजासाठी केलान् त्याने पाठपुरावा
आपल्या कष्टप्रद कामगिरीचा
गेला पार करून तो हेब्रसचा चंदेरी प्रवाह
मागोवा घेत अनॉरसच्या जलराशीचा
ठेपला येऊन पेलिऑनच्या सागरतीरीच्या मुळक्यांवर—!

आणि तिथे आपल्या शरांनी
प्राण घेतला त्याने अतिथीघातक सायकतसचा
जो ॲम्फेनी नजिक होता वास्तव्य करून एकान्तात !

मग केले त्याने प्रयाण दूरवर पश्चिमेकडे
गाणाऱ्या कुमारिकांच्या उद्यानात
पर्णाच्छादित सफरचंदतरूची सोनेरी फळे तोडायला !
नि ठार मारले त्या नागराजाला
विळखा घातला होता त्या तरुला ज्याने
आपल्या आग ओकणाऱ्या वेटोळ्यानी
साऱ्या आल्यागेल्यांपासून त्याचे रक्षण करायला
शोध घेतला त्याने तुफानी दर्यातील खाड्यांचा
अन बिनधोक केल्या त्या साऱ्या, दर्यावदर्यांच्या गलबतांसाठी
तो आला ॲटलसच्या महालाजवळ
आणि लांबवर पसरले त्याने आपले बाहू—
अस्मानाच्या मध्यवर्ती कमानीखाली
नि केवळ स्वीय सामर्थ्याने
तोलून धरले ते देवांचे तारकांनी उजळलेले प्रासाद !

नंतर पार केला त्याने वादळी युक्झाइन सागर
अश्वारोहणकुशल अमेझॉनांच्या मुलुखांत जाण्यासाठी
उड्या घेतात जिथे प्रचंड सरिता
माइओटीस सरोवराच्या अंतर्भागात
जिंकून घ्यायची होती त्याला
तिथल्या शूर लढवय्या राणीची
जरीचं भरतकाम केलेली ओढणी !

आणि हेलासच्या प्रत्येक भागातून
अनुयायांच्या पलटणी जमविल्या त्याने
रक्तपात आणि मृत्यू यांच्या थैमानातून
त्याने केला राणीच्या ओढणीचा पाठलाग
आणि हेलासला प्राप्त झाली ॲमेझोनची

ती ख्यातनाम लूट
जी आज ठेवली आहे मिसिनीत जीवापलीकडे जपून !

आणि त्या प्राणघातकी चांडाळाची
लेर्नेमधल्या त्या सहस्रशीर्षाची
छाटली त्याने शिरे आणि केले त्यांना छिन्नभिन्न
नि माखले त्याचे रुधिर शरांवर,
ज्या शरांनी केले ठार
एरिथिआच्या पशुपालाला—तीन देहधारी गेरिऑनला !

आपल्या पदयात्रांच्या व यशोधवल पराक्रमांचा
कळस गाठण्यासाठी की काय,
गलबत घेतले त्याने
अन् चालू लागला हेडीजकडे—
आसवांची ती दुनिया—त्याचे अखेरचे पराक्रमकांड

पण आसन्ननाश आहे आता तो शूरमर्द
पोचला आहे तो आयुष्याच्या सीमारेषेपर्यंत
परत आला नाही तो अजून
मित्रशून्य आहे त्याचे सदन
असुरी अन्यायाने पिटाळले आहे त्याच्या अपत्यांना
अशा मार्गावर की,
जेथून परत येणे नाही.

शॅरॉनचे वल्हे प्रतीक्षा करीत आहे त्यांची—
तुझे घर दार आशा ठेवून आहे तुझ्यावर सहाय्यार्थ
पण हेराक्लीज !
तू कुठे आहेस इथे ?

अरेरे ! मी जर असतो तरुण आणि बलशाली,
जर चालवू शकत असतो भाला रणकंदनात
तर—मी आणि माझ्या जवानीतील हे मित्र
तुझ्या अपत्यांच्या बाजूने उभे ठाकलो असतो आम्ही
आणि वाचवले असते त्यांना

पण आता
काहीही उरले नाही त्या वैभवशाली गतकालातले !

अरे पण, पाहा ! इकडेच येत आहेत ते
मृतांसाठी वापरावयाचे झगे घालून
एकेकाळी पुण्यश्लोक गणल्या जाणाऱ्या
हेराक्लीजचे हे पुत्र
आपल्या अपत्यांना हाताशी धरून पुढे येत आहे
त्याची पत्नी, आणि
हेराक्लीजचे पिताजीही !
अरेरे ! किती करुण आहे हे दृश्य !
माझ्या थकलेल्या नेत्रांत आसवे उभी राहताहेत
आवर घालता येत नाही मला त्यांना

[ ॲम्फिट्रिओन, मेगारा व तीन मुलगे प्रवेश करतात. ]

[रोहित म्हणून कोण काम बजावणार आहे ? सुरी कोण परजणार आहे ? वोखाळण्यासाठी यज्ञबळी सिद्ध आहेत ओळीने ! लाजिरवाणी, विपरीत अन्त्य प व बालके, वृद्ध आणि तरुण—सारी एकाच वेळी एकाच जोखडाखाली ारी. ज्यांच्याकडे मी आता अखेरचाच दृष्टिक्षेप टाकीत आहे त्या या मुलांवर ोणत्या कठोर नियतीने घातला आहे हा प्राणघातक घाव ? मी तुमचा ग, मायेच्या पोटी केवढ्या दक्षतेने तुम्हाला वाढवलं, वर्तवलं—ते एवढ्याच- ी वैऱ्यांनी तुमचा अपमान करावा तसे करण्यात धन्यता मानावी नि अखेर म्हाला ? आशा कशी ठकवून गेली मला ! तुमचे पिताजी नेहमी उच्चारायचे भर ठेवून केवढ्या उज्ज्वल आशाआकांक्षा बाळगल्या होत्या मी ! तू—सर्वांत -तू ॲरगॉसवर राज्य करायचा होतास ! युरिस्थिअसचा राजवाडा आणि नृद्ध मैदाने यावर तू स्वामित्व गाजविणार होतास. आपले स्वतःचे खास चिलखत—वनराजाच्या कातड्याचा अंगरखा, तो तुमच्या मस्तकाभोवती

[ दुसऱ्या मुलाकडे वळून ] तू व्हायचा होतास थीब्सचा राजा आणि तेथील ामी. माझ्या पित्याने मला दिलेल्या या विस्तीर्ण जमिनी हे सगळे वारसाहक्काने ते. तू मुलगा ना त्याचा ! तू मागायचास अन त्याने द्यायचं ! तो आपली गदा तुझ्या उजव्या हातात देणगी देण्याच्या आविर्भावाने ठेवायचा ! आणि ा सर्वांत धाकट्याला त्याच्या दूरवर विजयी झेप घेणाऱ्या शरांनी फार पूर्वी

कबाजात घेतलेले इचालिआ, तुला देण्याचे वचन द्यायचा. अशाप्रकारे अभिमानाने आणि आत्मविश्वासाने त्याने आपल्या तिन्ही पुत्रांसाठी भक्कम पायावर आधारित तीन सिंहासनांची योजना केली होती. आणि मी—मी तर तुमच्यासाठी अथेन्स, स्पार्टा, थीब्समधीस उत्कृष्ट निवडीच्या वधू निवडून निवडून नियोजित करून ठेवल्या होत्या. कारण अशा सोयरिकींनी—गलबताच्या पाठीमागे बांधलेल्या दणकट दोरखंडानी जसा त्याला दृढ आधार मिळतो तसा तुम्हाला सुरक्षितपणा आणि समृद्धी प्राप्त झाली असती. ती आशा सुद्धा संपलेली आहे आता! नशीब फिरले आहे, दैव फिरले आहे आणि त्याने तुम्हाला वधू म्हणून मृत्युदेवाच्या सहचऱ्या दिल्या आहेत माझे तीर्थोदक म्हणजे अश्रूच अश्रू! माझा हर्ष म्हणजे सारा विलापच. पाहा! मृत्यूशी झालेल्या या तुमच्या विषवत मीलनावर शिक्कामोर्तब करण्यासाठी तुमचे पितामह तुमच्या विवाहसमयीची मेजवानी साजरी करीत आहेत.

हाय! बाळांनो! मला तुम्हाला घट्ट कवळू द्या. कोण येतोय प्रथम! अन कोण शेवटी? या! मला तुमचा पापा घेऊ द्या, तुम्हाला बिलगू द्या. माझ्या फुलांनो! रडता आहात तुम्ही? तर मग तपकिरी पंखाच्या मधमाशीप्रमाणे तुमच्या साऱ्या आसवांचा मी एकच अर्करूपी अमोल अश्रू बनवीन आणि तो तुमच्यासाठी माझ्या नेत्रातून ओघळेल.

प्रिय प्राणनाथ! हेराक्लीज! पृथ्वीवर उच्चारलेला शब्द जर अधोलोकात वास करणाऱ्यांच्या कानापर्यंत पोचत असेल तर मी आपल्याला हाका घालते आता. आपले पिताजी आणि आपली मुले मृत्युसन्निध आहेत. मी तुमची पत्नी–जिला सर्वांनी भाग्यवान् म्हणून नावाजली–तीसुद्धा नष्ट होण्याच्या पंथी आहे. या! धावा आमच्या सोडवणुकीला. पिशाच्च रूपाने का होईना, पण एकदा माझ्या दृष्टीस पडा–आणखी कशाची गरजच नाही पडणार मग! नुसते या, म्हणजे आम्ही बचावलोच म्हणून समजा.

**ॲम्फिट्रिओन :** मुली! अधोलोकातील शक्तींची तू आळवणी करते आहेस–कर. मी माझे हात स्वर्गासमोर पसरतो. हे झ्यूसदेवा! मी आपल्याला आव्हान करीत आहे. जर, या मुलांना आपल्याला सहाय्य द्यायचे असेल तर या क्षणीच या आणि त्यांचा बचाव करा. थोडा अवधी लागला तरीही खूप खूप उशीर होणार आहे. ओः! किती वेळा तरी मी करुणा भाकली! पण माझ्या तोंडाची वाफ फुकट दवडली मी. आता आपली सुटका नाही. आपले मरण अटळ आहे [ श्रेष्ठीवृन्दाला उद्देशून ] मित्र हो! जीवन ही एक क्षणभंगुर आणि क्षुद्र गोष्ट आहे. जीविताच्या या अशा स्वरूपामुळे जीवनयात्रा करताना जीवनाच्या उषःकालापासून तो निशेचा पदरव ऐकू येईपर्यंत दुःखाला वावभर दूर ठेवून जितके सुखोपभोग भोगता येतील तितके भोगून घ्या. काळाच्या भरधाव दौडीत आमच्या आशांना जपण्यात त्याला स्वारस्य नसते. त्याचे लक्ष केंद्रित झालेले असते स्वतःच्या अंगीकृत कार्यावर. माझ्याकडे पाहा ना! एकेकाळी माझ्या थोर कर्तृत्वाचे नगारे वाजत होते. साऱ्यांचे डोळे माझ्यावर खिळून राहात होते. वादळी वाऱ्याने एखादे पीस आभाळात उंच उडवून द्यावे

त्याप्रमाणे आता अवघ्या एका दिवसात नियतीने माझ्यापासून प्रत्येक गोष्ट हिसकावून घेतली आहे. माझे सर्व काही हरपले आहे. संपत्ती! कीर्ती! कोण ठामपणे हक्क सांगू शकेल त्यांच्यावर? आता निरोप द्या मित्रांनो! आपण सर्व भर ज्वानीत होतो तेव्हापासूनची आहे आपली परस्पर मैत्री. या ठिकाणी तुमच्या नजरेस पडायची माझी ही शेवटचीच वेळ!

**मेगारा :** अहो! बघा! बघा! कोण आहे ते! ते माझे पतिदेव–हेराक्लीज–आहेत की काय?

**ॲम्फिट्रिओन :** मला काहीच उमगत नाही मुली! शब्दच उमटत नाही माझ्या तोंडातून!

**मेगारा :** ते या जगात नाहीत असं सांगण्यात आलं होतं आपल्याला. तेच असतील का हे?

**ॲम्फिट्रिओन :** हा हेराक्लीजच! जर आपणांस दिवसाढवळ्या स्वप्न पडत नसेल तर—

**मेगारा :** स्वप्न नव्हेच हे! दुःखाच्या पोटी अशी दिव्य दृश्ये थोडीच उपजणार आहेत? हेराक्लीजच–तुमचे पुत्र–दुसरे कुण्णी कुणी नाही बरं! या! बाळांनो! धावा! पळा! पित्याच्या अंगरख्याला घट्ट बिलगा, आणि कधीही जाऊ देऊ नका आता त्यांना. झ्यूस-इतकाच–किंचितही कमी नाही–असा तो तुमचा रक्षणकर्ता आहे.

[ हेराक्लीज प्रवेश करतो. ]

**हेराक्लीज :** माझ्या वास्तुदेवते! अभिवादन करतो तुला! माझ्या घराच्या उबेकडे घेऊन जाणाऱ्या प्रवेशद्वारा! तुला अभिवादन. या जित्याजागत्या दुनियेत एकदाचा परत आल्यानंतर झालेल्या तुझ्या या दर्शनाने समाधान वाटतंय मला! अरे पण! हे काय? माझे पुत्र प्रेतवस्त्रांत? त्यांच्या मस्तकांवर मरणोन्मुखांवर घालावयाच्या या माळा? माणसांची एवढी गर्दी का? आणि त्या तिथे? माझी पत्नी! माझे पिताजी पण! सगळे रडताहेत! काय घडलंय तरी काय? मला विचारलंच पाहिजे त्यांना. मेगारा! माझ्या भार्ये! काय चाललंय हे? घडलं तरी काय इथे?

**मेगारा :** हाय! मत्प्रिय प्राणनाथा!

**ॲम्फिट्रिओन :** माझा प्रिय पुत्र! माझ्या वृद्ध नजरेचा दीप!

**मेगारा :** सुखरूप आहात आपण? आपण आलात तर अगदी अखेरच्या घटकेला आमचे प्राण वाचविण्यासाठी!

**हेराक्लीज :** तुमचे प्राण? आहे काय हे सगळं पिताजी? काही संकट आलं का इथे तुमच्यावर?

**मेगारा :** अहो! ठार मारणार आहेत आम्हाला ते! [ ॲम्फिट्रिओनला उद्देशून ] माफ करा महाराज, मी तुमच्या आधी बोलते म्हणून. हा आपला अधिकार. पण आपले दुःख सांगण्यात पुरुषांपेक्षा स्त्रिया अधिक तत्पर असतात. माझे पुत्र मरणाच्या दारात होते; आणि मी पण...

**हेराक्लीज :** बाप रे ! ॲपोलोदेवाची आण !! काय सांगणार आहेस या पुढे आणखी ?

**मेगारा :** माझे बंधू मरण पावले, माझे पिताजीसुद्धा !

**हेराक्लीज :** पण झालं कसं हे ? कुणी घाव घातले त्यांच्यावर ?

**मेगारा :** लिकसने त्यांना ठार मारलं. थीब्सचा नवा राजा तो आहे !

**हेराक्लीज :** शहरावर चढाई केली त्याने ? का देशात यादवी माजली ?

**मेगारा :** थीब्समध्ये फळी पडली होती. या सात वेशींवर आता त्याची सत्ता आहे.

**हेराक्लीज :** आणि तू नि ऑम्फिट्रिओन—तुम्हाला कसली भीती घालण्यात आली होती ?

**मेगारा :** त्याने तुमच्या पित्याला, तुमच्या पुत्रांना आणि मलाही ठार मारण्याचं ठरवलं होतं.

**हेराक्लीज :** तुम्हाला ठारा मारायचं ? माझे पितृहीन पुत्र ! त्यांच्यापासून कसले भय निर्माण होणार होतं त्याला ?

**मेगारा :** माझ्या पित्याच्या वधाचा सूड, ते एखाद दिवशी उगवतील अशी भीती वाटली त्याला !

**हेराक्लीज :** पण तुम्ही हा पोषाख का चढविला आहात ? दफनाच्या वेळचे कपडे हे !

**मेगारा :** हे आत्ताच आम्ही अंगावर चढवले ते. मरणासाठी तयार झालो आहोत आम्ही.

**हेराक्लीज :** आणि तो तुम्हाला ठार मारणार होता ! तुम्हाला ? माझ्या कुटुंबियांना ?

**मेगारा :** आम्हाला सहाय्य करायला कुणी मित्रच उरले नाहीत. आणि तुम्ही—तुम्ही या जगातच नाही असं कानावर पडलं आमच्या.

**हेराक्लीज :** कशामुळे माझ्याबाबतची आशा खुंटली तुमची !

**मेगारा :** युरिस्थिअस आम्हाला सारखी माहितीपत्रे पाठवीत होता.

**हेराक्लीज :** अस्सं ! समजलो. पण माझं घर का सोडलंत ?

**मेगारा :** त्यांनी आम्हाला घराबाहेर हाकलून दिलं. तुमचे वडील तर बिछान्यावरून बाहेर भिरकावले गेले...

**हेराक्लीज :** वृद्ध, वयातीत माणसाला त्यानं असं अवहेलनापूर्वक वागवलं ? त्याला काही भद्राचार समजतो की नाही ?

**मेगारा :** भद्राचाररूपी देवाची त्याला ओळख आहेसं वाटत नाही !

**हेराक्लीज :** पण—पण...मी एक इथे नव्हतो—पण आपल्या सगळ्या स्नेह्यांचे काय झाले ?

**मेगारा :** माणसाला जेव्हा दुर्दैव घेरते तेव्हा कोण राहाणार एकनिष्ठ त्याच्याशी ?

**हेराक्लीज :** मिनिईच्या युद्धात मी जे जे सोसलं ते सगळं त्यांनी मनातून झटकून टाकलं काय ?

**मेगारा :** अर्थातच ! मी आत्ताच म्हणाले ना, त्याप्रमाणे दैवहीन तो मित्रहीनच.

**हेराक्लीज :** चला फेकून द्या या अंत्यसंस्काराच्या वेळी धारण करावयाच्या माला. नजर वर उचलून बघा. तिमिराऐवजी आता तुम्हाला प्रकाश लाभला आहे, मृत्यूऐवजी जीवन प्राप्त झाले आहे. मला आता निघायलाच हवं. माझ्या हाताशी काम पडले आहे. पहिलं, या नवीन राजाचे घर भुईसपाट करायचं, त्याचे शीर धडावेगळे करायचे आणि ते कुत्र्यांनी फाडावं, म्हणून बाहेर फेकून द्यायचे. नंतर—ज्यांनी माझे उपकार विश्वासघाताने फेडलेत अशा कॅडमसच्या नागरिकांशी—अनेक विजयांमुळे अनुभवसमृद्ध झालेली ही माझी गदा यथायोग्य व्यवहार करील अगर माझ्या पिसे लावलेल्या तीक्ष्ण शरांनी मी त्यांची दाणादाण उडवीन आणि इस्मेनस नदीचे पात्र प्रेतांनी भरून टाकीन आणि डिर्सेची स्फटिकासम जलधारा तांबडीलाल करून सोडीन. दुनियेतील इतरेजनांच्या आधी माझी पत्नी, माझे पुत्र, माझे पिताजी यांना मी सहाय्य करायला नको का ? माझ्या सगळ्या प्रसिद्ध वीरकृत्यांना आता कायमचा विराम. जर त्यांच्या नादाने मी स्वकीयांना सहाय्य करण्याकडे दुर्लक्ष केलं तर ही वीरकृत्ये म्हणजे निरर्थक कालापव्ययच. माझे नाव लावण्याबद्दल हे मुलगे ठार मारले जायचे होते ! तर मग जरूर पडली तर त्यांच्या रक्षणासाठी मला मरायलाच हवं. युरिस्थिअसच्या आज्ञेवरून मी झुंजलो त्या सहस्रशीर्षाशी आणि त्या वनराजाशी. माझ्या स्वतःच्या मुलांच्या जीविताला उत्पन्न झालेल्या धोक्याबद्दल मी जर सूड उगविला नाही, तर त्या वीरकृत्यांबद्दल कीर्ती कशी मिळणार मला ? विजेता हेराक्लीज म्हणून मी यापुढे कधीही ओळखला जाणार नाही.

**श्रेष्ठीवृन्द :** ते तुझे पुत्र आहेत. त्यांच्यासाठी सूड उगविणे योग्यच आहे. तुझ्या वृद्ध पित्यासाठी आणि तुझ्या पत्नीसाठी सूड उगविणे हेही तितकेच योग्य.

**ॲम्फिट्रिओन :** माझ्या महानुभाव पुत्रा ! आपल्या मित्रांवर प्रेम करणे आणि आपल्या शत्रूंचा द्वेष करणे हे तुला साजेसेच आहे. मात्र अतिशय उतावळेपणाने काही करण्याच्या भरीस पडू नकोस.

**हेराक्लीज :** मी जे काही करण्याचे योजले आहे, त्यापैकी आपणास काही अविचारीपणाचे वाटते काय ?

**ॲम्फिट्रिओन :** आपण ऐश्वर्याचे जीवन जगत आहोत असा देखावा करणाऱ्या गरजू माणसांचा फार मोठा वर्ग आहे थीब्समध्ये. लिकसला त्यांचा भक्कम पाठिंबा आहे. त्यानीच बंडाचे उठाव केले. उधळेपणा आणि आळशीपणा यांमुळे उद्‌भवलेल्या आपल्या स्वतःच्या दिवाळखोरीला बेकायदा लूटमारीने निपटता येईल या आशेने त्यांनी थीब्सला गुलामगिरीत लोटले. थीब्समध्ये प्रवेश करताना तू अनेकांच्या दृष्टीस पडला आहेस. तुझ्या पुनरागमनाची वार्ता ऐकताच तुझे शत्रू इथे गर्दी करतील. म्हणून म्हणतो, स्वसंरक्षणार्थ सावध राहा.

**हेराक्लीज :** साऱ्या शहराने जरी मला पाहिलं असलं तरी मला पर्वा नाही त्याची, पण

एका अशुभ चिन्हाने मला सावध केलं होतं. चुकीच्या दिशेने उडणारा पक्षी होता तो, तेव्हा पुढे संकट येणार असा तर्क करूनच मी येथे गुप्त वाटेने आलो.

**ॲम्फिट्रिओन :** उत्तम! आता आत जा! गृहदेवतांना वंदन कर आणि आपल्या वास्तूला घडीव आपले दर्शन. तुझ्या पत्नीला, तुझ्या पुत्रांना आणि मला, कत्तल करण्याकरिता ओढून नेण्यासाठी राजा स्वतः येईल. घरातच राहा म्हणजे सगळेच हस्तगत होईल तुझ्या. तू सुरक्षित राहून विजय मिळविशील. माझ्या बाळा! घरात सगळे स्थिरस्थावर करीपर्यंत आपल्या नागरिकांना उत्तेजित करू नकोस.

**हेराक्लीज :** हा चांगलाच सल्ला आहे. मी तो पाळीन. मी जातो आत. हेडीज आणि पर्सेफॉनी यांच्या असूर्यंपश्या गुहांमधून मी शेवटी परत तर आलो. तेव्हा जे आपले घर सुरक्षित राखतात त्या देवांना सर्व प्रथम अभिवादन करायला मी चुकणार नाही.

**ॲम्फिट्रिओन :** माझ्यापुत्रा! मृत्यूच्या दुनियेत तू खरोखरीच प्रवेश केला होतास का रे?

**हेराक्लीज :** हो तर! आणि त्या तीन शिरे असलेल्या सेरबेरसला तिथून वर पृथ्वीवर ओढून आणला मी.

**ॲम्फिट्रिओन :** त्याच्याशी झुंजून तू त्याला यायला भाग पाडलंस का पर्सेफॉनीची देणगी म्हणून मिळाला तुला तो?

**हेराक्लीज :** झुन्जावं लागलं मला त्याच्याशी. पवित्र गूढ गोष्टींचे दर्शन घडलं होतं मला. त्यामुळेच बळ आलं मला!

**ॲम्फिट्रिओन :** आता कोणाजवळ आहे तो? युरिस्थिअसपाशी?

**हेराक्लीज :** छे! तो आता डिमिटरच्या पवित्र वनराईत आहे हर्मिऑनीजवळ.

**ॲम्फिट्रिओन :** आणि तू पृथ्वीवर परत आला आहेस हे युरिस्थिअसला माहीत आहे?

**हेराक्लीज :** नाही! इथे काय हालहवाल आहे, हे प्रथम पाहायचं ठरवलं मी.

**ॲम्फिट्रिओन :** पृथ्वीच्याखाली अधोलोकात, इतका दीर्घकाल तू का राहिला होतास?

**हेराक्लीज :** कैदी म्हणून धरलेला थीसिअस तिथे होता. त्याची सुटका करण्यासाठी मला परत येणं, लांबणीवर टाकावं लागलं.

**ॲम्फिट्रिओन :** आता कुठाय तो! आपल्या घरी गेला काय?

**हेराक्लीज :** होय! अथेन्सला गेलाय आपल्या सुटकेने हर्षभरित होऊन. पण...माझ्या बाळांनो! या माझ्या सांगाती. तुमच्या पित्याच्या घरात चला. जेव्हा या घराबाहेर पडलात त्या वेळेपेक्षा आता या घरामध्ये प्रवेश करताना कितीतरी जास्त सुखी आहात तुम्ही. जरा उल्हसित व्हा पाहू! आता आणखी अश्रुपात नको, आणि तू! माझ्या भार्ये! थरथर कापू नको अशी, स्वतःला सावर. बाळांनो, माझ्या अंगरख्याला असे घट्ट बिलगायला नको आता. मी काही आता उडून जाणार नाही की तुमच्यापासून दूर जायचा कुठलाही प्रयत्न करणार

नाही. अरे हे काय ? अधिकच घट्ट चिकटताहेत ते मला. मला सोडीतच नाहीत ते. अरेरे ! इतके समीप होता तुम्ही मृत्यूच्या ! तर मग या अन् धरा माझे हात. मी या माझ्या छोट्या गलबतांना आता माझ्या मागे ओढून नेणार आहे. मुलांचा कधीच त्रास वाटत नाही मला. मुलांच्या बाबतीत सर्वच माणसांची ही अशीच, सारखीच भावना असते. मग ती उच्च कुलांत जन्माला आलेली असोत किंवा नीच कुलांत; धनाढ्य असोत किंवा गरीब; पण बालकांवर सगळेच माया करतात—अगदी एकूण एक मानवी जीव !

[ सगळे राजवाड्यात जातात ]

**श्रेष्ठीवृन्द :**

प्रीती करतो मी फक्त यौवनावरच
भारभूत होते वय माझ्या मस्तकावर ओझ्यासारखे
एटनाच्या खडकापेक्षाही जड भासते मला ते
माझ्या नजरेसमोर काळोखाचा पडदा ओढते जरा,
नाही स्वीकारणार मी यौवनाच्या बदल्यात
पौर्वात्य तख्ताची दौलत
की सुवर्णाने परिपूर्ण राजप्रासाद !
यौवन अत्यंत मौल्यवान असते वैभवाच्या काळात
आणि तितकेच मूल्यवान असते दारिद्र्यात !
जरा, ही अतीव दुःखदा !
मृत्यूने डागळलेली
तिरस्कार करतो मी तिचा.
लांबच राहू द्या ती, सागर उदरस्थ करू द्या तिला
जीर्णत्वाचा हा शाप,
माणसांच्या वास्तूंवर आणि शहरांवर का कोसळावा ?
वाऱ्यावर विरून जाऊ द्या ना, तो एकदांचा !
देवांजवळ जर असेल समज आणि शहाणपणा
आम्ही मानव ज्याला शहाणपणा म्हणतो तो—
तर दुसऱ्यांदा यौवन द्यावयास हवे होते त्यांनी
ज्यांचे जीवन पुण्यशील असते त्यांना
त्यांचे निराळेपण उठावदार करून दाखविण्यासाठी !
अशी माणसे एका मृत्यूनंतर
सूर्याच्या प्रकाशकिरणांत पुन्हा उभी ठाकतील
आणि जीविताचा द्विगुणित पथ चालतील

आणि हिणकसशीलाचे मानव,
उपभोगतील फक्त एकच आयुर्मर्यादा !

या अशा मार्गाने शक्य होईल निवडून काढणे
सज्जन जीव अधमांमधून.
जसा खलाशी पाहतो चकाकणारा तारकांचा पुंजका
काळ्याकुट्ट मेघांच्या सापटीतून !
पण करीत नाहीत देव स्पष्ट विभागणी
चांगुलपणा आणि नतद्रष्टपणा या मध्ये
काळ—जशजशी वर्षे उमटतात—तसतसा
संपत्तीतील वाढीव्यतिरिक्त काहीच आणीत नाही अधिक !

कलादेवतांचा कृपाप्रसाद
असा जो वाद्य व गीत यांचा अचूक मेळ
त्याने साजरा होणाऱ्या विजयोत्सवात
सामील व्हायला कधीच कंटाळणार नाही मी.
जिथे गीते ऐकविली जात नाहीत
तिथल्या जीवनात रसच वाटत नाही मला
जिथे कवीश्रेष्ठांच्या मस्तकावर
गौरवाचे मुकुट चढविले जातात
तिथल्या परिसरात
जीवन व्यतीत करू द्या मला !

गायक वृद्ध झाला तरी त्याची स्मृती जीर्ण होत नाही
आणि म्हणून तो वाहतो तिला स्तवनगीतांची सुमने
अजूनही आलापू शकतो मी
हेराक्लीजची विजयगीते
ज्या ठिकाणी बॅकस आपली मद्याची अर्घ्ये देतो
अथवा, जिथे लिबियाची वेणू आणि
साततारांची वीणा
मधुर सुरांचा पूर वाहवेत, तिथे.
ज्यांनी मला आपली गुपिते शिकविली

त्या संगीत देवतांची सेवा न करण्याइतका
वयातीत झालो नाही मी अद्याप!

विजयगीते गायली जातात डेलॉसच्या कुमारिकांकडून
जेव्हा लेटोच्या देदीप्यमान पुत्राच्या देवालयातील
दरवाज्यानजिक
लालित्यपूर्ण पदन्यास करीत
त्या नृत्याची गिरकी घेतात तेव्हा.
या इथे आपल्या दरवाज्यापाशी
मी विजयगीत गाईन!
माझ्या करड्या दाढीतील ओठांमधून
उच्चारवात चढेल माझे अखेरचे हंसगीत
माझ्यापाशी विषय आहे छानदार अशा गीतांसाठी

हेराक्लीज हा झ्यूसचा पुत्र आहे
त्याच्या जन्माभोवती आहेच श्रेष्ठत्वाचे वलय
पण आपल्या उदात्त जीवनातील अचाट कृत्यांनी
श्रेष्ठत्वाची आणखी एक पायरी वर चढला आहे तो.
ज्यांच्या दहशतीत माणसे जीवन कंठीत होती
त्या पशूंचा नाश करून
आम्ही उपभोगीत असलेली स्थिर शांतता
आम्हाला मिळवून दिली आहे त्याने.

[ रंगमंचाच्या एका बाजूने सेवकांसह लिकस प्रवेश करतो; आणि राजवाड्यातून ॲम्फिट्रिओन येतो. ]

**लिकस :** ॲम्फिट्रिओन! तू काही लवकर बाहेर आला नाहीस. तुम्ही सर्वांनीच फार वेळ घेतलात प्रेतवस्त्रे चढवण्यामध्ये. चला लवकर आता! हाका मार त्याच्या बायकोला नि पोरांना! त्यांना इथे बाहेर येऊन नजरेस पडायला सांग सर्वांच्या. अशाच होत्या आपल्या अटी. तुमच्या बाजूने आपखुषीच्या होत्या त्या. तुम्ही मरायचं मान्य केलं होतं.

**ॲम्फिट्रिओन :** राजा! माझ्या जखमांवर मीठ चोळतो आहेस तू! माझा पुत्र तर मृत झालेलाच आहे; त्या माझ्या हानीबद्दल टोचून बोलतोयस तू मला. सामर्थ्यवान् आहेस तू. तेव्हा तुझ्या उतावळेपणाला काही प्रमाणात आळा घालायला हवास तू. आम्ही मरायलाच हवं असं तू म्हणतोस! होऊ दे तर मग तसं. तुझी इच्छा उतरू दे मूर्त स्वरूपात.

**लिकस :** ठीक तर! पण मेगारा कुठाय? कुठे आहेत हेराक्लीजचे तीन पुत्र?

**ॲम्फिट्रिओन :** [ राजवाड्याच्या दाराकडे पाहात ] या जागेवरून मला जितकं सांगता येणं शक्य आहे तितके सांगायचं झालं तर मला वाटतं...

**लिकस :** तुला वाटतं ? काय वाटतं तुला ?

**ॲम्फिट्रिओन :** शरणार्थी म्हणून, ती वेदीच्या पायरीवर बसून आहे.

**लिकस :** अस्सं ! पण तिचे प्राण नाही वाचणार तिथे बसल्याने.

**ॲम्फिट्रिओन :** आपल्या मृतपतीच्या नावाने ती टाहो फोडीत आहे निरर्थक.

**लिकस :** तो कधीही परत यायचा नाही.

**ॲम्फिट्रिओन :** नाही यायचा. जर कुणा देवाने मृतावस्थेतून त्याला उठवला तरच त्याची येण्याची आशा.

**लिकस :** आत जा आणि आण तिला बाहेर.

**ॲम्फिट्रिओन :** जर मी तसं केलं तर तिचे रक्तःसांडाण्यात अंशतः गुन्हेगार ठरेन मी.

**लिकस :** ठीक आहे. जर तुझ्या मनात संदेह येत असतील......पण माझ्या मनात संदेह नाहीत आणि भीतीही नाही कसली. मी स्वतःच आत जातो आणि घेऊन येतो त्या सर्वांना. सेवकांनो ! या रे माझ्या मागे. कालहरणाचा डाव खेळते आहे ती ! या वेळं काढूपणाशी मुकाबला करण्यास मजाच वाटेल मला.

[ सेवकांसह लिकस जातो ]

**ॲम्फिट्रिओन :** ठीक ! जा तर ! तुला योग्य असाच शेवट वाट पाहातोय तुझी. जे काही करायचं राहिलं आहे, त्याच्याकडे पाहील कदाचित दुसरंच कुणी तरी ! तुझी करणी होती निर्दयपणाची. मग कठोर कर्मभोगाचीच अपेक्षा कर आता. मित्रांनो अगदी योग्य वेळी गेला तो आत. तो अगदी सहज जाळ्यात सापडेल आता. मी जाईन आणि बघेन कसा मरून कोसळतो तो. आपल्या दुष्टकृत्यांचे वाजवी मूल्य वैरी जेव्हा आपल्या रक्तानेच देतो, तेव्हा केवढा आनंद होतो मनाला.

**श्रेष्ठीवृन्द :**

निर्दयपणा आणि हालअपेष्टा
यांनी बदलल्या आहेत बाजू आता
एकेकाळी सामर्थ्यसंपन्न असलेल्या राजाचे जीवन
मृत्यूच्या आखाताकडे परत वाहते आहे.
स्वर्गाच्या न्यायाचा, नियतीच्या समतोलपणाचा
जयजयकार !

आपल्याहून श्रेष्ठांच्या बेमुर्वतखोड छळवादांचे ऋण
तुला चुकते करावयाचे आहे ज्या ठिकाणी आपल्या रक्ताने,
त्याच ठिकाणी अखेरीस तू येऊन ठेपला आहेस

उसळताहेत माझ्या डोळ्यांतून आनंदाश्रू
ज्या कर्मभोगांची त्याने कधी शक्य कोटीत
गणनाही केली नसेल
तेच आता येत आहेत राजा लिकसच्या वाट्याला
ये मित्रा! आपण घरात डोकावू या
घराच्या आतील बाजूस
आपण जसे इच्छितो
तसे घडते आहे सारे की नाहीं ते पाहू या

[ राजवाड्याच्या आतील बाजूने फोडलेली एक किंकाळी ऐकू येते. ]

**श्रेष्ठीवृन्द :**

ऐका! जे ऐकण्यासाठी मी आतुर झालो आहे
त्या गीताचा हा प्रारंभीचा सूर.
मृत्यू समीप आहे, राजाला ज्ञात आहे ते
आणि भीतीने कण्हत कुथत तो सामोरा जात आहे त्याला.

**लिकस :** [ आतून ] हे कॅडमसच्या भूमी ! मी ठार मारला जातोय ग विश्वासघाताने !

**श्रेष्ठीवृन्द :**

तू प्राण घातकी होतास,
हा न्याय बदला आहे
तुझ्या सर्व दुष्कृत्यांबद्दलचा
सहन केलाच पाहिजे तो तुला

कोण होता तो मानव, नाशवंत रक्तामांसाचा
जो आव्हान देत होता स्वर्गातील देवांना
मूर्खप्रलापांनी आणि निरर्गल अशी
निंदा करीत म्हणाला, देवांमध्ये काही दम नाही म्हणून ?

सुहृदांनो! तो निर्दय माणूस ठार झाला आहे
शांती नांदत आहे घरात आता
चला! या! आनंदाने नाचा
आपल्या आशांना अनुकूल साद मिळाली आहे
ज्यांच्यावर आपण प्रेम केले
त्यांना जय प्राप्त झाला आहे

पवित्र अशा थीब्स शहरात जिकडे तिकडे
निनादते आहे नृत्य आणि मेजवानी प्रसंगीचे संगीत
प्रारब्धदशा फिरली आहे
आसवांचा विसर पडला आहे
प्रारब्धदशा फिरली आहे
संकटांना विराम मिळाला आहे

हर्षाची गीते ओठांतून उमटत आहेत
परस्वाचे अपहरण करणाराचा अस्त झाला आहे
आपला पूर्वीचा नृपति पुन्हा राज्यावर आला आहे
मृत्यूच्या बंदरातून अक्षत घरी परतला आहे
सर्व आशांपलीकडील आशा आपल्या भेटीस आली आहे
देव – जपणूक करतात मानवांची
देव – नजर असते त्यांची सक्त
दुष्टांवर आणि सुष्टांवर
सद्भाग्यासह सुवर्ण जुंपले जाते
मर्त्य जीवनाच्या रथाला
अन् गति देते त्याला अभिमानाच्या पथावर
कुशीवर त्यांच्या चढविलेला असतो साज
पापपुण्याचा विचार न करणाऱ्या सत्तेचा

बेफिकिर, अविवेकी सारथी
कधीच दृष्टिक्षेप करीत नाही परतीच्या रस्त्याकडे
अन् अजून दूर असलेल्या काळाकडे !
विधिनियमांच्याही पुढे फेकीत असतो तो आपला रथ
आपल्या अनिर्बंध इच्छाशक्तीला बेलगाम करीत,
परिणामी चक्काचूरे करतो तो स्वतःच्याच यशाचा
कर्तृत्वाच्या ऐन बहरात
आणि काळी धूळ अच्छादून टाकते त्याला

पुष्पमाला धारण कर इसमेनस सरिते।
शृंगार सातवेशींच्या थीब्सच्या वीथीना।

डिर्सेच्या चकाकणाऱ्या जलराशींनो
चला, उठा, नाचू लागा एकदम

आणि एसोपसच्या जलदेवतांनो
या तुम्हीही आपल्या पितृप्रवाहातून
हेराक्लीजचे लढे आणि दीप्तिमान यश
यांचे गुणगान गाण्यात सामील व्हा आमच्यात.

डेल्फीच्या वृक्षाच्छादित सुळक्यांनो!
हेलिकॉनच्या कलादेवतांच्या वसतिस्थानांनो
निनादू द्या माझ्या नगरीतील तटबंदीमधून
आणि वीथींवरुन
तुमच्या हर्षाच्या आरोळ्यांचा प्रत्येक प्रतिध्वनी

ही नगरी, जिथे तरारून उठले पेरलेल्या माणसांचे पीक
—पितळी ढाली असलेली सेना—
थीब्ससाठी पवित्र उषेसारख्या उदयमान होणाऱ्या
त्याच्या अपत्यांच्या अपत्यांची
ही भूमी आहे वारसा, वंशपरंपरागत सातत्याने

हे शय्ये! जिथे दोन जन्मदाते प्रीतिशयन करते झाले
एक मर्त्य; दुसरा झ्यूसदेव
जो आला होता, पर्सीअसची कन्या ॲल्कॅमेनी
हिला आलिंगन द्यायला

खूप झाली वर्षे आता त्याला
जेव्हा सुरुवातीच्या शंका, दिल्या सोडून माझ्या मीच
आणि ठेवला विश्वास, की
तू—देवांश झ्यूस—तूच तिची प्रीतिशय्या सजवलीस
कारण, काल पुढे सरकला आणि दुनियेच्या डोळयात
झगझगू लागली हेराक्लीजची थोरवी!

जो प्लूटोच्या राजवाड्यातून आताच पडला आहे बाहेर
भू-मातेच्या खोल गाभाऱ्यातून आला आहे वर

ऐक माझा निर्णय आता
त्या कालच्या क्षुद्रमनस्क राजापेक्षा
तू लायक आहेस जास्त, राज्य करायला !

हेराक्लीज, तुझ्या उच्चकुलातील जन्मामुळे
एखादे माणूस जेव्हा हातात समशेर धरून
झुंजायला सिद्ध होतो, तेव्हाच
सर्व माणसांच्या प्रश्नाला उत्तर मिळून जाते
देव, न्याय्य अशा कार्यांवर,
अनुग्रह करतात की नाही,
हे दिसून येते, तेव्हा !

[ अिरिस आणि उन्माददेवता राजप्रासादाच्या छतावर दिसतात. ]

**श्रेष्ठीवृन्द :**

तिकडे पहा, नजरफेका तिकडे !
बोबडी वळली आहे काय तुमचीही माझ्याइतकीच ?
—राजप्रासादावर उभ्या ठाकलेल्या
अक्राळविक्राळ आकृत्यांनी !

पळा ! पळा ! वाचवा आपल्याला
पहात राहू नका नजरा रोखून
हला झट्दिशी ! दूर जा त्यांच्यापासून

ॲपोलो ! रक्षणकर्त्या !
सुटका कर आमची, या अभद्रापासून !

**इरीस :** श्रेष्ठीनो ! घाबरून जाऊ नका. या दृश्याने तुम्ही थरथर कापण्याची जरुरी नाही. या इथे, दिसते आहे तुम्हाला उन्माददेवता,, निशेची कन्या आणि मी-इरीस, देवांची सेविका. आम्ही थीब्सवर संकट आणीत नाही, पण अल्कमेनीच्या उदरी ज्याचा झ्यूसपासून गर्भसंभव होऊन जन्म झाला—वदंता आहे अशी—त्या एका माणसाच्या घरावर आम्हाला घाव घालायचा आहे. आपली सर्व अचाट साहसे पुरी करण्यापूर्वी नियतीने त्याला संरक्षण दिले होते. त्याचा पिता झ्यूस हाही मला अगर हेराला, त्याच्याविरुद्ध हात उठवायला परवानगी देईना. पण आता त्याने युरिस्थिअसची सर्व कामे पूर्ण केली आहेत. तेव्हा हेराची इच्छा आहे की [ आणि मीही तिच्या विचाराशी सहमत आहे. ] आपल्या नात्यातल्या व्यक्तींच्या रक्तपाताचे पाप हेराक्लीजच्या मस्तकी लादावे. त्याला त्याच्या अपत्यांना

ठार मारण्यास प्रवृत्त करणार आहे ती. ये तर मग! काळ्याकुट्ट यामिनीच्या ब्रह्मचारिणी बाळे! करुणेच्या सान्या विचाराविरुद्ध तुझ्या हृदयाची कवाडे बंद करून घे. पिसाट, उन्मत्त प्रक्षोभाला या माणसावर सोड. आपल्या स्वतःच्या अपत्यांच्याच रक्तपिपासेने त्याचे मन विकृत कर. वधाचे दोर कापून त्याला मोकळा कर. वेडाच्या झटक्यांनी या माणसाला तडफडू दे. स्वतःच्या रक्तलांच्छित पापी हातांनी जेव्हा तो आपल्या देखण्या मुलांचा किरीट काळनदीवरून पाठवील, तेव्हां त्याला समजून येईल, हेराचा त्याच्याविरुद्ध पेटलेला क्रोध, किती जळजळीत आहे तो; आणि माझ्या द्वेषाचीही त्याला जाण होईल. हेराक्लीजने जर आमची शिक्षा चुकवली, तर मग जगात देव उरलेच नाहीत, आणि यापुढे मर्त्यांचा वंश पृथ्वीवर अधिराज्य गाजवणार, असे सिद्ध होईल.

**उन्माददेवता** : स्वर्ग माझा पिता, यामिनी माझी माता. माझ्या आईवडिलांचा होता तसाच माझाही स्वभाव उमदा आहे आणि कत्तलीत आनंद मानणे हा माझा हक्क असे मी मानीत नाही. मी शहरांवर धाड घालते तीही स्वखुषीने नव्हे. म्हणून हेराच्याहातून वेडा प्रमाद होण्यापूर्वी मला, हेरापाशी आणि तुझ्यापाशीही काही रदबदलीच्या गोष्टी करू दे. तुम्ही ऐकून घ्याल अशी आशा करते मी. ज्याच्या घरादाराचा सत्यानाश करायला तुम्ही मला पाठवता आहात, तो हा माणूस, भूलोकांत आणि देवांमध्येही सारखाच नामवंत आहे अक्षुण्ण प्रदेशांना, राक्षसांनी गजबजलेल्या सागरांना त्याने माणसांची वसतिस्थाने बनविले मानवांच्या धर्मलंडपणामुळे खंडित व उपेक्षित झालेले देवांचे हक्काचे पूजन, त्यानेच एकट्याने पुन्हा पूर्ववत सुरू करून दिले.

**इरीस** : ही सर्व योजना हेराच्या व माझ्या इच्छेला अनुसरून आखलेली आहे. उगीच लादू नकोस आमच्यावर तुझा उपदेश!

**उन्माददेवता** : माझ्या मनात आपला विचार आला की, वाइटाकडून चांगल्याकडे तुमची पावले वळली तर पहावं.

**इरीस** : स्वर्गाच्या राणीने तुला इथे पाठवलं ते विचार करायला नाही!

**उन्माददेवता** : हा सविताच साक्षी आहे की, मी माझ्या इच्छेविरुद्ध वागते आहे. पण मला जर हेराने आणि तू ही निश्चित केलेली योजना त्वरित कार्यान्वित करायची असेल, आणि शिकारी कुत्री प्रचंड आवाज उठवीत सावजामागे धावतात, तसा तिचा पाठपुरावा करायचा असेल तर, निघालेच मी आता. आणि मी जेव्हा हेराक्लीजच्या काळजावर खोल-वर प्रहार करीन, त्याचे घर उद्ध्वस्त करीन, त्याच्या घरातील दालनांतून क्रोधाने थैमान घालीन, आणि सर्वप्रथम त्याच्या अपत्यांना ठार मारीन, तेव्हा माझ्या प्रकोपाची बरोबरी ना करी भूकंप, ना खदखदणाऱ्या सागराचा संहारी आवेश, ना वज्रांचे फुत्कारणारे यातनामय फटकारे. त्या बालकांचा मारेकरी होण्याचे ज्याच्या कपाळी लिहिलेले आहे, त्याला ते आप-ल्याच देहापासून उत्पन्न झालेले आपलेच पुत्र आहेत, हे मी त्याच्यात प्रार्दुभुत केलेल

उन्माद ओसरल्याशिवाय समजणारच नाही. पाहा ! बघा त्याची स्थिती ! मस्तक कसे उडवतो आहे उन्मत्तपणे ! हा तर नुसता आरंभ—अजून निःशब्दच आहे तो, पिसाट अंगाराने प्रक्षुब्ध अशी त्याची बुबुळे गरागरा फिरत आहेत; श्वासोच्छ्वास करतो आहे, झटके आल्यासारखा, आणि मुसंडी मारायच्या बेतात असणाऱ्या बलीवर्दासारखा दीर्घ, सखोल, थरकाप करणारी डरकाळी ठोकतो आहे; किंचाळतो आहे तो, नरकांतील सर्व पिशाच्चांना जणू साद घालीत. अरे ! आणखी जास्त, क्रूर छळवाद करणार आहे मी तुझा. माझ्या पुंगीवर भयभीत असा तू, थयथय नाचशील. इरीस ! परत फीर ऑलिम्पसकडे पंख लावून. मी प्रवेश करीन, या वास्तूत, कुणाच्याही दृष्टीस न पडता.

[ इरीस वरच्या बाजूस जाताना दिसते. उन्माद देवता प्रासादात प्रवेश करते. ]

**श्रेष्ठीवृन्द :**

हे थीब्सनगरी ! आसवं ढाळ नि आक्रोश कर !
तोडलं गेलं आहे तुझं सर्वोत्कृष्ट पुष्प
अभागी हेलास ! अंतरणार आहेस तू
झ्यूसच्या पुत्राला, तुझ्या हितकर्त्याला,
उन्माददेवतेच्या बेसूर संगीताने नादावलेला
अन वेडावलेला, अशा त्याला, गमावशील तू !
उन्माददेवता तिच्या रथावर आरूढ झालेली आहे
तिच्या सांगाती आहेत दुःखाचे चीत्कार आणि अश्रू
ती उडवीत आहे चाबूक,
प्राण घेण्याच्या पापी इच्छेने
क्षोभ तिच्या नेत्रातून उफाळतो आहे
यामिनीच्या पोटी जन्मलेली प्रती गॉर्गानच जणू
तिच्या भोवताली सळसळताहेत
फूत्कार टाकणारी शेकडो सर्पांची शिरे
यश बरबाद केले आहे नियतीने
आता त्वरित मरतील त्याचे पुत्र आपल्या जन्मदात्याच्या
हाताने

अरेरे ! कुठे गेली सारी करुणा, दया ?
झ्यूस ! ऐकतो आहेस ना बाबा हे !
सूडासाठी वेडी झालेली मत्सराची पिशाच्चे
तुटून पडतील तुझ्या अभागी पुत्रावर
चिरफाड करणाऱ्या लांडग्यांप्रमाणे

ऐका ! राजप्रासादाच्या भिंतींनो आणि छतांनो !
एक तालबद्ध ठोका सुरू झाल्याचे ऐकताहात तुम्ही !
तो नाहीय सिबिलीच्या झांजांच्या नृत्यासाठी
नाही तो बॅक्कसच्या राजदंडाच्या आनंदोत्सवाच्या
साथीसाठी
वा, काळ्याशार द्राक्षरसाच्या अर्घ्यासाठी !
तो आहे केवळ रक्तपातासाठी

पळा ! बालकांनो ! सुटका करून घ्या आपली !
हे चकरावून टाकणारे संगीत जीवघेणे ठरेल
मृत्युदेवाने फुंकलेले मृगयापूर्व शिंग
ऐका ! त्यांच्याच मागावर आहे तो !
पाठलाग करतो आहे त्यांचाच.
उन्माददेवता घरभर धुमाकूळ घालील
आणि ठेवील काय अधुरा आपला हेतू ?

हाय ! काय हे दुःख ! केवढ्या यातना !
धाय मोकलून रडतो आहे मी
त्यांच्या पित्यासाठी, आणि
जिने गर्भभार वाहून या कर्मभोगाकरताच
जणू वाढविले पुत्रांना, त्या मेगाराकरिता—

पाहा ! पाहा ना ! घर हदरवतो आहे झंझावात
उद्ध्वस्त झाले आहे छप्पर ! थांब ! थांब !
काय करतो आहेस तू हे झ्यूसच्या पुत्रा ?

पाशवी तुफानी तांडवाने आपला राजवाडा
उद्ध्वस्त करतो आहेस
ॲथनीने एन्सेलॅड्सचा धुव्वा उडविला तसा !

[ राजवाड्यातून एक दूत, रुदन करीत येतो. ]

**दूत** : हाय, महाशय ! अहो महाशय !
**श्रेष्ठीवृन्द** : काय झालं ? कशासाठी रडतोयस तू ?
**दूत** : त्या तिथे राजवाड्याच्या आत जे घडले आहे—ते वाचेच्या आवाक्यापलीकडचे आहे.

**श्रेष्ठीवृन्द** : खरे म्हणतोस ? माझा विश्वास बसतो आहे तुझ्या बोलण्यावर.

**दूत** : मुलं सोडून गेली या जगाला.

**श्रेष्ठीवृन्द** : अरेरे ! काय भयानक घटना ही !

**दूत** : खरोखरीच भयानक आहे सारे.

**श्रेष्ठीवृन्द** : त्यांना जीवे मारणे हा केवढा क्रूरपणा ! पिता इतका बेफाम तरी कसा होऊ शकतो ?

**दूत** : आपल्या वाट्याला जो कर्मभोग आला आहे तो शब्दांनी वर्णन करण्यापलीकडचा आहे.

**श्रेष्ठीवृन्द** : दुर्दैव ! दयनीय दुर्दैव – खुद्द त्यांच्या पित्याने त्यांच्यावर ओढवून आणलेले कसं वर्णन करणार त्याचे तू ? या आस्मानी अरिष्टाने या घरावर घणाघात केला तेव्हा काय काय घडलं, ते सारं सांग. बालके, आपल्या जीवाला कशी मुकली ?

**दूत** : गृहशुद्धीकरणासाठी वेदीसन्निध, यज्ञीय बळी ठेवलेले होते; कारण, हेराक्लीजने राजाला ठार मारलं होतं. आणि त्याचा जडदेह दाराबाहेर भिरकावून दिला होता. ते तीन मुलगे — मोठे देखणे त्रिकूट दिसत होते — तिथंच होते तेव्हा मेगारा आणि ॲम्फिट्रिओन यांच्यासह त्या वेळेपर्यंत सुरी आणि वालींचे पीठ, यांची वेदीसभोवतालची प्रदक्षिणा आटोपली होती. कुणी एकही शब्द उच्चारीत नव्हता. हेराक्लीज प्रदीप्त काष्ठाची दिवटी, पवित्र जलात बुडविण्यासाठी उचलून घ्यायच्या तयारीत होता. पण मग तो स्तब्ध उभा राहिला आणि घुटमळू लागला. त्याच्या पुत्रांनी त्याच्याकडे नजर टाकली. त्याचा चेहरा बदलला होता. मुळाशी अत्यंत आरक्त झालेली त्याची बुबुळे अनैसर्गिकपणे गरगरा फिरत होती. त्याच्या कुरळ्या दाढीवरून एकप्रकारचा शुभ्र फेस ठिबकू लागला. नंतर उन्मादक हास्य करीत किंचाळला, पिताजी ! यज्ञबळी देऊन अग्निशुद्धी मी आताच काय म्हणून करतो आहे ? कारण, मला ते सारे पुन्हा करावेच लागणार आहे. मी अजून युरिस्थिअसला कुठे मारले आहे ! त्याचे शिर मी इथे आणणार आहे. मी त्याच्या वधाच्या नि ज्यांना मी आज ठार मारलंय त्यांच्या वधाच्या पापाचे एकाच यज्ञविधीत क्षालन करून माझ्या हातचा कलंक, धुवून काढणार आहे. फेकून द्या ते उदक ! द्या भिरकावून खाली या परड्या ! माझं धनुष्य—घेऊन या कुणीतरी माझं धनुष्य. गदा आणा माझी ! मिसिनीविरुद्ध मी पुन्हा चाल करून जातो आहे. पहारी आणि टिकाव आणा. दोरीने माणूस आणि हातोडीने ठोकून मजबूत केलेले त्यांचे सायक्लोपी राक्षसी बांधकाम आपण तराफीने उचलल्यासारखे उखडू या. लोखंडाची कांब, छान करील ते उखडून टाकण्याचे काम.

मग त्याने असा अविर्भाव केला, की त्याचेजवळ रथ आहे. मग त्या रथात त्याने उडी मारली. त्याच्या कठड्यावर मुठीची पकड घट्ट बसवली आणि जणू काय पराणी वापरतो आहे अशा आविर्भावाने हवेत टोचीत राहीला. त्याचे सगळे नोकर हसत होते, तरीही घाबरून

जाऊन एकमेकांकडे पाहात होते. म्हणत होते, 'आपला धनी आपली मस्करी तर करीत नाही ना ? का तो कमालीचा वेडापिसा झाला आहे ?' नंतर घरातच इतस्ततः धावत-पळत तो पुरुषांच्या दिवाणखाण्यात घुसला नि म्हणाला की आपण आपल्याच घरात थेट अगदी मेगारापाशीच आलेलो आहोत. मग तशाच अवतारात तो खाली जमिनीवर बसला आणि त्याने पाकसिद्धीची तयारी करावयास प्रारंभ केला. एक क्षणभरच तो त्यात गुंतला होता नि मग मोठ्याने किंचाळला, 'मी आता कोरिन्थच्या वनराईसंन्निध आहे.' मग त्याने आपल्या अंगरख्याचे बंद सोडले नि नग्न उभा ठाकला; आणि समोर कुणीही नसताना त्याने कुस्ती लढण्यास प्रारंभ केला. नंतर अदृश्य जमावाला, आपण विजयी झाल्याचे त्याने जाहीर केले. मग तो गेला मिसिनीला, युरिस्थिअसविरुद्ध मोठमोठ्या धमक्या उच्चारीत. पण ॲम्फिट्रिओन त्याच्या दणकट हाताला घट्ट बिलगला आणि आक्रंदून म्हणाला, 'अरे माझ्या परमप्रिय पुत्रा ! काय हा वेडेपणा ? या इथे लिकसला ठार केल्यानंतर तुला खरो-खरीच बुद्धिभ्रंश तर झाला नाही ?' हेराक्लीजला वाटलं, युरिस्थिअसचा बापच धाबरून, भीतीने थरथर कापत आपल्या हाताला बिलगतो आहे. हेराक्लीजने त्याला मागे ढकलले व आपले धनुष्य व भाता हातात घेऊन, ती युरिस्थिअसचीच अपत्यें आहेत असे समजून तो आपल्याच मुलांवर शरसंधान करण्यास तयार झाला. अत्यंत घाबरलेली ती बालके, या बाजूला, त्या बाजूला, अशी पळू लागली. एक आपल्या आईच्या वस्त्रामागे दडला, दुसरा एका स्तंभाच्या छायेआड लपला तर तिसरा, भीतीने अंग मुडपून पाखरासारखा वेदीच्या मागील बाजूस बसला. मेगारा किंचाळली, "काय करताय हे तुम्ही ? ती तुमचीच लेकरे आहेत ना ?" ॲम्फिट्रिओन नि सर्व सेवकांनी किंकाळ्या फोडल्या. पण त्वरेने आणि चापल्याने हेराक्लीज, स्तंभाभोवती गरगर फिरला, मुलाला सामोरा झाला नि त्याने त्या मुलाला शराने ठार केले. ते पोर, त्या स्तंभावर रक्ताचे शिंतोडे उडवीत, कष्टाने श्वास घेत मागे कोसळले. हेराक्लीज विजयोन्मादाने ओरडला, 'तिथे आडवं झालंय एक. युरिस-थिअसच्या एका छाव्याने आपल्या बापाचे ऋण फेडून टाकले आहे.'

वेदीच्या पायऱ्यांजवळ खालच्याबाजूला, आपण दृष्टीस पडणार नाही अशा आशेने दुसरा मुलगा, दडून बसला होता. हेराक्लीजने त्याच्यावर नेम धरला. पण बाणापेक्षा पोराने जास्त चपळाई केली. आपल्या बापाच्या गुडघ्यापाशी ते तीरासारखे गेले व त्याच्या दाढीला नि कंठाला कुरवाळीत ओरडले, 'मी पुत्र आहे तुमचा युरिस्थिअसचा नव्हे हो ! प्रिय तात ! ठार नका मारू स्वतःच्याच मुलाला !'

पण त्याच्या पित्याचे डोळे झाले होते गॉर्गन–राक्षशिणीसारखे, नजर ठिकाणावर नसलेले क्रूर. मुलगा फारच खेटून उभा होता, त्यामुळे त्याला बाण वापरता येत नव्हता. म्हणून घाव घालून लोखंड घडविणाऱ्या लोहाराप्रमाचे त्याने आपली गदा उंच उचलली नि आपल्या पुत्राच्या राजस शिरावर ती दाणदिशी आदळली, त्याची कवटी छिन्नभिन्न करीत.

त्याचा दुसरा बळीही ठार झाला होता. आता तो तिस-याकडे वळला. मग मेगाराने चपळाई करून त्या बालकाला चटकन उचलून घेतलं आणि त्याच्यासह धावतधावत ती एका आतल्या खोलीत घुसली. तिने दरवाजे आतून घट्ट लावून घेतले. नंतर .खरोखरीच प्रत्यक्षात त्या मिसिनी आणि सायक्लोपी भिंतीच आहेत असे मानून त्याने पहार आणि टिकाव वर उचलीत, प्रहार करीत द्वारस्तंभच उखडून टाकले आणि एकाच शरसंधानाने पत्नी व पोर, दोघांनाही मृत्युसदनास पाठवून दिले. मग तो आपल्या जन्मदात्याला ठार करायला आवेशाने परत निघाला. पण एक छायादेह प्रगट झाला. तो आम्हाला पॅलसदेवीसारखा भासला. पिसांचा जिरेटोप तिच्या मस्तकावर होता. भाला परजीत तिने अचूक नेम धरीत सरळ त्याच्या छाताडावर एक भलामोठा गोटा भिरकावला. त्याने त्याच्या प्राणघातकी प्रक्षोभाला बांध घातला. त्या आघाताने त्याचे भान हरपले व मूर्च्छित होऊन तो जमिनीवर कोसळला. कोसळत्या छताने दुभंगलेल्या आणि आपल्याच पायावर सावरलेल्या एका स्तंभावर त्याची पाठ आदळली प्रथम पळ काढलेले आम्ही परत आलो नि घोड्याच्या साजाच्या काढण्यांनी त्याला खांबाला घट्ट आवळून बांधण्यासाठी, आम्ही ॲम्फिट्रिओनला मदत केली—अशा करिता, की जेव्हा तो झोपेतून जागा होईल, तेव्हा पूर्वी केलेल्या गुन्ह्यात आणखी गुन्ह्यांची भर घालू नये त्याने. तो आता झोपी गेलेला आहे निद्रा हे एक वरदानच आहे—पण त्याने आपल्या पत्नीला व पुत्राला ठार मारलं—अशाला ते वरदान ठरत नाही. खरोखर याच्याइतका वरदानांना आचवलेला दुसरा माणूस मला तरी माहित नाही.

[ दूत जातो ]

**श्रेष्ठीवृन्द :**

डनॉसच्या कन्यकांच्या हातून घडलेले
ॲरगॉसमधील हत्याकांड
त्याच्या त्या काळात खूप गाजले होते
हेलासमध्ये
पण त्यालाही मागे सारीत आहे
आजचा रक्तपात
तेव्हा जे घडले त्यापेक्षा कितीतरी भयंकर
थोर कवीने गाइल्यामुळे माननीय ठरलेली
प्रॉक्नेची कथा सांगू शकेन मी, उदाहरणादाखल
तिने केले होते ठार, आपल्या राजवंशी पुत्राला
पण ते होते फक्त एकच अपत्य

आणि हेराक्लीज–तू–एका माथेफिरू क्षणात
आपल्यापासून गर्भसंभव होऊन जन्मलेल्या
आपल्या तीन पुत्रांचा नाश करणारा कमनशिबी ठरलास तू !

कुठून आणू मी आसवं, अशा कडवट दुःखासाठी !
अंत्ययात्रेच्या वेळी गावयाची कोणती गीते–
कोणती दुःखवट्याची क्रिया कर्मान्तरे
पुरी पडतील या घोर प्रसंगाला ?

[ राजवाड्याचे दरवाजे उघडतात; आणि मेगारा व तीन मुले यांचे मृत देह दृष्टीस पडतात. ॲम्फिट्रिओन त्यांच्यासाठी शोक करीत आहे. हेराक्लीजला स्तंभाला बांधलेला आहे. ]

पहा ! राजप्रासादाचे उंच दरवाजे
त्यांच्या पाकळ्या हलताहेत, दूर होताहेत
उघडताहेत
अरेरे ! केवढे करुण दृश्य हे
आपल्या अभागी जनकासमोर पडलेली ही बालके
अपत्य हत्येनंतर तो घेतो आहे एक भयानक काळनिद्रा !

शृंखला आणि गाठी मारलेले दोरखंड
गुंडाळलेले आहेत त्याच्या विसावलेल्या देहाभोवती
घट्ट जखडून टाकीत आहेत त्याला दगडी स्तंभाला

आणि इथे हा त्याचा वय झालेला पिता
दुःखद जीवनपथावर रखडायचं आहे आता त्याला
शोक करीत–पंख न फुटलेल्या पिलांसाठी
पक्षीण दुःख करते त्याप्रमाणे

**ॲम्फिट्रिओन :** थीब्सच्या श्रेष्ठींनो ! शांत राहा ! गप राहा !
बंधमुक्त असा निद्रेत विसावलेल्या त्याला
विसरू दे त्याच्या यातना

**श्रेष्ठीवृन्द :**

आमचे अश्रू वाहताहेत, ॲम्फिट्रिओन,
तुझ्यासाठी अन् या बालकांसाठी

आणि अनेक विजय संपादन केलेल्या
या वीरपुरुषासाठी

**ॲम्फिट्रिओन :** लांब उभे राहा आणखी!
आवाज करू नका, बोलू नका!
शांत झोपला आहे तो
त्याची विश्रांती भंगू नका

**श्रेष्ठीवृन्द :** काय भयानक कृत्य?

**ॲम्फिट्रिओन :** नको! नको! तुमच्या बोलण्याने प्राणघातक यातना देता आहात तुम्ही मला!

**श्रेष्ठीवृन्द :** त्याच्यावर दोषारोप करायला
वर उठेल त्याने सांडलेले रक्तच.

**ॲम्फिट्रिओन :** सुहृदांनो! आणखी मंदस्वरात
आपण शोक करू शकणार नाही का?
भीती वाटते मला, की तो जागा होईल
तोडून टाकील शृंखला,
धावेल शहरातून खून करीत
ठार करील त्याच्या पित्याला
उद्ध्वस्त करील त्याचे घरदार

**श्रेष्ठीवृन्द :** मला आसवं ढाळायला हवीत. आवरू शकत नाही मी त्यांना

**ॲम्फिट्रिओन :** शू ऽऽऽ! मी जातो जवळ त्याच्या आणि अंदाज घेतो त्याच्या श्वासोच्छ्वासगतीचा

**श्रेष्ठीवृन्द :** निद्रावश आहे का तो?

**ॲम्फिट्रिओन :** होय! छे! काय ही झोप!
शापित अशी काळनिद्राच ही
पत्नी घातकी! अपत्य घातकी!
धनुष्याच्या त्रिज्येच्या घातकी टणत्कार संगीताचा
निपुणस्वामी

**श्रेष्ठीवृन्द :** अश्रू ढाळा त्यांच्यासाठी

**ॲम्फिट्रिओन :** ढाळतोच आहे अश्रू मी

**श्रेष्ठीवृन्द :** बालकांच्या मृत्यूसाठी अश्रू ढाळा

**ॲम्फिट्रिओन :** हाय! किती कठोर करणी!

**श्रेष्ठीवृन्द :** तुझा पुत्र हेराक्लीज—त्याच्यासाठी पण ढाळा अश्रू

**ॲम्फिट्रिओन :** माझा पुत्र!!
**श्रेष्ठीवृन्द :** ॲम्फिट्रिओन!—
**ॲम्फिट्रिओन :** [ हेराक्लीजच्या शरीरावर ओणवत ]
शांत राहा! आता गप राहा पाहू ?
कुशीला वळतो आहे तो—
आळोखे पिळोखे देतो आहे—
जागा होतो आहे—
मला आत जायला हवं नि लपून बसायला हवं.
**श्रेष्ठीवृन्द :** तुम्हाला घाबरायचं कारण नाही, अजून त्याची रात्रच चालू आहे.
**ॲम्फिट्रिओन :** पाहा! दृष्टी फेका त्याच्याकडे
माझ्या हतभागी जीवनाच्या यातनांनंतर
मरणाच्या यातनांना
थोडाच भीतो आहे मी !
पण मला भीती वाटते तीही
की ठार करील तो त्याच्या जन्मदात्याला
आणि सांप्रतच्या पापांव्यतिरिक्त
पित्याच्या रक्ताचे लांच्छन वागवावे लागेल
त्याला आपल्या शिरावर
**श्रेष्ठीवृन्द :** ज्यावेळी तुम्ही तुमच्यावर पत्नीखातर
तिच्या भावांच्या हत्येचा सूड घेण्यासाठी
आपल्या तरुण वयात, वैभवाच्या काळात
बाहेर पडलात व नष्ट केले होते
टॅफिअन आणि त्यांची नगरी
त्याच वेळी हे जग सोडून गेला असतात तर !

**ॲम्फिट्रिओन :** झट्दिशी पळा मित्रांनो! जागा होतोय तो. घरापासून दूर जा, दूर जा या उन्मत्त वेड्यापासून—खुनावर खुनांची रास रचीत लवकरच तो घालणार आहे थैमान शहरात.

**श्रेष्ठीवृन्द :** हे झ्यूस देवा! हा इतका भयानक आकस
का धरला होतास तूं तुझ्या पुत्राविरुद्ध ?
कशासाठी त्याने रखडायला हवंय,
यातनांच्या अशा सागरातून ?
[ खूप मोठी आरोळी मारून हेराक्लीज जागा होतो. )

**हेराक्लीज** : मी जीवंत आहे, माझा श्वास चाललाय्. जे बघण्यासारखं आहे, ते सर्व बघू शकतोय मी–हे व्योम, ही धरित्री, आदित्याचे हे चकाकणारे किरणशर! आणि तरीही त्रस्त खळबळीच्या लाटांमध्ये माझे अंतःकरण का बुडाल्यासारखे झालंय? माझा श्वास का असा तप्त व अस्थिर? जसा स्थिर, शांत असावयास हवा, तसा का नाही? आणि हे काय? गलबतासारखा जागच्याजागी जखडला गेलो आहे मी! माझ्या छातीभोवती हे दोरखंड? माझ्या? हेराक्लीजच्या? माझे दंड या भग्न बांधकामाला खिळवून टाकलेले? टेकून बसलोय मी! आणि माझ्या शेजारी हे मृतदेह? पिसे लावलेले शर, इतस्ततः विखुरलेले– आणि हे माझे धनुष्य–या इथे पडलेले–ज्याने किती वेळा तरी रणसंगरात साथ केली माझी– नेहमीच समरसमयी माझे रक्षण केले त्याने–आणि मीही जपले त्याला एखाद्या मूल्यवान निधीप्रमाणे. मी पुन्हा दुसऱ्यांदा मृतांच्या अधोलोकात उतरलो आहे की काय? एकदा युरिस्थिअससाठी मागोवा घेतला होता त्या दुहेरी मार्गाचा पण सिसिफस आणि त्याचा गडगडणारा खडक, प्लूटो वा पर्सेफॉनीचा राजदंड–यापैकी कशाच्याच काही खुणा दिसत नाहीत इथे! मी सुन्न झालो आहे अगदी. मी हा असा असहाय्य होऊन का पडलो आहे? आहे तरी कुठे मी? अरे, ऐकताय् का कुणी? कुठे आहे मी, काय घडतंय, हे मला सांगायला माझा कुणी सुहृद, येथे किंवा कुठे आसपास आहे कां? जे मला समजायला हवं आहे, त्यातलं काहीही उमगत नाहीय् मला!

**ॲम्फिट्रिओन** : माझा पुत्र! माझ्या दुःखाचे मूळ! वृद्ध मित्रांनो! मी जाऊ का त्याच्याजवळ?

**श्रेष्ठीवृन्द** : होय! मी येईन तुमच्याबरोबर आणि सहाय्य करीन तुम्हाला, ही कटुता सहन करायला.

**हेराक्लीज** : प्रिय पिताजी! का अश्रू ढाळता आहा तुम्ही? डोळे का झाकून घेता आहात आपल्या हातांनी? माझ्यापासून इतक्या दूर अंतरावर उभं राहून! मी पुत्र आहे तुमचा!

**ॲम्फिट्रीओन** : माझा पुत्र! होय! अधःपात झालेला व दैवाहत असलास तरीही माझा पुत्रच आहेस तू!

**हेराक्लीज** : दैवाहत! कसा काय दैवाहत पिताजी! आणि अश्रूंचा हा पूर कशासाठी?

**ॲम्फिट्रिओन** : अरे, तुला जे काही भोगावं लागलं आहे ते पाहून देवांच्या तोंडून सुद्धा आर्त उद्गार बाहेर पडतील!

**हेराक्लीज** : इतकं भयानक आहे काही! काय घडलं आहे? अजून सांगितलं नाहीत मला तुम्ही काय घडलं आहे ते!

**ॲम्फिट्रिओन** : तुझं चित्त जर ठिकाणावर आलं असेल तर तुझं तूच पहा काय झालं आहे ते.

**हेराक्लीज :** माझ्यावरचं काहीतरी अरिष्ट सूचित करताय तुम्ही. असंच ना !

**ॲम्फिट्रिओन :** आता तूं जर मृत्यूत्सव साजरा करणारा भ्रांतचित्त उपासक राहिला नसलास, तर मी तुला सागतो सारं.

**हेराक्लीज :** अद्यापही कोड्यांतच बोलता आहात तुम्ही. मी तर्क चालवतोय आणि तर्कातून जे निष्पन्न होते आहे त्याने घाबरून पण जातोय.

**ॲम्फिट्रिओन :** तुझं चित्त पूर्णतया पूर्वस्थितीवर आलंय की नाही, याबद्दल मी अजूनही साशंक आहे !

**हेराक्लीज :** माझं चित्त भ्रांत झालं होतं ? ते कसं ? मला काहीच आठवत नाही त्याबद्दल ?

**ॲम्फिट्रिओन :** वृद्ध दोस्तांनो ! याला करू का बंधनातून मोकळा ? काय करायला हवं मी ?

**हेराक्लीज :** सोडवा मला बंधनातून आणि सांगा कुणी बांधलं होतं मला ते. शत्रू मानतो मी त्याला.

**ॲम्फिट्रिओन :** तुला जे ज्ञात आहे, नि तुला जे दिसते आहे त्यावरच समाधान मान तू. जास्त काही विचार नकोस.

**हेराक्लीज :** मी तुम्हाला सांगतो आहे, तुम्ही पाळीत असलेले मौन, हे माझ्या प्रश्नांचे उत्तर नव्हे—मला समजलंच पाहिजे सारं !

**ॲम्फिट्रिओन :** [ त्याला बंधमुक्त करीत ] झ्यूस देवा ! पाहातोयस ना तू, की सिंहासनावर विराजमान झालेली हेरा, हीच कारण आहे या अनर्थाचे.

**हेराक्लीज :** हेरा ! तिने केला माझ्यावर आघात ?

**ॲम्फिट्रिओन :** विसरून जा तिला. आपल्या विच्छिन्न जीवनाचाच विचार कर आता.

**हेराक्लीज :** विच्छिन्न जीवन ? काही तरी घोर आपत्तीबद्दल सांगणार आहात तुम्ही मला !

**ॲम्फिट्रिओन :** या आपत्यांच्या मृत देहाकडे पाहा. ज्या स्थळी घावाने कोसळली, तिथेच पडली आहेत बिचारी अजून.

**हेराक्लीज :** हाय रे ! देवा, देवा ! काय पहातोय हे मी !

**ॲम्फिट्रिओन :** माझ्या पुत्रा ! ज्यांच्याविरुद्ध तू शस्त्र उचललेस, ती ही तुझी अपत्ये, गनीम तर नव्हती ना तुझी ?

**हेराक्लीज :** मी शस्त्र उचलले ? अर्थ तरी काय तुमच्या बोलण्याचा ? कुणी ठार केलं यांना ?

**ॲम्फिट्रिओन :** तूच माझ्या मुला ! तुझे हे धनुष्य आणि ज्याने कुणी हे करायला तुला भाग पाडलं, तो देव—हे कारण झाले या हत्येला.

**हेराक्लीज :** काय केलं हे मी ? पिताजी ! केवढी भयानक घटना माझ्यापुढे उघडी केली तुम्ही ?

**ॲम्फिट्रिओन :** तू निखालस, ठार वेडा झाला होतास. तुला हे सांगायचं म्हणजे मरणान्तिक यातना आहेत.

**हेराक्लीज :** माझी पत्नी पण ? तिला पण मीच ठार मारलं ?

**ॲम्फिट्रिओन :** ही सर्व तुझ्या एकट्याच्या हाताचीच करणी आहे.

**हेराक्लीज :** हाय ! यातना मला गिळून टाकताहेत, ढगासारख्या.

**ॲम्फिट्रिओन :** माझे अश्रू तुझ्या वेदनांबद्दल आहेत. माझी करुणा त्यांच्या मृत्यूबद्दल आहे.

**हेराक्लीज :** माझं घर मी स्वतःच उद्ध्वस्त केलं, की इतरांना त्यासाठी चिथावणी दिली ?

**ॲम्फिट्रिओन :** मला केवळ एकच गोष्ट माहीत आहे ! तुझ्या सगळ्या आयुष्याचीच वाताहात झालेली आहे.

**हेराक्लीज :** पण हा प्रलयंकर उन्माद शिरला तरी कुठे माझ्यात ?

**ॲम्फिट्रिओन :** वेदीसन्निध असताना; यज्ञाने आपल्या हातांचा कलंक तू निपटून काढीत असताना...

**हेराक्लीज :** काय लाजिरवाणी गोष्ट ही ! केवढी दुःखदायक ! आपल्या अत्यंत लाडक्या पुत्रांचा मारेकरी मी व्हावं अं ? का घेत नाहीय, मी माझाच प्राण ? का घेत नाही उडी एखाद्या उघड्याबोडक्या सुळक्यावरून किंवा का धरीत नाही नेम स्वतःच्या काळजावर समशेरीचा ? मीच का नाही होत, माझ्या अपत्याच्या हत्येचा सूड घेणारा ? जी वाट पाहाते आहे माझी, ती अपकीर्ती टाळण्यासाठी का स्वतःचे मांस जाळून घेत नाही मी अग्नीत ?

[ थीसिअस येताना दिसतो. ]

अरे पण पाहा ! मरणाविषयीच्या या विचारांना आवर घालण्यासाठी माझा आप्त आणि माझा स्नेही थीसिअसच येतो आहे इकडे. आता दृष्टीस पडणार मी त्याच्या ! माझ्या कृत्याचा कलंक त्याची नजर विटाळील. माझा सर्वांत जीवाभावाचा मित्र आहे तो ! काय करू मी ? माझ्या दुर्दशेला कोठला एकांत शोधू — उत्तुंग पर्वतावर, की खोलखोल सागरात ? माझं हे मस्तक मला दिवसाच्या प्रकाशापासून दूर दडवायला हवं. मला शरम वाटते आहे माझ्या या काळ्याकुट्ट गुन्ह्याची ! निष्पाप माणसाला धोक्यात आणायची इच्छा नाही मला. ज्याचा सूड घेतला गेला नाही, अशा हत्येचा शाप माझ्या मित्राच्या शिरावर मला लादण्याची इच्छा नाही.

[ हेराक्लीज आपले मस्तक झग्याने आच्छादतो.
थीसिअस आपल्या अनुयायांसह प्रवेश करतो. ]

**थीसीअस :** ॲम्फिट्रिओन ! तुझ्या पुत्राला युद्धात माझे सहाय्य पुरविण्यासाठी बाहेर

नदीकिनाऱ्यावर खडे असलेल्या माझ्या सशस्त्र अथेन्ससेनेसह आलोय मी. अथेन्समध्ये अशी वार्ता येऊन पोचली की, लिकसने सेनेसह थीब्सवर स्वारी केली व सिंहासन बळकावले. म्हणून, माझ्या वृद्ध मित्रा! अधोलोकातून माझी सुटका केल्यामुळे, मी हेराक्लीजचे जे ऋण लागतो, त्याच्या परतफेडीसाठी उत्सुक आहे मी. तुम्हाला जर मित्रांची गरज असेल किंवा माझ्या हातच्या सेवेची आवश्यकता असेल तर हा तयार आहे मी! पण, हे काय पाहतोय मी! मृत्यूचे मैदान? गुन्ह्याची पाठ फिरल्यावर आलोय की काय मी? फार उशीर झालाय का मला? या बालकांना कुणी ठार केलं? आणि ही कुणाची पत्नी? लहान बालके, काही सैनिकांच्या रांगात लढायला उभी ठाकत नाहीत? मी इथं जे बघतोय, ते खरं म्हणजे युद्ध नव्हेच हा दिसतोय केवळ दुष्टपणाचा परिपाक!

**ॲम्फिट्रिओन :** काय सांगू ऑलिव्ह वृक्षांचे मुगुट धारण करणाऱ्या टेकडीवरील अथेन्सच्या राजा!

**थीसिअस :** तुमचे पहिलेच शब्द शोकविव्हल उद्‌गारासारखे भासतात!

**ॲम्फिट्रिओन :** आकाशाची कुऱ्हाडच कोसळलीय आमच्यावर!

**थीसिअस :** ज्यांच्यासाठी तू आसवं ढाळतोयस, ती ही मुलं कुणाची?

**ॲम्फिट्रिओन :** माझा बिचारा पुत्र, हाच त्यांचा जन्मदाता आणि त्यानेच ठार मारले त्यांना—त्यांच्याच पित्याने आणि कलंकित झाला आहे तो त्यांच्या रक्तपाताच्या अपराधाने!

**थीसिअस :** या पेक्षा कमी थरकांप उडवणारं काही सांगता येणार नाही का तुम्हाला?

**ॲम्फिट्रिओन :** तसं सांगणं शक्य असतं तर!

**थीसिअस :** काय ही भीषण घटना!

**ॲम्फिट्रिओन :** आमचं सर्व जीवनच विरून गेलंय वाऱ्यावर!

**थीसिअस :** काय केलं त्याने! सांगा मला?

**ॲम्फिट्रिओन :** भ्रमिष्टपणाच्या झंझावातात दिशाहीन असा भरकटत गेला तो, आणि त्याचे शर, बुचकळलेले होते सहस्त्रशीर्षाच्या जहरी रक्तात!

**थीसिअस :** त्या मागे नक्कीच हात होता हेराचा! पण हा कोण आहे या जड देहांच्या शेजारी बसलेला!

**ॲम्फिट्रिओन :** तो हेराक्लीज, माझा पुत्र अनेक अचाट कृत्ये करून प्रसिद्धी पावलेला प्राणघातकी असुरांबरोबर फ्लेग्राच्या मैदानावर नाचविली ज्याने आपली ढाल, देवांच्या खांद्याला खांदा भिडवून समरांगणात!

**थीसिअस :** याने जे भोगलंय, तसं कधीतरी भोगलं असेल का कुणा मानवाने?

**ॲम्फिट्रिओन :** कुणीही दुसरा मानव नाही आढळणार त्याच्या तोडीचा; अंत नसलेल्या पर्यटनात किंवा अचाट सहनशक्तीत.

**थीसिअस :** आपले मुख का झाकून घेतो आहे तो आपल्या झग्याने?

**ॲम्फिट्रिओन** : त्याला शरमल्यासारखं वाटतय
तुमच्या उपस्थितीत!
आपल्याच आप्तांच्या मायेपुढे आणि
आपल्याच अपत्यांच्या सांडलेल्या रक्तासमोर
शरमून गेलाय तो!

**थीसिअस** : पण त्याच्या दुःखात सहभागी व्हायला, मी आहे इथे. आवरण काढा त्याच्या मस्तकावरचं!

**ॲम्फिट्रिओन** : माझ्या पुत्रा! दूर कर झगा तुझ्या मुखावरून! फेकून दे तो लांब! दाखव स्वतःला त्या आदित्याला! [ थीसिअसला उद्देशून ] त्याच्या यातनांच्या भाराने सुकून गेले आहेत त्याचे सारे अश्रू— माझ्या मुला! तुझी दाढी, तुझे गुडघे, तुझे हात, यांना स्पर्श करून, माझ्या थकलेल्या डोक्यातून आसवं ठिबकत असताना मी तुला विनवितो आहे. सिंहासारख्या प्रकृतीचा तू—पण आता हताश होऊन बसला आहेस! मनोवृत्तीला आवर घाल आपल्या! प्रिय पुत्रा! शोक विव्हल मनोवृत्ती तुला मृत्यूच्या विचाराकडे ओढून नेत आहे, पण असा मार्ग पत्करणे म्हणजे देवांना आव्हान देण्यासारखे आहे नि पूर्वीच्या चुकांत आणखी चुकांची भर घालणे आहे केवळ!

**थीसिअस** : तू—जो इथे बसला आहेस अतीव दुःखात बुडून—वर बघ आणि आपला चेहरा दाखव आपल्या स्नेह्याला. कुठल्याही काळोखात इतका काळा नाही असणार झगा की जो तुझ्या वेदना दडवू शकेल. रक्तपाताच्या लांच्छनापासून मला सावध करण्याकरिता कशाला हात हलवतोयस तुझा? तुझे शब्द मला कलंकीत करतील या भीतीने? तुझ्या विजयात मी भागीदार झालो होतो! आता तुझ्यावरच्या घोर संकटात भाग घ्यायला भीती नाही वाटत मला! मला तू अंधेरातून प्रकाशाच्या दुनियेत परत आणलंस, तेव्हाच आपल्या मध्ये हा लागाबांधा निर्माण झाला आहे. ज्याची कृतज्ञताबुद्धी वाढत्या वयाबरोबर कोमेजत जाते, जो आपल्या सुहृदाबरोबर समृद्धी उपभोगील, पण प्रतिकूल वाऱ्यात त्याच्या सांगाती जीवनाची नाव हाकलणार नाही, अशा स्नेह्याचा मी तिरस्कार करतो. चल ये! तुझ्या मस्तकावरचे आवरण काढ! ऊठ, उभा राहा! बघ माझ्याकडे, हेराक्लीज! धीरोदात्त हृदय देवांचे वा प्रारब्धाचे प्रहार सहन करते आणि कच खात नाही कधीही!

[ थीसिअस, हेराक्लीजच्या मस्तकावरील आवरण बाजूला करतो. ]

**हेराक्लीज** : थीसिअस! बघितलंस ना तू काय केलंय मी माझ्या तीन पुत्रांचे ते!

**थीसिअस** : सांगितलय त्यांनी मला नि पाहातोच आहे मी.

**हेराक्लीज** : मग कशासाठी केलंस तू माझं मस्तक अनवगुंठीत, या हिरण्यगर्भासमोर?

**थीसिअस** : जो मर्त्य आहे, त्याच्या दोषाने, अमर देव काही कलंकित होत नाही.

**हेराक्लीज** : अपवित्र आहे मी. लांब राहा माझ्यापासून!

**थीसिअस :** मित्राच्या शापाचा संसर्ग काही मित्राला बाधत नाही.

**हेराक्लीज :** तू आता माझा स्नेही राहाताच कामा नये. तरी पण एकेकाळी मी तुझा स्नेही होतो, याबद्दल मात्र मला खंत नाही.

**थीसिअस :** मला दिलस तू सहाय्य त्यावेळी आता मी तुला देतोय सहानुभूती!

**हेराक्लीज :** ज्या मी—माझे पुत्र ठार मारले—त्या माझ्याबद्दल सहानुभूती असू शकते तुला ?

**थीसिअस :** होय! त्यावेळची तुझी परिस्थिती आता बदलली आहे—मी तुझ्यासाठी शोक करतोय.

**हेराक्लीज :** याहूनही दैवाचे जास्त तडाखे खाऊन संपूर्ण कोसळलेला कुणी दुसरा माणूस माहीत आहे तुला?

**थीसिअस :** तुझी दुःखे इतकी विस्तृत आहेत की ती भूलोकापासून स्वर्गलोकापर्यंत पोचतील.

**हेराक्लीज :** म्हणूनच निर्धार केलाय मी, की, माझ्या जीवताची अखेरी करायची.

**थीसिअस :** देव, तुझ्या धमकावण्यांची परवा करतात असं समजतोस तू!

**हेराक्लीज :** मानवी भावनांची परवा केली आहे कधी देवादिकांनी! जुमानीत नाही मी देवत्वाला.

**थीसिअस :** आळा घाल जरा तुझ्या वाणीला. अशी घमेंडखोर भाषा वापरल्याने आणखी कर्मभोग ओढवून घेशील!

**हेराक्लीज :** काठोकाठ भरलाय कर्मभोगाचा प्याला. आणखी आपदांसाठी जागाच नाही.

**थीसिअस :** काय करणार आहेस तू! अशा बेपर्वाईच्या वर्तनाने काय साधणार आहेस तू!

**हेराक्लीज :** मरण! दुसरं काय? जो मी नुकताच सोडून आलोय, त्या अधोलोकाकडे पुन्हा परत जाणे!

**थीसिअस :** तू आता जे बोललास ना, ते एखाद्या सर्वसाधारण प्रतीच्या माणसाला शोभेल असे आहे.

**हेराक्लीज :** आणि तू दुःखाचा स्पर्शही न झालेला तू—तू म्हणे देतो आहेस मला चांगला सल्ला!

**थीसिअस :** आजवर जो सर्व काही सहन करीत आला तो हेराक्लीजच का बोलतोय हे!

**हेराक्लीज :** असं, इतकं, या सारखं दुःख कधीच नाही सोसलं! सहनशक्तीलाही मर्यादा असाव्यात.

**थीसिअस :** हेराक्लीज—मानवजातीचा सर्वश्रेष्ठ स्नेही आणि उपकारकर्ता,—तोच का हा!

**हेराक्लीज :** मानवजात! काय उपयोग आहे मला त्यांचा! सत्ता आहे ती, हेराच्या हातात.

**थीसिअस :** तू—तू मूढाचे मरण पत्करणार? सहन करणार नाही हेलास हे!

**हेराक्लीज :** ऐक तर मग! तू मला जो सल्ला देतो आहेस, त्याला माझा विरोध का आहे त्याची कारणे स्पष्ट करून सांगतो तुला. माझे सारे जीवन—पूर्वीचे आणि सांप्रतचे—मुळी अस्तित्वातच यायला कसे नको होते ते विशद करतो. पहिलं म्हणजे, मी माझ्या पित्याचा पुत्र आहे. जेव्हा ॲम्फिट्रिओनने माझी आई अल्कमेनी हिच्याशी विवाह केला, तेव्हा तिच्या पित्याच्या हत्येचा दोष, त्याच्या शिरावर होता म्हणून तो शापित होता. एखादे घराणे जेव्हा डळमळीत पायावर उभे असते तेव्हा त्यातील माणसांना ऊर्जितावस्था येत नाही. नंतर झ्यूसने—जो कोण झ्यूस असेल त्याने—हेराच्या वैराचे लक्ष्य होण्यासाठीच जणू, माझे पितृत्व पत्करले. ॲम्फिट्रिओन! त्रस्त होऊ नकोस मी तुलाच माझा पिता समजतो, झ्यूसला नाही—नंतर मी जेव्हा अगदी आईच्या अंगावर पिणारा तान्हा बालक होतो तेव्हा स्वर्गाच्या राणीने माझा नाश व्हावा म्हणून, भयानक डोळ्यांचे काळसर्प, माझ्या पाळण्यात सोडले. मी जेव्हा मोठा झालो आणि अंगाने चांगला भरू लागलो तेव्हा कोण-कोणत्या अचाट साहसातून मी पार झालो हे तपशिलवार सांगायला हवेच का? सिंह, तीन देहांचे राक्षस, चार खूर असलेला सेन्टॉरांचा काफिला—सर्वांशी मी झुंज दिली आणि सर्वांचा पराभव करून पुनः पुन्हा विजयी झालो, तोडलेल्या मस्तकांच्या जागी पुन्हा नवीन निर्माण होणाऱ्या अनेक मस्तकांनी मंडित अशा सहस्रशीर्षालाही मी मृत्यूच्या सदनास पाठवलं. शेवटी युरिस्थिअसच्या शब्दानुसार मृतलोकातील तीन मुंडक्यांच्या संरक्षक श्वानाला पकडून पृथ्वीवर ओढून आणण्यासाठी तिमिराच्छादित प्रदेशांवर चाल करून अन्य अनेक पराक्रमांवर कळस चढविला आणि आता अंतिम अरिष्ट म्हणून आमच्या या दुराचारांचे वसतिस्थान बनलेल्या घराच्या शिरावर माझ्या पुत्रांच्या हत्येचा कळस चढविला. आता मला दुसरा पर्यायच उरला नाही. माझ्या प्रिय थीब्समध्ये वास्तव्य करायला आता मी पात्र नाही. आत्यंतिक अपवित्रतेने लडबडलेला आहे मी. मी जरी येथे राहिलो, तरी कुठल्याही मंदिरात प्रवेश करू शकणार नाही मी. स्नेह्यांच्या मेळाव्यात मला सामील होता येणार नाही. शापित अशा माझ्याशी कुणी बोलायलाही धजणार नाही. मग काय मी ॲरगॉसमध्ये जावे? तेथून तर मी आधीच हद्दपार झालो आहे. मग दुसऱ्या कुठल्यातरी शहरात जायचा प्रयत्न करावा काय मी? तिथे जाऊन तेथील भेकड अहिताचतकांच्या कटाक्षांना तोंड द्यावे? लोकांनी ज्याच्याकडे बोटे दाखवावी असा, हेटाळणीच्या उल्लेखांचा काटेरी पिंजऱ्यातला कैदी बनून राहावे? ‘ हाच ना तो झ्यूसचा पुत्र! ज्याने आपल्या पत्नीला नि मुलांना ठार मारलं! तो नको इथे राहायला! रोग पडो त्याच्यावर!’ आपल्या सवंगड्यांसमवेत ज्याने फक्त सुखच भोगले आहे, अशा माणसाला, परिस्थितीतला हा असा

बदल अत्यंत कटू वाटतो. दुर्दैव ज्याच्या हाडीमासी खिळलेले असते त्याला त्याच्या यातना जाणवतच नाहीत. सतत सहन करीत राहाणे हा त्याचा स्थायीभावच होऊन बसतो.

ओः! मला दिसतो आहे, काय कर्मभोग माझ्यापुढे वाढून ठेवलाय तो! प्रत्यक्ष भू-देवीला वाचा फुटेल आणि ती ओरडेल, 'स्पर्श करू नकोस मला!' सागर आणि उड्या टाकणारे प्रपात खवळून गर्जतील, 'लांब हो! दूर हो!' माझा होणार आहे, अविरत गोल-गोल भटकणारा, आपल्या चक्राला जखडलेला इक्झिऑन! जिथे मी थोरपदास चढून सुखात राहात होतो त्या हेलासने मला या अवस्थेत पाहू नये हेच कितीतरी जास्त उत्तम. का जगावे मी? काय अर्थ आहे अशा दळभद्री, कलंकित जीवनाला! आता झ्यूसची पत्नी दिमाखात झगमगणारी हेरा–हर्षभरित होरून नाचत आपल्या पैजाराने ऑलिम्पस हदरवून टाको! हेलासमधल्या अग्रगण्य माणसाला त्याच्या उच्चासनासकट तिने जमिनीवर खेचले आहे व आपल्या अंतरीची आस पुरी केली आहे. अशा देवाची कोण करील पूजा अन प्रार्थना? झ्यूसविषयीच्या आकसाने, त्याने दुसरीची शय्या सजविली याबद्दलच्या मत्सराने, कुठलाही अपराध नसताना स्वदेशाच्या तारणहारालाच तिने सर्वनाशाच्या गर्तेत फेकून दिले.

**श्रेष्ठीवृन्द** : या सर्व घटनांचे कारण, तुला स्पष्टपणे कळून आले आहे, त्याप्रमाणे, खुद्द स्वर्गाची राणीच आहे. दुसरं कुणीही नाही.

**थीसिअस** : तू जे काही म्हणालास, ते सर्व मला समजते आहे. पण तरीही तुझ्या मरणाच्या इच्छेची तरफदारी मी करू शकत नाही. उलट, जिवंत राहून कर्मभोग सोसायचा सल्ला मी तुला देत आहे. योगायोगापायी कलंक लागला नाही असा माणूस या जगात नाही. जर महाकवीवर विश्वास ठेवायचा असेल तर असं दिसतं की कोणता देवही कलंक-रहित असू शकत नाही. आपआपसात व्यभिचारी प्रेमाची शिकार देवसुद्धा झालेले नाहीत का? सिंहासनाच्या प्राप्तीसाठी बेड्या चढवून पितृत्वाचा अवमानसुद्धा देवांनी केला आहे ना? आणि तरीही त्यानी काही ऑलिम्पसवर वास्तव्य करण्याचे सोडून दिलेले नाही! आणि जरी त्यांनी पातके केली असली तरी, ते ती, एवढी काही मनाला लावून घेऊन बसलेले नाहीत! तू केवळ एक मानव असूनही नियतीविरुद्ध ओरडतोस; पण देव काही तसा ओरडा करीत नाहीत. आता यावर तुझ्या बचावाचे उत्तर काय आहे, ते बोल! ठीक तर मग कर, कायद्याचे पालन आणि जा थीब्स सोडून आणि माझ्याबरोबर अथेन्सला पॅलासच्या गढीवर ये. तिथे मी हत्येच्या पापापासून तुझे शुद्धीकरण करीन. तुला राहायला जागा आणि संपत्ती देईन; आणि मिनोटोरला ठार मारून मी जेव्हा नागरिकांच्या चौदा अपत्यांचे प्राण वाचवले तेव्हा त्या नागरिकानी मला जी मालमत्ता दिली, ती सारी, मी तुला देईन. माझ्या देशभर जे जे भू-प्रदेश माझ्या नावे केलेले आहेत, ते सारे यापुढे तुझे होतील आणि तू हयात आहेस तोपर्यंत ते तुझ्याच नावाने ओळखले जातील. तू जेव्हा मृत्यूकडे प्रयाण करशील. तेव्हा अथेन्सचे राज्य, उदात्त, गंभीर यज्ञयागाने आणि शिलास्तंभ स्मारकाने तुझ्या स्मृतींचा

सन्मान करील. एका वीर योद्धाला केलेल्या सहाय्याबद्दल हेलासच्या रहिवाशांत आपलं नाव व्हावं हा आमच्या नागरिकांना त्यांचा गौरवच वाटेल. तू माझे प्राण वाचवलेस! आता तुला मित्राची गरज आहे. तर मग मला माझी कृतज्ञता प्रगट करू दे. देव जेव्हा आपल्याला मानतात तेव्हा आपल्याला मित्राची गरज भासत नाही. दैवी सहाय्यच पुरेसे असते ते जेव्हा दिले जाते तेव्हा.

**हेराक्लीज :** देवांबद्दल तू जे काही म्हणतोस, ते दूरान्वयानेही फारच थोडे सुसंबद्ध आहे. देव अनैतिक प्रेम चालवून घेतात यावर माझा विश्वास नाही. त्या बेड्या चढविण्याच्या परंपरागत कथाही देवांना न शोभेशा आहेत. मी त्या कधीही विश्वसनीय मानल्या नाहीत व पुढेही मानणार नाही. तसेच कोणताही देव दुसऱ्या देवावर जुलूम करतो, यावर माझा विश्वास नाही. देव जर खराखुरा देव असेल तर त्याला कसलीच गरज भासणार नाही. त्या सर्व कवींच्या कल्पित भाकड-कथा आहेत. कीव येते मला असल्या गोष्टींची.

पण घोर निराशेने मी व्याप्त असलो तरीही मनात विचार करतो आहे या गोष्टीवर. आत्महत्या करणे म्हणजे निश्चितच भेकडाचे कृत्य—कारण ज्याला नियतीच्या तडाख्यांना तोंड देता येत नाही तो कुणाही माणसाने उचललेल्या भाल्यासमोरही थरथर कापणारच. माझ्या मृत्यूची मी शांतपणे प्रतीक्षा करीत राहीन; आणि तुझ्याबरोबर अथेन्सला येईन; तुझ्या उदार देणग्यांबद्दल मी तुझे मनःपूर्वक आभार मानतो, थीसिअस! यातना आणि मरगळ यांचे चटके मला जाणवलेले आहेत. मी कधीही कुठलेही कार्य अंगाबाहेर टाकलेले नाही. आजपर्यंत माझ्या नेत्रांत कधी आसवे येऊ दिली नाहीत. अखेर मला आसवं सांडावी लागतील असं क्वचितच वाटलं होतं. आपण भाग्येदेवतेचे दास आहोत आणि आपल्यावर लादलेल्या शृंखला, आपण मुकाट्याने वागविल्याच पाहिजेत शरीरावर.

पिताजी! थीब्समधून मी हद्दपार झालोय, हे तुम्ही पाहाताच आहा. तेव्हा, त्यांचे जडदेह उचला; अंत्यविधीसाठी त्यांना वस्त्रांत लपेटा आणि त्यांना मूठमाती द्या; आसवांनी त्यांचा सन्मान करा. मी हे सारं त्यांच्यासाठी करायला मला कायद्याने बंदी आहे. त्यांना आपल्या मातेच्या मिठीत विसावू द्या, अगदी तिच्या छातीजवळ. अजाणता मी मायलेकरांची ताटातूट केली. आता तरी होऊ दे त्यांचे हे असे दुःखी मीलन! त्यांना तुम्ही मूठमाती दिल्यावर थीब्समध्येच वास्तव्य करा आणि माझ्या दुःखात मला साथ देण्यासाठी तुमच्या दुःखी जीवनातही तुमच्या हृदयाला धीर धरता येईल असे करा.

बाळानो! ज्या मी तुम्हाला जीवन दिले त्या मीच तुमच्याकडून ते हिरावून घेतले. माझी सर्व थोर आणि नावाजलेली वीरकृत्ये—तुम्हाला मानसन्मानाचे जीवन प्राप्त व्हावे—हा तुम्हाला मिळणारा सर्वोत्कृष्ट वारसा ठरावा म्हणून मी केलेले कष्ट—या सगळ्यांनी काही भलं साधलं नाही तुमचं. आणि तू! माझी पत्नी! आपल्या परस्पर प्रीतीशी इतकी एकनिष्ठ! त्या प्रीतीचा काय क्रूर शेवट केला मी हा! इतकी सारी वर्षे तू एकाकी अशी, एकनिष्ठेने

वाट पाहिलीस—त्याची परतफेड ही अशी केली गेली ! पत्नीच्या, पुत्रांच्या वाट्याला केवढं घोर दुःख आलं हे ! एकदा चुंबू दे तुम्हाला–हाय ! केवढे मधुर पण केवढे क्लेशदायक ! माझे धनुष्य ! ज्याच्यावर मी प्रीत केली आणि ज्याच्या संगतीत सारे जीवन व्यतीत केले—पण आता घृणा येत आहे त्याची मला !

काय करू मी ! हे जवळ ठेऊ का त्याग करू त्यांचा ? माझ्या कुशीशी लटकलेले हे धनुष्य मला म्हणत राहील, माझ्या सहाय्याने तू तुझ्या पत्नीला नि अपत्यांना ठार केलेस; मला जवळ बाळगणं म्हणजे त्यांच्या प्राणघातक्याला जवळ ठेवणं. तर मग मी त्याला जपून ठेवून नेहमी कसे जवळ बाळगू ? कसे समर्थन करू मी या कृत्याचे ! आणि तरीही कुणीच ज्याची बरोबरी करू शकणार नाही अशी हेलासमधील वीरकृत्ये मी या माझ्या धनुष्याने केली, त्याचा त्याग केल्यावर मी खाली मान घालून माझ्या वैऱ्यांना शरण जावे आणि मृत्युमुखी पडावे काय ? नाही; कधीही नाही. हे धनुष्य हा मला मनस्ताप आहे; तरीही मला ते दूर करवत नाही.

थीसिअस ! माझ्यावर आणखी एक मेहेरबानी करण्यासाठी मी तुला विनवितो. माझ्याबरोबर ॲर्गासला ये आणि शेरबेरसला वर खेचून आणण्याबद्दलच्या पारितोषिकावरील माझ्या हक्काला पाठिंबा दे. एकलेपण आणि दुःख, या जोडगोळीची मला भीती वाटते. कॅडमस भूमी ! थीब्सच्या नागरिकांनो ! और्ध्वदेहिकाच्या वेळच्या पोषाखात शिरोमुंडन करून या. या अपत्यांच्या दफनविधीला आपल्या उपस्थितीने मान द्या. या मृतांसाठी—आणि माझ्यासाठीही—एकमुखाने शोक करा. कारण हेराच्या क्रौर्याने आणि नियतीच्या इच्छेने आम्ही सर्व कोसळून पडलो आहोत—एकाच मरणात संलग्न झालेले आहोत.

**थीसिअस** : यातना सोसणाऱ्या माझ्या मित्रा ! ऊठ, उभा राहा आता. पुरे झाला शोक !

**हेराक्लीज** : उठवत नाही मला. इथेच खिळून बसलोय जसा काही मी.

**थीसिअस** : खरे आहे ! सामर्थ्यवानही दुर्दैवाने पंगू होतात.

**हेराक्लीज** : ज्याला दुःखाची जाणीवच होत नाही अशा पत्थरांत रूपांतर होऊन मला इथं राहाता आलं असतं तर !

**थीसिअस** : आता पुढे काही बोलू नकोस. तुझा हात दे माझ्या हातात. मी तुला आधार देतो.

**हेराक्लीज** : नको ! संभाळ ! तुझ्या कपड्यांना माझा स्पर्श म्हणजे अमंगल प्रदूषण !

**थीसिअस** : मग माझ्यावरच पुसून काढ तुझी सगळी अपवित्रता. अगदी सगळी ! मी घाबरून तिच्यापासून मागे सरकणार नाही.

**हेराक्लीज** : मला पुत्र नाहीत आता; पण मी तुलाच माझा पुत्र मानतो.

**थीसिअस** : तुझा बाहू माझ्या मानेभोवती टाक. चालताना माझ्यावर भार टाक.

**हेराक्लीज :** दोन मित्र एका जोखडाखाली—त्यातला एक मात्र आहे आपत्तीखाली वाकलेला. पिताजी ! नशिबाने माणसाला लाभावा असा आहे हा मित्र.

**ॲम्फिट्रिओन :** ज्या भूमीने त्याला वाढवलं ती भूमी थोर मानवांच्या एका पुऱ्या वंशाची धात्री आहे.

**हेराक्लीज :** थीसिअस ! जरा मागे फिरू दे मला. मला माझे पुत्र पाहावयाचे आहेत.

**थीसिअस :** का बरं ? त्यांच्याकडे पाहाताना अद्यापही—तुझ्या अंतःकरणाला बरं वाटेल म्हणतोस ?

**हेराक्लीज :** मला पाहायचंच त्यांना अन् पिताजींनाही मिठी मारायचीय.

**ॲम्फिट्रिओन :** माझ्या मुला ! हा येथे आहे मी ! तुझी जी इच्छा, तीच माझीही इच्छा आहे.

**थीसिअस :** चल ये हेराक्लीज ! एकेकाळी जे सारं तू सोसलंस, भोगलंस, त्याचा विसर पडला की काय तुला ?

**हेराक्लीज :** मी आजपर्यंत ज्याला तोंड दिलं, त्याची बरोबरी नाही होणार या व्यथेशी.

**थीसिअस :** हे असले बायकी अश्रू तुझ्या डोळ्यांत पाहिले तर माणसे कमी लेखतील तुला !

**हेराक्लीज :** तू मला टाकून बोलतो आहेस ! हेच का ऐकायला जिवंत राहिलो मी ! मला वाटतं, एकेकाळी तू माझा तिरस्कार करीत नव्हतास !

**थीसिअस :** अरे, वागतोच आहेस तसा तू ! ओढवून घेतो आहेस तिरस्कार आपल्या-वर. तो पूर्वीचा हेराक्लीज कुठे आहे आता ?

**हेराक्लीज :** हेडीजमध्ये तू बंदी म्हणून कारागृहात होतास, तेव्हा तुझ्या धैर्याची कमान कितपत होती उंच ?

**थीसिअस :** छे रे ! उंच कुठली ! तेव्हा तर माझी हिम्मत अगदी पार खचून पूर्ण दुबळा झालो होतो मी.

**हेराक्लीज :** आणि आता तूच मला सांगतो आहेस की मी मात्र पार चिरडून, खचून गेलो आहे संकटाखाली म्हणून ?

**थीसिअस :** बरं बाबा ! चल तर मग पुढे !

**हेराक्लीज :** निरोप घेतो आता पिताजी !

**ॲम्फिट्रिओन :** निरोप असो तुला माझ्या प्रिय बाळा !

**हेराक्लीज :** माझ्या पुत्रांना मूठमाती द्या.

**ॲम्फिट्रिओन :** ती मी देईन. पण मला रे कोण मूठमाती देणार ?

**हेराक्लीज :** मी देईन.

**ॲम्फिट्रिओन :** खरंच तू परत येशील ? केव्हा ?

**हेराक्लीज :** तुम्ही त्यांना मूठमाती दिल्यावर कुणाला तरी मी थीब्समध्ये पाठवीन आणि तुम्हाला अथेन्समध्ये घेऊन येईन. आता त्याचे जडदेह आत घ्या. भूमीला त्यांचा भार जड वाटतोय. मी-ज्याने आपले घर अधमपणे उजाड केले असा-मी—मोठ्या गलबताला बांधलेले, वादळात मोडतोड झालेले गलबत जसे त्याच्या मागून ओढले जाते, तसा मी, थीसिअसच्या जागे जात आहे. जर कुणी मानव, आपल्या जवळच्या संपत्तीला किंवा सत्तेला आपल्या सच्च्या स्नेह्यापेक्षा अधिक मूल्यवान समजत असेल तर—तर तो वेडाच म्हटला पाहिजे.

[ जातात ]

**श्रेष्ठीवाद्यवृन्द :**

अवरित अश्रुपात करीत आणि शोक करीत
निघालो आम्हीही.
कारण आज गमावला आहे आम्ही
आमचा सर्वांत उमदा मित्र !

# हेराक्लीज ( टिपणे )

( १ ) **अल्काअस** : [ Alcaeus ] : ॲम्फिट्रिओनचा पिता

( २ ) **ॲटलस** : [ Atlas ] : आफ्रिकेतील एक पर्वत, पौराणिककाली हा पर्वत नसून एक धिप्पाड राक्षस होता. देवांशी त्याने युद्ध केले म्हणून, देवांनी त्याला त्या ठिकाणी स्वर्ग तोलून धरण्याची शिक्षा फर्मावली. त्याप्रमाणे ॲटलस त्या ठिकाणी उभा राहिला व स्वर्ग तोलून धरू लागला. ॲटलसला सुवर्णफळे कोठे आहेत हे माहीत होते, ती फळे आणून देण्यास तो तयारही होता, पण मग स्वर्ग कोण तोलून धरणार ही अडचण आली म्हणून हेराक्लीजने स्वतः स्वर्ग तोलून धरला व ॲटलसला त्याने सुवर्णफळे आणावयास पाठविले.

( ३ ) **अनारस** : [ Anaurus ] : एका नदीचे नाव

( ४ ) **ॲथीनी** : [ Athene ] : एक ग्रीक देवता. तिला पॅलस ॲथीनी असे म्हणतात. झ्यूस व मेटिस यांची ही कन्या. झ्यूसने तिच्या आईला खाऊन टाकल्यानंतर झ्यूसच्या मस्तकापासून ॲथीनीचा जन्म झाला. ॲथेन्सशहरची ती संरक्षक देवता होती. हस्तकला कौशल्याचीही तीच देवता होती.. तसेच शहाणपणा व बुद्धी यांची देवताही तीच असल्याने नागरिकांचे चातुर्याचे व बुद्धिमान प्रश्न सोडविण्याबाबतच्या अडचणींची देवता म्हणून तिलाच मान मिळू लागला. ती कुमारी देवी म्हणून ज्ञात असली तरी राज्यातील प्राण्यांची पैदास व फळफळावळीची निर्मिती यावर तिचीच सत्ता असे, ती युद्धदेवता म्हणूनही मानली जाई. प्रत्येक चार वर्षांनी ऑगस्ट महिन्यात अथेन्स येथे तिची जत्रा भरते. रोमन्स तिलाच आपली मिनर्व्हा देवता मानतात.

( ५ ) **ॲम्फेनी** [ Amphanae ] : सायकनसचे वसतिस्थान.

( ६ ) **ॲमेझॉन** [ Amazons ] : आफ्रिका खंडातील एका देशात स्त्रीराज्य होते या राज्यातील स्त्रियांना ॲमेझॉन म्हणत. त्या शूर व लढवय्या असून अनेक मोठमोठ्या शहरांवर त्यांचा अंमल होता. त्यांच्यामध्ये अशी विशेष चाल होती की जन्माला आलेल्या अपत्यापैकी मुली ठेवावयाच्या व मुलगे मारून टाकायचे. या स्त्री-राज्याची राणी हिपोलिटा या राणीचा कमरपट्टा आणण्यासाठी हेराक्लीज गेला होता. राणी कमरपट्टा द्यायला तयार होती पण तिच्या अनुयायांना हे न आवडून त्यांनी हेराक्लीजवर हल्ला केला. त्यात हेरा-क्लीजने राणीला ठार केली व कमरपट्टा आणला.

( ७ ) **ॲरीस** [ Ares ] : ग्रीक लोकांचा युद्धाचा अधिष्ठाता देव. रोमन याला मार्स म्हणून ओळखतात, हा झ्यूस व हीरा यांचा पुत्र. जमिनीतून वर आलेली थीब्सची माणसे या देवाला मानीत. त्यामुळे त्याची पूजा फक्त थीब्स मध्ये होत असे, ट्रायच्या युद्धात या देवाने प्रत्यक्ष भाग घेतला होता तेव्हा—डायामिडीजने याला जखमी केले होते.

(८) **ॲसोपस :** [ Asopus ] : ॲसोपस नदीच्या पाण्यातील जलदेवता ( निम्फस ) या काहीशा कनिष्ठ प्रतीच्या देवता ' उपवर तरुण मुली ' अशा अर्थीही निम्फस हा शब्द वापरतात. वन, पर्वत व जल यांच्या नजिक या देवतांचे वास्तव्य असते.

(९) **ऑलीम्पस :** [ Olympus ] : ऑलिम्पस पर्वत हे ग्रीकदेवदेवतांचे जन्मस्थान. या पर्वतावर झ्यूस या देवाचे वास्तव्य आहे. तो देव व मानव यांचा पिता. ऑलिम्पिक या जगप्रसिद्ध खेळांचा जन्म येथूनच झाला. खुद्द ज्युपिटरने हे खेळ प्रचारात आणले.

(१०) **इनोनी** [ Oenone ] प्रायमचा कुप्रसिद्ध मुलगा पॅरीस याची ही धर्मपत्नी ट्रॉयच्या नाशास कारण झालेल्या हेलनला पळवून आणल्यानंतर पॅरीसने इनोनीला सोडून दिले. लढाईत हेराक्लीजच्या बाणांनी पॅरीसला प्राणघातक जखम झाली तेव्हा त्याला इनोनीची आठवण झाली इनोनी त्या ठिकाणी आली, पण तिला नवऱ्याची दया येण्याऐवजी त्याचा तिटकारा आला. तिने त्याची जखम बांधली नाही वा औषधोपचारही केला नाही. अखेर, त्या जखमांनी पॅरिसचा अंत झाला तेव्हा इनोनीला खराखुरा पश्चात्ताप झाला व तिने आत्महत्या केली.

(११) **इक्झिओन** [ Ixion ] : एका दंतकथेनुसार थेसलीचा राजा. त्याने आपल्या सासऱ्याचा खून केला तेव्हा जनतेने त्याची छीथू केली. पण झ्यूसला दया येऊन त्याने या राजाला ऑलिम्पस येथे नेले. पण कृतघ्न इक्झिओनने झ्यूसच्या आदरातिथ्याचा गैरफायदा घेऊन त्याची पत्नी हीरा, हिच्यावर पापदृष्टी ठेवली. हीरा समजून त्याने एका ढगाला कवटाळले व त्यातून एका सेन्टॉरचा जन्म झाला. त्याच्या या अपराधाबद्दल मृत्यूनंतर अधोलोकात त्याला कडक शिक्षा करण्यात आली. सदैव फिरत राहणाऱ्या एका अवाढव्य चाकाला त्याला जखडून टाकल्यामुळे त्याला त्या चक्राबरोबर सारखे फिरत रहावे लागे.

(१२) **इलेक्ट्रिओन** [ Electryon ] : हा मिसिनीचा राजा व ॲम्फिट्रिओनचा चुलता. गैरसमजुतीमुळे ॲम्फिट्रिओनच्या हातून हा मारला गेला, तेव्हा ॲम्फिट्रिओनला हद्दपार व्हावे लागले. याच्या मुलीचे ॲम्फिट्रिओनवर प्रेम होते. तीही त्याच्याच बरोबर पळून गेली.

(१३) **इरीथिया :** [ Erytheia ] : एक प्रसिद्ध बेट. गेरिऑनचे वसतिस्थान.

(१४) **इस्मेनस** [ Ismenus ] : बिओशियामधील एक छोटी नदी. डिर्सेच्या थीब्सच्या लोककथांतील प्रसिद्ध झरा इस्मेनसला येऊन मिळतो.

(१५) **एटना** [ Etna ] : एक ज्वालामुखी पर्वत. या पर्वताखाली सायक्लोप्स नावाचे राक्षस राहात असत. ॲपोलोच्या वैद्यक-शास्त्रनिष्णात मुलगा इस्युलेपिअस हा ज्युपिटरच्या ज्या बाणाला बळी गेला, तो बाण, या राक्षसांनीच बनविलेला. हे राक्षस एटना पर्वताखाली राहून शस्त्रास्त्रे बनवितात. त्यामुळेच या पर्वताच्या ज्वालामुखीतून ज्वाला व धुराचे लोट बाहेर पडतात अशी समजूत आहे. एटना हा सर्वांत जुना पर्वत.

(१६) **एन्सेलॅडूस** [ Enceladus ] : शंभर बाहू असलेला राक्षस, त्याने झ्यूसविरुद्ध बंड केले व भीतीने तो सिसिली येथे पळून गेला. तेव्हा एका प्रचंड विद्युत्पाताने ॲथिनीने त्याला जागचेजागी खिळवून ठेवले व एटना पर्वताखाली गाडून टाकले. हीच कामगिरी झ्यूसने केली, अशीही कथा आहे.

(१७) **ओकालिया** [ Oechalia ] : थेसिलीतील एक शहर. कांहींच्या मते हे शहर मेसेनिआमध्ये तर कांटींच्या मते युबोइआमध्ये होते.

(१८) **क्रेओन** [ Creon ] : थीब्सच्या राज्यासाठी आपला बळी देणाऱ्या मिनीसिअसचा हा पिता. प्रथमपासूनच हा ईटिऑक्लीजच्या बाजूचा असल्याने ईटिऑक्लीज व पॉलिनिसस आपापसात लढून मरण पावल्यावर हा स्वतःच थीब्सचा राजा झाला. ईटिऑक्लीजच्या प्रेताला याने सन्मानाने मूठमाती दिली पण पॉलीनिससच्या मृत शरीराची विटंबना केली. त्याला मूठमाती द्यायची भाषा करणारालाही देहांत शासन दिले जाईल असे सांगितले होते. त्याप्रमाणे ॲन्टिगॉनीलाही त्याने जिवंतपणे गुहेत कोंडले.

(१९) **कॅडमस** : ( Cadmus ) ग्रीक वीर पुरुष फिनिशिआ ( Phoenicia ) व राजा एजिनॉर यांचा हा मुलगा व युरोपाचा भाऊ. युरोपाला ज्युपिटरने पळवून नेल्यावर कॅडमस तिच्या शोधासाठी बाहेर पडला पण तिचा पत्ता न लागल्याने निराश झाला व त्याचे झालेल्या दैवी वाणीप्रमाणे एका गाईच्यामागे तो पेनोप मैदानावर आला. तिथे एका सर्पराजाला ठार मारून त्याचे दात जमिनीवर पुरल्यावर त्यातून जे शिपाई आले त्यातील पाच शिपायांच्या सहाय्याने त्याने थीब्सशहर वसविले. एका अर्थी हाच थीब्सशहराचा जनक व त्या शहरातील एका बलिष्ठ वंशाचा संस्थापक. हातून घडलेल्या पापक्षालनासाठी त्याने आठ वर्षे तप केले. व्हीनसची मुलगी हार्मोनिया, ही त्याची पत्नी. त्याला पॉलिकोरस हा पुत्र व इनो, ॲटिनी, ॲगेवे व सेमेले या चार कन्या होत्या. त्याने जो सर्प मारला तो मार्स या देवाचा असल्याने मार्सचा त्याच्यावर राग होता. त्यामुळे कॅडमसला संसारसुख मिळाले नाही. त्याची मुले व नातवंडे त्याच्या देखत गेली. शेवटी त्याला व त्याच्या पत्नीला सर्पयोनीत प्रवेश करावा लागला.

(२०) **कोरिन्थ** ( Corinth ) : ग्रीसमधील आखात व शहर येथील राजा सिसीफस याला त्याने केलेल्या काही अपराधाबद्दल अधोलोकात कडक शिक्षा देण्यात आली होती.

(२१) **गाणाऱ्या कुमारिका** ( Singing Maidens ) : ज्यूनोच्या विवाहाच्या वेळी पृथ्वीवरील देवतांनी तिला काही सुंदर सुवर्णफळे नजर केली होती. या फळांवर कुणी हल्ला करू नये म्हणून एक भयानक विषारी सर्प तोंडातून दाहक ज्वालांचे फूत्कार टाकीत त्या झाडाभोवती विळखा घालून बसलेला असे व तीन देखण्या कुमारिका गाणी म्हणत जाणाऱ्या-येणाऱ्यवर लक्ष ठेवून असत. हेराक्लीजने ॲटलस राक्षसाच्या सहाय्याने ती सुवर्णफळे मिळविली.

**( २२ ) गॉरगॉन ऑफ नाइट** [ Gorgon of Night ] : तीन भयंकर राक्षशिणीपैकी एक यांच्या मस्तकाभोवती केसांऐवजी साप असत.

**( २३ ) ग्रेसेस** [ Graces ] समृद्धी आणणाऱ्या ग्रीक देवता Agalia ( तजेला ) Evphrosyne ( आनंद ) व Thalia ( यौवन ) अशा या तीन समृद्धी देवता, झ्यूस आणि हीराच्या मुली. सर्वसाधारणपणे या आकर्षकता व सौंदर्य ( Charm & Beauty ) यांच्या देवता. त्यामुळे त्यांचा संबंध ॲफ्रोडायटी व हार्मिस या देवतांशी येतो.

**( २४ ) चौदा मुले** [ Fourteen Childeen ] : क्रीट बेटावरील चक्रव्यूहात अर्धा बलीवर्द व अर्धा मानव अशा आकाराचा एक क्रूर राक्षस होता. त्याने आपल्या प्रचंड सामर्थ्याने व दुष्टवृत्तीने त्या बेटांत लिलक्षण दहशत उत्पन्न केली होती. क्रीटचा राजा शेजारच्या अथेन्स शहरातून या राक्षसासाठी प्रतिवर्षी एक चमत्कारिक खंडणी वसूल करीत असे. ही खंडणी म्हणजे सात तरुण मुलगे व सात कुमारिका; ही चौदा मुले चिठ्या टाकून निवडली जात; व तीच राक्षसाची मेजवानी असे. थीसिअस या मुलातलाच एक म्हणून गेला व त्याने त्या प्रचंड व दुष्ट राक्षसाला ठार केले. अशा प्रकारे अथेन्समधील सात तरुण मुले व सात तरुण कुमारिका, यांचे प्राण त्याने कायमचे वाचवले.

**( २५ ) झ्यूस** [ Zeus ] : आकाश व हवामान या संबंधीचा प्राचीन ग्रीकांचा देव. वातावरणातील सर्व घडामोडींचा हा अधिष्ठाता. प्राचीन कल्पनांनुसार क्रोनोस आणि ऱ्हेआ यांचा पुत्र. वडिलांना राज्यपदावरून दूर केल्यावर याने पृथ्वीचे राज्य आपल्याकडे घेतले. याचा जन्म क्रीटमध्ये झाला. डिमिटर, हीरा व हेस्टिआ या त्याच्या भगिनी व पत्नीही. ॲपोलो, आर्टिमिस, ॲरीस व अथीना ही देव–देवता त्याचीच अपत्ये.

झ्यूसचे वास्तव्य ऑलिम्पस पर्वतावर असते. झ्यूस हा देव व मानव यांचा पिता. गरुडपक्षी ओक वृक्ष व पर्वतशिखरे ही त्याची प्रतीके आणि शेळी, बैल व गाय हे आवडते हव्य बळी.

ॲम्फिट्रिओन हा टॅफिअन्सविरुद्ध लढत असताना झ्यूसने ॲम्फिट्रिओनसारखा वेष केला आणि ॲम्फिट्रिओनची पत्नी अल्कमेनी इच्याशी सुखशय्या केली. त्यातून हेराक्लीजचा जन्म झाला.

**( २६ ) तीन धडांचे गेरॉन** [ Three Bodied Geryon ] : तीन धडे असलेला एक राक्षस. हा एरिथिया बेटाचा राजा. आपल्या ताम्रवर्णाच्या पशुधनाचा कळप राख ण्याचे काम, हा करीत असे. हेराक्लीजने याला ठार मारून याचे पशुधन पळवले.

**( २७ ) टॅफिअन्स** [ Taphians ]: यांच्यासी लढत असताना अल्कमेनीचे सर्व भाऊ मारले गेले. अपवाद म्हणून फक्त एकच भाऊ वाचला. टॅफिअन्सचा सूड उगवून भ्रातृ-हत्येचे परिमार्जन केल्याशिवाय मी आपल्याशी विवाह करणार नाही अशी अटच अल्के-मनीने घातल्याने ॲम्फिट्रिओनला, टॅफिअन्सविरुद्ध हत्यार उचलणे भागच पडले. यालढ्यात

ॲम्फिट्रिओनला सहजी जय मिळाला नसता पण टॅफिअन्सची राजकन्या कोमैथो ( Comaetho ) हिने ॲम्फिट्रिओनवरील प्रेमामुळे आपल्या वडिलांना अमर करणारा सोनेरी केसांचा झुपका आणून तो ॲम्फिट्रिओनच्या हवाली केला. त्यानंतर मगच ॲम्फिट्रिओनने टॅफिअन्सवर जय मिळवला.

( २८ ) **टिरॅनस** [ Taenarus ] : ग्रीसच्या दक्षिण भागातील एक शहर. हे एका सुय्ळक्यावर वसलेले आहे. त्या सुळक्यावर याच नावाची एक गुहा आहे. या गुहेतून हेराक्लीजने सैरबेरेसला ओढीत वर आणले.

( २९ ) **डर्फीज** [ Dirphys ] : एजिअन समुद्रातील सर्वात मोठे बेट.

( ३० ) **डायॉमिडीज** [ Diomedes ] : थ्रेसमधील बिस्टोनांचा ( Bistones ) राजा. याच्या रथाला घोड्या जुपलेल्या असत. या घोड्या अत्यंत मस्तवाल असून त्यांना नर मांसाची चटक लागलेली होती, हेराक्लीजने या घोड्यांना त्यांच्याच मालकाचे मांस खाऊ घातले. तेव्हा त्यांची नरमांसाची चटक गेली.

( ३१ ) **डॅनॉस** [ Danaus ] : इजितचा राजा इजिप्टस याचा हा जुळा भाऊ. डॅनॉसला पन्नास कन्या होत्या तर इजिप्टसला पन्नास पुत्र होते. इजिप्टसच्या पन्नास पुत्रांची डॅनॉसला भीती वाटल्याने आपल्या पन्नास कन्यांना घेऊन तो ॲर्गासला पळून गेला. इजिप्टसचे पन्नास पुत्रही त्याच्या मागे गेले व त्यांनी त्याच्या पन्नास मुलींची विवाहासाठी मागणी केली. डॅनॉसने वरकरणी हे मान्य केले पण आपल्या प्रत्येक कन्येला एक एक खंजीर दिला व विवाहाच्या पहिल्या रात्री आपापल्या नवऱ्यांना ठार मारण्यास सांगितले. त्यानुसार एकोणपन्नास मुलींनी आपल्या एकोणपन्नास नवऱ्यांना ठार केले. एकटी हायपरम्नेस्ट्रा ( Hypermnestra ) हिने मात्र आपला नवरा लिन्सिअस ( Lynceus ) याला ठार मारले नाही. तोच एकटा वाचला. पुढे त्याने आपला सासरा डॅनॉस याला ठार मारले व बंधूंच्या मृत्यूचा सूड उगवला.

( ३२ ) **डीमीटर** : [ Demeter ] : क्रोनोस व ऱ्हेआ याची कन्या झ्यूसची बहीण व शेतीविषयक उत्पादनाची देवता. तिचा संबंध अन्य बागायती फळे व तत्सम उत्पादनाशी येतो. डिमीटर म्हणजे पृथ्वी.

( ३३ ) **डेलोस** : [ Delos ] : अंदाजे तीन मैल लांब व एक ते दीड मैल रुंद असे ग्रीसबेटातील सर्वात छोटे बेट. त्याचे सांप्रतचे नांव ‘ मिक्रा डिली ’ ( Mikra Dili ) हे बेट एकदम लाटांवर आले व तरंगू लागले. झ्यूसने त्याला स्थिर केले. लेटोने याच बेटावर अर्टेमिस व ॲपोलो या जुळ्या देवांना जन्म दिला. त्यामुळे हे बेट ॲपोलो भक्तांचे तीर्थक्षेत्र बनले.

( ३४ ) **डेल्फी** : [ DelPhi ] : प्राचीन ग्रीसमध्ये फोसिस प्रदेशातील एक गाव, ॲपोलोच्या दैवीवाणीबद्दल प्रसिद्ध असे देवालय येथेच आहे. डेल्फी हे गाव पार्नासस पर्वताच्या

उतारावर असून वर उंच चकाकणारे डोंगराचे सुळके दिसतात, डेल्फी हा पृथ्वीचा मध्य असे ग्रीक समजत असत. ग्रीसच्या दैवीवाणीला एकेकाळी फार महत्त्व होते. वैयक्तिक अडचणीच नव्हे तर राजकीय हालचाली, राष्ट्रीय अरिष्टे, ध्येय कोणते असावे या बाबत मार्गदर्शन याबद्दलही कौल लावले जात. देवालयाचा मधला परिसर साधारण चौकोनी आहे. चारी बाजूंनी भिंती असून मध्यभागी ॲपोलोचे भव्य मंदिर आहे. समोर वेदी आहे. सांप्रतचे मंदिर खिस्तपूर्व चवथ्या शतकातील असावे. मागील बाजूस असलेल्या गाभाऱ्यात दैवीवाणी ऐकू येई. देवालयाच्यावरील अंगास नाट्यगृह असून त्याहीवर स्टेडियम आहे.

( ३५ ) **नीमिअन सिंह** : [ Nem-an Lion ] : नीमिआ दरीत एका भयंकर क्रूर सिंहाने विलक्षण उपद्रव मांडला होता. त्याला ठार मारण्याचे अवघड काम, हा हेराक्लीजचा पहिला पराक्रम. हा सिंह इतका प्रचंड व ताकदवान होता की तलवारीसारख्या शस्त्रालाही तो दाद देईना. तेव्हा हेराक्लीजने नुसत्या हातांनी बुकलून त्याला ठार केले.व त्याचे प्रचंड कातडे युरिस्थिअसला भेट दिले. ते कातडे सुद्धा एवढे अवाढव्य व भीतिदायक होते की युरिस्थिअस भयंकर घाबरला व त्याने ते कातडे तत्काळ नजरेआड करण्याचा हुकूम केला.

( ३६ ) **पेनिअस** : [ Peneus ] : ग्रीसमधील बारमाही वहाणारी नदी. ग्रीसमध्ये बारमाही वहाणाऱ्या नद्या थोड्या आहेत. बहुतक नद्यांचे प्रवाह डोंगराळ भागाने खंडित झालेले आहेत. पेनिअस नदीचे पाणी आणून हेराक्लीजने ॲजिअसराजाच्या तीन हजार बैलांनी घाण केलेला गोठा, साफ केला.

( ३७ ) **पेलॅसगिअन** : [ Pelasgian ] : ग्रीकांचा उदय होण्याआधी ग्रीसमध्ये जे रहिवासी होते त्या सर्वांना पेलॅसगिअन ही संज्ञा होती. आयोनिअन्स हेच पेलॅसगिअन म्हणजे ग्रीसचे मूळ रहिवासी असे समजतात, होमरच्या काव्यांत यांचा ट्रॉयचे मित्र असा उल्लेख आहे. हे, आग्नेय थ्रेस मध्ये लारिसा प्रदेशात हेलेसपॉण्ट येथे राहात. ईलियड या महाकाव्यात थेसिलीतील ॲर्गास प्रदेशाचा पेलॅसगिक असा उल्लेख आहे. पेलॅसगिअन हे ग्रीकपूर्व रहिवासी हे सर्वमान्य आहे. इतिहासपूर्व अथेन्सच्या किल्ल्याला पूर्वी व आजही पेलासगिअन म्हणून संबोधण्यात येते.

( ३८ ) **पर्सिअस** : [ Perseus ] : हा, ज्युपिटर व डॅनी, यांचा पुत्र, याच्याहातून याच्या आजोबांचा ( आईचे वडील ॲक्रिसिअस याचा ) मृत्यू होणार असे भविष्य समजल्याने याचा जन्म होताच याला व याच्या आईला एका पेटीत घालून ॲटलसने समुद्रात सोडून दिले. पुढे या मायलेकरांना सेरिफॉस देशाच्या राजाने वाढविले. पर्सिअस मोठा झाल्यावर त्याने मेडयूसा राक्षशिणीला ठार केले व तिचे शीर कापून ते बरोबर घेऊन तो परत येण्यास निघाला. वाटेत तो ॲटलस राजाच्या प्रदेशात आला. ॲटलसने आपला मृत्यू पर्सिअस तो हाच, हे ओळखून त्याला हाकलून दिले. पर्सिअसला विलक्षण राग आला

व त्या संतापाच्या भरात त्याने मेडयूसाचे शिर ॲटलसला दाखविले. ॲटलस तत्काल पाषाणमय झाला.

( ३९ ) **पार्नासस** : [ Parnassus ] : फोसिस (Phocis) प्रांताच्या दक्षिणेला असलेला ग्रीसमधील एक पर्वत, ८०५९ फूट उंच ॲपोला, संगीताच्या देवता म्यूजेस व कॉरिंथवासी अप्सरा यांच्या वास्तव्याने पुनीत झालेला. पाययोन या नांवाचा एक विषारी सर्प या पर्वताच्या गुहेत राहात असे.

( ४० ) **पर्सेफोनी** : [ Persephone ] : ही, प्रॉसर्पिना म्हणूनही ओळखली जाते. ही सिरीजची देखणी कन्या. अधोलोकाचा राजा हेडीज तथा प्लूटो याने तिला आपल्या राज्यात पळवून नेले व आपली पट्टराणी केले तिच्या सुटकेसाठी तिच्या आईने भगीरथ प्रयत्न केले. पृथ्वीवर दुष्काळ आणला. पर्सेफोनीची सुटका झालीही असती पण तिने अधोलोकांत डाळिंबाचे अवघे चार दाणे उष्टावले; त्यामुळे तिला पूर्ण सुटका करून घेता आली नाही. ती सहा महिने पृथ्वीवर व सहा महिने अधोलोकात राहाते.

( ४१ ) **पॅलास** : [ Palpas ] : हा एक संकेतवाहक शब्द असून त्याचा अर्थ कुमारिका असा आहे, ग्रीक देवता ॲथीनी हिच्या नांवामागे या शब्दाचा उपयोग करतात.

(४२) **पेरलेल्या लोकांचे पीक** [ Crop of Sown Men ] : थीब्सच्या रहिवाशांच्या जन्माची ही कथा. पेनोपच्या मैदानावर केडमसने एका जहरी सापाला ठार केले व त्याच ठिकाणी झालेल्या एका दैवीवाणीस अनुसरून त्या सर्पराजाचे दांत त्याने जमिनीत पुरले. लगेच जमीन हलू लागली व जितके दांत पुरले होते तितके सशस्त्र शिपाई वर येऊन आपापसांत लढू लागले. फक्त पांच शिपाई वगळता बाकी सर्व मरून गेले. या पाच शिपायांनी लढाई थांबवून कॅडमसशी मैत्री केली. हेच थीब्सचे रहिवाशी व यांनीच थीब्स शहराची वाढ केली.

(४३) **प्लूटो** [ Pluto ] : प्लूटो हा अधोलोकाचा राजा. थिसिअसचा मित्र. पिरिथिअस याला अधोलोकातील प्लूटोची राणी प्रॉसर्पिना हवी होती. हे काम किती अवघड होते हे अथेन्सचा राजा थीसिअस याला माहीत होते. पण मित्रप्रेमाने हे साहस करण्यास तो तयार झाला व ते दोघे अधोलोकात गेले. त्यांना त्या ठिकाणी प्लूटोने मंत्रसहाय्याने एका खडकावर अडकवून ठेवले. पुढे हर्क्यूलसने अधोलोकात जाऊन थिसिअसची सुटका केली व पिरीथिअसला तसेच तिष्ठत ठेवले. हेडीज आणि प्लूटो हे समानार्थीच शब्द.

(४४) **प्रॉकने** [ Procne ] : ॲथेन्सच्या पॅन्डिअनराजाची ही मुलगी. टीरिअसची पत्नी. सवतीच्या द्वेषाने हिने स्वतःचे मूल मारून ते पतीच्या ताटात वाढले.

(४५) **फ्लॅग्रियन प्लेन्स** [ Phlegraean Plains ] : फ्लेग्रा येथे ज्या ठिकाणी देव व राक्षस यांचे युद्ध झाले ती मैदाने.

(४६) **फोली** [ Pholoe ] : अर्केडियामधील एका पर्वताचे नाव. या पर्वताच्या

उतारावर सेन्टॉर्सचे वास्तव्य असावे.

(४७) **डिर्स** [ Dirce ] : थीब्सचा राजा लिकस याची पत्नी. ॲन्टिओपी ही तिची सवत. या सवतीचा तिने खूप छळ केला; तेव्हा सवतीच्या ॲम्फिअन व झेथस या दोन मुलांनी लिकसला ठार केले आणि थीब्सचे राज्य बळकावले. डिर्सला माजलेल्या बलिवर्दाच्या पायाला बांधून तिचा शेवट केला.

(४८) **बॅक्कस** [ Bacchus ] : प्राचीन ग्रीकांचा मद्य व फलपुष्पांचा अधिष्ठाता देव. हा ज्युपिटरचा पुत्र. थीब्सच्या कॅडमस राजाची कन्या सिमिली ही याची माता. बॅक्कसने पृथ्वीवर द्राक्षांची लागवड सुरू केली व फळांपासून मद्य तयार करण्याची कला, लोकांना शिकविली. ग्रीस देशात त्याने स्वतःचा पंथ स्थापन केला व आपलीच पूजा करण्याचा उपदेश तो लोकांना करू लागला. त्याच्या हातात व मस्तकावर द्राक्षवेलींच्या माळा असत व हातात थिरसस नावाचा काळ दंड असे. त्याच्या उत्सव प्रसंगी मद्य व स्वैराचार यांना मुक्त परवाना असे. त्याच्या भक्तिणींना बाकाए म्हणत.

(४९) **मिनिसिअस** [ Menoeceus ] : हा क्रेओनचा पुत्र. ईटिऑक्लीज व पॉलिनीसस या बंधूनी थीब्सवर एकेक वर्ष आळीपाळीने राज्य करावयाचे ठरविले होते. पण एका वर्षाची मुदत संपल्यावर ईटिऑक्लीजने पॉलिनीससला राज्य द्यावयाचे नाकारले. तेव्हा पॉलिनीससने ॲर्गॉसचा राजा ॲड्रॅस्टस याच्या सहाय्याने थीब्सवर स्वारी केली. ईटिऑ-क्लीजच्या दरबारातील भविष्यवेत्ता टायरेसिअस याने सांगितले की मिनिसिअस जर स्वतःचा बळी देण्यास तयार होईल तर ईटिऑक्लीजला जय मिळेल. देशप्रेमाने प्रभावित होऊन मिनिसिअस युद्धांत सर्वांत पुढे झाला व शत्रूकडून मारला गेला.

(५०) **मिनिई** [ Minyae ] : थीब्स शेजारील ग्रीक लढवय्यांची एक जमात. या जमातीचा जनक मिनिॲस हा बोएशियाचा राजा. मिनिईच्या वंशाजाना ॲर्गोनॉप्स या नावाने संबोधितात. या मिनिॲसवर हेराक्लीजने विजय मिळवला होता.

(५१) **मिनिटॉर** [ Minotaur ] : क्रीट या बेटाचा राजा मिनॉस याच्या राज्यात मिनीटॉर या नावाचा एक राक्षस होता. या राक्षसाचे शरीर, अर्धे बैलासारखे व अर्धे माणसासारखे होते. या राक्षसाला एका चक्रव्यूहात कोंडून ठेवले होते. त्याला दरवर्षी अथेन्स-मधून सात तरुण मुलगे व सात तरुण कुमारिका भक्ष्य म्हणून द्याव्या लागत. थीसिअस या तरुणांपैकी एक म्हणून गेला व त्याने मिनीटॉरला ठार केले.

(५२) **मिसिनी** [ Mycenae ] : ग्रीसमधील सर्वांत जुने शहर. बालेकिल्ल्यासारखे उंचावर असून चौफेर भक्कम अशी सायक्लोपिअन तटबंदी आहे. हा ईजिअन समुद्राला लागून आहे. ट्रॉयशी स्नेहसंबंध ठेवणारे राज्य असा मिसिनीचा होमरच्या काव्यात उल्लेख आहे. मिसिनीचा राजा युरिस्थिअस याच्या सांगण्यावरून हेराक्लीजने बारा भीमपराक्रम केले.

(५३) **माउण्ट पेलिअन** [ Mount Pelion ] : थेसॅलीतील मॅग्नेशिया प्रदेशातील पर्वत.

सेन्टॉर्स, या पर्वतातील गुहेतून राहात, चिरॉन हा सेन्टॉर, येथील गुहेत अनेक तरुण सेन्टॉर्सना शिक्षण देत असे. देवांविरुद्ध लढताना राक्षसांनी या पर्वताचा उपयोग ऑलिम्पस पर्वतावर जाण्यासाठी शिडीसारखा केला. झ्यूस ॲक्टिअस याची जत्रा येथे भरते.

(५४) **म्यूजेस** [ Muses ] : काव्य, कला, शास्त्र व संगीताच्या देवता. ग्रीक कथेत यांची संख्या नऊ आहे. या हेलिकोन पर्वतावर राहातात.

(५५) **यूबिआ** [ Euboea ] : पूर्वी एग्रिपॉस व निग्रापॉण्ट या नावाने ज्ञात असलेला ग्रीक बेटांचा समूह. वायव्येकडून आग्नेयेकडे अशी पसरलेली लांबी १०६ मैल व रुंदी ४ पासून ३० मैलांपर्यंत. डेल्फी व ओखी ही दोन उंच शिखरे. ग्रिकांच्या मते भूकंपामुळे मुख्य भूगाभापासून हा भाग निराळा निघाला असावा. उत्तम पर्वतराजीतील उत्तम गवताळ प्रदेशामुळे गुरेढोरे जोपासण्यास उत्तम. हेराक्लीजच्या मागे थीब्सची सत्ता बळकाविणारा जुलमी राजा लिकस हा याच प्रांतातला.

(५६) **युरिस्थिअस** [ Eurystheus ] : पर्सिअसच्या घराण्यातील स्थेनलेसचा हा मुलगा. हा कृश व आजारी असायचा. हेराक्लीजला राज्य मिळू नये म्हणून त्याचा जन्मकाळ लांबवून हीराने याचा जन्म आधी घडवून आणला. हीराच्या प्रेरणेने यानेच हेराक्लीजला बारा साहसे करायला भाग पाडले. हा विलक्षण भित्रा होता. हेराक्लीजने नीमिआ सिंहाचे प्रचंड धूड याला भेट म्हणून दिले तेव्हा हा इतका घाबरला की हेराक्लीजने यापुढे स्वतःच्या पराक्रमाची कोणतीही खूण आपल्याला दाखवू नये, असे त्याने सांगून टाकले.

(५७) **लर्निअन हायड्रा** [ Lernean Hydra ] : हेराक्लीजचा दुसरा पराक्रम. ॲर्गॉस देशातील याच नावाच्या नदीपाशी असणारा सर्पाकृती राक्षस म्हणजेच हा हायड्रा. याला नऊ मस्तके होती. मधले एकच अमर होते. या सर्पराजाने आसपासचा प्रदेश उद्ध्वस्त करून सोडला होता. हेराक्लीजने त्याची आठ मस्तके तोडून जाळून टाकली. व मधले मस्तक एक प्रचंड पर्वताखाली दडपून टाकले.

( ५८ ) **लीबिअन पाइप** : लीबियामधील एक वाद्य

( ५९ ) **शरॉन** [ Charon ] मृतांचे वास्तव्य असलेल्या अधोलोकातील नदीवरील नावाडी. हा अत्यंत वयातीत पण पिळदार शरीराचा आहे. ज्यांना मृत्यूनंतर यथाविधी मूठमाती मिळालेली आहे अशाच मृतात्म्यांना तो नदीवरून पलीकडे जाऊ देत असे.

( ६० ) **सेन्टॉर्स** [ Centaurs ] अर्धे मानव व अर्धे हय, असे चार पायांचे प्राणी. हे सेन्टॉर्स पर्वताच्या गुहेत तरुणांना शिक्षण देत. नेसस या नावाचा एक सेन्टॉर उतारूंकडून ठराविक कर घेऊन त्यांना नदीपार करीत असे. हेराक्लीज आपल्या डिथॅनिरा या पत्नीसह तिथे आला असता नेससने हेराक्लीजला नदीपार केले. पण डिथानिरा ईस नदीपार करीत असताना त्याच्या मनात पापबुद्धी आली व तिला घेऊन तो पळून जाऊ लागला. तेव्हा हेराक्लीजने त्याला एका बाणाने ठार केले.

(६१) **सेरबेरस** [ Cerberos ] : मृतात्मे वास्तव्य करतात त्या अधोलोकाचे प्रवेश-द्वार संभाळणारा उग्रप्रकृती श्वानराज. काही प्राचीन कवींच्या मते याला ५० ते १०० मस्तके होती, पण नंतरचे कवी याला तीनच शिरे असल्याचे सांगतात. या श्वानराजाच्या मानेवरील केसांच्या व शेपटीच्या ठिकाणी भयानक सर्प होते. हेराक्लीजने या भयानक श्वानाला पृथ्वीवर आणले. हेराक्लीजचे हे बारावे साहस.

(६२) **सायकन्स** [ Cycnus ] : हा, अतिथींना ठार मारीत असे. हेराक्लीजने याला ठार केले. हेराक्लीजच्या वीर कृत्यांपैकी हे एक होते.

(६३) **सायक्लोपिअन** [ Cyclopian ] : मिसिनी येथील उत्खननात जे भव्य असे बांधकाम दिसून आले त्याला सायक्लोपिअन असे म्हणतात. ॲर्गॉसचा किल्लाही असाच भक्कम होता. सायक्लोप्स या नावाचे आडदांड राक्षस होते. त्यांच्या सारखा म्हणजे सायक्लोपियन.

(६४) **सायसीफस** [ Sisyphus ] : कोरिन्थचा राजा. याने काही विशेष अक्षम्य अपराध केल्याबद्दल अधोलोकात त्याला कठोर शिक्षा देण्यात आली होती. एक भला मोठा धोंडा, त्याला शिखराच्या टोकापर्यंत ढकलीत न्यावा लागे. शिखराच्या टोकाशी नेलेला धोंडा लगेच गडगडत खाली येत असे. सायसीफस पुन्हा धोंडा वर नेई व तो पुन्हा खाली येई. असे एकसारखे चाललेले असे.

(६५) **सिबिली** [ Cybele ] : इटली देशातील मंत्रतंत्र जाणणारी. हिला मंत्रसहाय्याने उत्तम प्रकारचे भविष्य समजत असे. अपोलोच्या देवळाजवळ डायनाची राई होती. देऊळ व राई या दरम्यान असलेल्या एका गुहेत ती राहात होती. ईनिअसला घेऊन ती अधोलोकात गेली होती. एकेकाळी ऑपोलोचे तिच्यावर प्रेम होते तेव्हा एक मूठभर वाळू तिने हातात घेतली व जितके वालुकाकण होते तितकी वर्षे आयुष्य मागितले. तिला एक हजार वर्षे आयुष्य होते. आयुष्याबरोबर तिने चिरतारुण्य मागून घेतले नाही. म्हणून ती जख्ख म्हातारी दिसे.

(६६) **हीरा** [ Hera ] क्रोनस व र्‍हेआ या ग्रीकमानवपूर्व टायटान्सची कन्या झ्यूसच्या अनेक राण्यांपैकी एक राणी अत्यंत दुष्ट व मत्सरी स्वभावाची अल्कमेना, लेटो व सेमेले या सवतींचा व त्यांच्या मुलांचा अतोनात द्वेष करणारी, हेराक्लीजच्या जन्माचे वेळी आज जन्मणारा मुलगा ग्रीसचा राजा होईल असे झ्यूस म्हणाला तेव्हा हीराने पर्सेअसच्या वंशातील स्थेनेलसच्या पत्नीला ( हेराक्लीजच्या जन्माला उशीर लावून ) एक मुलगा होऊ दिला या मुलाचे नाव युरिस्थिअस. हा युरिस्थिअस पुढे राजा झाला. हेराक्लीजची सर्व अचाट साहसे पुरी झाल्याशिवाय त्याच्यावर हात उगारण्यास 'झ्यूस 'व' न्यायदेवता' यांनी हीराला मना केली होती. त्यामुळे त्याची ती सर्व भीमकृत्ये पुरी होताच हीराने त्याच्यावर पुरा सूड उगावला. त्याच्या हातूनच त्याची सर्व अपत्ये व पत्नी यांचा नाश घडवून आणला.

(६७) **हेडीज** [ Hades ] : क्रोनस आणि ऱ्हेआ या मानवपूर्व दैत्यांचा हा पुत्र. झ्यूस व पोसिडॉन यांचा भाऊ. वडील क्रोनस यांना राज्यावरून दूर केल्यावर या तिघा भावांनी वडिलांचे राज्य आपापसात वाटून घेतले. हेडीजच्या वाट्याला अधोलोकातील राज्य आले. हेडीज हा प्लूटो या नावानेही ओळखला जातो. पर्सिफोनी (प्रॉसर्पिना) ही त्याची पत्नी. याची मृतांवर सत्ता असते. हा स्वतः न्यायनिवाडा करीत नाही पण त्यावर त्याची देखरेख असते. हेडीज हा अत्यंत कठोर, उग्र व यमासारखा निष्ठुर आहे. त्याच्या सिंहासनाखाली भयानक ज्वाला उफाळत असतात. त्याच्याच राज्यातून हेराक्लीजने थीसिअसला सोडवून आणले. त्याच्या नावावरून अधोलोकाला हेडीज हेच नाव पडले.

(६८) **हेब्रस** [ Hebrus ] : थ्रेस देशातील मुख्य नदी. ग्रीकलोककथांत विशेष प्रसिद्ध. या नदीच्या तीरावर एशियन स्त्रियांनी आर्फिअसला ठार केले. डायोनिसस या देवाच्या पूजनात हिचे नाव वरचेवर येते.

(६९) **होमोली** [ Homole ] : पेलिअन पर्वतावरील हिरव्यागार वृक्षराजीने नटलेले उतार या उतारावरील वनराजीतून भाले करण्यासाठी सेन्टॉर्स पाइनवृक्षांच्या फांद्या तोडीत.

( ) **हेलिकॉन** : [ Helicon ] : मध्यग्रीसमधील फोसिस पर्वतावरील एक प्रसिद्ध पर्वत पार्नासिस व हेलिकॉन पर्वतावरून ओक वृक्षांचे ओंडके आणण्यासाठी लिकसने सेवकांना पाठविले होते. ॲपोलो कलादेवता ( म्यूजेस ) यांच्या नावाशी या पर्वताचे नाव निगडीत आहे. कलादेवतांचे प्रसिद्ध, झेर ॲगॅनिपे व हिपोमीन, या पर्वतावरूनच उगम पावले आहेत.

( ७० ) **हेलास** : [ Hellas ] : दक्षिण थिसिलीतील एक प्रदेश. ग्रीसचे एक नाव. प्राचीन काळी सर्व ग्रीक जगताला उद्देशून हा शब्दप्रयोग करीत. मूळ ग्रीस व त्याशिवाय त्यावेळी एशिया मायनर, सिसिली आणि भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर असणारा सर्व प्रदेश 'हेलास' या शब्दात समाविष्ट होता.

( ७१ ) **हेलनीज** : [ Heilenes ] : म्हणजे ग्रीक भाषा बोलणारे. ग्रीक पद्धतीने वागणाऱ्या पण मूळ ग्रीक नसलेल्यांनाही हा शब्द वापरतात.

'हेलेनिस्टिक' म्हणजे खिस्तपूर्व ३०३ ते ३० वर्षे इतका कालखंड.

( ७२ ) **हंसगीत** : Swan Song : मरणापूर्वीचे शेवटचे गीत. हंस, गीत गाता गाता मरतो, अशी समजूत आहे.

( ७३ ) "You shared my marriage,
Shared my tatherhood, heracles !"
"माझ्या विवाहात तूं सहभागी झालास,
तसाच माझ्या पितृत्वातही !"

ॲम्फिट्रिओन हे काहीशा उद्वेगाने व काहीशा उपहासाने बोलत आहे. युरायपिडीज हा

देवदेवतांचा कठोर टीकाकार त्याचेच विचार थोड्याफार प्रमाणात ॲम्फिट्रिओन बोलून दाखवतो. ज्या देवाला श्रेष्ठ म्हणावयाचे, ज्याला मान द्यावयाचा, त्याबद्दल आदर दाखवायचा तोच झ्यूस देव मानवी जीवनात मिसळून एका मानवाच्या पत्नीजवळ शय्यासुख घेतो पण त्याच स्त्रीच्या अपत्यांच्या संकटकाळी मात्र धावून येत नाही हे देवाला जरासे लाजीरवाणेच. वास्तविक झ्यूस हा हेराक्लीजचा खरा जन्मदाता व ॲम्फिट्रिओन हा लौकिक पिता पण हेराक्लीजच्या अपत्यांच्या संकटकाली तोच उभा होता.

(७४) " Hvue not Gods joined in lawless Love
among themselves ?
Dishonoured tatherhood with chains
to gain a throne ? "

आपापसात व्यभिचारी प्रेमाची शिकार देवसुद्धा झालेले नाहीत का? सिंहासनाच्या प्राप्तीसाठी बेड्या चढवून, पितृत्वाचा अवमानसुद्धा देवांनी केला आहे ना ?

हेराक्लीजच्या वेडाचा उन्माद ओसारल्यावर आपल्या हातून आपलीच प्रिय बालके व प्रिय पत्नी ठार व्हावी या दैवदुर्विलासेचा त्या मानी व सरळ मनाच्या पुरुषास अतोनात यातना होतात 'आपण जगणे' म्हणजे पृथ्वीला पापाचा भार, असे वाटून हेराक्लीज आत्महत्या करायला प्रवृत्त होतो तेव्हा त्याचा मित्र थीसियस त्याची समजूत घालतो व त्याला समजावून सांगतो. देवादिकांचे दाखले देऊन थीसिअस म्हणतो देव जर अशा कृत्यांचे काही मानीत नाहीत, तर तुला मानवाला एवढे मनाला लावून घ्यायचे कारण काय ? शिवाय हेराक्लीजच्या हातून झालेल्या पापाच्या मागे हीराची दुष्ट प्रेरणा असल्याने त्यात त्याचा दोष नाही.

देवांनीसुद्धा पातके केली आहेत. झ्यूसने व त्याच्या बंधूंनी खुद्द जन्मदात्याला ठार करून त्याचे राज्य बळकावले. ज्युपिटरने युरोपाला पळवून नेले, हेराक्लीजचा जन्मकाळ लांबवून हीराने युरिस्थिअसचा जन्म आधी घडवून आणला व त्याला राज्यावर बसवले. खुद्द झ्यूसने ॲम्फिट्रिओनच्या अनुपस्थितीत त्याच्यासारखा पोषाख करून त्याची पत्नी अल्केमेनी इच्याशी व्यभिचार केला. त्यातूनच हेराक्लीजचा जन्म झाला. इतके करूनही हीरासारख्या पत्नीला साथ देऊन हेराक्लीजचा छळ केला. त्याला मदत करणे दूरच, उलट त्याच्या हातून त्याच्या स्त्री-मुलांची हत्या केली.

असे हे देव जर ताठमानेने व उजळमाथ्याने ऑलिम्पिक पर्वतावर रहातात, पूजा मानसन्मान घेतात, तर हेराक्लीजने, नकळत झालेले पाप एवढे मनावर घ्यायचे कारणच काय ? असा थीसिअसचा युक्तिवाद होता. या न्यायाने इतरेजनांनाही तसेच वागायला प्रत्यवाय कोणता ?

# बाकाअी

मूळ लेखक : युरायपिडीज [EURIPIDES]

## पात्र-परिचय

**डिऑनायसस**

**कोरस**

डिऑनायससच्या पौर्वात्य भक्तिणींचा संच

**टेरेसिअस**

एक अन्ध द्रष्टा

**कॅडमस**

थीब्स शहराचा संस्थापक; भूतपूर्व राजा

**पेन्थअस**

कॅडमसचा नातू; थीब्सचा सांप्रतचा राजा

**रक्षक**

पेन्थेअसचा अनुचर

**गोप**

**जासूद**

**अॅगेवे**

कॅडमसची कन्या आणि पेन्थेअसची माता

**स्थळ :** थीब्स शहरातील पेन्थेअस राजाच्या राजप्रासादासमोरील जागा. रंगमंचाच्या एका बाजूला सेमेलीचा स्मारकस्तंभ असून त्या स्तंभाच्या वरच्या बाजूस एक दीपज्योत मंदपणे तेवत आहे. स्तंभाच्या सभोवतालच्या बांधकामाचे अवशेष काळवंडलेले असून भग्नावस्थेत इकडे तिकडे विखुरलेले आहेत.

[ डिऑनायसस उजव्या बाजूने प्रवेश करून रंगमंचावर येतो. त्याने आयव्ही नावाच्या लतापल्लवांचा मुगुट मस्तकावर धारण केलेला आहे. हातात थिरससचा दण्ड आहे. या दण्डाचे टोक भाल्यासारखे असून, ते लतापल्लवांने मढवलेले आहे. त्याचे केस लांब असून मानेपर्यंत रुळत आहेत. यौवनाने बहरलेल्या त्याच्या सौंदर्यात जनानी झाक आहे. ]

**डिऑनायसस :** मी आहे डिऑनायसस, झ्यूसचा मुलगा. माझी आई सेमेली म्हणजे कॅडमसची कन्या. काय झालं ! विजेच्या कडकडाटात, त्या अग्निकल्लोळाच्या चकचकाटात मातेच्या उदरातून माझा जन्म झाला. आज, माझं देवस्वरूप मी जरा बाजूला ठेवलंय नि रूपपालट करून मर्त्य मानवाच्या वेषात या थीब्स शहरात आलो आहे. डिर्से आणि इस-मेनस या दोन नद्या या शहराजवळून वाहतात. अरे ! या प्रासादाशेजारीच हे स्मारक ! हो ! विद्युत्पातात इहलोक सोडून गेलेल्या माझ्या मातेचे हे स्मारक. हे तिच्या वास्तूचे अजून धुमसत असलेले भग्न अवशेष. या अवशेषांवर अजूनही झ्यूसची तेजोमय ज्योत प्रकाशत आहे. ही जळती ज्योत, म्हणजे ‘ हेरा ’ची माझ्या आईबद्दलच्या दुष्टाव्याची झगझगीत स्मृतीच. कुणाचा पदस्पर्श होऊन ही जागा अपवित्र होऊ नये म्हणून कॅडमसने योग्य तोच बंदोबस्त ठेवला आहे. ठीकच आहे ते. त्याच्या कन्येच्या स्मृतीमुळे पूज्य मानला गेला आहे हा परिसर. आणि आता, मी तो शृंगारला आहे द्राक्षवेलीच्या अतिनवकोमल पर्णांनी. लायडिया आणि फ्रिजिया, सोने पिकविणारे सुपीक प्रांत; तेथून मी आलो तो, सूर्यकिरणांनी तापून निघणाऱ्या पर्शियातील सपाट मैदानावर; पुढे, तटबंदी असलेली नि फारशी सुखदायक नसलेली बॅक्ट्रिआ व मीडिआ, ही शहरे; नंतर समृद्ध अरेबिया. तो सगळा आशियायी

सागरी टापू, ज्या टापूत गजबजलेल्या धनाढ्य, समृद्ध शहरांतून ग्रीक आणि पौर्वात्य एकत्र राहत होते, असा फिरत फिरत मी प्रथमच पाहात असलेल्या हेलासमधल्या या नगरीत आलो. मी माझं आवडतं नृत्य नाचलो, माझ्या पूजाअर्चनाचा विधी नीट दाखवून दिला. त्यामुळे माझ्यातला दैवी अंश त्या त्या ठिकाणच्या मानवांना उमगला.

हेलासमधील थीब्स हे शहर, येथील सर्व महिलांनी माझ्या आज्ञेला मान देऊन खास माझा, बॅक्सच्या नावाचा जयघोष चालवलेला आहे. त्यांनी अंगावर मृगजिनांचे झगे घातले आहेत. माझे शस्त्र म्हणून आयव्ही पल्लवाने मढविलेले थिरसस दण्ड हातात धारण केलेले आहेत. याच स्त्रियांनी सर्वप्रथम माझे अनुयायित्व का स्वीकारले ? याचे कारण असे, माझ्या आईच्या बहिणी म्हणाल्या – वास्तविक त्यांनी – विशेषतः त्यांनी, असे म्हणणे अगदी गैर होते. तरी त्या म्हणाल्या की, मी म्हणजे डिऑनायसस, हा काही झ्यूसचा मुलगा नव्हे तर सेमेली, हिला दिवस राहिले ते कुणा मानवाच्या सहवासाने. पण मग तिच्या वडिलांनी सुचविलं म्हणून सेमेलीने कौमार्यभंगाची जबाबदारी झ्यूसवर ढकलली. आणि माझ्या मावश्या असेही प्रतिपादू लागल्या की सेमेलीने आपल्या मुलाच्या पितृत्वाबद्दल जे असत्य कथन केले त्या पापाबद्दल झ्यूसने तिला देहदंड दिला.

म्हणून या, त्याच सर्व बहिणींना मी पार वेडंखुळं करून टाकलंय. सगळ्या जणींना वेडाच्या उन्मादात घर सोडायला लावलंय. त्यांची अक्कल तर निकालात निघालीच आहे आणि आता त्यांचा मुक्कामही डोंगरमाथ्यावर. माझ्या पूजा–अर्चनाची गूढ प्रतिके, मी त्यांना हातात वागवावयास लावली. शहरात असणाऱ्या थीब्समधील एकूण एक स्त्रीला मी घराबाहेर काढले. बडबडत, बरळतच त्या घरांतून निघाल्या आणि त्या सगळ्याजणी आता कॅडमसच्या मुलीभोवती गोळा झाल्या आहेत. जिथे माथ्यावर छप्पर नाही अशा खडकावर चंदेरी देवदार वृक्षाखाली त्या बसल्या आहेत. थीब्सच्या नागरिकांना हे पटणार नाही, तरी त्यांना हे समजलं पाहिजे की, माझा, बॅक्सचा जल्लोष, हा त्यांच्या प्रस्तुत ज्ञानाच्या आणि समजशक्तीच्या पलीकडचा आहे, आणि सेमेलीला झ्यूसपासून झालेला मुलगा तो मीच, हे अखिल मानवजातीला पटविण्यासाठी मला देवरूप घेऊन त्यांच्यासमोर प्रगट व्हायला हवं. असं झालं म्हणजेच माझ्या मातेची प्रतिष्ठा निष्कलंक केल्याचे समाधान मला लाभेल.

आता कॅडमसने राजपदाचे सर्व परंपरागत मानसन्मान आणि त्याचबरोबर सिंहासन आपल्या मुलीच्या मुलाला म्हणजे पेन्थेअसला:बहाल करून टाकले आहेत. आणि या पेन्थे-असने ईश्वराविरुद्ध बंड पुकारले आहे. तो मला जुमानीत नाही. अर्घ्ये अर्पण करताना मला वगळतो. प्रार्थना म्हणताना कधीच माझे नाव घेत नाही, म्हणून मी त्याला आणि सर्व थीब्सवासियांना पटवून देणार आहे की, मी देव आहे, मर्त्य नव्हे.

इथली सगळी घडी नीटनेटकी बसली की, मग मी दुसऱ्या ठिकाणी जाईन आणि माझे दिव्य रूप प्रगट करीन. दरम्यान थीब्सचे नागरिक, जर संतापाने, डोंगरमाथ्यावर

असलेल्या बाकाईना, माझ्या भक्तिणींना बळजबरीने परत आणण्याचा प्रयत्न करू लागले तर अंगात संचार झालेल्या त्या बायकांच्या दलात मी स्वतः सामील होईन आणि लढाईत त्यांचे नेतृत्व करीन. तेवढ्यासाठीच मी माझे दिव्य स्वरूप बदलले आहे आणि माणसाच्या रूपात इथं उभा राहिलो आहे.

या ! पूर्वेकडील प्रदेशातून मोलसच्या उतारावरील भूभागातून, लायडिआच्या बुरुजांवरून ज्या स्त्रियांना मौजमजा करण्यासाठी आणि माझ्या प्रवासात सहभागी होण्यासाठी मी माझ्या-बरोबर आणले आहे, अशा सर्व पावन महिलांनो ! या ! तुमच्या फ्रीजियामधले संगीत घुमवा. महान्माता ऱ्हेआ आणि मी – आम्ही दोघांनी जे ढोलके प्रथम शोधून काढले त्या ढोलक्याचा गगनभेदी आवाज उठवा. पेन्थेअसच्या प्रासादाला गराडा घाला आणि वाद्य-नादाचा असा गजर करा, की सारे थीब्स मान मोडून टकमक बघत राहील. सायथेइरॉन पर्वताच्या दऱ्यांतून माझ्या बाकाई आहेत, तिथे मी जातो आणि त्यांच्या नृत्यात सहभागी होतो.

[ डिऑनायसस डोंगरमाथ्याच्या दिशेने जातो. त्यानंतर जेथून डिऑनायससने प्रथम प्रवेश केला व जेथून तो प्रवास करीत आला, त्याच बाजूने हा नारीवृन्द ( कोरस ) येतो. ]

**नारीवृन्द : ( गीताचा पहिला भाग : कडवे पहिले )** Strophe I

दूर दूर असणाऱ्या एशियाच्या भूमीवरून
मोलसच्या पवित्र पर्वतावरून
धावतो आहोत आम्ही हर्षदेवासमवेत
श्रम हाच आनन्द आहे
थकून जाण्यात गोडवा आहे
आमची गीते गात आहेत
फक्त बॅक्कसच्या गौरवाला

**( गीताचा दुसरा भाग : पहिले कडवे )** Anti Strophe I

लुडबुड्यांपासून सावध रहा
घरांत अगर बाहेर
कोण ऐकत आहे तो !
प्रत्येक ओठ पवित्र शब्द उच्चारू द्या
अगदी दूर राहा; निस्तब्ध राहा
आम्ही बॅक्कसच्या स्तुतीची खास स्तोत्रे गात आहोत

**( गीताचा पहिला भाग दुसरे कडवे )** Storphe II

ज्ञात असतात ज्या मानवाला
देवप्रणीत गूढ विधी
आणि पावन करून सोडतो जो
आपले पवित्र जीवित
आणि निष्कलंक केलेले विधी आचरीत
गिरिकन्दरातील एकान्तात
आनन्दमय समाधीत होतो लीन
आणि महन्माता सिबिलीने वैध ठरविलेले
करतो गूढ संस्कार,
शृंगारतो आपले मस्तक आयव्ही पल्लवाच्या मुगुटांनी
आणि उंच हेलकावतो आपला दण्ड
डिऑनायससबद्दलच्या पूज्य भावनांनी ओथंबून
धन्य होय तो मानव !

चला, चला, पुढे चला
नाचा, बागडा, बेहोष व्हा, झपाटून जा
डिऑनायससला पूर्वप्रतिष्ठा प्राप्त झाली आहे
या घेऊन त्याला फ्रीजिअन टेकड्यांवरून
हेलासच्या भव्य राजरस्त्यावर
तो देव, ईश्वराचे ते लेकरू,
साक्षात् मौज मजा आणि बेहोषीच
असा तो डिऑनायसस

**( गीताचा दुसरा भाग : कडवे दुसरे )** Anti:Strophe II

ज्या गर्भाशयाने केला होता एकदा त्याचा प्रतिपाळ
फेकला गेला, त्या गर्भाशयावरच झ्यूसच्या हातचा अग्निलोळ
त्याच्या मातेला घेरले प्रसव वेदनांनी
आणि तिने त्याला अकालीच दिला जन्म
आणि त्या अग्निलोळातच तिने देह ठेवला
त्याच वेळी क्रॉनॉसपुत्र झ्यूसने

त्या बालकाला लपवून ठेवला
आपल्या मांडीतल्या गुप्त गर्भाशयात
सुवर्ण कीलकांनी बंद करून
आणि रक्षिला असा, हेराच्या क्रूर नजरेपासून

आणि जेव्हा देवतांच्या ( Fates ) धारणेनुसार
जन्म घेण्यास तो योग्य झाला
तेव्हा झ्यूसने बलिवर्दासारखी शिंगे असलेल्या
देवाला जन्म दिला
आणि शृंगारले त्याचे मस्तक वळवळणाऱ्या सर्पमालिकांनी
म्हणूनच मेइनाडस् पकडतात रानटी सर्प
पाळतात त्यांना, आणि गुंडाळतात
आपल्या कचपाशाभोवती

**( गीताचा पहिला भाग : कडवे तिसरे )** Strophe III

ही प्राचीन थीब्स नगरी
जिने केले होते सेमेलीचे दाईपण
हे नगरी!
आयव्ही पल्लवांचे हार धारण कर
चमकदार बेरी फळे आलेल्या
रसरशीत ब्रिऑनी लतांच्या माळा
धारण करून फुलून ये!
फर लोकरीचे गोंडे आणा.
ओक वृक्षांच्या हिरव्यागार फांद्या तोडा
आपला आत्मा आणि शरीर,
जाऊ द्या भरून, बॅक्कसच्या गूढ मंत्रप्रभावाने
लावा आपल्या ठिपक्या ठिपक्यांच्या
मृगजिनांच्या झग्यांच्या किनारींना लोकरी गोंडे
आणि शृंगारा बाकी सर्व, अति शुभ्र लोकरी धाग्यांनी
फेनेलच्या त्या दंडात, दडलेली आहे
एक रानटी मस्ती
सामोरे जा तिला सन्मानाने

जेव्हा थीब्समधील महिला
आपली सूतकताई आणि विणकाम थांबवून
डिऑनायससच्या वेड लावणाऱ्या बेहोषीने मस्त होऊन
नाचत ओरडत मोठ्या जमावाने
देवाच्या उत्कटानंदाच्या आरोळ्यांसरशी
त्यांच्या नेतृत्वाखाली उंच उंच जाणाऱ्या
गिरीशिखरांकडे चालू लागतील
तेव्हा,
सबंध मुलूखच नाचू उडू लागेल,

**( गीताचा दुसरा भाग : कडवे तिसरे )** Anti Strophe III

ती गुप्त जागा; जी ज्ञात होती क्युरीटीजना
ती क्रीटनच्या दऱ्यांतील पवित्र गुहा
जिथे झ्यूस जोजावला गेला
ज्या ठिकाणी तिहेरी तुरे खोवणाऱ्या कॅरिबॅन्टीसनी
आम्हाला तोषविण्यासाठी आपल्या ढोलाचे
वर्तुळाकार चामडे, असे आवळले की,
त्याचे बेबंद नाद फ्रीजिअन बासरीच्या
मधुर आलापांना आनन्दोत्कट लय देऊन गेले,
आणि ज्यामुळे देवांशी ऱ्हेआमातेला समजून आलं
की, ढोलकीचा नाद, तिच्या बॅक्कसच्या
स्तोत्र सुरावटींना पोषक होऊ शकतो
त्या ऱ्हेआपासून, त्या जगन्मातेपासून
उन्मत्त सॅटिरांनी
त्या नंतरच्या वर्षांत, त्यांच्या नृत्योत्सवांत
डिऑनायससच्या अंतःकरणाला सुखावणारे
एक प्रमुख अंग म्हणून
त्याच ढोलकीच्या सुरावटी पकडल्या

**( गीताचा तिसरा भाग )** Epode

ओहो ! केवढी गंमत आहे डोंगरमाथ्यावर !
पवित्र मृगाजिनांनी वेष्टिलेला

या उत्सवातला प्रमुख,
शरणागतासारखा झुगारून देत आहे
स्वत:ला भूमीवर
आणि जलद्गतीने पडणारी जमावाची पाउले
चालली आहेत पुढे पुढे
तो मात्र शोध घेतो आहे
दिसते आहे का शोणित कोठे ?
आणि खातो आहे कच्चे मांस, कचाकचा
तुकडे तुकडे केलेल्या बोकडाचे.

फ्रीजिअन अगर लायडिअन पर्वतांच्या शिखरांवर
झपाटलेला बेहोष असा तो
त्यांच्या हर्षभरित आरोळ्यांत
आपला आवाज चढवीत आहे.
भूमीवर दुधाच्या, मद्याच्या नद्या वहात आहेत
मधही ओसंडतोच आहे
आणि वहातो आहे,
मधमाशांनी आणलेला मकरन्द
सीरिआतील रक्तबोळांचा मंद सुगंध
वातावरण कोंडून टाकतो आहे.
नृत्यसमारंभातला प्रमुख
तन्मय अवस्थेत धावतो आहे,

आपल्या हातातील फेनेल दंडाची
झगझगीत लाल प्रकाशझोत फेकणारी मशाल
गोल गोल फिरवतो आहे.
ओरडत आरडत इकडे तिकडे पांगलेल्या
भक्तगणांना उत्साहित करतो आहे
आणि
नीट पाउले टाकून
त्यांना नृत्य करायला लावतो आहे

आपल्या मलमली मऊ केसांचे झुपके
भन्नाट वाऱ्याबरोबर तो जेव्हा झुलवतो
आणि गीतांच्या बेभान कल्लोळात
मध्येच मेघगर्जनेसारखा आवाज उठवतो.

चला ! चला ! धावा ! नाचा ! बेहोषपणे ! झपाटल्यासारखे !
सुवर्णभूमी मोलसला भूषणभूत
सौंदर्य व लालित्यराशींनो !
गा ! मेघनादी ढोलक्यांच्या कडकडाटात आनंदाने गा !
आनंदयात्री देव, डिऑनायसस; त्याचे स्तवन करा,
फ्रीजिअन्ससारखे ओरडा; तुम्हाला ज्ञात असतील
ते सूर मोठ्याने गा !
कारण, शुद्ध स्वर काढणारी ही पवित्र बासरी,
पर्वतराजीकडे, त्या पर्वतराजीकडेच जाणाऱ्या
सामूहिक पदन्यासाशी जुळते मिळते असेच
स्वर काढीत,
वातावरण पावन हर्षाने थरारून सोडीत आहे.

आणि बॅक्कसदेवाची प्रत्येक कन्या
आईबरोबर हिरवळीवर चरणाऱ्या
बागडणाऱ्या शिंगरासारखी
हर्षभरित होऊन धावत आहे
उड्या मारीत.

[ टिरेसिअस प्रवेश करतो, त्याला दिसत नाही; तरीही कुणाची मदत न घेता तो एकटाच दरवाज्यापाशी येतो व दार ठोठावतो. ]

**टिरेसिअस :** कोण आहे रे पहाऱ्यावर ! [ आतल्या बाजूने कुणीतरी उत्तर देते ] जरा कॅडमसला बोलाव पाहू ! कॅडमस ॲगेनोरचा मुलगा, सिडोनियाहून या थीब्सची तटबंदी उभारायला आलेला ! जा बरं ! जा कुणीतरी, आणि सांगा कॅडमसला ! म्हणावं, टिरेसिअस वाट पहातोय तुझी. त्याला माहीत आहे मी का आलोय ते. ठरलंच होतं तसं आमचं. मी जरी म्हातारा असलो, तरी तो माझ्याहून म्हातारा. तरीसुद्धा आमचं ठरल्याप्रमाणे, मी बॅक्कसचा एक दण्ड घेऊन, मृगाजिनाचा एक अंगरखा घालून, कोवळ्या कोवळ्या आयव्ही पल्लवांची माला धारण करून आलो आहे. [ कॅडमस प्रवेश करतो. ]

**कॅडमस :** प्रिय मित्रा ! आत होतो ना, तरीसुद्धा बरोबर ओळखला तुझा आवाज, ऐकल्याबरोबर ! शहाण्या माणसाचा शहाणा आवाज. हे पहा ! माझी सगळी तयारी आहे. देवाला जे जे लागते ते ते सर्व जय्यत तयार आहे. डिऑनायसस हा माझ्या सख्ख्या मुलीचाच मुलगा आणि आता तर देवावतार म्हणून जगाला दर्शन देऊन राहिलाय. तस्मात् त्याची प्रतिष्ठा वाढविण्यासाठी मला जे जे करता येणे शक्य आहे, ते ते करायलाच हवं. आता नृत्यांत सामील व्हायला, आपण जावं कोणत्या ठिकाणी ? इतरांच्या बरोबर आपण कुठे उभं रहायचं, आपल्या जीर्ण पिकलेल्या करड्या दाढ्या, नाचवीत, उडवीत ! टिरेसिअस ! या बाबतीत तूच मला पद्धतशीर वाट दाखवायला हवीस. तू तसा जवळजवळ माझ्याच वयाचा, पण अशा प्रकारात तूच जाणकार ! छट् ! काहीदेखील त्रास होणार नाही मला. हा थिरससचा दण्ड हातात धरून मी रात्रंदिवस ताल धरीत राहीन. आपलं स्वतःचं वय विसरता येण्यासारखी मजेची बाब नाही दुसरी कुठली !

**टिरेसिअस :** अरे वा ! म्हणजे अगदी माझ्यासारखंच वाटतं आहे म्हण ना तुला ! मीसुद्धा जवान आहे बरं का ! नृत्याची पाउले टाकण्याचा प्रयत्न तरी मी करणारच.

**कॅडमस :** आपण वाहनातून डोंगराकडे मार्गक्रमण करणं, प्रशस्त वाटतं तुला ?

**टिरेसिअस :** अं हं ! ते नाही तितकंसं बरं वाटत ! त्याने देवाचा मान राखल्यासारखं नाही होत.

**कॅडमस :** ठीक आहे ! मग, मी होतो तुझा वाटाड्या. दोन म्हातारी माणसं, संगती-सोबतीने जाऊ.

**टिरेसिअस :** देवरायाच दाखवील आपल्याला मार्ग; आणि मग थकणारसुद्धा नाही आपण !

**कॅडमस :** मला वाटतं, या बॅक्कसच्या नृत्यात भाग घेणारे थीब्समधील पुरुष असे आपण दोघेच का ?

**टिरेसिअस :** होय ! रास्त विचार करणारे असे आपण फक्त दोघेच पुरुष. बाकीचे सर्व उलटया खोपडीचे.

**कॅडमस :** उगाच वेळ घालवतोय आपण. हं ! चल ! धर बरं माझा हात !

**टिरेसिअस :** बरोबर ! घट्ट पकड हं ! बिलकूल ढिला सोडू नकोस !

**कॅडमस :** आपण मर्त्य माणसांनी देवाला कधीही क्षुद्र लेखू नये. मी तरी तसं कधीही करणार नाही.

**टिरेसिअस :** देवत्वाच्या बाबतीत आपण कधीही सिद्धान्त शोधीत बसू नये, अगर तर्ककुतर्क काढू नये. हे पाहा ! आपल्या वाडवडिलांपासून चालत आलेल्या कालचक्राच्या पहिल्या फेऱ्याइतक्या जुन्या श्रद्धा कोणत्याही शाब्दिक वादाने किंवा बौद्धिक कसरतीने नाहीशा होणार नाहीत. आता ही आयव्हीपल्लवांची माला घालून, मी नाचायला सुरुवात

केली, म्हणजे माझ्यावर टीका ही होणारच. आपल्या वयाला काय शोभतं, याचाही म्हाताऱ्याला पोच नाही, असं लोक म्हणणारच. पण असं म्हणणारे चुकताहेत. कारण, हा जरठ, हा तरुण, यानेच नाचावे, त्याने नाचू नये, असा भेद, त्या देवाने केलेला नाही. सर्वांनीच सारखी भक्ती करावी, हीच त्याची अपेक्षा. भक्तीचा गणिती हिशेब, तो कधीच करणार नाही.

**कॅडमस :** टिरेसिअस ! तुला दिसत नाही मुळीच. थांब ! मीच होतो तुझा द्रष्टा संजय. मला दिसतो आहे, पेन्थेअस, एचायऑनचा मुलगा; ज्याला मी थीब्समधली माझी सर्व राजसत्ता बहाल केली, तो पेन्थेअस, घाईघाईने राजवाड्याकडेच येतोय. भलताच कावराबावरा दिसतोय ! काय सांगणाराय आपल्याला हा !

[ पेन्थेअस प्रवेश करतो. कॅडमस आणि टिरेसिअस रंगमंचाच्या विरुद्ध बाजूला उभे असतात. प्रथम त्यांना न पाहताच प्रेक्षकांना उद्देशूनच पेन्थेअस भाषण करतो. ]

**पेन्थेअस :** खरं सांगायचं म्हणजे इतके दिवस मी थीब्समध्ये नव्हतोच; पण शहरातल्या विलक्षण अपप्रकाराची बातमी माझ्या कानावर आली आहे. मला समजलं आहे. बॅकसच्या पूजनअर्चनाच्या नावाखाली आमच्या शहरातल्या स्त्रिया, आपापली घरदारं सोडून गेल्या आहेत आणि डिऑनायसस; कोण आहे तो कोण जाणे, नावाच्या देवाच्या पूजनाच्या मिषाने डोंगरदऱ्यांतील रानावनांतून स्वैर भटकताहेत, नाचगाण्यात मश्गूल आहेत. असं सांगतात की या स्वैर नाचणाऱ्या गाणाऱ्या प्रत्येक गटाच्या मध्यभागी मदिरेचा एक चषक असतो. मग स्त्रिया, या नाहीतर त्या बाजूने चोरट्या पाऊलांनी एकांत आडोश्याला जातात आणि तिथे ‘आपण होऊन बदफैली पुरुषांच्या आधीन होतात. कारण काय, तर त्या म्हणतात की, ‘आम्ही मेअिनॅड संतिणी आहोत, बॅकसच्या उपासिका’. पण खरं म्हणजे त्यांच्या अर्चनविधीत आधी मान आहे, तो ॲफ्रॉडायटीचा.

ठीक आहे ! यापैकी ज्या स्त्रियांना मी गिरफदार केले आहे, त्यांच्यावर माझ्या सैनिकांचा पहारा आहे, सर्वांचे हात आम्ही जेरबंद करून टाकले आहेत. त्यांची राहण्याची सोयही सरकारी खर्चानेच केलेली आहे. अजून खूपजणी डोंगरमाथ्यावर नाचताहेत. त्यांचाही पाठलाग मी करणार आहे. त्या बायकांत, ॲगावीचा, म्हणजे खुद्द आमच्या मातोश्रींचा समावेश आहे. ती आणि तिच्या बहिणी ! इनो आणि ऑटॉनॉई. एकदा का त्यांना लोखंडी साखळदंडाने जखडून टाकले की, तिरस्करणीय बॅकस पंथाला मी तिलांजली दिलीच.

मी असंही ऐकलं आहे की, पूर्वेकडील कुणी जादुगार मांत्रिक, लायडिआहून आलाय. सांगतात मोठा छकडा आहे म्हणून. केस कुरळे, सोनेरी आहेत. त्यांचा सुवास दरवळत राहतो. चेहेऱ्यावर मदिरेची मोहक गुलाबी नव्हाळी आहे, आणि नजरेत ॲफ्रॉडायटीची गहिरी चारुता आहे. असंही मला समजलं आहे की, आपल्या गूढ अशा बॅकसपंथी चमत्कृतींनी तो आमच्या तरुण मुलींना फूस लावतो आहे, नि त्यांच्या सहवासात रात्रंदिवस मजा

मारतो आहे. एकदा ती स्वारी माझ्या नगरीच्या भिंतीच्या आत येऊ दे, मग त्याचं मुंडकंच करतो धडावेगळं. बस! निकालच लागला मग त्याचा. त्या थिरसस दंड हलविण्याचा नि केसांचे झुपके उडविण्याचा. हा जो कोण उपरा आलाय ना, त्यानेच डिऑनायससबद्दल गप्पा उठवायला सुरुवात केलीय. म्हणे, डिऑनायसस हा देव आहे. त्यालाच झ्यूसच्या मांडीत शिवून टाकला होता – खरं तर डिऑनायसस हा आता अस्तित्वातच नाही. आपल्या मातोश्रीबरोबरच स्वारीची विद्युत्पाताने जळून राखुंडी झालीय. कारणच तसं घडलं. त्याची आई खोटंच बोलली, झ्यूसचा तिच्याशी संबंध होता म्हणून. पण हा माणूस कुणी का असेना! त्याची ही अशी अक्षम्य कृत्ये...त्याला सर्वांत कठोर अशी शिक्षा झाली पाहिजे. फाशीच योग्य होईल नाही का?

[पेन्थेअस जाण्यासाठी म्हणून वळतो आणि कॅडमस व टिरेसिअस त्याच्या दृष्टीस पडतात.]

**पेन्थेअस :** कोण! वा! आणखी एक अजब चमत्कार! हे तर टिरेसिअस, एक द्रष्टे आणि हे! आमच्या मातोश्रींचे बाबा. चालले आहेत बॅकसचे उपासक म्हणून नाचायला – अंगावर चित्रविचित्र मृगाजिन आणि हातात फेनेल वेत्र! छान! खरोखरीच हास्यास्पद दृश्य!

[पण पेन्थेअस हसत नाही, रागातच बोलत राहतो.]

वय झालेले तुमच्यासारखे दोन बुद्ढे; आणि इतकी चाड नसावी त्यांना शिष्टाशिष्ट आचाराची! खरोखरीच माझ्या दृष्टीने लज्जास्पद आहे हे! महाशय! आता माझं जरा ऐका. आपण तर माझे आजोबाच. फेकून द्या त्या माळा! फेका दूर तो थिरसस दंड. टिरेसिअस! तुम्ही भरीला घातलेलं दिसतंय यांना! बरोबर आहे! या नव्या देवाजींचा लोकांत उदोउदो केला म्हणजे तुमची नेमणूक होणार ती त्यांचे द्रष्टे पुजारी म्हणून. मग यज्ञयागाची दक्षिणा घ्यायला तुम्ही मोकळे! केस पिकलेत, त्यांचा मान राखायचा म्हणून. नाहीतर या असल्या घातुक कर्तुतांना सहाय्य केल्याबद्दल, महाशय, या बेताल बायकांबरोबर आपल्यालाही तुरुंगात बसावं लागलं असतं. स्त्रियांबद्दल म्हणाल तर माझं असं स्वच्छ मत आहे की, त्यांच्या समारंभात, चमकदार मधुर मद्याचा शिरकाव झाला म्हणजे मग त्या सोहोळ्यातून काही भलं निष्पन्न होईल, अशी अपेक्षाच कुणी करू नये.

**नारीवृन्द :** काय ही नास्तिक बडबड! महाराज! आपण देवांना अगर ज्याने भूमीतून जन्म घेणाऱ्या मानवांचे बी पेरले, त्या कॅडमसलाही वंदनीय समजत नाही? आपले जन्मदाते एकायओन, जमिनीतून वर आलेल्या सशस्त्र मानवांपैकीच एक. आपण आपल्या रक्ताच्या माणसांनाच खाली पाहायला लावणार!

**टिरेसिअस :** हुषार माणूस जेव्हा एखादा फसवा युक्तिवाद करू लागतो, तेव्हा त्याच्या

जिभेला धार चढते. पण त्या वाक्ओघात अभिमान वाटावा असं काहीही नसतं. तुझ्या चुरूचुरू बोलणाऱ्या जिभेवरून तू बुद्धिमान आहेस असा भास झाला, तरी तुझी बडबड, हा शुद्ध मूर्खपणा आहे. हट्टी माणसाची सत्ता आणि त्याचे वाक्पाटव, यांची अखेरी मूर्खपणातच व्हायची. असा माणूस, हा राज्याच्या टिकाऊपणाला एक धोकाच !

ज्या या नव्या देवाची आपण रेवडी उडवीत आहात, त्यालाच, हेलासच्या कानाकोपऱ्यातून नियतीनुसार केवढा मोठेपणा मिळणार आहे, हे मला शब्दांनी पुरेसे व्यक्त करता येणार नाही. तरुण माणसा ! मानवी जीवनांत ज्या दोन शक्तींना अतीव महत्त्व आहे, त्यातील एक म्हणजे डेमीटीर देवता. ती म्हणजेच ही भू-माता. मग तिला कोणतेही नाव द्या; तीच मानवाला अन्नधान्याचा भक्कम पुरवठा करते. दुसरी शक्ती म्हणजे डिऑनायसस, सेमेलीचा पुत्र. त्याचे वरदान म्हणजे या अन्नधान्य वरदानाचा पूरक भाग. त्यानेच मद्याचा शोध लावला आणि मानवाला ती एक देणगीच उपलब्ध करून दिली. द्राक्षवेलीच्या झुवक्यांतून सतत वहाणारा रस ! मानवाने फक्त त्याचे प्याले भरभरून घ्यायचे. त्या पेल्याने दुःखी मानववंशाच्या वेदनांची लगेच हकालपट्टी होते. त्या झोपेत साऱ्या दिवसाच्या कष्टांना विराम मिळतो. कंटाळवाण्या आयुष्यावर हीच गुणकारी जडीबुट्टी. देवांना त्यांचा हविर्भाव अर्पण करीत असताना हा देव, खुद्द डिऑनायससच, ओतला जातो [ मद्याचे अर्घ्य दिले जाते ] त्यामुळे त्याच्यामार्फतच मानवजातीला आशीर्वाद मिळतो.

आता त्याला झ्यूसच्या मांडीत शिवून टाकला ही परंपरागत कथा घेऊ या ! तिची चेष्टा करता तुम्ही ? तसं असेल, तर मी तुम्हाला या आख्यायिकेमागचं सत्य विशद करून सांगतो. विद्युल्लोळापासून डिऑनायसस या बालकाला झ्यूसने जेव्हा खेचून घेतलं आणि त्याला देव म्हणून ऑलिम्पस येथे आणलं, तेव्हा हेराच्या मनात त्याला स्वर्गाबाहेर ढकलून द्यायचं होतं. त्यावेळी तिच्या बेताला खोडा घालण्यासाठी झ्यूसला, अर्थातच एक युक्ती योजावी लागली. भू-मातेला वेढून घेणाऱ्या आकाशाचा एक तुकडा त्याने काढला. त्या तुकड्यालाच बालकासारखा आकार दिला आणि हेराचा मत्सर शांतविण्यासाठी [ आपल्या तिच्यावरील प्रेमाची ] साक्ष म्हणून तिला दिला. खऱ्या डिऑनायसची देखभाल व्हावी म्हणून झ्यूसने त्याला दुसऱ्याच्याच हवाली केले होते. आता जुना साक्ष [ प्लेज ] हा शब्द आपल्या उरु ( थाय ) या शब्दाशी मिळताजुळता आहे. कालांतराने या शब्दार्थाचा विपर्यास झाला. लोक म्हणू लागले, झ्यूसच्या मांडीमुळे डिऑनायसस बचावला. 'साक्ष' दिल्यामुळे तो वाचला, हे लक्षातच घेतलं नाही. खरे म्हणजे त्याच्यासारखे दिसणारे बालकच हेराला आपल्या एकनिष्ठेची साक्ष म्हणून झ्यूसने दिले होते.

आणि हा देव द्रष्टा आहे. कारण बॅक्कसपंथी हर्षोत्कट उन्मनी आणि उन्मादावस्था, यांत भविष्यकाल दर्शनाचा पुष्कळ भाग असतो. कारण डिऑनायससच्या प्रेरक शक्तीचा मानवी शरीरात जेव्हा प्रवेश होतो, तेव्हा संचार झालेल्या माणसाला, भविष्यात काय

होओील, हे सांगण्याची शक्ती येते. थोड्याफार प्रमाणात युद्धदेव ॲरीस याच्या कामातील वाटाही त्याला उचलावा लागतो. असं घडलेलं आहे की, युद्धासाठी जय्यत तयारी करून लढण्यासाठी ठाकलेल्या सैनिकांना एकही भाला उचलण्यापूर्वीच रणांगणातून घबराटाने पळून जावं लागलं होतं. अर्थात् त्यांची ही अशी वेड्यासारखी दैनाही डिऑनायससनेच घडवून आणली.

होय! आणि एक दिवस असा उगवेल की, ज्यावेळी प्रत्यक्ष डेल्फीच्या खडकांवर, जुळ्या शिखरांच्या रांगातून प्रखर प्रकाश देणाऱ्या मशालींच्या झोतात उड्या टाकीत जाणारा आपला बॅक्कसंपथी दण्ड परजणारा व फेकणारा, आणि हेलासमधील लोक ज्याच्या पायाशी लीन झाले आहेत, असा डिऑनायसस तुम्हाला दिसेल.

हे पाहा पेन्थेअस! माझं ऐक जरा. तुझा सगळा भर दंडेलीवरच – पण मानवी व्यवहार काही दंडेलीवर चालत नाहीत. जर तुला तसं वाटत नसेल, तर तुझे ते विपरीत विचार म्हणजेच शहाणपण आहे, असं समजण्याची तरी चूक करू नकोस. थीब्समध्ये डिऑनाय-ससचे स्वागत कर. त्याला मदिरेची अर्घ्ये अर्पण कर. तुझ्या मस्तकावर माला धारण कर आणि त्याला प्रिय असे पूजनअर्चन आचरणात आण. स्त्रियांनी आपल्या वासना काबूत ठेवाव्यात अशी डिऑनायसस त्यांना सक्ती करणार नाही. सर्व गोष्टींत संयम राखणे हे आपल्या स्वतःच्या स्वभावावर अवलंबून आहे. या वस्तुस्थितीचा तू नीट विचार करावयास हवास. कारण सत्प्रवृत्त स्त्रीला बॅक्कसपंथी कर्मकांड आचरताना कसलीही इजा पोचणार नाही. आता या दुसऱ्या गोष्टीचाही विचार कर, शहराच्या वेशीपाशी उभा राहिलेला जन-समुदाय जेव्हा पेन्थेअस या नावाचा जयजयकार करतो. तेव्हा सुखसंवेदनानी तुझं हृदय उचंबळून येतंच ना! तसाच, मला वाटतं, डिऑनायससलाही मानसन्मान मिळाला की आनंद होतो.

म्हणूनच तू ज्यांची चेष्टा करते आहेस, ते आम्ही, म्हणजे मी आणि कॅडमस, दोघेही आयव्ही पल्लवांच्या माला, मस्तकी धारण करणार आहोत आणि नृत्यात सहभागी होणार आहो – आम्ही दोघेही आता वयातीत, पण आम्हाला वाटतं, आम्ही हे कर्तव्य केलेच पाहिजे. देवाविरुद्ध बंड पुकारण्यासाठी तुझी कोणतीही शाब्दिक मखलाशी माझे मन वळवू शकणार नाही, कारण, तुझे मन, कीव करण्याइतकं सडलेलं आहे. तुला निरोगी, निर्दोष करील, असं औषधच नाही. तरी पण ... एक उपाय आहे, तुझ्या मूर्खपणावर.

**नारीवृन्द :** टिरेसिअस! आपण जे बोललात ते फीबसला, ज्याचे आपण भाष्यकार आहात त्याला कमीपणा आणणारे नाहीच. डिऑनायसस हा थोर देव आहे. आता त्याचा सन्मान करण्यात आपण चतुराईच व्यक्त केली आहे.

**कॅडमस :** पुत्रा! टिरेसिअसने तुला योग्य तेच करायला सांगितले आहे. आपली परंपरागत जी पवित्र धर्मकृत्ये आहेत, त्याबाहेर जाण्याचा अविचार करू नकोस. आमच्या

सारखाच वाग. सध्या तुझं चित्त नाही ठिकाणावर. तुला वाटतं, आपण बोलतो तेच शहाणपणाचे. पण बाळा रे! त्यात शहाणपणा नाहीच. घटकाभर धरून चालू की तू म्हणतोस तेच खरे आहे आणि हा देव, देव नाही. तरीसुद्धा त्याला तुझ्याकडून मान्यतेचे बोल ऐकू दे. या चांगल्या कामासाठी बोल एकदा खोटं. म्हणजे देवमाता म्हणून सेमेलीचा गौरव होईल आणि मी व आपला सर्व वंशच जास्त प्रतिष्ठेला चढेल. अॅक्टीऑनची आठवण कर. त्याचा तो शोचनीय शेवट! 'आपण आर्टेमिसपेक्षा जास्त बहादूर शिकारी आहोत', म्हणून, या, याच दऱ्याखोऱ्यांतून त्याने बढाई मारली होती. काय झालं त्याचं? त्यानेच पाळलेल्या शिकारी कुत्र्यांनी त्याच्या शरीराच्या चिंध्या केल्या आणि त्या मटकावून टाकल्या. त्याच दुर्दैवी कर्मभोगाला का निमंत्रण देतोस? ये! चढवू दे मला, ही आयव्ही-पल्लवांची माला तुझ्या मस्तकावर. डिऑनायससच्या पूजाअर्चनासाठी आमच्यात सामील हो.

**पेन्थेअस :** हात काढा बाजूला ते. आपण बॅक्कसपंथीय पूजनात खुशाल भाग घ्या, पण आपल्या बेअकलीपणाचा माझ्यावर नका प्रयोग करू! काही झालं तरी, ज्याने तुम्हाला हे वेडेचार शिकविले त्या माणसाला मी शासन करणारच. [रक्षकास उद्देशून] जा रे! तुमच्यापैकी एकजण ताबडतोब निघा...जिथे टिरेसिअसचे भाकिते सांगणे चाललेले असते, तेथे जा. टोकदार पहारींनी त्या ठिकाणचा निकाल लावा. भिंती पाडा, प्रत्येक वस्तू होती की नव्हती, अशी करून टाका. त्याची ती दांभिक तकलादू उपकरणी; टाका फुंकून वाऱ्यावर. या अशा करणीनेच, दुसऱ्या कशाहीपेक्षा, त्याच्या मनाला डंख होईल. आणि तुम्ही बाकी उरलेले! जा! तुम्ही सारं शहर पालथं घाला आणि ज्याने या चमत्कारिक रोगाने आपल्या स्त्रियांना पिडून त्यांना बदफैलीचा रस्ता दाखविला आहे, त्या बायकी परदेश्याला हुडकून काढा. तो सापडला म्हणजे साखळदंड बांधून त्याला इकडे घेऊन या. दगडाने ठेचून ठेचून मारवीन त्याला. थीब्समध्ये नाचत, आरडाओरडा करीत कुठून आलो, असे त्याला होऊन जाईल.

[पेन्थेअस जातो]

**टिरेसिअस :** मूर्ख साहसी माणसा! आपण काय भकतो आहोत, हे तझे तुलाच कळत नाही. आधी तुझं डोकं ताळ्यावर नव्हतंच, आता तर तू ठार वेडाच होत चालला आहेस.

चल! कॅडमस, आपण डिऑनायससकडे जाऊ आणि पशुतुल्य असला तरी या माणसा-वर नि थीब्सनगरीवर अवकृपा करू नकोस, म्हणून दोघे त्याची करुणा भाकू या. चल, घे तुझा थिरसस दंड नि ये माझ्या मागोमाग, मला हात दे रे! आपण दोघेही धडपडलो ना, तर अगदी केविलवाणी स्थिती होईल आपली. बरं! जाऊ द्या ते. आपण झ्यूसपुत्र डिऑनायससच्या सेवेला रूजू होऊ या.

**कॅडमस :** पेन्थेअस या नावाचा अर्थच आहे, दुःख! तुझ्या घरादारावर हा काही अरिष्ट आणणार नाही अशी आशा बाळगू या. हे जे मी बोलतो आहे ते काही दैवी स्फूर्तीने

नाही. त्याच्या या वागणुकीवरूनच अंदाज केला मी हा. तो जे जे काही बोलत होता, ते ते त्याच्या प्रगाढ मूर्खपणाचे प्रदर्शनच होते.

[ टिरेसिअस आणि कॅडमस जातात. ]

**नारीवृन्द : [ गीताचा पहिला भाग : कडवे पहिले ]** Strophe–I

पवित्रते, स्वर्गराज्ञी
पवित्रते, सुवर्णपंखी तू, भूमीवर संचार करीत आहेस
ऐकते आहेस ना, त्याची ही ईशनिन्दा !
पेन्थेअसची ही मुजोरी ऐकू येते तुला !
हा आनंदाचा कन्द,
त्याचा हा अपमान बेबन्द,
हा सेमेलीपुत्र—
अंतःकरण उल्हसित करणारी मेजवानी सुरू होते
तेव्हा देवप्रमुख म्हणून उल्लेख होतो याचाच
हर्ष आणि नृत्यप्रसंगी आत्म्यांचे मीलन
ही याचीच देणगी
बासरीच्या संगीतातील आनन्द
देवांच्या मेजवानीच्या प्रसंगी फेसाळणाऱ्या मद्याची बेहोषी
तीव्र खेदाची धार बोथट करते,
सारी दुःखे दूर करते
ज्या वेळी हे मदहोष विसावतात
आयव्ही पल्लवांच्या थंड छायेत
मद्याच्या मऊशार उशीवर निद्रिस्त

**[ गीताचा दुसरा भाग : कडवे पहिले ]** Anti Strophe–I

मूर्खांच्या उच्छृंखल जिभेची बेताल बडबड
दुःखातच अखेर व्हायची तिची
पण शहाण्या समाधानी पुरुषाचे जीवित
शांततेचे वरदान मिळविते वादळातून निसटून

आणि आपले गृह, राखते सुरक्षित.
जरी मंगलदेवतांचे वास्तव्य असते दूर व्योमसदनात

तरी ते अवलोकीत असतात, मानवाची छद्मी चाल.
खूप माहीत असणे, म्हणजे नव्हे शहाणपण.
मर्त्य मानवाला न पेलणारा अभिमान
जीवनाची अखेर नजीक आणतो
जे अभिमानाने म्हणतात, मानवी मर्यादेवर करू मात
ते हाताशी असलेले खात्रीचेही गमावून बसतात
खुळेपणाच म्हणायचा तो.
दुष्ट मानव आणि त्याचे दुष्ट मार्ग
यावर इलाज ठावा नाही.

[ **गीताचा पहिला भाग : कडवे दुसरे** ] Strophe II

ओ हो ! ॲफ्रोडायटीच्या त्या बेटावरचे वास्तव्य
या क्षणभंगुर जीवनाला माधुर्याने मनोहारी करणाऱ्या
मदनाने व्यापलेल्या त्या सायप्रसवरचे
अथवा त्या अद्‌भुत भूभागावर;
जेथील सुजला सुफला गिरिकन्या
शेकडो खोल प्रवाहांनी वहात राहिली आहे,
तेथील निष्पर्जन्य वालुकामय प्रदेश समृद्ध करण्यासाठी
जायचे आहे त्या भू-भागावर, अथवा
ज्याठिकाणी ऑलिम्पसची पवित्र कुरणे
वळण घेत जातात पायेरिआचे दिशेने
जिथे वसति करतात म्यूझिस ( काव्य संगीत देवता )
तिथे ने रे मला ब्रॉमिअस !

उद्युक्त कर मला आनंदी व्हायला नि पूजा करायला
तिथेच होतो गौरव, आमच्या उन्मनी अवस्थेचा
व हर्षोत्कटतेचा !

तेच आहे निवासस्थान त्या सुकुमार
तीन सौंदर्य देवतांचे
आणि मधुर अभिलाष देवतेचे

### [ गीताचा दुसरा भाग : कडवे दुसरे ] Antisrophe–II

झ्यूसपुत्र डिऑनायसस
त्याला आवडतात मेजवानीचे प्रसंग
आणि त्याची प्रिया आहे शांतता
जी आहे धनदाती, तरुण जीवांची त्राती.
अशी देवता विरळाच !

मद्य ! त्याचीच देणगी,
ज्याच्या सेवनाने विलयास जातात सारी दुःखे
धनवान आणि दरिद्री,
सारखेच होऊ शकतात त्यात सहभागी
तोच मानव त्याचा शत्रू,
ज्याला नाही आस,
जीवित सुखात आणि निरामय अवस्थेत व्यतीत करण्याची,
दिवस शांततेत आणि निशा मौजमजेत घालविण्याची,
जो ठेवतो आपले मन आणि हृदय
चार हात दूर; त्या मानवापासून

जे मर्त्यमानवापेक्षा
अधिक काहीतरी करून दाखविण्याचा गर्व बाळगतात
ते जीवित, जे गरीब माणूस एकमुखाने वाञ्छितो
तेच त्याचे तत्त्वज्ञान, तोच त्याचा आचार
तेच जीवित मला हवे, तीच माझी निवड !

[ पेन्थेअसने ज्या रक्षकांना डिऑनायसला पकडून आणण्यासाठी पाठविलेले असते, ते बरोबर आपला कैदी घेऊन येतात. प्रासाद—दालनातून पेन्थेअस प्रवेश करतो. ]

**रक्षक** : सरकार ! ज्या सिंहाची शिकार करायला आपण आम्हाला हुकूम केलात, त्या छाव्याच्या मागावर आम्ही गेलो होतो. आणि आम्हाला सापडला तो. पण...अगदीच माणसाळलेला निघाला हो हा बिचवा ! पळून जायचा एवढाही प्रयत्न त्याने केला नाही. उलट हातकड्या घालून घेण्यासाठी सहजपणे हात पुढे केले. त्याच्या चेहऱ्याची रया, जरा-सुद्धा बदलली नाही. आता पाहताय ना, तस्सा टवटवीत होता चेहेरा. हसतहसत सांगत होता, 'पकडा मला. आणि चला घेऊन.' थांबला होता मी तसं करावं म्हणून. खरं तर

त्याने मला अजिबात त्रास दिला नाही. मला साहजिकच जरा ओशाळल्यासारखे झाले. मी होऊनच सांगून टाकलं, मला काही आपल्याला अटक करावीशी वाटत नाही, पण... राजेसाहेबांचा हुकूमच तसा आहे....क्षमा असावी महाराज !

आणखी एक गोष्ट सांगायची आहे सरकार ! ज्या बायांना आपण पकडून बेड्या घालून ठेवलं होतं ना, त्या सर्व देववेड्या बायका, गेल्या ना पळून, पिसाटासारख्या, डोंगरदऱ्यांतून तिथे त्या नाचताहेत. बॅक्कसला साद घालताहेत. त्यांच्या हातातल्या बेड्या आपोआप गळून पडल्या; कुठल्याही मानवी हाताचा स्पर्श झाल्याशिवाय कड्या निखळून पडल्या व दरवाजे उघडले गेले. सरकार ! हा माणूस थीब्स शहरात अवतरला आहे तो चमत्काराची पोतडी बरोबर घेऊनच. आता यापुढे काय घडणार, त्याची जोखीम आपल्यावर, माझ्यावर नाही.

**पेन्थेअस** : मोकळे कर त्याचे हात. [ रक्षक तसे करतो ] आता तो चांगलाच जाळ्यात अडकला आहे. आणि कितीही चपळ असला, तरी हातावर तुरी देऊन निसटून जाईल, हे शक्य नाही.

ठीक ! बाबा रे ! थीब्समध्ये येण्याचा तुझा कावा, स्त्रियांचे चित्त वेधून घेणे. त्यादृष्टीने तुझे रूप काही अगदीच वाईट नाही. तुझ्या कपोलावर झेपावणारे तुझे हे मनमोहक कुरळे केसच सांगताहेत, तू लढवय्या नाहीस. तुझी सतेज गौर अंगकांती तू काळजीपूर्वक जतन केलेली दिसतेय. उन्हात न जाता तू फक्त सावलीतच हिंडत असावास. आणि आपल्या मोहक चेहऱ्याचा उपयोग तू प्रेमदेवतेच्या [ॲफरोडायटीचा] अनुनय करण्यासाठी करीत असावास.

ते असू दे. प्रथम हे सांग. तुझा जन्म कोणत्या देशातला ?

**डिऑनायसस** : ते सहजच सांगता येईल बढाया मारल्याशिवाय. पुष्पवेलींनी बहरलेला मोलस ! नाव तरी निश्चित ऐकलं असेल.

**पेन्थेअस** : हो ! ऐकलंय, सार्डिस शहराला वेढणारी ती पर्वतराजी...

**डिऑनायसस** : ती माझी मायभूमी, मी लायडियावासी आहे.

**पेन्थेअस** : काय रे ! हे सगळं अर्चनपूजन; तू हेलासला कशासाठी आणलंस ?

**डिऑनायसस** : झ्यूसचा पुत्र डिऑनायसस, त्याने मला तशी शिकवण दिली.

**पेन्थेअस** : लायडियातही एखादा झ्यूस आहे की काय, जो नवनव्या देवांना प्रसवतो !

**डिऑनायसस** : छे ! छे ! मी सांगतोय ते आपल्याच झ्यूसबद्दल. त्यानेच इथे थीब्समध्ये सेमेलीचा पत्नी म्हणून स्वीकार केला.

**पेन्थेअस** : काय रे ! डिऑनायससने तुला आपल्या कबजात घेतलं, तुला सूचना दिल्या तेव्हा तो काय रात्री तुझ्या स्वप्नात आला होता, का, तुला त्याने प्रत्यक्ष दर्शन दिलं ?

**डिऑनायसस** : अगदी आमनेसामने दृष्टभेट झाली आणि त्यानेच मला या गूढ गोष्टी सुपूर्त केल्या.

**पेन्थेअस** : काय स्वरूप आहे, तुझ्या या गूढ विधीचे ?

**डिऑनायसस** : या पंथाची दीक्षा ज्याने घेतली नाही, त्याला त्या सांगता येत नाहीत.

**पेन्थेअस** : पूजकाला त्यापासून लभ्यांश काय ?

**डिऑनायसस** : ते, तू ऐकणे नियमाला धरून होणार नाही. पण ऐकण्यासारखे मात्र आहे ते.

**पेन्थेअस** : वा ! मोठा धूर्त जबाब. माझी जिज्ञासा चाळविणारा !

**डिऑनायसस** : जिज्ञासा काय करायची ? देवाच्या पूजाअर्चन विधींना अश्रद्ध माणसाचे वावडे असते.

**पेन्थेअस** : काय रे ! तू सांगतोयस की डिऑनायससला तू प्रत्यक्ष पाहिलंस ! कसा काय दिसला तो ?

**डिऑनायसस** : त्याला जसं वाटलं, तसा दिसला तो मला. त्या बाबतीत मला काहीच अखत्यार नव्हता.

**पेन्थेअस** : आणखी एक शिताफीने टाळाटाळ करणारा जबाब, कांहीच बोध होऊ न देणारा.

**डिऑनायसस** : शहाणपणाचे शब्द मूर्खांच्या लेखी निरर्थकच ठरायचे.

**पेन्थेअस** : डिऑनायससचा उदोउदो केला गेला तो प्रथम याच शहरात का ?

**डिऑनायसस** : छे ! तसं नाही; सर्व पौर्वात्य देश, या गूढ विधीत सामील झाले आहेत.

**पेन्थेअस** : शक्य आहे ! पौर्वात्यांची बैठकच आपल्यापेक्षा हलकी, कमी दर्जाची !

**डिऑनायसस** : या बाबतीत मात्र त्यांची वरकडी आहे. •अर्थात त्यांच्या चालीरीती वेगळ्या आहेत.

**पेन्थेथस** : तुम्ही हे जे गूढ विधी साजरे करता, ते दिवसा की रात्री ?

**डिऑनायसस** : मुख्यतः रात्रीच. धर्मभावनेला उपकारक असा भीतियुक्त आदर, अंधारात सहजी उपजतो.

**पेन्थेअस** : स्त्रियांच्या बाबतीत मात्र अंधार धोक्याचा आणि पातकी !

**डिऑनायसस** : पातक काय ? दिवसाही करता येते ?

**पेन्थेअस** : मला वाटतं, तुझ्या या लबाड, बदफैली जिभेला शिक्षा द्यायची वेळ आता आली आहे.

**डिऑनायसस** : आणि तुझ्या ढळढळीत दुर्वर्तनांनाही.

**पेन्थेअस** : या बॅक्कसपंथाच्या स्फूर्तीने केवढा धीट झालाय हा ! वाद कसा घालावा, हे सुद्धा समजतं याला.

**डिऑनायसस** : ठीक आहे ! काय दंड सुनावला मला ? कोणती शिक्षा देणार आहात ?

**पेन्थेअस :** हे, हे तुझे सुगंधी रेशमी केस! ते प्रथम छाटून टाकणार आहे.

**डिऑनायसस :** हे माझे केस, मी देवासाठी राखतो. त्याला वाहिलेले पवित्र असे आहेत ते.

**पेन्थेअस :** मग हा तुझा थिरसस दण्ड! हा स्वाधीन करायला हवा माझ्या.

**डिऑनायसस :** आपणच घ्या तो माझ्याकडून. तो आहे डिऑनायससचा. मी फक्त घेतलाय हातात त्याच्या नावाने.

**पेन्थेअस :** आणि मग तुला अगदी तुरुंगात डांबून टाकणार.

**डिऑनायसस :** मला ज्या वेळी वाटेल, त्या क्षणाला स्वतः देव मला बंधमुक्त करील.

**पेन्थेअस :** तुला बंधमुक्त करील? खरं आहे. बेहोष बायकांच्या घोळक्यात उभा राहून त्याची प्रार्थना करशील, तर सुटशील खरा.

**डिऑनायसस :** तो अगदी इथे आहे, माझ्या सन्निध! आणि मला काय काय करण्यात येते आहे, ते तो पाहातो आहे.

**पेन्थेअस :** खरं का काय? कुठे आहे? मला तर तो अजिबात दिसत नाही!

**डिऑनायसस :** या इथे माझ्याजवळ आहे. पण तू करतो आहेस त्याची कुचेष्टा! कसा दिसणार तुला तो?

**पेन्थेअस :** [ रक्षकांना ] पकडा रे याला! उपहासाने हसतो आहे तो मला व या सगळ्या शहराला.

**डिऑनायसस :** [ रक्षकांना ] खबरदार मला पकडाल तर. [ पेन्थेअसला ] मी पूर्ण शुद्धीवर आहे. भ्रम झालाय तुला.

**पेन्थेअस :** [ डिऑनायससला ] माझे हुकूम तुझ्या हुकुमांच्या वरचढ ठरतील. [ रक्षकांना ] बांधा रे याला? मी सांगतो आहे ना?

**डिऑनायसस :** तू कशा तऱ्हेचे जीवन जगतो आहेस, काय करतो आहेस? तू कोण आहेस? काही काही समजत नाही तुला!

**पेन्थेअस :** मी कोण आहे? वा! काय विचारणे? मी पेन्थेअस! एकिऑन आणि अॅगेवेचा मुलगा.

**डिऑनायसस :** पेन्थेअस म्हणजे दुःख! कसं चपखल नाव ठेवलंय तुला!

**पेन्थेअस :** घेऊन जा त्याला. तिकडे त्या तबेल्यात नेऊन कैदेत ठेवा. उत्तम अंधार आहे तिथे याला हवा तसाच. खुशाल नाच तिथे! आता तुला मदत करायला नि प्रोत्साहन द्यायला या ज्या बायका आणल्या आहेस ना, त्या सर्वांना मी गुलामाच्या बाजारात तरी पाठवीन, नाहीतर ठेवीन माझ्या घरीच माग चालवायला. डफावर थापा मारणारे त्यांचे हात जरा निराळ्या कामात गुंततील.

**डिऑनायसस :** मी निघालो. जे माझ्या ललाटी नाही. ते कधीही घडून येणार नाही.

पण ज्या डिऑनायससला तो मृत आहे. असे तू समजतो आहेस, तोच तुझा पिच्छा पुरवील आणि या पावित्र्य विडंबनाबद्दल तुझा सूड घेईल. तू माझ्यावर हात टाकतो आहेस, तेव्हा त्यालाच कैद करतो आहेस, असे समज.

[ रक्षक डिऑनायससला तबेल्याकडे घेऊन जातात. पेन्थेअस त्यांच्या मागोमाग जातो ]

**नारीवृन्द : [ गीताचा पहिला भाग ]** Strophe

डिर्से ! सौन्दर्यशालिनी आणि पुण्यमयी युवती
ॲकेलाअसच्या थीबनकन्ये !
तुझ्या उसळत्या सलिलात
स्वागत केलं गेलं होतं
झ्यूसच्या बालकाचं

धरणी आणि आकाश यांचा स्वामी
त्यानेच ओढून काढले होते, त्या बालकाला
धगधगत्या ज्वालेतून;
आणि सुरक्षित ठेवले आपल्या मांडीत,
त्याच वेळी त्याने त्या शिशूचे नाव उच्चरवाने पुकारले

' द्विजन्मा डिथिराम्बस ! ये !
तुझ्या पित्याच्या गर्भाशयात प्रवेश कर
बॅक्सचे बालक मी घोषित करतो
या थीब्समध्ये तुझे नाव होईल '
हे पुण्यसलिले डिर्से !
माझ्या मस्तकावर मुकुट शोभेल
बॅक्सच्या बेहोष नृत्यात माझा पदन्यास सुरू होईल
का मोकलतेस मला तुझ्या पुण्यमय परिसरातून
माझ्यापासून तुला कसला उपसर्ग !
डिऑनायससच्या वृक्षावर जांभळे फळ
दिमाखाने झळकू लागेल ना !
तेव्हा त्याचा भयकारी नामोच्चार
अजूनही तुझ्या जाणिवा निनादत राहील

[ **गीताचा दुसरा भाग** ] Antistrophe

बाप रे ! काय क्रोधाग्नी धगधगतो आहे
पेन्थेअसच्या आरडाओरड्यात आणि तिरसट मुद्रेवर
नागराक्षसाच्या दातांपासून उगवलेला
हा एकायोनच्या भूमिज वंशातला,
रक्ताळलेला जबडा वासून रानटीपणाने
देवांच्या सत्तेला आव्हान देणारा,
भयानक उग्र चेहेऱ्याचा ओबडधोबड असा;
त्याच्या मानवी शरीराची विटंबना ठरणारा
लवकरच जखडून टाकील आपला अवयव अन् अवयव
बॅक्कसच्या भक्तांचा ! खरंच !

आणखी शिवाय आपला एक सहकारी
आतासुद्धा पहुडलेला आहे खोल अंधाऱ्या
जमिनीवर !

डिऑनायसस !
तुझे कृपाकटाक्ष आम्हावर आहेत ना !
हे झ्यूसनन्दना !
तुझ्या भक्तांवर परजला जातो आहे जुलमी दण्ड !
या ! सर्व शक्तिमान प्रभो !
परजा तुमचा तो सोनेरी थिरसस दण्ड
आणि थोर ऑलिम्पसहून उतरा खाली,
या खुनी मानवाला दाखवा आपला झपाटा
आणि होऊ द्या त्याच्या मुजोरीपणाची
एकदम अखेरी !

[ **गीताचा तिसरा भाग** ] Epode

डिऑनायसस ! प्रभो ! आपण आहात कुठे ?
डोंगरमाथ्याच्या उतारावर आपल्या नृत्यांगनांच्या ताफ्यात
अग्रभागी आहात,

की चालला आहात हिंस्र श्वापदांच्या पुरातन गुहांवरून,
की डोंगरसुळक्यांवरून
हातात थिरसस दण्ड धरून चालला आहात?
का ऑलिम्पिसच्या वनराजीतील छुप्या कुंजातून,
जेथे एकदा ऑर्फेअसने जमविले होते
वृक्ष आणि गिरिकुहरातील पशू,
जमविले होते आपल्या वीणेच्या मधुलहरीवर
आणि गायिले होते भारून टाकणारे गीत !

पायोरिआच्या आनन्दमयी गुहे !
बॅक्कसला तुझ्यामध्ये प्रसन्नता वाटते
तो जाईल तरून ऑक्सिअसचा
उफाळलेला घोघावणारा फेसाळलेला पूर,

आणि आपल्या गिरक्या घेणाऱ्या भिॅनडसना घेऊन येईल
नृत्योत्सवासाठी आणि मेजवान्यांसाठी,

पार करील तो लायडिआसला, त्या नदाला, जलपित्याला !
असं म्हणतात, ज्या भूमीला त्याची पाउले लागतात
ज्याचे नामवंत वारू या समृद्ध आणि नयनरम्य
नदीच्या काठाने चरतात, तिथे तो देतो मुक्तहस्ताने
संपत्ती आणि भाग्य !

[ इतक्यात इमारतीच्या आतील बाजूकडून एकदम एक मोठा आवाज येतो. हा डिऑनायससचा आवाज ]

**डिऑनायसस** : हो ! हो ! ओळखलात का माझा आवाज ! बॅक्कसच्या भक्तांनो ! ऐकू येतो का माझा आवाज ? हो ! हो !

**नारीवृन्द** : कोण आहे तो ? कुठे आहे तो ? डिऑनायससची हाक आम्हाला पाचारीत आहे !

**डिऑनायसस** : हो ! हो ! पुन्हा एकदा ऐका ! मी सेमेलीचा मुलगा, झ्यूसचा पुत्र !

**नारीवृन्द** : हो ! हो ! आमचे गुरुदेव ! आमचे गुरुदेव ! या ! या ! आमच्यात या, हे आनन्दयात्री !

**डिऑनायसस** : हे प्रलयंकर भूकंपा ! हादरवून टाक या जगाचा भूभाग !

**नारीवृन्द :** [ एक भयचकित चीत्कार काढून ]
पेन्थेअसचा प्रासाद कोसळतो आहे, तुकडे होताहेत
त्याचे

[ **एक एक स्त्री वेगवेगळी गाते** ]

डिऑनायसस राजप्रासादात उभा आहे
त्याच्यापुढे नतमस्तक व्हा !
आम्ही त्याच्यापुढे माथा नमवतो, पहा ! पहा !
छप्पर आणि खांब, कसे भुईसपाट होत आहेत
अंतस्थ कारागारात असलेला देव
करील विजयश्रीची उत्स्फूर्त घोषणा

[ सेमेलीच्या स्तम्भावरील ज्योत मोठी होते आणि झगझगीत प्रकाश पडतो ]

**डिआनायसस :** विद्युत्पाताने पेटलेली ही ज्योत, ती अधिक प्रज्वलित करा. पेन्थेअसच्या राजभवनात वणवा पेटवा.

**नारीवृन्द :** पहा ! पहा ! पहा !
दिसते आहे ना सेमेलीच्या स्मृतिस्तंभावरील ज्योत
अशनिपाताने ती निजधामास गेली,
त्यावेळी अवशिष्ट राहिलेली ही ज्योत !

[ कोसळणाऱ्या चिरेबंदी कामाचा आवाज ]

खाली पडा, थरथर कापणाऱ्या मिनॅडस्‌नो
जमिनीवर आडव्या व्हा!
तुमचा पालनहार ! राजवाडा उद्ध्वस्त करतो आहे
छपरापासून पायापर्यंत.
ऐकली आपली आर्त हाक त्याने,
येतो आहे तो झ्यूसनन्दन
[ दरवाजे उघडतात व डिऑनायसस दिसतो ]

**डिऑनायसस :** हे आशियातील पुरंध्रीनो ! अशा घाबरून जमिनीवर काय पडलात ? बॅकस स्वतःच पेन्थेअसच्या प्रासादाचे तुकडे तुकडे करतो आहे, ऐकलत ना ? चला ! उठा ! उभ्या राहा ! घाबरू नका ! धीर धरा !

**नारीवृन्द :** वा ! तुझी ती बॅकसपंथी घोषणा ऐकून केवढा हर्ष झाला ! तूंच आम्हाला

जीवदान दिलंस ! किती एकाकी अनाथ झालो होतो आम्ही ! किती हर्ष झालाय तुझ्या दर्शनाने !

**डिऑनायसस :** पेन्थेअसच्या काळ्या कभिन्न कोठडीत मला जेव्हा घेऊन गेले, तेव्हा तुम्ही अगदी हताश होऊन गेला असाल ना ?

**नारीवृन्द :** त्याशिवाय दुसरी गतीच काय होती ? तुलाच नेल्यावर आमचा वाली कोण ? पण या कसाबाच्या मगरमिठीतून सुटलास कसा ? सांग ना !

**डिऑनायसस :** अगदी सहज, जराही कष्ट न पडता माझी मीच घेतली सुटका करून.

**नारीवृन्द :** अरे पण, तुझे हात दोरीने घट्ट बांधून नव्हते ठेवले त्याने !

**डिऑनायसस :** हाः ! हाः ! खूपच बनवलं स्वारीला मी. त्याला वाटलं, त्याने मला बांधून ठेवलंय. आपल्याच भ्रमात होते महाशय. त्याने मला धरलेच नाही. साधा स्पर्श-सुद्धा नाही. तबेल्यात बंदिस्त ठेवायचं, म्हणून मला तो घेऊन गेला खरा, पण त्याला दिसला तो एक बैल. आणि मग त्या बैलाच्या खुरांना आणि गुडघ्यांना आवळीत होता दोरखंड ! घामाघूम झाला होता, रागाने फुसफुसत होता नि स्वतःचेच दातओठ खात होता. मी जवळ नुसता उभा होतो नि पाहात होतो. आणि अगदी त्याचवेळी बॅकस प्रगट झाले, त्यांनी राजमंदिर गद्‌गदा हलवलं, आपल्या मातेच्या स्मृतिस्तंभावरील ज्योत प्रज्वलित केली. पेन्थेअसला हे जेव्हा दिसलं, तेव्हा त्याला वाटलं, राजभवन पेटलाय. मग धावू लागला इतस्ततः, नोकरांना हाका मारल्यान्, पाणी आणायचे हुकूम सोडले, सगळ्या वाड्यात हा गोंधळ ! खरं म्हणजे, काहीच घडलं नव्हतं.

मग त्याला वाटलं, मी पळालो. पाणी मारून आग विझवायचं थांबवलन. देहदंड देणारी आपली तलवार त्याने खाडकन उचलली आणि तीरासारखा शिरला राजभवनात. त्यानंतर डिऑनायससने; हो ! तो डिऑनायससासारखा दिसला नसेलही, पण मला वाटलं ते मी सांगतोय; राजवाड्याच्या आवारात एक अस्पष्टशी आकृती उभी केली. मग काय ! त्या बाजूला धावले महाराज, नि मलाच ठार करताहेत अशा आविर्भावात प्रकाशणाऱ्या हवेतच तलवार भोसकताहेत.

पण देवाला त्याची आणखी मानहानी करायची होती. तबेला असलेली ती सर्व इमारत त्याने भुइसपाट केली. तो पाहा ! त्या तिथे ढीग दिसतोय दगडमातीचा. त्या ढिगाकडे नजर गेली म्हणजे त्याचे काळीजच फाटते. आता अगदी गलितगात्र झालाय या सगळ्या दगदगीने. तलवार दिली खाली टाकून. हं ! हा मर्त्य मानव ! देवाविरुद्ध हत्यार उचलायला धजावला. मी अगदी थंडपणे प्रासादाबाहेर आलो, तो हा तिथे उभा आहे. पेन्थेअस काहीही वाकडं करू शकत नाही माझं. पण त्याची ती अवजड पडणारी पावलं मला ऐकू येत आहेत. मला वाटतं, इतक्यातच येईल स्वारी इथे. काय म्हणेल या सर्व प्रकारानंतर ते दिसेलच. कितीही संतापो तो ! माझी शांती काही ढळणार नाही. शहाणा माणूस स्थितप्रज्ञतेने

स्वतःवर ताबा ठेवतो.

[ पेन्थेअस प्रवेश करतो. ]

**पेन्थेअस :** कल्पनेबाहेर विलक्षण आहे हे सगळं ! त्या परदेशी माणसाला कोंडला होता आणि अगदी काही वेळापूर्वीच जेरबंद केला होता आणि त्याने माझ्या हातावर तुरी दिल्या. [ त्याला डिऑनायसस दिसतो. तो एकदम विचलित होऊन ओरडून म्हणतो ] हाच तो माणूस ! काय चाललं आहे हे ! कसा सुटलास तिथून बाहेर ! आणि माझ्या राजवाड्याच्या अगदी दारातच मला तोंड दाखवायचा धीर कसा झाला तुला ?

**डिऑनायसस :** थांब आहेस तिथेच. भडकला आहेस, जरा आवर घाल स्वतःला.

**पेन्थेअस :** बंदिस्त करून कडीकुलपात ठेवला होता ना तुला ? कसा निसटलास

**डिऑनायसस :** विसरलास काय ? तुला बजावून सांगितलं होतं मी, की तो मला तेथून मुक्त करील !

**पेन्थेअस :** तो म्हणजे कोण ? बोलतो आहेस ते सगळे चमत्कारिकच !

**डिऑनायसस :** दुसरा कोण असणार ? मानवासाठी समृद्ध द्राक्षमळ्यांची जोपासना करतो तोच.

**पेन्थेअस :** म्हणजे तो देवराज ! पुरुषांना बेअक्कल आणि बायकांना खुळे बनविणारा ?

**डिऑनायसस :** खासा अपमान ! आणि तो ही डिऑनायससचा !

**पेन्थेअस :** [ रक्षकांना ] सर्व बाजूचे दरवाजे लावून घ्या. तटवेशीचा प्रत्येक दरवाजा बंद झाला पाहिजे.

**डिऑनायसस :** कशाकरता हे ? देवाला काय, तटावरून जाता येणार नाही ?

**पेन्थेअस :** वा ! खूपच अक्कल आहे तुला, फक्त जी असायला हवी, तेवढीच वगळून...

**डिऑनायसस :** हे पाहा ! ज्या गोष्टी सर्वांत महत्त्वाच्या म्हणून माहीत असायला हव्यात त्या मला ज्ञात आहेत. पण जरा थांब. या माणसाला तुला काहीतरी सांगायचं आहे. ते ऐक. तो काही खास बातमी घेऊन डोंगरावरून आलेला आहे. ऐक ते ! मी इथेच थांबतो. वचन देतो मी पळून जाणार नाही.

[ एक गोप प्रवेश करतो. ]

**गोप :** पेन्थेअस, थीब्सचे स्वामी ! जेथील भू–भाग झगमगणाऱ्या, नेत्रदीपक अशा हिमशलाकापासून कधीही मुक्त नसतो अशा सिथेइरॉनहून मी आलेलो आहे.

**पेन्थेअस :** काय तातडीची बातमी घेऊन आला होतास माझ्याकडे ?

**गोप :** अनावृत्त अंगोपांगाचा, उन्मनी अवस्थेत शहराच्या वेशीतून बाहेर सुसाट धावत सुटलेला पवित्र बाकाईचा लोंढा मला दिसला. अचाट, अद्भुततेच्या पलीकतील गूढ आणि कराल अशी त्यांची करणी, महाराज, आपल्याला आणि सर्व शहरवासियांना सांगावीत, म्हणूनच मी इथे आलो आहे. पण मला प्रथम जर कांही विचारायचं असेल तर ते हे की,

तिथं जे काही चाललं आहे, ते मी मोकळेपणाने सांगू का? का शब्दांची काटछाट करून सांगू? मला आपल्या घायकुत्या स्वभावाची भीती वाटते महाराज? आपण फार लवकर रागावता, जसा राजा असावा तसेच आहात तुम्ही – पण जरा जास्तच प्रमाणात!

**पेन्थेअस :** सांग! कांय सांगायचं असेल ते सारं काही सांग! माझी कसलीही भीती बाळगू नकोस. बाकाईबद्दलची तुझी हकीकत जितकी जास्त भयंकर असेल तितक्या अधिक निश्चितीने; अशी दुष्ट कृत्ये करायला त्यांना भरीस घालणऱ्या या माणसाला मी योग्य न्यायदंड देईन.

**गोप :** अरुणोदयानंतरचे सूर्यनारायणाचे, प्रभातकालीन कोवळे ऊन, नुकतेच कुठे जमीन शेकवू लागले होते. मी असं, गुराढोरांना चरायला सोडलं होतं. आणि टेकडीवर उंचावर त्यांना घेऊन जात होतो. तेव्हा बायामाणसांची तीन टोळकी दिसली मला. सगळी एकत्र नाचत होती. एका टोळक्याची प्रमुख होती ऑटॉनॉई. दुसऱ्या टोळीच्या म्होरक्या होत्या, आपल्या आईसाहेब ॲगेवे आणि तिसरीचे पुढारीपण होते इनोबाईकडे. नाचून झाल्यावर त्या सगळ्या झोपल्या हातपाय ताणून अगदी निश्चल. काहीजणी देवदारच्या टोकदार पानांच्या शय्येवर आराम करीत होत्या, काहींनी ओक वृक्षांच्या पानांचीच उशी केली होती. उभ्या उभ्या त्यांनी आपलं अंग जमिनीवर झोकून दिलं होतं, तशाच अवस्थेत त्या पडून होत्या. त्यांच्या त्या लवंडण्यात शालीनता होती. आपण म्हणाला होता. तसं त्यांनी मद्य वगैरे काहीही घेतलेलं नव्हतं. बासरीच्या आलापात त्या आपले भानही विसरल्या नव्हत्या किंवा वनराईतल्या त्या एकांतात कुठे कसल्या प्रणयचेष्टाही दृष्टोत्पत्तीस आल्या नाहीत.

आमच्या शिंगाड्या गाईबैलांचे हंबरणे आपल्या आईसाहेब ॲगेवेबाईंनी ऐकलं आणि लगेच बाकाई भक्तिणीच्या कोंडाळ्यात त्या एकदम उठून उभ्या राहिल्या. शालीनता आणि देखणेपणा यांचे अचंबा करायला लावणारे, असे ते अनोखे दृश्य होते. स्त्रिया-वृद्धा आणि तरुण व अजून विवाहबद्ध न झालेल्या कुमारी – प्रथम त्यांनी आपला केशसंभार मोकळा करून खांद्यावर सोडला. ज्यांच्या हरिणाजिनाच्या उपवस्त्रांचे बंद सैल झाले होते, त्यांनी ते घट्ट बांधले व त्या चित्रविचित्र लोकरी वस्त्रांवर सर्परज्जूची मेखला धारण केली. ते सर्प आपल्या जिभांनी त्या बायांचे गाल चाटत होते. काहीजणींनी जंगली लांडग्यांच्या बछड्यांना किंवा एखाद्या हरिणशावकाला बाहूत कवटाळले होते आणि काही, त्या शावकांना छातीशी धरून आपल्या अंगावरचे धवल दूध त्यांना पाजीत होत्या. त्यांना अंगावर पिणारी तान्ही बाळे होती व म्हणून त्यांच्या स्तनातून भरपूर दूध होतं. आयव्हीपल्लव, ओक व बहरलेल्या ब्रिओनीची फुले, यांचे गजरे त्यांनी आपल्या केसांत माळले होते.

त्यांच्यातल्या एका बाईने आपल्या हातातला थिरसस दण्ड घेतला नि तो खडकावर आपटला. आणि काय सांगायचं? त्यातून स्वच्छ, नितळ पाण्याचा झरा झुळझुळू लागला.

दुसरीने आपला दण्डा जमिनीत दाणकन् खुपसला आणि महाराज ! देवाने उत्पन्न केलेल्या मद्याचा श्रोतच त्यातून उफाळू लागला. कुणाला दुधाची गरज भासली तर तिने आपल्या बोटांच्या टोकांनी फक्त जमीन उकरायची, की तिच्यासाठी धवल दुग्धधारा वर उफाळायला लागल्याच. आणि आयव्हीपल्लवाने सजविलेल्या थिरससमधून मधाचे मधुर बुंद ठिपकत होते. काय सांगावं ? आपण तिथे असता तर हे सर्व बघितल्यावर ज्याला आता आपण दोषी ठरवता आहात, त्याचीच काकुळतीने करुणा भाकली असतीत.

बरं ! तर मग आम्ही सगळे गोप आणि मेंढपाळ जमलो नि या अद्‌भुत व असाधारण घटनांबद्दल आपापसात चर्चा करू लागलो. इतक्यात, गावातलाच एक भटक्या आणि मिठ्ठास बोलणारा बाताराम, आम्हा सर्वांना सांगू लागला. तो म्हणाला, ' या पुण्यमय डोंगरमाथ्यावर राहणारे तुम्ही सगळेजण—असं पाहा, की, आपण जर, महाराजांच्या मातोश्री, ॲगेवेबाईसाहेब, यांचा पाठलाग करीत राहिलो आणि या पूजनविधीच्या वेळी होणाऱ्या मद्यपान, नृत्य यासारख्या आक्रितातून त्यांना सोडवून नेलं, तर त्यात आपल्या राजाची काही सेवा केल्यासारखं होईल की नाही ? आम्हाला वाटलं, चांगली आहे कल्पना ! म्हणून आम्ही मग झुडपांच्या पानाआड दडून बसलो नि संधी केव्हा मिळते, याची वाट पाहू लागलो.

जेव्हा त्यांची ती ठराविक घटिका आली तेव्हा त्या बायांनी आपापले दण्ड परजायला सुरुवात केली आणि ' लॅकस ' ' ब्रोमिअस ' अशी, त्या झ्यूसच्या पुत्राला एकमुखाने साद घालीत त्या नृत्याची तयारी करू लागल्या. मग तो आख्खा डोंगरच नव्हे तर तेथील हिंस्र श्वापदेसुद्धा त्यांच्या बेहोष, आनंदी नृत्याचा एक भागच बनून गेली. अशी एकही वस्तू तिथे उरली नाही की जी, धावूपळू, नाचूकुंदू लागली नाही.

त्याचवेळी ॲगेवेबाईसाहेब सहजच माझ्या अगदी जवळून जात होत्या. मग काय ? त्यांना धरावं, म्हणून ज्या झुडुपामागे मी दडून बसलो होतो, तिथून धाडकन झेप घेतली. पण त्या मोठ्याने ओरडल्या, ' अरे माझ्या चपळ शिकारी कुत्र्यांनो ! ही माणसं आपला पाठलाग करताहेत. चला ! या ! आपापले थिरसस दण्ड घेऊन सज्ज व्हा नि या माझ्या मागोमाग ! '

मग काय ? आम्ही धूम ठोकली नि संचार झालेल्या त्या बायकांनी आमच्या शरीराच्या चिंध्या केल्या असत्या, त्यातून निभावलो. पण, आमची गुरेंढोरे तिथल्या नवांकुरित हिरवळीवर ताव मारीत होती. या गुराढोरांवरच या बॅक्कसच्या भक्तिणींनी आपल्या नुसत्या हातांनी हल्ला चढवला. ॲगेवेबाईसाहेबांनी काय केले; दुधाने जिची आचळे पुरेपूर भरलेली आहेत, अशा एका तरण्या कालवडीच्या तंगड्या, धरल्या आपल्या दोन्ही हातात नि दोन्ही हात दूर फाकले. इतर सगळ्या बायका आमच्या गायींच्या अवयवांची चीरफाड करीत होत्या. काही फासळ्या नि खुरांचा एखाद दुसरा तुकडा, वरखाली झेललेला कुठे कुठे

दिसून येत होता. आणि रक्ताळलेले मांसखंड, देवदार झाडांच्या फांद्यावर लटकावलेले दिसत होते व त्यातून अडकून बसलेले रक्त ठिबकत होते. आणि एका क्षणापूर्वी जे आपली शिंगे रोखून हिंसक मगरुरीने टवकारून पाहात होते, त्या बैलांची धुडे दुसऱ्याच क्षणी जमिनीवर आपटण्यात आली. मुलींचे, हजारो मुलींचे, मृदुमृदुल हात त्यांना भुइसपाट करीत होते आणि महाराज, आपली शाहीनजरसुद्धा जितक्या झटकन पापण्यांची उघडझाप करणार नाही. तितक्या निमिषार्धात त्यांनी त्या बैलांच्या अंगावरील मांस ओरबाडून काढले.

मग, जमिनीसरसे उड्डाण करीत जाणाऱ्या पाखरांसारख्या त्या धावल्या. थिब्सशहराला जिथून विपुल धान्य मिळते ते ऑसोपस नदीच्या तीरावर पसरलेले सपाट मैदान त्यांनी पायाखाली घातले आणि सिथेइरॉनच्या ठेंगण्या उतरणीवर असणाऱ्या हायसिए व एरिथ्रे या दोन खेड्यांवर त्यांनी एखाद्या शत्रुसैन्याने घालावी, तशी धाड घातली व त्यांची लुटालूट केली. घरांमधून त्यांनी बालके पळविली. त्यांनी जी लूट घेतली ती सगळी दुसरा कसलाही आधार नसताना त्यांच्या खांद्यावर अगदी घट्ट ठेवल्यासारखी राहिली होती. त्यातलं काहीही खाली काळ्या मातीत पडलं नाही, अगदी ब्रॉन्झ वा लोखंडी वस्तूसुद्धा. त्यांच्या डोक्यावर धगधगणारा विस्तव होता तरीही त्यांचे केस पेटले नव्हते.

ते सगळे खेडुत बाकाईनी केलेली ही लूटमार पाहून साहजिकच संतापले. त्यांनी हत्यारांनी प्रतिकार केला. आणि नंतर, महाराज, असं काही विलक्षण द्रव्य नजरेला मिडलं म्हणता ! त्या क्षेडुतांनी फेकलेल्या भाल्यामुळे रक्ताचा एक थेंबही सांडला नाही. पण त्या बायकांनी थिरसस दण्डाचीच भाल्यासारखी जी फेकाफेक केली, तिने मात्र खेडुतांना जखमा झाल्या. त्या बायांनी त्या बाप्यांना अक्षरशः पळवून लावलं. या सर्व प्रकारात कोण्या देवाची अदृश्य शक्ती होती नक्कीच.

मग महाराज, जिथून त्या निघाल्या होत्या तिथेच, म्हणजे देवाने त्यांच्यासाठी जिथे झरे निर्माण केले होते त्या ठिकाणी त्या माघाऱ्या आल्या. तिथे त्यांनी आपल्या अंगावरील रक्त धुऊन काढले. त्यांच्या गालावरचे रक्ताचे डाग, सर्पराजांनी चाटूनपुसून स्वच्छ केले.

म्हणून म्हणतो महाराज ! कुणी का असेना हा देव ! त्याचे आपल्या शहरात स्वागत करा. अनेक प्रकारांनी त्याचे सामर्थ्य प्रकट होत आहे. पण विशेष म्हणजे मानवाला सर्व दुःखांचा विसर पाडणारी संजीवनी अशी द्राक्षवेल, तीही त्याचीच निर्मिती असे ऐकतो. समजा ! इथून पुढे जर मद्य नाहीसे झाले, तर प्रीतीची वाट लागेलच पण जीवनातली अन्य मौजमजाही निकालात निघेल.

**नारीवृन्द** : राजेसाहेबांसमोर मोकळेपणी बोलायची छाती होत नाही; तरीही पण आम्ही बोलतोच. डिऑनायससहून दुसरा श्रेष्ठ देव नाही.

**पेन्थेअस** : सबंध हेलासमध्ये आमचा पाणउतारा करणारा हा उत्पाती बॅकस पंथ,

झपाट्याने पसरणाऱ्या आगीसारखा आमच्यावर चाल करून येतो आहे. वेळ दवडून चालणार नाही. [ गोपास उद्देशून ] हे बघ! असाच जा तातडीने एलेकट्रॉन वेशीवर. तिथे माझी माणसं असतील. पाठीला भक्कम किंवा कमी वजनाच्या ढाली बांधलेली, पवनजव वारूवर स्वार होणारी, धनुष्याच्या प्रत्यंचेचा टणत्कार करणारी अशा त्या सैनिकांना सांग, 'बाकाईंवर हल्ला चढविण्याच्या तयारीनेच मला भेटा.' बायका जर आम्हाला 'किस झाड की पत्ती, समजणार असतील, तर हे सारं सहन करण्यापलीकडचं आहे.

**डिऑनायसस :** पेन्थेअस! मी काय सांगतोय ते ऐकायचं, किंवा आपली वागणूक बदलायचं तू नाकारतो आहेस. तुझ्याकडून मला जो काही त्रास झाला तोही मागे सारून आहे तितक्यावरच हे सारे थांबविण्याची, आणि देवाविरुद्ध शस्त्र न उचलण्याची, मी तुला ताकीद करीत आहे. त्यांच्या डोंगरमाथ्यावर करावयाच्या पूजनविधीपासून बाकाईंना तू हाकलून देतो आहेस हे दृश्य असे जवळ उभे राहून नुसतं पाहात बसणं, डिऑनाय-ससला जमणार नाही.

**पेन्थेअस :** तुझ्याकडून सूचना नकोयत मला! लोहशृंखलातून तू सुटला आहेस, तेवढ्यावरच समाधान मान. नाहीतर, तुला पुन्हा शासन करावं लागेल मला.

**डिऑनायसस :** तू एक मर्त्य मानव, तो देव! मी जर तुझ्या जागी असतो तर, टोचणाऱ्या टाचेविरुद्ध व्यर्थ लाथा झाडण्यापेक्षा माझ्या संतापाला आवर घातला असता आणि देवाला आहुती अर्पण केल्या असत्या.

**पेन्थेअस :** आहुती देऊ? खरंच देईन! सिथेइरॉनच्या दऱ्यांत कत्तल करणाऱ्या लायकीच्या स्त्रियांचे रक्त सांडून ते देईन त्याला आहुती म्हणून!

**डिऑनायसस :** मग तुम्हा सर्वांनाच पळ काढावा लागणार! बॅकसच्या भक्तिणींच्या दंड्यानी तुमच्या ब्राँझच्या ढालीची दाणादाण उडवावी ही किती शरमेची गोष्ट ठरेल!

**पेन्थेअस :** हा परदेशी मोठा आडमुठा दिसतोय! याच्याशी बोलाय–सवरायची मुळी सोयच नाही. तुरुंगात काय, अगर बाहेर काय, हा काही आपल्या जिभेला आवर घालणार नाही.

**डिऑनायसस :** माझ्या मित्रा! अजूनदी एखादी समाधानकारक तडजोड निघू शकेल!

**पेन्थेअस :** कशी काय? माझ्या गुलामांचा गुलाम होऊ की काय मी?

**डिऑनायसस :** हे पाहा! शस्त्रांचा उपयोग न करतादी, मी त्या बायकांना इथे आणू शकेन.

**पेन्थेअस :** ईश्वरच आमचं रक्षण करो! काहीतरी कावा करायचा बेत दिसतोय तुझा!

**डिऑनायसस :** कावा! माझ्या सामर्थ्याने मी तुला वाचविणार म्हणतो, तर तो काय कावा?

**पेन्थेअस** : त्या बायकांशी तुझं आधीच काहीतरी ठरलेलं दिसतय. कुठूनतरी त्यांचे नाचगाणे चालू रहायला हवे म्हणून ...

**डिऑनायसस** : होय! असं काहीतरी मी ठरवलेले आहे खरं! पण ते देवापाशी – या बायकांशी नव्हे!

**पेन्थेअस** : बस् झालं तुझं चऱ्हाट! माझं चिलखत आणा रे! कोण आहे तिकडे!

**डिऑनायसस** : [ अधिकारवाणीने ओरडून ] थांब! [ मग एकदम शांतपणे ] या बायका, डोंगरमाथ्यावर अशा एकत्र बसलेल्या पाहायच्या आहेत तुला?

**पेन्थेअस** : होय! जरूर पाहायच्या आहेत. त्यांना पाहाण्यासाठी सुवर्णमुद्रांची खूप मोठी रक्कम देईन मी.

[ यावेळेपासून हलके हलके पण ठामपणे, डिऑनायसस आपली छाप पेन्थेअसवर पाडू लागतो. ]

**डिऑनायसस** : अं! इतकी मोठी उतावळी तू करावीस, असं काय घडलं एकाएकी!

**पेन्थेअस** : मद्याने झिंगलेल्या बायका पाहण्यासाठी काही मी एवढा उतावीळ नाही झालो! छे! छे! मोठं दुःखदायक दृश्य असेल ते.

**डिऑनायसस** : पण तरीही, दृष्टीस पडल्याबरोबर यातना होतील असं एखादं दृश्य पाहणं तुला बरं वाटेल म्हणायचं.

**पेन्थेअस** : होय! वाटेल खरं! मी, इतरांच्या दृष्टीस पडणार नाही अशाप्रकारे एखाद्या देवदार वृक्षांखाली निवांत बसून जर काही पाहणं मला शक्य असेल, तर ते पाहीन मी.

**डिऑनायसस** : तू कितीही लपून-छपून जा. त्या तुला हुडकून काढणारच.

**पेन्थेअस** : अगदी बरोबर आहे तुझं. पण मी अगदी उघड उघडच जाईन ना!

**डिऑनायसस** : मग सांगू का एक मार्ग! एवढं साहस करायची तयारी आहे?

**पेन्थेअस** : मला तिकडेच घेऊन चल ना पटकन्! मला नाही आता दम धरवत.

**डिऑनायसस** : मग तू प्रथम मऊ सुती झगा घालायला हवा.

**पेन्थेअस** : कां? मऊ सुती झगा कशाला? मला काय बाई बनायला हवं?

**डिऑनायसस** : तुला पुरुषासारखा वेष केलेला जर का त्यांनी पाहिला, तर ठारच मारतील त्या तुला?

**पेन्थेअस** : अगदी बरोबर आहे तुझं! प्रत्येक बाबीचा विचार करतोस तू!

**डिऑनायसस** : डिऑनायससनेच तसा विचार माझ्या मनात निर्माण केला.

**पेन्थेअस** : तुझी ही सूचना जास्तीत जास्त चांगल्या प्रकारे प्रत्यक्षात कशी आणता येईल?

**डिऑनायसस** : मी येतो आत तुझ्याबरोबर, नि नटवतो तुला!

**पेन्थेअस** : मला नटवणार! स्त्रीवेषात तर नाही ना! मला लाज वाटेल ना!

**डिऑनायसस :** असं ! म्हणजे मेइनाड्सना पाहण्याची तुझी उत्कंठा संपली तर ?

**पेन्थेअस :** कशा तऱ्हेचा वेष मला देणार म्हणतो आहेस !

**डिऑनायसस :** तुझं मस्तक लांबसडक रुळणाऱ्या केसांनी आच्छादीन मी.

**पेन्थेअस :** आणि मग त्यानंतर ? माझी वेषभूषा कशी दिसेल ?

**डिऑनायसस :** तुझ्या टाचेपर्यंत रुळणारा झगा आणि मस्तकावर फीत.

**पेन्थेअस :** आणखी काही ?

**डिऑनायसस :** हातात थिरसस दंड आणि अंगाभोवती चित्रविचित्र हरिणाजीन.

**पेन्थेअस :** मला कधीही बाईचे कपडे घालवणार नाहीत.

**डिऑनायसस :** तू जर बाकाओंबरोबर एकदम झुंज द्यायचं ठरवलंस तर रक्तपात ठेवलेलाच.

**पेन्थेअस :** अगदी बरोबर आहे तुझं. मी प्रथम त्यांची गुप्तपणे टेहेळणीच करायला हवी.

**डिऑनायसस :** हिंसेचा उपयोग करून हिंसेला आमंत्रण देण्यापेक्षा हे जास्त शहाणपणाचं !

**पेन्थेअस :** आणि कुणाच्याही दृष्टीस न पडता थीब्स शहराच्या रस्त्यावरून मी पार कसा होणार !

**डिऑनायसस :** आपण असे एकीकडच्या गल्लीबोळाने जाऊ. मी दाखवतो तुला वाट.

**पेन्थेअस :** माझ्याकडे पाहून बाकाईनी माझी रेवडी नाही उडवता कामा. त्यापेक्षा दुसरं काहीही सहन करीत मी. मी आता आत जातो नि ठरवतो कसं काय करायचं ते !

**डिऑनायसस :** ठीक आहे ! तसे कर ! पण माझ्याकडून सगळी जय्यत तयारी आहे बरं का ?

**पेन्थेअस :** मी निघतो मग. डोंगरमाथ्यावर जाताना एकतर पुरेपूर बंदोबस्ताने शस्त्रसज्ज जाईन अगर तुझ्या उपदेशाचे पालन करीन.

[ पेन्थेअस जातो ]

**डिऑनायसस :** बायांनो ! हा माणूस आता सापळ्याकडेच पाउले टाकीत येत आहे. हा बाकाओंना भेटेल आणि त्या ठिकाणी याला मृत्युदंडाचे शासन दिले जाईल. डिऑनायसस ! [ कारण तू काही फार दूर नाहीस ! ] आता सगळं तुझ्याच हातात आहे. आपल्याला त्याच्यावर सूड उगवलाच पाहिजे. त्यासाठी त्याला आपण प्रथम, वेडगळपणाच्या विलक्षण जाळ्यात पकडू या आणे त्याची सारासार विचारशक्ती नष्ट करू या. कारण जोपर्यंत त्याचा मेंदू ताळ्यावर आहे तोपर्यंत स्त्रीचे कपडे परिधान करायला तो कधीही कबूल होणार नाही. एकदा का सारासार विचारशक्तीच्या लगामातून तो निसटला की मग, ते कपडे, तो अंगावर चढवील. स्त्रीवेषात असलेल्या त्याला रस्त्यातून मी नेत असताना, थीब्सचे समस्त

पौरजन त्याच्याकडे पाहात कसे फिदीफिदी हसताहेत, हे पाहायला मी अधीर झालो आहे. मला त्याने ज्या चढेलपणाने प्रथम धमकावलं, तिथून त्याला खाली खेचायचं आहे मला.

मी आता जातो. खुद्द आईच्या हातून मारला गेल्यावर, मृतांच्या मुलखात ज्या वेषात तो पोचणार आहे, त्या पोषाखात त्याला नटवतो. मग त्याला समजेल झ्यूस पुत्र डिऑनायसस ही काय चीज आहे ती. मानवजातीशी अतिशय सौम्यतेने वागत असला तरी तो देव अनिवार्य अशा क्रोधाचाही रसरसणारा अंगार असू शकतो, हे कळून येईल त्याला.

[ डिऑनायसस पेन्थेअसच्या मागोमाग राजवाड्यात जातो ]

**नारीवृन्द : [ गीताचा पहिला भाग ]** Strophe

अहा ! त्या पूजनात व्यतीत होणाऱ्या दीर्घयामिनी !
नाचणाऱ्या पाउलांच्या पांढुरक्या कांतीने उजळणाऱ्या, रंगणाऱ्या,
द्रवाने आर्द्र झालेल्या हवेत शीर्ष उंच उडवताना
होणारे ते सुख—किती गूढरम्य आणि मधुर !

अहा ! त्या प्रमतगंध हरित तृणांवर, हर्षमोदाने
बागडणाऱ्या हरिणशावकाचा आनंद !
विणलेल्या जाळ्याबाहेर उडी ठोकून
ज्याने मिळविले आहे स्वातंत्र्य,

पाठलाग आणि पळापळ यांच्या भीतियुक्त दडपणापासून
शिकाऱ्यांच्या हाकांपासून आणि तावातावाने दौडणाऱ्या श्वानांपासून
नदीतीरावरील सिकतेवरून जो सुळकन् उड्या टाकीत जातो आहे
सुखकर अशा एकाकी अरण्याकडे
जेथील भूभाग आहे मानवी पाउलाने अस्पर्शित
जिथे पर्णराजी झुलते आहे घनदाट आणि
सावल्या आहेत शबल,

[ ध्रुपद ] Refrain

कुठली प्रार्थना प्रशंसनीय म्हणावी ?
ज्यांनी आपले चिंतिले अहित,
त्यांच्या हतप्रभ मस्तिष्कावर
आपला विजयी दण्ड परजणे,

याहून देवदत्त असा आणखी कोणता उदात्त वरप्रसाद
आणखी कोणती प्रार्थना अधिक शहाणपणाची समजावी ?

आणि जे जे उदात्त, तेच कुणालाही अत्यंत
हवेहवेसे वाटणार !

[ **गीताचा दुसरा भाग** ] Antistrophe

धीम्या पण अमोघ अशा स्वर्गशक्ती
गतिमान रहातात कालगतीबरोबर
मन जेव्हा खुळे होते, देवाचा अवमान करते
पूजिते जेव्हा स्वार्थालाच व अज्ञानमूलक दंभाला,

तेव्हा उगारतो दैवी न्याय, आपला अक्षय दण्ड,
स्वर्गशक्ति, अखंड करतात पाठलाग अश्रद्ध माणसाचा.
जरी देवाची धूर्तता छपवते काळाची सरकणारी पाऊले
करू नये कधी काळाला आव्हान् मर्त्य मानवाने,
अव्हेरू नयेत कधी रूढीचे रिवाज
कृतीत वा विचारसरणींत वृद्धांचा सल्ला.

अल्पकाळाने अखिल मानव होऊ शकतात सहभागी
पवित्र अशा धर्माचरणांच्या वरदानात.
शाश्वत सत्यें – नाशिवंतावर मात करून
जगदारंभापासून अस्तित्वांत असलेली
प्रत्यक्ष निसर्गातच अंतर्भूत झालेली

हीच सत्ये आहेत सत्ता गाजवून, आपल्या विश्वावर
ठाम आणि दृढ.

[ **ध्रुपद** ] Refrain

कुठली प्रार्थना प्रशंसनीय म्हणावी ?
ज्यांनी आपले चिंतिले अहित
त्यांच्या हतप्रभ मस्तिष्कावर

आपला विजयी दण्डा परजणे
याहून देवदत्त असा आणखी कोणता वरप्रसाद
आणखी कोणती प्रार्थना अधिक शहाणपणाची
भाग्याची समजावी
आणि जे जे उदात्त, तेच कुणालाही अत्यंत हवेहवेसे वाटणार !

[ **गीताचा तिसरा भाग** ] Epode

धन्य तो मानव, जो उधाणलेल्या सागराला चकवतो
आणि विसावतो अनाहत, सुरक्षक अशा धक्क्यावर.
तो ही तसाच धन्य, जो विजय मिळवतो कठिण कसोटींवर.

एखादा टाकतो मागे शेजाऱ्याला
संपत्ति आणि सत्तास्पर्धेत अनेकविध साधनांनी,
सहस्त्रविध रंगतदार स्वप्नांनी
बहरत असते हजारोंच्या अंतःकरणातील आशा;
अखेरीस
दिसते काहींना सुफलित झालेले आपले ईप्सित
कांहीजणांकडे फिरवते ते पाठ !
पण तरीही मी सांगते
जो व्यतीत करतो अधिकाधिक मौजमजेत
प्रत्येक सरता दिवस
तो धन्य होय खरोखरीच धन्य !

[ डिऑनायसस प्रवेश करतो. तो पेन्थेअसला हाक मारण्यासाठी वळतो. ]

**डिऑनायसस :** ये ! हेकेखोर माणसा ! बघू नयेत अशी दृश्ये पाहायला तू हपापला आहेस. करू नयेत अशी कृत्ये करायला तू उतावळा झाला आहेस, पेन्थेअस ! ये ! असा प्रासादाबाहेर ये ! बघू दे मला तुझं रूप. तुझी आई आणि तिच्या साऱ्या सख्या यांच्यावर टेहळणी करण्यासाठी सज्ज झालेल्या बेहोष, प्रमत्त अशा बाकाई स्त्रीचा वेष केलेल्या तुला, बघू दे मला एकदा.

[ बाकाई भक्तिणीप्रमाणे वेष केलेला पेन्थेअस येतो. तो भांबावलेला असून डिऑनायससच्या प्रभावाखाली पूर्णतया आहे. ]

वा ! तूं अगदी कॅडमसच्या मुलींपैकीच एक शोभतो आहेस.

**पेन्थेअस :** अरेच्या ! असं काय होतंय हे ! मला दोन दोन सूर्य दिसताहेत. दोन–दोन

थीब्स शहरं दिसताहेत आणि सप्त वेशी असलेल्या या शहराच्या तटबंदी, त्याही मला दोन दोन दिसताहेत. मला मार्गदर्शन करणारा तू, एखाद्या बलिवर्दासारखा दिसतो आहेस, तुझ्या मस्तकावर शिंगे उगवली आहेत काय रे? सांग ना! थोड्याच वेळापूर्वी तू काय पशू होतास? खात्री आहे माझी, तू आता एवढ्यातच हा बलिवर्द अवतार धारण केला आहेस?

**डिऑनायसस :** याच्या आधी देवाची कृपा नव्हती आपल्यावर. आता तो आपल्या पाठीशी आहे. आपण आता समझोता केला आहे. जसं दिसायला हवं, तसंच दिसेल आता तुला?

**पेन्थेअस :** ब ऽ ऽ रं! पण कसा काय दिसतोय रे मी? उभा राहिल्यावर मी इनोसारखा दिसतो की माझ्या आईसारखा? तुला काय वाटतं?

**डिऑनायसस :** तू म्हणजे अगदी हुबेहूब त्यांची छबीच असा दिसतो आहेस. पण जरा थांब. ही केसांची कुरळी बट बाहेर निसटून आलीय. मघाशी कशी मी तुझ्या केसांना गुंडाळलेल्या फितीखाली नीट बसवली होती.

**पेन्थेअस :** हं! मघाशी, आतमध्ये प्रमत्त बाकाई नृत्यांगनेप्रमाणे मी माझं मस्तक, वर खाली, झोकात हलवलं ना, तेव्हा आली असावी, ती निसटून बाहेर.

**डिऑनायसस :** चल! आतां तुझी काळजी मलाच घ्यायला हवी. मी करतो ती बट व्यवस्थित. जरा हनुवटी उचल पाहू वर!

**पेन्थेअस :** ही केली; तूच बसव हं ती व्यवस्थित. मी आता सर्वस्वी तुझ्यावर अवलंबून आहे.

**डिऑनायसस :** आणि तुझा कमरपट्टा पण ढिला झालाय. तुझ्या झग्याच्या या चुण्या थेट तुझ्या घोट्यावर पडायला हव्यात!

**पेन्थेअस :** कबूल! तशा त्या नाहीत खऱ्याच! निदान या इथं उजव्या पाउलावर तरी नाहीत, मग दुसऱ्या बाजूला झगा अगदी झकास टाचेपर्यंत रुळतोय.

**डिऑनायसस :** जेव्हा बाकाई तुला दिसतील आणि तुला आश्चर्य वाटेल इतक्या चांगुलपणाने त्या वागतील, तेव्हा माझी खात्री आहे, तू मला आपला सर्वांत जिवलग मित्र समजशील. होय की नाही?

[ पण पेन्थेअसचे त्याच्या भाषणाकडे लक्ष नाही. ]

**पेन्थेअस :** अगदी थेट बॅकसच्या उपासकासारखं दिसावं म्हणून मी हा थिरसस दण्ड या हातात धरू की उजव्या हातात घेऊ!

**डिऑनायसस :** तुझ्या उजव्या हातात धर तो; नि तुझे उजवे पाऊल उंच उचलशील तेव्हा त्याचबरोबर हा दण्डही उंच उचल. [ पेन्थेअस तसे करण्याचा प्रयत्न करतो ] मला फार बरं वाटलं. खूपच मानसिक बदल झालाय तुझ्यात!

**पेन्थेअस :** या सर्व स्त्रिया इथे मौजमजा करताहेत, त्या सिथेइरॉनच्या दऱ्याच, बायकां-

सह माझ्या खांद्यावर घेऊ शकतो का रे मी!

**डिऑनायसस :** तू मनात आणलेस तर तेही अशक्य नाही तुला. तुझं मन किडलं होतं या आधी. आता मात्र ते जसं असायला हवं, तसं झालंय.

**पेन्थेअस :** आपण तरफेसारख्या पहारी घ्यायच्या का? का मी फक्त माझा बाहू उंचावून किंवा माझ्या खांद्यांचा रेटा देऊन या गिरिशिखरांना उखडून काढू नि टाकू ती मोडूनतोडून माझ्या हातांनी!

**डिऑनायसस :** अं हं! या वनदेवतांची आश्रयस्थाने नाहीशी करता कामा नये तू. शिवाय बासरी वाजवीत बसणाऱ्या पॅन [ निसर्गाचा अधिष्ठाता देव ] देवाच्या नित्याच्या जागा आहेत या. त्या मोडून टाकणे बरोबर नाही;

**पेन्थेअस :** अगदी बरोबर आहे तुझं! रानटी धाकदपटशा दाखवून स्त्रियांना जेरीस आणणं बरोबर नाही. मी देवदारी वृक्षराजीत लपून बसेल.

**डिऑनायसस :** लपून बसणार! होय! एखाद्या कावेबाज गुप्तहेराप्रमाणे मेनॅड्सवर गुप्त नजर ठेवण्यासाठी लपायला योग्य अशी जागा तुला सापडू शकेल खरीच.

**पेन्थेअस** होय! आत्तांच माझ्या डोळ्यासमोर दिसताहेत त्या; मधुर प्रीतिपाशात गुरफटून गेलेल्या; निबिड वृक्षराजीतील प्रीतिकूजन करणाऱ्या पाखरांसारख्या!

**डिऑनायसस :** अगदी बरोबर! तीच नेमकी गोष्ट हुडकण्यासाठी निघणार आहेस आता तू. जर प्रथम तुलाच त्यांनी पकडलं नाही, तर तू त्यांना पकडशीलही.

**पेन्थेअस :** हं! चल घेऊन मला आता थीब्समधल्या मध्यवर्ति राजरस्त्यातून. कोणाची ताकद आहे अशी जायची? त्यांच्यातला एकमेव पुरुषोत्तमच आहे मी.

**डिऑनायसस :** या साऱ्या शहरासाठी तू एकटा तोंड देतो आहेस या सगळ्या गोष्टींना—हो! तू एकटाच. आणि जो झगडा आता तुझी वाट पाहातोय, तेच तुझ्या नशिबी निहिलेले भयंकर दिव्य आहे. चल! तिथपर्यंत तुला सुखरूप न्यायची जबाबदारी माझी. घरी परतताना दुसरंच कुणीतरी घेऊन येईल तुला.

**पेन्थेअस :** म्हणजे माझी आई, असं तर म्हणायचं नाही तुला?

**डिऑनायसस :** सर्वांनी पाहावं असंच विलक्षण दृश्य असेल ते!

**पेन्थेअस :** त्यासाठीच तर निघालोय मी.

**डिऑनासयस :** तुला उचलून घरी आणण्यात येईल—

**पेन्थेअस :** अहा! काय वैभवशाली दृश्य असेल, नाही ते!

**डिऑनायसस :** तुझ्या मातोश्रींच्या आधाराने!

**पेन्थेअस :** अरे! तू तर मला दुबळा, बावळट करून टाकलेस की?

**डिऑनायसस :** हं ऽ ऽ! हं ऽ ऽ! ते आपलं—म्हणजे याही एका तऱ्हेने वर्णन करता येईल त्या घटनेचे!

**पेन्थेअस :** हं ! पण मला योग्य अशीच पद्धत आहे ती !

[ पेन्थेअस जातो. ]

**डिऑनायसस :** पहाणाराचा थरकाप उडावा असं तुझं व्यक्तिमत्त्व, थरकाप उडवील असाच तुझा शेवट होणार आहे – अशी अखेरी, की जी तुझा नावलौकिक उच्च स्वर्गापर्यंत नेईल. ॲगेवे आणि ॲगेवेच्या भगिनींनो, कॅडमस कन्यकांनो ! पसरा आपले हात पुढे. या तरुण माणसाला मी त्याच्या प्राप्त संघर्षात लोटतो आहे. आणि मी आणि डिऑनायसस नक्कीच विजयी होणार आहोत. [ मग हलकेच ] आणखी काय घडणार आहे ! जे घडेल ते दिसेलच.

[ डिऑनायसस जातो. ]

**नारीवृन्द : [ गीताचा पहिला भाग ]** Stropne

बुद्धिभ्रंशाची शिकार झालेल्या श्वानांनो
पळा, डोंगराकडे पळा
तिथे नृत्यात हर्षाने मश्गूल आहेत
देहभान हरपलेल्या कॅडमस–कन्यका
फिरवा त्यांची माथी
भीतिपोटी सैरभैर दौडणाऱ्या कळपाप्रमाणे

आणि तुटून पडू द्या त्यांना
त्या मूढमति मानवावर
जो आला आहे छपून स्त्री वेषांत
मेइनॅडस्च्या हर्षोन्मादातर गुप्त नजर ठेवण्यासाठी
प्रथम पाहील त्याची माता
वाटोळ्या खडकांआडून वा झाडाच्या विदीर्ण खोडामागून
बगळ्यासारखी मान उंच करणाऱ्या त्याला
आणि सांगेल ओरडून मेइनॅड्स्ना
कोण आहे हा मानव ! बाकाईनो :
या डोंगरावर, पर्वतावर हेरगिरी करायला
कॅडमसकन्यांच्या स्वैर, द्रुत गिरिनृत्यावर

टेहेळणी करायला आलेला !

तुम्हापैकी त्याची जन्मदात्री कोण ?

छे ! हा पोरगा कधी पहुडलाच नाही स्त्रीच्या गर्भाशयात
याला पाजलं असावं सिंहिणीने किंवा लिबियन गॉर्गान राक्षशिणीने !

न्यायदेवते ! हो आता प्रगट आणि
भूमातेच्या गर्भातून वर आलेल्या एकिऑनच्या
या निर्लज्ज, अश्रद्ध, बेबंद पुत्राचा
गळा घोटेपर्यंत खुपस आपली तलवार
आरपार अगदी आरपार

[ **गीताचा दुसरा भाग** ] Antistrophe

पहा ! बॅकसदेवा !
तुमच्या आणि तुमच्या मातेच्या गूढ कृत्यांशी
सामना द्यायचा म्हणून
न्यायाचा अवमान करण्यासाठी
बेफाम, विवेकशून्य क्रोधाने
तो बाहेर जातो आहे
माथेफिरू त्वेषाने, हा ठार वेडा
तुमच्या अजिंक्य बाहूशी
आपल्या ताकदीची होड लावीत आहे.

विनम्र आणि विवेकी अंतःकरण
देवांना अर्पण करते त्यांचा त्यांचा हविर्भाग
कसलीही तक्रार वा मिथ्यारोप न करतां
ज्याला ज्ञात असते,
आपले आयुष्य म्हणजे मृतिका
तो रहातो अशापित.

हेवा वाटत नाही मला ज्ञात्यांच्या ज्ञानाचा
हवे आहेत जे हर्ष मला
ते आहेत दिव्य भव्य,

इतर सर्व हर्षांना फिके पाडणारे आणि
आपल्या जीविताला शिव व सुंदराकडे नेणारे.

जी पवित्र हृदये, रात्र आणि दिवस
सतत रत देवांच्या सन्मानासाठीच,
आणि न्यायाची कुंपणे तोडणाऱ्या
साऱ्या रिवाजांना देतात झुगारून
त्यांचा आनंद काय विचारावा !

न्यायदेवते ! हो आता प्रगट, आणि
भूमातेच्या गर्भातून वर आलेल्या एकिऑनच्या
या निर्लज्ज, अश्रद्ध, बेबंद पुत्राचा गळा घोटेपर्यंत
खुपस आपली तलवार
आरपार, अगदी आरपार

[ नंतर वाढत्या बेहोषीने एकमुखाने आरोळ्या देत व आपल्या शब्दांच्या, लयींवर, तालांवर नाचत, त्या गातात. ]

[ **गीताचा तिसरा भाग** ] Epode

ये ! डिऑनायसस !
ये ! आणि दर्शन दे आम्हाला
ये एखाद्या मत्त बलिवर्दासारखा,
किंवा,
हो सर्पराज शतशीर्ष, शतजिव्हांनी फूत्कारणारा
ये गर्जत वनराजासारखा
आपल्या नाकपुड्यातून अग्निज्वाला फेकीत

हे बॅकस !
बाकाईंची शिकार करणारांवर तुटून पड
बाह्यात्कारी हास्य कर त्याच्याकडे बघून
आणि मग घे त्याला आपल्या पाशात कवटाळून

नंतर,
करू दे त्याला जमीनदोस्त

सैरभैर धावणाऱ्या मेइनॅड्सूचा कळप,
आवळू दे त्यांना त्याचे नरडे !
पकडू दे ! पाडू दे ! तुडवू दे त्याला
जीव जाईपर्यंत !

[ जासूद प्रवेश करतो. ]

**जासूद :** अरेरे ! एकेकाळी सबंध हेलासचे कीर्तिशिखरावर चढलेले, हेलासचे भूषण समजले जाणारे, ज्याने नागराक्षसाच्या दातांचे बी पेरून भूमीतून जन्म घेणाऱ्या मानवांचे पीक काढले, त्या वृद्ध सिडोनिअस राजाचे हे घराणे ! किती आसवं ढाळावीत तुझ्यासाठी ! मी तर साधा क्षुद्र गुलाम; पण सच्चा गुलाम धन्याच्या पाठीवर बसलेल्या कोरड्याने कळवळून उठतो.

**नारीवृन्द :** काय झालं ! डोंगरमाथ्यावरील काही विशेष वृत्त ?

**जासूद :** पेन्थेअस, एकिऑनचा मुलगा, हे जग सोडून गेला.

**नारीवृन्द :** डिऑनायसस ! हर्षोन्मादाच्या उद्गात्या देवा ! अखेर प्रकट झाला तुझ्या शक्तीचा प्रभाव !!

**जासूद :** काय ? म्हणताय काय तुम्ही ! ज्या भीषण प्रकारे माझ्या धन्याला मृत्यू आला त्यानेही तुम्हाला हर्षाच्या उकळ्या फुटत आहेत !

**नारीवृन्द :** आम्ही काही ग्रीक नाही. मी अन्य देशीय सुरांत आनंदाने गात आहे. आता तुरुंगाच्या भयाने चळचळ कापण्याचे कारण नाही मला.

**जासूद :** तुम्हाला काय वाटतं ? अधिकार गाजवील, अशा ताकदीचा कुणी माणूसच नाही आता थीब्समध्ये ?

**नारीवृन्द :** डिऑनायसस हाच सत्ता गाजवतो आमच्यावर ! थीब्स नव्हे ! डिऑ-नायससच.

**जासूद :** तुम्हाला तितकंसं वाईट वाटणार नाही हे मला मान्य. पण जेव्हा अनिवार्य अन्याय झालेला असतो तेव्हा आनंदाने उड्या मारणे हे लज्जास्पद आहे.

**नारीवृन्द :** सांग ! सांग आम्हाला काय घडलं ते ! कसं झालं ! काय झालं ! कसा मेला तो ! स्वतःच्या जुलमांचा सारखा पाठपुरावा करीत राहाणारा हा जुलमी कसा ठार झाला ?

**जासूद :** आम्ही थीब्समधील घरे मागे टाकीत चाललो आणि अॅसोपस नदी पार केली नि मग सिथोअॅरोनच्या पायगतीच्या टेकड्या चढायला सुरुवात केली. आणि मी – मी माझ्या धन्याबरोबरच होतो – आणि जिथे आम्हाला बघायसवरायला जायचं होतं तिथला रस्ता दाखवणारा तो परदेशी.

ठीक ! प्रथम आम्ही एका तृणाच्छादित दरीत बसलो आणि दुसऱ्यांच्या दृष्टीस न पडता स्वतःला तर पहाता यावे, म्हणून आम्ही आमचे चालणे व बोलणे अगदी हळू ठेवले

होते. खळाळत जाणारे प्रवाह असलेल्या एका दरीत आम्ही होतो. दोन्ही बाजूला कडेकपारी होत्या आणि तिथे देवदार वृक्षाच्या दाट छायेत मेअिनॅड्स बसल्या होत्या. त्यांचे हात आपापल्या आवडत्या कामात गर्क होते. आधीचे आयव्हीपल्लव गळून पडलेल्या आपल्या थिरसस दण्डाला काहीजणी नवपल्लवांनी नटवीत होत्या आणि इतर स्त्रिया, रंगीत जोखडातून सुटका झालेल्या शिंगरांप्रमाणे, बागडत होत्या व आळीपाळीने एकमेकींना धार्मिक गाणी म्हणून दाखवीत होत्या.

पण, कमनशिबी पेन्थेअसला या बायका दिसल्याच नाहीत. आणि महाराज म्हणाले 'मित्रा ! आपण जिथे उभे आहोत तिथून या ढोंगी भक्तिणी, या मेअिनॅड्स, मला काही नीटशा दिसत नाहीत.' या दरडीच्या बाजूला असलेल्या उंच देवदार वृक्षावर जर मी चढलो तर त्यांची ती निलाजरी करणी मला अधिक नीट दिसू शकेल.

आणि मग त्या परदेशाने एक अपूर्व कर्तुक केलं. आकाशात सर्वात उंच गेलेली एक देवदार वृक्षाची फांदी त्याने हाताने धरली आणि ती अगदी काळ्याशार जमिनीला टेकेल इतकी खाली खाली वाकवली. धनुष्य जसं वर्तुळाकृती वाकवावं, तुंबा व आऱ्यांच्या सहाय्याने चाकाची धाव जशी गोल करावी, तसा त्या परदेशाने त्या डोंगरदरडीवरचा तो देवदार वृक्ष हातात घेतला आणि जमिनीपर्यंत वाकवला – बाप रे; कुणाही मर्त्य माणसाच्याने होणार ते काम नव्हतं. मग त्याने पेन्थेअसला उंचावरच्या फांद्यावर बसवलं नि तो वृक्ष आस्ते आस्ते सरळ करीत, त्याचबरोबर महाराज खाली पडणार नाहीत अशी काळजी घेत त्याने तो वृक्ष आपल्या हाताच्या पकडीतून हळूहळू सोडायला सुरुवात केली. मग तो देवदार वृक्ष हातातून सुटल्यावर आपोआप सरळ झाला आणि त्यावर स्वार झालेल्या राजे-साहेबांसह उंच आकाशात दिमाखाने उंचावर गेला. त्यामुळे झाले काय, या बाया त्यांना दिसल्या त्यापेक्षाही अधिक स्पष्टपणे महाराज त्यांना दिसत होते.

आणि महाराज त्या उंच बैठकीवरून दृष्टिपथात आले न आले तोच, तो परदेशी मात्र कुठेच दिसत नव्हता. त्याच वेळी एक आवाज – मला वाटतं तो डिऑनायससचा आवाज असावा – आभाळामधून गरजला 'बायांनो ! ज्याने तुमची, माझी आणि माझ्या पवित्र पूजन विधीची टर उडवली तो माणूस मी तुमच्यासमोर आणला आहे. आता करा त्याला शासन ! आणि हा आवाज उठला त्याक्षणीच, अमानुष असा एक अग्निलोळ आकाश आणि पृथ्वी या दरम्यान एकदम चमकून गेला.

सारे आसमंत मूक झाले. वृक्षाच्छादित दरीने पानापानाला मौनाची मुद्रा ठोकली. एकाही पशूचा आवाज कानावर येत नव्हता. ती अशरीरी वाणी नक्की काय म्हणाली याचा त्या बायांना नीटसा उलगडा झाला नाही. त्या उठून उभ्या राहिल्या नि सगळीकडे रोखून बघू लागल्या. त्यानंतर दुसऱ्यांदा शब्द ऐकू आले ते मात्र हुकूम केल्यासारखे. बॅकसची ती स्पष्ट आज्ञा कॅडमसकन्यांनी ऐकली व ओळखली मात्र, उड्डाण करायला निघालेल्या

कबुतरांच्या थव्यासारख्या त्यापुढे झेपावल्या आणि सगळ्या बाकाई त्यांच्यामागे धावल्या. प्रत्यक्ष देवानेच फुंकर मारून चेतवल्याप्रमाणे त्या दऱ्यांवरून, उंच उंच, झऱ्यांच्या बाजू-बाजूंनी कड्याकपारीवरून उड्या टाकीत चालल्या होत्या. जेव्हा त्यांनी राजेसाहेबांना वृक्षावर बसलेलं पाहिलं तेव्हा तटासारख्या उंच असलेल्या एका कड्यावर प्रथम त्या चढल्या आणि आपल्या सर्वशक्तिनिशी महाराजांच्या अंगावर त्यांनी मोठाल्या खडककपारीचा मारा केला ष देवदारवृक्षाच्या फांद्या नेम धरून भाल्यासारख्या त्यांच्यावर फेकल्या. काही बाया आपल्या हातातला थिरसस दण्ड त्या दयनीय लक्ष्यावर फेकीत होत्या. पण ते सर्व प्रहार फुकट जात होते कारण त्यांच्या आवाक्याच्या मानाने राजेसाहेब बसले होते तेथपर्यंतची उंची खूपच अधिक होती. तो दुर्दैवी जीव मात्र, तिथे सापळ्यात सापडल्यासारखा अगतिक होऊन बसला होता. सरतेशेवटी अशनीपाताच्या ताकदीने त्यांनी ओकवृक्षाच्या फांद्या ओढून काढल्या आणि त्या फांद्याचा तरफांसारखा उपयोग करून त्यांनी त्या देवदारवृक्षाची पाळेमुळे खणून काढण्याचा प्रयत्न केला. त्यांची ती ही धडपड फुकट गेली. मग ॲगवेबाई-साहेब त्यांना म्हणाल्या, “पुढे या मेइनॅड्सनो! अशा सगळ्याजणी या वृक्षाभोवती वाटोळ्या उभ्या रहा नि त्याला विळखा घाला. या उंच चढून बसलेल्या पशूला आपण धरलंच पाहिजे. नाहीतर डिऑनायससच्या गुप्त नृत्य प्रकारांची हा जाहीर वाच्यता करील.” मग त्या वृक्षाभोवती हजारो हातांचा विळखा पडला आणि त्या हातांनी तो वृक्ष जमिनीतून उखडून काढला. मग आपल्या उंच बैठकीवरून पेन्थेअस महाराज एकदम खाली कोसळत धाडकन जमिनीवर आदळले. आपला कोणत्या प्रकारचा शेवट जवळ आला आहे याची कल्पना येताच त्यांनी एक दीर्घ किंकाळी फोडली.

प्रमुख उपाध्याय या नात्याने महाराजांच्या आईनीच मृत्युयागाच्या विधीला सुरुवात केली आणि ती महाराजांवर तुटून पडली. महाराजांनी आपल्या केसांवरची फीत ओरबाडून काढली. हेतू हा की, आपली दुष्प्रवृत्त आई आपल्याला ओळखील आणि ठार मारणार नाही. आईच्या गालाला स्पर्श करीत महाराज म्हणाले, ‘आई! अग मी आहे! तुझा मुलगा पेन्थेअस. एकिऑनपासून तुला झालो नाही का मी! आई ग! दया कर माझ्यावर! मी पापी असलो तरी पण तुझा मुलगाच ना! नको ग ठार मारू मला!

ॲगेवेबाईसाहेबांच्या तोंडातून रागाने फेस येत होता. भानावरच नव्हत्या त्या. त्यांच्या शरीरात डिऑनायससचा संचार झाला होता व त्या त्याच्या काबूत गेल्या होत्या. त्या महा-राजांचे काही ऐकणे शक्यच नव्हते. आपल मनगट आणि कोपरे यामध्ये तिने महाराजांचा उजवा बाहू घट्ट दाबून धरला, आपला पाय तिने त्यांच्या छाताडाच्या फांसळ्यांवर रोवला आणि त्यांचा बाहुच खांद्यापासून फाडून काढला. हे जे केलं गेलं, ती काही तिची ताकद नव्हती. देवच तिच्या बोटांत दडला होता. त्यामुळे हे सहजी शक्य झाले. महाराजांच्या दुसऱ्या अंगाला इनोबाईसाहेब होत्या त्या त्यांचे मांस ओरबाडून काढीत होत्या. त्यात मग

ऑटोनॉईबाईसाहेब पण सामील झाल्या नि त्यांच्या मागोमाग बेहोष झालेला मेइनॅड संतिणींचा सगळा घोळकाच आला तिथे. एकच एक अखंड आरोळी अविरत ऐकू येत होती—देहात प्राण शिल्लक होता, तोपर्यंत पेन्थेअस महाराज किंचाळत होते. बाया विजयोन्मादाने आरडत केकाटत होत्या. त्यांच्यापैकी एकजण नुसता बाहूच नाचवीत होती; दुसरीच्या हातात महाराजांचा पाय होता. काय सांगायचं ! त्या पायातला चढाव देखील अजून काढलेला नव्हता. फासळ्यांवरचे मांस पंजांनी ओरबाडून काढण्यात आले होते व त्या अगदी स्वच्छ करण्यात आल्या होत्या. प्रत्येक हात लालभडक रक्ताने दाट माखला होता. पेन्थेअसचे मांसखंड त्या चेंडूसारखे खालीवर फेकीत होत्या, झेलीत होत्या.

महाराजांच्या शरीराचे खंड सर्वत्र विखुरले गेले आहेत. काही दणकट खडकाखाली तर काही दाट हिरव्या झाडीत जाऊन पडले आहेत. ते शोधून काढणं सोपं नाही. महाराजांचे हतभागी मस्तक ! त्यांच्या आईनेच ते हातात धरले आहे. त्यांनी ते थिरससच्या टोकावर बसवले आहे आणि ते घेऊन डोंगरकपारीतून त्या अगदी उजळ माथ्याने मिरवीत आहेत, त्यांच्या बहिणी, मेऑनड्स संतिणींसमवेत नृत्यात गर्क होऊन पाठीमागे राहिल्या आहेत. आपल्या त्या भयानक आणि थरकाप उडवणाऱ्या शिकारीच्या विजयोन्मादात शिकारीतला सहकारी म्हणून बॅक्कसचे नाव पुकारीत सावज गारद करण्याच्या मर्दुमकीतील भागीदार आणि विजयातील सोबती म्हणून त्याचा जयघोष करीत त्या मात्र आता राजवाड्याकडेच येत आहेत. पण बक्षिसादाखल, बॅक्कस तिला फक्त दुखाश्रूच देणार आहे.

मी जातो आता. ॲगवेबाओसाहेब येथे येऊन पोचण्याच्या आधी त्या भयानक दृश्यापासून मला दूर दूर जाऊ दे.

देवाचा मान राखणारे विनम्र आणि शांत अंतःकरण असणे ही मानवाजवळ असावी, अशी सर्वोत्तम उदात्त गोष्ट होय. मला वाटते, माणसाजवळ असावी अशी सर्वांत शहाणपणाची गोष्ट ही हीच – त्याने ती उपयोगात मात्र आणली पाहिजे.

[ जासूद जातो. ]

**नारीवृन्द :** चला धरू या, बॅक्कससाठी नृत्याचा फेर,
विजयोन्मादे देऊ आरोळ्या गाऊ या स्वैर,
सर्पबीजवंशाचा अखेरचा वंश दीप विझला म्हणून
नष्ट झाला पेन्थेअस

दवडली होती त्याने आपली दाढी स्त्रीच्या झग्यात
आणि मोहोरबंद केला होता आपला मृत्यू
फेनेलने भाला वेढलेल्या आयव्ही मालेच्या पवित्र चिन्हानें

बलिवर्दरूप धारण करणाराने
नेले त्या मानवाला विधियुक्त वधाच्या रिंगणात
तेव्हा उन्मादग्रस्त
कॅडमस कन्यकांनो !
केवढे नांव मिळवून दिलंय तुमच्या विजयाने तुम्हाला
असे गीत की,
जे यातनेच्या उद्रेकाला गुदमरवून टाकील
आसवांना जलसमाधी देईल

विजयाची निशाणी धाडसी आणि छान !
हात एका मातेचा
रक्तलांछित लालभडक रक्ताने टपकणारा,
कुरवाळतो आहे धडापासून विलग झालेले शीर
स्वतःच्याच वध झालेल्या अपत्याचे.

अरे पण, या पहा आपले भीषण नेत्र गरगरा फिरवीत पेन्थेअसची मातोश्री, ॲगेवे, राजवाड्याकडे धावत येताना मला दिसताहेत. ' डिऑनायससच्या उपासक चमूचे स्वागत असो.

[ ॲगेवे येते. बेभान अशी ती धापा टाकीत आहे. तिने पेन्थेअसचे शिर हाती धरले आहे. समूहगीत गाणाऱ्या नारीवृन्दाने तिच्या पाठीमागून राजवाड्याकडे येणारा भक्तिणींचा जो तांडा पाहिलेला होता, त्यातील भक्तिणी रंगमंचावर येत नाहीत. त्यापैकी काहीजणी तिथे प्रवेशद्वाराच्या तोंडाशीच उभ्या असलेल्या दिसतात. नाटक संपेपर्यंत त्या तिथेच उभ्या असतात. ]

**अगेवे** : आशियातील नारींनो, बॅक्कसच्या उपासिकांनो,

[ ॲगेवे त्यांना आपल्या हातातील ते शिर दाखविण्याचा प्रयत्न करते; पण त्या बिचकून मागे सरकतात. ]

**नारीवृन्द** : कशासाठी एवढा आग्रह ! हाय ...

**ॲगेवे** : दिले आहे देवाने वरदान
आमच्या शिकारीला आज; म्हणून
द्राक्षवेलीची खुडलेली ताजी फांदी
पहा मी आणली आहे स्वगृही, पर्वतावरून

**नारीवृन्द** ! दिसते आहे आम्हाला ती... आणि मैत्रिणी म्हणून आम्ही स्वागतही करतो तुझे !

**ॲगेवे** . पकडला त्याला मी, लावल्याशिवाय सापळा छावा सिंहाचा, लहानवयाचा पण बंडखोर पहा ना ! पाहू शकाल तुम्ही तो. हा बघा !

**नारीवृन्द** : कुठे मिळाला तो ?

**ॲगेवे** : सिथेइरॉनवर. त्या भयानक आणि एकाकी पर्वतावर –

**नारीवृन्द** : सिथेइरॉनवर ?

**ॲगेवे** : त्याच्या शरीरातलं जीव की प्राण, असं रक्त शिंपडलं गेलं.

**नारीवृन्द** : कुणी ठार केलं त्याला ?

**अगेवे** : मी ! मी होते सर्वांत पुढे. सर्व स्त्रिया गात आहेत स्तुतिस्तोत्रे माझी

' धन्य आहे थोर ॲगेवेची
मोठी माननीय महिला ! '

**नारीवृन्द** : आणि मग त्यानंतर कोण पुढे झाले ?

**ॲगेवे** : वा ! मग तर कॅडमसच्या—

**नारीवृन्द** : काय ? कॅडमस ?

**ॲगेवे** : होय त्याच्या कन्यका— पण नंतर हं ! माझ्यानंतर हात टाकले त्यांनी शिकारीवर,

त्या पशूला ठार करायला झोकदार होती आजची शिकार
म्हणून म्हणते, या ! चला ! आनंदोत्सवाच्या मेजवानीत सहभागी व्हा.

**नारीवृन्द** : काय ? दुष्टप्रवृत्त स्त्रिये ! आनंदोत्सवाची मेजवानी ?

**ॲगेवे** : [ हातात धरलेले मस्तक हळुवारपणे थोपटीत ] फारच कोवळं आहे हे बछडं ! कसे त्याच्या मृदुल टाळूपर्यंत गेले आहेत लाटालाटांनी नुकतेच उगवलेले हे दाट केस !

**नारीवृन्द** : त्यांच्या या लांब केसांनी खरे म्हणजे दिसतो आहे तो जंगली श्वापदासारखा.

**ॲगेवे** : देव मोठा कुशल शिकारी आहे. कसे झोकून दिले त्यांनी त्या शिकारी स्त्रियांना आपल्या भक्ष्यावर प्रथम त्यांना मोक्याच्या जागांवर उभ्या करून

**नारीवृन्द** : खरंच, आपला देव चतुर शिकारी आहे.

**ॲगेवे** : आणि तुम्ही माझीपण स्तुतिस्तोत्रे गाणार ना ?

**नारीवृन्द** : होय तर ! आम्ही तुझेही स्तवन करणारच.

**ॲगेवे** : आणि कॅडमसचे पुत्रही करतील माझे...

**नारीवृंन्द** : आणि पेन्थेअससुद्धां करील ! काय ग ॲगेवे ?

**ॲगेवे** : होय ना ! तो आपल्या आईचे गुणगान करील या तिने ठार केलेल्या सिंहाच्या छाव्याबद्दल.

**नारीवृन्द :** आ ! भयंकर, भयंकर !

**ॲगेवे :** हो तर काय ! भयंकर कर्म खरेच.

**नारीवृन्द :** तुला कृतकृत्य वाटतंय !

**ॲगेवे :** मला खरोखरीच हर्षभराने धन्यधन्य वाटतंय, या जगाच्या नजरा दिपवून टाकील, अशीच आहेत माझी महान कृत्ये, विशेषतः ही शिकार ! मी तिथे केली ती !

**नारीवृन्द :** दुर्दैवी ॲगेवे ! तर मग दाखव सर्वांना घरी आणलेली तुझी ही विजयी लूट ! बघू दे थीब्समधील जनतेला तुझी ही शिकार.

**ॲगेवे :** या तर मग ! या उत्तुंग आणि देखण्या शहरात वास्तव्य करणाऱ्या समस्त थीब्सवासीयांनो ! या ! आम्ही पकडलेल्या नि ठार मारलेल्या या पशूंना पहा. आम्ही— आम्ही कॅडमसकन्यांनी मारला त्याला. पकडायला ना जाळी पसरली, ना कातडी पट्टे असलेले थेसली भाले वापरले ! वापरले फक्त आमचे हे गोरेगोरे बाहू नि ही बोटे. शस्त्रे तयार करणाऱ्या व्यापाऱ्यांकडून हलकीसलकी हत्यारे घेऊन शिकार करणारे, आता यापुढे आपल्या शौर्याच्या बढाया मारतील काय ? आम्ही आमच्या नुसत्या हातांनी हे सावज पकडलं आणि नंतर त्याचा अवयव अन् अवयव फाडून काढला.

माझे बाबा कुठे आहेत ?, येऊ देत त्यांना इथे आणि आमचे चिरंजीव, पेन्थेअस ! आहे कुठे तो ! घेऊन ये म्हणावं एक दणकट शिडी; चढ त्यावर आणि राजवाड्याच्या भिंतीवर उंच जागी खिळ्यांनी ठोकूस टाक हे शिर; हा सिंहाचा बच्चा ! मी शिकार करून घरी आणलेला.

[ पेन्थेअसच्या शरीराचे तुकडे उचलून आणणाऱ्या सेवकांसह कॅडमस प्रवेश करतो. ]

**कॅडमस :** या ! सेवकांनो ! घेऊन या ते दुर्दैवी ओझे. एकेकाळी पेन्थेअस असलेले ! आणा त्याला स्वगृही ! हजारो ठिकाणी विखरून पडलेले त्याच्या शरीराचे तुकडे मला धुंडाळावे लागले. दोन सलग भाग काही एका ठिकाणी नव्हते. विस्कळीत असे पसरले होते ते. सिथेइरॉन डोंगराच्या दऱ्यातून आणि दाट झाडीतून कोनाकोपऱ्यात पडले होते. थकून गेलो शोधता शोधता. जमवले सगळे कसेतरी आणि आलो इथे ते घेऊन.

बॅक्कसदेवाच्या नृत्योत्सवातून मी आणि आमचा वृद्ध टिरेसिअस आधीच इकडे यायला निघालो होतो. शहराच्या वेशीत आम्ही आलो असू, नसू, तोच माझ्या मुलीच्या घोर कृत्याची वार्ता माझ्या कानावर आली. तसाच सरळ परत डोंगराकडे वळलो आणि घेऊन येतो आहे हा इथे, मेइनॅडस्च्या हातून ठार झालेल्या माझ्या पुत्राला. ॲरिस्टीअसपासून ॲक्टोओनला जन्म देणारी ऑटॉनॉअी, मला भेटली, तिथेच त्या गर्द झाडीत. तिची बहीण इनोही तिथेच होती. दोघीही त्यांच्या त्या दुर्दैवी उन्मादावस्थेतच होत्या. पण मला कुणीतरी सांगितलं की, ॲगेवे बेभानपणे ओरडत, बडबडत राजवाड्याकडे आली आहे. खरंच ते ! ती दिसतेय खरीच तिथे. देवारे ! काय हे भयानक दृश्य !

**अॅगेवे :** बाबा ! वाटेल तेवढ्या आत्मप्रौढीने खुशाल सांगा ओरडून साऱ्या जगाला की, कोणत्याही विद्यमान पुरुषाला अशा मुली असल्याचे भाग्य लाभलेले नाही. तिघींच्याहीबद्दल बोलते आहे मी. पण त्यातल्यात्यांत प्रामुख्याने माझ्याबद्दल. घरांत, मागावर सूत विणायचं टाकून मला इकडे यावसं वाटलं ते माझ्या हातून असं काही घडायचं होतं म्हणूनच. माझ्या नुसत्या हातानिशी हिंस्र श्वापदे ठार व्हायची होती. पाहा ना ! काय आणलंय मी माझ्या बाहूंमध्ये ते. घ्या ना बाबा ! घ्या ते ! असं हातात धरा. माझ्या या शिकारीतील कसबाचा अभिमान वाटू द्या तुम्हाला. आपल्या स्नेह्यासोबत्यांना बोलवा या आनंदाप्रीत्यर्थ मेजवानीला. माझ्या या देदीप्यमान कृत्याबद्दल त्यांना तुमचे अभिनंदन करू द्या. थोडासा हेवाही वाटेल नाही त्यांना तुमचा !

**कॅडमस :** आः ! या अमाप यातना आता सोसवत नाहीत ! हे दयनीय हातांनो ! तुमचं देदीप्यमान् कृत्य म्हणजे खून आहे खून ! सर्व थीब्सवासियांना व मला ज्यासाठी मेजवानीचे आमंत्रण करीत आहेस ती तुझी ही शिकार, तुझा हा बळी जो तू देवाच्या पायाशी अर्पण करणार आहेस, तो कोण आहे, हे तुला माहीत आहे का ? बाई ग ! अत्यंत खडतर असं दुःख वाढून ठेवलाय तुझ्यापुढे प्रथम आणि माझ्यापुढेही, पण तुझ्यापेक्षा थोडे कमी खडतर. हर्षदेव डिऑनायसस ! त्याने न्याय दिला. पण फार फार कठोरपणे वागलाय तो. माझ्याच रक्तमांसाचा ना तो ! पण त्याने माझे घर बरबाद केले.

**अॅगेवे :** काय तिरसट होतात माणसं म्हातारपणी ! काय पण डोळे वटारून पाहाताहेत माझ्याकडे ! किती, किती वाटतं मला की माझ्या मुलाने आपल्या आईसारखं निष्णांत शिकारी व्हावं. थीब्समधल्या साऱ्या तरुणांना बरोबर घेऊन हिंस्र श्वापदांचा पाठलाग करावा. पण त्याला वैर करता येतं फक्त देवाविरुद्ध. बाबा ! त्याला एकदा समजावून सांगायला हवं हे ! माझे हे सद्भाग्य पहायला, बोलवाना त्याला कुणीतरी इकडे !

**कॅडमस :** अरेरे ! माझ्या कन्यकांनो, आपण काय केलंय हे जर तुम्हाला समजलं तर केवढ्या यातना भोगाव्या लागतील तुम्हाला. पण आता आल्या तशा कायमच्या राहिलात तर मोठ्या सुखी असं जरी म्हणता आलं नाही, तरी आपलं दुःखं काय, याची तरी जाण होणार नाही तुम्हाला !

**अॅगेवे :** दुःखं ? काय बिघडलंय तरी काय ? मला दुःखं करायचं कारणच काय ?

**कॅडमस :** प्रथम तुझी नजर तिकडे वळव – आभाळाकडे पाहा !

**अॅगेवे :** पाहातेच आहे की मी ! तिकडे पाहायला का सांगताय मला ?

**कॅडमस :** नेहमी सारखंच अजूनही दिसतंय का हे आभाळ ? का काही बदलल्यासारखं वाटताय ?

**अॅगेवे :** मघापेक्षा जास्त उजळ – अधिक प्रकाशमय.

**कॅडमस :** आणि ज्या वेडाने तुला पछाडलं होतं ते मात्र अजून तसंच आहे तुझ्या

अंगात – खरं ना!

**ॲगेव्हे** : मला समजत नाही तुम्हाला काय म्हणायचंय ते. पण माझ्या मनःस्थितीतील बदल जाणवतोय मला. माझे विचार आता काहीसे स्पष्ट होत आहेत.

**कॅडमस** : आता तू नीट ऐकू शकशील? व समर्पक उत्तर देऊ शकशील?

**ॲगेवे** : होय! पण सगळं विसरून गेलेय बाबा, मी! आताच आपण काय बोललो ते.

**कॅडमस** : तुझं जेव्हा लग्न झालं, तेव्हा कुणाच्या घरी आलीस तू?

**ॲगेवे** : जे जमिनीत पेरलेल्या बीमधून उत्पन्न झाले त्या एकिओनला दिलीत आपण मला.

**कॅडमस** : मग एकिओनला एक पुत्र झाला – तो कोण होता?

**ॲगेवे** : पेन्थेअस – माझा आणि त्याच्या पित्याचाही मुलगा.

**कॅडमस** : बरोबर! मग आता सांग! तुझ्या हातात घेतले आहेस ते शिर कुणाचे आहे?

**ॲगेवे** : सिंहाचे ... निदान ज्यांनी त्याची शिकार केली त्या असं म्हणाल्या.

**कॅडमस** : आता बघ बरं सरळ नजर देऊन त्याच्याकडे! नुसतं बघणं काही फारसं अवघड नाही!

[ॲगेवे निस्तब्धपणे त्या शिराकडे नजर टाकते आणि किंकाळी फोडते.]

**ॲगवे** : हाय रे नशीबा! काय पहाते मी माझ्या हातात! काय आहे हे!

**कॅडमस** : आणखी नीट टक लावून पहा व काय दिसतंय ते स्पष्ट ध्यानात घे.

**ॲगेवे** : पाहिलं!...देवा रे! काय अघोर दृश्य हे! माझे हृदय पिळवटतंय, तडफडतंय!

**कॅडमस** : सिंहाच्या मस्तकासारखं दिसतंय ते तुला?

**ॲगेवे** : नाही माझ्या डागळलेल्या शापित हातात धरलंय ते आहे पेन्थेअसचे शिर.

**कॅडमस** : तोच! तोच आहे तो! तुला हे कळण्यापूर्वी खूप रडून घेतलंय मी बाळ! आधीच!

**ॲगेवे** : कुणी ठार मारलं त्याला हो? नि हे शिर माझ्या हातात आलंच कसं?

**कॅडमस** : हाय! केवढं निर्घृण सत्य हे! किती कठोर वेळेला उघडकीस आणावं लागताय!

**ॲगेवे** : सांगा हो! माझं काळीज फाटू पाहतय! सगळं समजलंच पाहिजे मला!

**कॅडमस** : तू ठार मारलंस त्याला – तू आणि तुझ्या बहिणींनी.

**ॲगेवे** : कुठे हो घडलं हे दुष्ट कृत्य! घरीच का आणखी कुठे?

**कॅडमस** : जिथे ॲक्टेओनला शिकारी कुत्र्यांनी फाडलं होतं ...

**ॲगवे** : सिथेइरॉनवर? कुठल्या दुर्दैवाने ओढून नेलं पेन्थेअसला तिथे?

**कॅडमस** : तो तिथं गेला तो डिऑनायसस व तुमचा तो उन्मत्त पूजाविधी धिक्कारायला.

**ॲगेवे** : पण आम्ही सगळ्याजणी तिथंच एकत्र कशा होतो?

**कॅडमस :** तुम्ही सगळ्याच वेड्या खुळ्या झाला होता. सारे शहरच डिऑनायससने झपाटले गेले होते.

**ॲगेवे :** आता सगळं समजलं – पुरा सत्यानाश केला आपला डिऑनायससने.

**कॅडमस :** त्याचा अपमान झाला होता. त्याच्याबद्दल अपशब्द वापरण्यात आले होते. त्याचे देवत्व मान्य केले नाही तुम्ही !

**ॲगेवे :** बाबा कुठाय माझ्या पुत्राचा प्रिय देह !

**कॅडमस :** हा इथे आहे ! खूप वेळ शोधाशोध करून इथं आणलाय मी तो !

**ॲगेवे :** अगदी नीट जुळविला आहे का तो ! अवयवाला अवयव जोडून ?

**कॅडमस :** अजून नाही. जमलं तेवढ्या तातडीने आम्ही इथे आलो.

**ॲगेवे :** मला त्याला स्पर्श करायची परवानगी असेल तर जमवते मी तो देह !

**कॅडमस :** तुला तशी परवानगी असायला हरकत नाही. कारण तुझा अपराध काही त्याच्या अपराधापेक्षा मोठा नाही.

**ॲगेवे :** पण माझ्या त्या खुळचटपणांत पेन्थेअसचा कितीसा भाग होता ?

**कॅडमस :** डिऑनायससला मान न देण्यात तो तुझ्यासारखाच होता. म्हणून देवाने एकाच सत्यनाशात सर्वांना सामावून घेतलं – तू, तुझ्या बहिणी, पेन्थेअस, सगळीच... आणि माझं घर नि मलाही भुईसपाट केलं. मला पुत्र नाही, आणि हे हतभागी मुली ! तुझ्या पोटचे पोर अत्यंत लाजिरवाण्या आणि भयंकर मृत्यूने माझ्यापासून हिरावून घेतलं. पेन्थेअस, लाडक्या बाळा, माझ्या मुलीच्या मुला ! ही वास्तू घराण्याचा प्रमुख पुरुष म्हणून तुझ्याकडे आशेने पाहात होती. या घराच्या सामर्थ्याचा तू भरभक्कम आधार होतास. थीब्सवासी तुला टरकून असत. तू जवळ असताना तुझ्या वृद्ध आजोबांना कुणीही कमी लेखू शकला नसता. असा कुणी निघताच, तर त्याला तू त्याच्या लायकीप्रमाणे पुरेपूर अद्दल घडविली असतीस. आता मी श्रेष्ठ समजला जाणारा कॅडमस, ज्याने थीबनवंशाचे बी भूमीत पेरले व नेत्रदीपक पीक काढले – तो मी – आता माझ्या वास्तूपासून दूर, असे निर्वासित, अवमानित आयुष्य कंठणार ! प्रियतम पुत्रा – हाय ! हा देह टाकल्यानंतरही तू मला अत्यंत प्रियच वाटणार आहेस – यापुढे कधीही तू माझ्या दाढीला स्पर्श करणार नाहीस. आजोबा ! अशी साद घालणार नाहीस, आपला बाहू माझ्याभोंवती टाकून, 'कुणी त्रास दिला तुम्हाला ? कुणी अपमान केला तुमचा ! आजोबा ! सांगा ! म्हणजे आता शासन करतो त्याला मी !' असं म्हणणार नाहीस. कधीच नाही म्हणणार.... ! आता माझ्यासाठी उरलंय फक्त दुःख ! आणि तुझ्यासाठी हाल...तुझ्या मातेच्या वाट्याला फक्त आसवं, आणि आम्हा कुटुंबियांना यातना !

अदृश्य जगताची चेष्टामस्करी करणारा कुणी असलाच तर त्याने पेन्थेअसच्या हत्येची घटना विचारात घ्यावी आणि देवाचे अस्तित्व मान्य करावे.

**नारीवृन्द** : कॅडमस! आम्हाला फार दुःख होतंय तुझ्याबद्दल. तुझ्या नातवाला योग्यच शासन झाले, पण तुला मात्र फार खडतर दुःख विनाकारण भोगावं लागलं.

**अॅगेवे** : बाबा! त्या एका भयानक कालखंडाने माझं सारं आयुष्य तोडून मोडून टाकलंय हो! एका भयानक तासाने माझा अभिमान धुळीस मिळवला. माझ्या सौख्याची राखरांगोळी केली. आता इच्छा राहिलीय ती एवढीच की माझ्या मुलाचं सगळं शरीर नीट जुळवायचं नि त्याला मूठमाती द्यायची. नंतर त्याच्यासाठी ढाळायचे अश्रू आणि मग कुठे तरी दूर जाऊन देह ठेवायचा. पण हे सगळं धर्मनियमांना धरून आहे की नाही कोण जाणे! माझे हात आपल्याच दुष्कृत्याने कलंकित गलिच्छ झाले आहेत. त्याचं म्हणजे माझं स्वतःचंच रक्त मी माझ्या हाताने सांडलं आहे; एकेकाळी माझ्याच उदरात वाढलेलं मांस मी छिन्नभिन्न केलं आहे—अशी मी देवाची नाराजी ओढवून घेतल्याशिवाय त्याला कसा हृदयाशी कवटाळू शकेन? त्याच्या अंत्येष्टीच्या वेळी शोकगीत कसं म्हणू शकेन? पण मला एवढी भीक घाला. हे जर अगदीच देवाधर्माला पावित्र्य भंग करणारे असे तुम्हाला वाटत नसेल, तर मला माझ्या लेकराला स्पर्श करू द्या. ज्या त्याच्या प्रिय देहावर मी ममता केली आणि जो नकळत माझ्याच हातून नाश पावला त्या देहाचा मला शेवटचा निरोप घेऊ द्या! माझ्याप्रमाणे तुम्हालाही यातना होत आहेत म्हणून माझी कीव तुम्हाला यावी हे उचितच आहे. अर्थात तुम्हाला फुकट यातना सोसाव्या लागत आहेत.

**कॅडमस** : माझ्या मुली! डिऑनायससच्या प्रकोपाखाली तू, मी आणि आपले सर्व घराणेच चिरडून गेले आहे, भग्न होऊन पडले आहे. तुझ्या लेकरापासून तुला दूर ठेवणारा मी कोण? मात्र आधीच सांगतो. कोणत्याही नजरेला भीतीने भोवंड आणील असं दृश्य पाहाण्यासाठी हृदय वज्रवत कठीण कर. आईच्या डोळ्यांनी ते पाहाणे म्हणजे तर एक भयंकर दिव्यच! [आपल्या सेवकांना] ठेवा ते तुमचे ओझे तिच्यापुढे! त्यावरचं आच्छादन बाजूला करा. अॅगेवेला आपला पुत्र पाहू दे.

[ती शवपेटी अॅगेवेसमोर जमिनीवर ठेवण्यात येते. अॅगेवे त्याशेजारी गुडघे टेकून बसते.]

**अॅगेवे** : अरे माझ्या लाडक्या लेकरा! किती जगरहाटीविरुद्ध आहेत ही आसवं! वास्तविक माझ्या चेतनाहीन चेहऱ्यावर तुझ्या डोळ्यांतून पडायला हवी होती ती, मी आता मरेन तेव्हा माझ्यासाठी रडायलासुद्धा कुणी नाही बरं! पण माझ्याकडून घडलेल्या कृत्याचे यथायोग्य प्रायश्चित्तच आहे हे! कारण केवळ गर्वाच्या भरात मी डिऑनायससदेवाची निंदा-नालस्ती केली आणि मला ज्या गोष्टी समजून घ्यायला हव्या होत्या त्या मी मुळी समजूनच घेतल्या नाहीत. तुला शिक्षा झाली तीसुद्धा या अपराधासाठीच. तुझे नशीब अधिक फुटकं की माझं, ते मला सांगता येत नाही, पण ज्याअर्थी तू माझ्याबरोबरच यातना सोसल्या आहेस

त्याअर्थी, मी जे काही केलं, ते काय करते आहे हे माहीत नसताना केलं म्हणून, आणि या तुझ्या देहाला माझ्या अपवित्र हातांनी, तुझी सर्वांत क्रूर वैरीण ठरलेली आणि तरीसुद्धा तुझ्यावर अपार माया करणारी आई म्हणून स्पर्श करते आहे; या दोन्ही गोष्टींबद्दल तू मला क्षमा करशील ना!

तुझे अवयव जसे असायला हवेत तसे जुळवून ठेवते आहे आता मी. ज्याला लहानाचा मोठा होईपर्यंत निगुतीने वाढवलं, ज्या हाडामांसाला मी स्वतःच्या रक्ताने जोपासलं त्याचे चुंबन घेऊ दे मला. या बाबा! मला हात द्या. त्याचे हे बापडे शिर इथे ठेवा. शक्य तितके सारे अगदी असावं तसं आणि जरा तरी साजरं दिसेल असं करू या.

हे प्रियतम चेहेऱ्या, हे उमद्या टवटवीत गालांनो! हे राजशाही नयनांनो! तुमच्यातलं तेज आता अंधारलं! अरे माझ्या बाळा! या ओढणीने आता तुझे मस्तक, तुझे हे भग्न आणि रक्तलांच्छित अवयव मी झाकून टाकीत आहे.

उचला आता त्याला नि घेऊन जा मूठमाती देण्यासाठी. अरेरे! हा एवढा राजा! पण देवाच्या प्रकोपामुळे लाजिरवाण्या अशा मृत्यूकडे ओढला गेला.

[ राजवाड्याच्या भिंतीवर डिऑनायसस प्रगटतो ]

**नारीवृन्द** : अरे पण पाहा! हे काय? हा तर देव डिऑनायसस! आपला स्वामी! हो! स्वतः तोच. पूर्वीसारखा मानवाच्या रूपात नाही तर आपल्या दिव्य देवत्वाने प्रगट झालेला!

**डिऑनायसस** : बघा! बघा माझ्याकडे! श्रेष्ठ आणि सामर्थ्यशाली असा मी देव डिऑनायसस! झ्यूस आणि सेमेलीचा अमर पुत्र!

सात वेशी असलेल्या या शहरात, या थीब्सनगरीत मी प्रवेश केला. इथल्या स्त्री-पुरुषांनी माझी चेष्टा केली. माझे देवत्व नाकारले आणि माझे पवित्र पूजनविधी स्वीकारले नाहीत. आता आपल्या नास्तिक मूर्खपणाची फलश्रुती त्यांना स्पष्टच दिसते आहे, हे राजघराणे उद्‌ध्वस्त झाले आहे. शहरच्या रस्त्यातून एकप्रकारची अपराधी भीती भरून राहिली आहे, कारण प्रत्येक थीब्सवासीयाला आपल्या कोत्या दृष्टीचा व पाखंडीपणाचा पश्चात्ताप होतो आहे – पण आता उशिरा – वेळ निघून गेली आहे. या पापचरणात अग्रेसर आणि प्रमुख होता हा पेन्थेअस! याने केवळ माझे न्याय हक्कच झुगारून दिले असे नाही तर मला शृंखलाबद्ध केले व माझी अवहेलना केली. त्यांमुळेच अत्यंत घृणास्पद असे मरण, त्याला त्याच्या जन्मदात्रीच्याच हातून आले. हा जो दैवभोग त्याच्या वाट्याला आला तो त्याने आपल्या कर्मानेच आपल्यावर ओढवून घेतला व म्हणून तो न्याय्यच म्हणावा लागेल, कारण कोणताच देव आपल्या पूजनविधीचा तिरस्कार झालेला सहन करणार नाही व आपल्या नामाचा उच्चार पाखंडीपणाने केलेला त्याला खपणार नाही आणि जर असे धाडस कुणी केलेच तर तो देव आपल्या सूडबुद्धीने अगदी अखेरपर्यंत त्याचा पाठपुरावा

केल्याशिवाय राहाणार नाही. असे केल्यानेच मर्त्य मानवांना समजून येईल की देव हे त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ आहेत.

आता आणखी पुढे ऐका. थीव्सच्या नागरीकांपुढे काय वाढून ठेवले आहे ते मी उघड करून सांगतो आहे. असा एक दिवस उजाडेल की त्या दिवशी या शहरातून त्यांना हाकलून देण्यात येईल आणि या भूमातेवर ते पूर्व आणि पश्चिम दिशांनी भटकत जातील कारण देवांना धिक्कारणाऱ्यांचे असे एखादे शहर असावे हे झ्यूसला संमत होणारे नाही.

ॲगेव्हे आणि तिच्या बहिणी यांनी आजच्या आज हे गाव सोडलं पाहिजे – या रक्तपाताने त्यांनी स्वतःला किळसवाण्या तऱ्हेने विटाळवून घेतले आहे. त्यासाठी त्यांना हद्दपारीचे हे प्रायश्चित्त न्याय्य आणि पुरेपूर असेच आहे. त्यांना त्यांची ही माय-भू पुन्हा कधीही दिसणार नाही. कारण या शहराच्या यज्ञयागात अशा रक्तलांच्छित हातांनी भाग घेणे हा धर्मनिष्ठेविरुद्ध गुन्हा ठरेल.

आणि आता कॅडमस – स्वतः तुझ्यापुढे काय यातना वाढून ठेवल्या आहेत त्या तुला सांगतो. तुझे रूपांतर आता सर्पात होईल. तुझी पत्नी हार्मोनिया जी, तू मर्त्य असूनही तुला तिच्या देवांश पित्याने, ॲरीसने विवाहविधीने दिली, ती ही या रूपांतराने पशुयोनीत जाऊन तुझ्याप्रमाणे सर्पच होईल. झ्यूसची देववाणी हेच भाकीत करीत आहे. एका रानटी सेनेचा तू प्रमुख होऊन बैलजोडी जुंपलेल्या गाड्यांतून आपल्या पत्नीसह मार्गक्रमण करशील. आपल्या अमर्याद सेनेच्या सहाय्याने तुम्ही खूप शहरांचा सत्यानाश कराल. पण हे सगळे-जण जेव्हा, कौल देणाऱ्या अपोलो देवांचे मंदिर लुटतील, तेव्हा त्याचे फल, त्यांना मिळेलच. ते म्हणजे ते सगळे घरी परतताच त्यांच्यासमोर दुःख वाढून ठेवलेले असेल. पण तू स्वतः आणि हार्मोनिया, ॲरीसकडून वाचविले जाल. तो देव तुम्हाला अमर जीवांच्या भाग्यशाली मालिकेत समाविष्ट करील.

मी जो तुम्हाला हे ऐकवतो आहे, तो मी काही कुणा मर्त्य बापाचा पुत्र नसून खुद्द झ्यूसचा पुत्र आहे, जर शहाणपणाचा मार्ग तुम्ही स्वीकारला असतात—पण तुम्ही हट्टाने तो स्वीकारला नाही – तर हा झ्यूसचा पुत्र आपला स्नेही झाल्याचे तुम्हाला आढळले असते आणि सांप्रत तुम्ही सुखी झाला असता.

**कॅडमस :** डिऑनायसस। दया कर आमच्यावर।
आम्ही चुकलो रे। पापी आहो आम्ही।

**डिऑनायसस :** फार उशिरा ओळख पटली माझी तुम्हाला. ज्यावेळी पटायला हवी होती, तेव्हा ती पटली नाही.

**कॅडमस :** हे सगळं आम्हाला आता कळून चुकलं आहे. पण तुझा हा सूड फार आततायी वाटतोय !

**डिऑनायसस !** मी देव आहे, आणि तुम्ही माझी अवहेलना केलीत !

**कॅडमस :** देवांनी माणसासारखं असू नये. माणसं असा राग मनात बाळगतात, देव नाही.

**डिऑनायसस :** झ्यूस – माझे जन्मदाते – त्यांनी पहिल्यापासूनच हे सर्व निश्चित केलेले आहे.

**कॅडमस :** बाबा सगळी आशा संपली. आमची शिक्षा पक्की झाली. आम्ही आता आहोत फक्त निर्वासित.

**डिऑनायसस :** मग जे टाळता येत नाही ते लांबणीवर टाकण्याची यातायात कशासाठी ?

[ डिऑनायसस अंतर्धान पावतो. ]

**कॅडमस :** हाय ! माझ्या मुली ! केवढ्या भीषणपणेतेने आणि आत्यंतिक दुःखाने आपल्याला गाठलं आहे ग ! तू, तुझ्या बहिणी आणि मी, तुझा कमनशिबी पिता – सर्वांनाच. माझ्या या अखेरच्या दिवसांत म्हातारपणी माझी वास्तू मला सोडली पाहिजे आणि अज्ञात भू-भागात भटकलं पाहिजे. नि त्याच्याहीपेक्षा पलीकडची दुःखद गोष्ट म्हणजे पुढलं भाकीत असं आहे की एका संमिश्र रानटी टोळीचे धुरिणत्व माझ्याकडे येणार व तिच्यासह मी हेलासवर चाल करून जाणार ! मी आणि माझी पत्नी हार्मोनिया–ॲरीसची – कन्या दोघांनाही पशुयोनीत सर्परूप धारण करायला लागणार; आणि सशस्त्र अशा टोळीचा धुरीण म्हणून पत्नीसमवेत हेलेनेसच्या वेदया आणि थडगी, उद्ध्वस्त करावी लागणार आणि मला माझ्या यम यातनातून कोणत्याही प्रकारचा दिलासा लाभण्याचा संभव नाही. मृत्युतली चिरशांतता मिळावी म्हणून ॲकेरीनचा खोलवर वहाणारा प्रवाहही मला ओलांडण्याची परवानगी नाही.

**ॲगेवे :** आणि बाबा ! तुमच्यापासून विलग होऊन कुठेतरी दूर निर्वासित असे मला राहावे लागणार.

**कॅडमस :** हतभागी बाळे ? कशाला तुझ्या या बाहूंचा विळखा घालतेस मला ! एखादा राजहंस आपल्या थकलेल्या, दुबळ्या, म्हाताऱ्या भाईबंदाची देखभाल करतो तसे माझे हे पिकलेले केस कशाला नीटनेटके करते आहेस ?

**ॲगेवे :** माझं घर, माझा देश, याला वंचित अशी मी कुठे जाऊ बाबा ? कुठे आधार शोधू ?

**कॅडमस :** कसं नि काय सांगणार मी ? तुझा जन्मदाता या बाबतीत तुला सहाय्य करायला असमर्थ आहे बेटी !

**ॲगेवे :** निरोप घेते माझ्या घरकुलाचा, निरोप त्या भूमागाचा परिचित आहे जो मला ! बहिष्कृत, शापित आणि हतभागी अशी मी हा उंबरठा ओलांडून निघून जात आहे. जो ओलांडून प्रथम स्वगृही प्रवेश केला होता मी वधूवेषात.

**कॅडमस :** जा ! मुली ! जा ! तुझं दुःख आणि मानहानी झाकली जाईल, असं एखादं एकीकडचं ठिकाण हुडकून काढ.

**ॲगेवे :** बाबा ! अश्रू आवरत नाहीत हो तुमची ही अवस्था बघून !

**कॅडमस :** तुझी आणि तुझ्या बहिणींची ही अशी अवस्था पाहून मलाही माझ्या अश्रूंना आवर घालता येत नाही बेटा !

**ॲगेवे :** ज्याने तुमच्या वंशासाठी ही घोर शिक्षा योजिली त्या देवाचा हा जुलमीपणा चमत्कारिकच वाटतो मला.

**कॅडमस :** चमत्कारिक नव्हे पोरी ! आपल्या या शहरवासीयानीच हक्क धिक्कारला आणि तू आणि ते – या दोघांनीही उघडाउघड त्याची मानहानी केलीत.

**ॲगेवे :** बाबा ! येते हं मी ! सुखी असा !

**कॅडमस :** गरीब बापडी माझी बाळी ! कशी नि कुठे तू सुखी होशील, हे मला सांगता येणार नाही; पण तरी मी असं म्हणतो; कुठेही अस ! सुखात अस !

**ॲगेवे :** मी, माझ्या बहिणींना हाताला धरून नेते माझ्याबरोबर परदेशात, माझ्या दुर्भाग्याच्या वाटेकरी होण्यासाठी.

[ रंगमंचाच्या कडेशी तिष्ठत उभ्या असलेल्या थीब्स स्त्रियांकडे ती वळते. ]

या ! मला पुढे घालून चला. देवानो ! अशा ठिकाणी मला न्या जिथे ज्याचा उबग आला आहे असा सिथेइरॉन मला पाहू शकणार नाही किंवा मी त्याला पाहू शकणार नाही. डोंगरमाथ्यावर हर्षोन्मादाने भटकण्याची माझी हौस पुरी फिटली.

आतां ज्याला हवी असेल त्याने घ्यावी माझी ही पवित्र आयव्ही माला ! माझा हा थिरसस दण्ड ! मी या देवाची कशी सेवा केली, त्या आठवणी मला देणाऱ्या या साऱ्या वस्तू जाऊ देत आता.

[ ॲगेवे जाते. मागोमाग कॅडमसही जातो. ]

**नारीवृन्द :** देव प्रगट होतात विविध स्वरूपात आणि कितीतरी गोष्टींचा आश्चर्यकारक शेवट करून टाकतात. त्या घडतच नाहीत गोष्टी. ज्या आपल्याला वाटतात घडतील असं. अकस्मित असते ते, देव शक्य कोटीत आणून दाखवतो आणि तेच आज, या इथे घडले आहे !

# बाकाई ( टिपणे )

**डिऑनायसस :** ग्रीक पुराणानुसार फळे, फुले व सुफलता यांचा देव; पण मुख्यत्वे मद्याची देवता म्हणूनच त्याचा उल्लेख केला जातो. त्याच्या स्वतःच्या देशात त्याचे भक्त, बेहोष होऊन त्याच्या उत्सवात नाचत व पशूंना फाडून त्यांचे कच्चे मांस खात. ग्रीसमधील उत्सवात या एकांगीपणाला पुष्कळच सौम्य स्वरूप होते. या भक्तात प्रामुख्याने स्त्रियाच असत. एरवी अतीव शालीन अशा या स्त्रिया डिऑनायससच्या पूजन अर्चन प्रसंगी बेभान होऊन अनेक तर्कबुद्धीला न पटणारी कृत्ये करीत.

सर्वसाधारण समजुतीनुसार त्याचा जन्म थीब्समध्ये झाला. झ्यूस व सेमेले यांचा हा पुत्र. डिऑनायससचा जन्म होण्याआधीच सेमेलेच्या विनंतीनुसार झ्यूस तिला भेटला. पण झ्यूस हा विद्युत् देव असल्याने त्याच्या प्रखर तेजाने सेमेलीचा अंत झाला. नंतर झ्यूसने तिच्या उदरात वाढणाऱ्या आपल्या मुलाला वाचवले. त्याने त्या बालकाला स्वतःच्या मांडीत ठेवले व बालकाची पूर्ण वाढ झाल्यावर ते प्रत्यक्ष जन्माला आले. त्यामुळेच डिऑनायससला द्विजन्म ( Twice Born : Dithyrambus ) म्हणतात. त्यानंतर निसा येथील जलदेवतांनी त्याचे लालनपालन केले. झ्यूसची तशी आज्ञाच होती. मोठा होताच डीऑनायसस जगप्रवासाला निघाला. या फेरीचा उद्देश म्हणजे माणसांना द्राक्षवेलींची मशागत करायला शिकवणे व स्वतःच्या पूजनविधीचा त्यांच्यात प्रसार करणे हा होता. या कार्यात त्याला त्याच्याच देशात म्हणजे थीब्समध्येच प्रथम अडथळा झाला. पेन्थेअस हा त्याचा विरोधक. या विरोधकाचा त्याने कसा भीषण सूड घेतला हाच या शोकांतिकेचा प्रमुख विषय आहे.

लायसारगस ( Lycurgus ) हा थ्रेसियन राजाही डिऑनायससचा विरोधकच होता. या राजापासून स्वतःचा बचाव करण्यासाठी डिऑनायससने समुद्रात उडी मारली व थेटिस या देवतेने त्याचे स्वागत केले. लायसरगसला झ्यूसने अंधळा केले; पुढे भ्रमिष्टावस्थेत द्राक्षवेल समजून त्याने आपल्या स्वतःच्याच मुलाला ठार केले. आर्कोमेनस ( Orchomenus ) येथे मिनिआसच्या तीन मुलींनी डिऑनायससच्या पूजनविधीत इतर महिला समवेत भाग घ्यायचे नाकारले. त्या तीन मुलींना वटवाघूळ व्हावे लागले. या सर्वांवरून डिऑनायससच्या पूजनविधीत बऱ्याचदा बऱ्याच ठिकाणी विक्षेप झाला असावा. उलट ज्या ठिकाणी त्याचे स्वागत झाले तिथल्या लोकांना त्याने द्राक्षवेलीसारख्या व अन्य उपयुक्त गोष्टी दिल्या.

एशिआ मायनरमध्ये विशेषतः लिडिया व फ्रिजिया येथे डिऑनायससच्या पूजनविधीला विशेष महत्त्व मिळाले.

डिऑनायसस हा नाकससला जात असताना त्या प्रवासात त्याला टायरेनिअन चाच्यांनी फार त्रास दिला. त्यामुळे या चाच्यांचे रूपांतर त्याने एका समुद्रप्राण्यात केले. नाकसस येथे डिऑनायससची ॲरिडनेशी गाठ पडली, या स्त्रीला डिऑनायससची पत्नी समजण्यात येते, व दोघांचा विवाहसोहळा समारंभदिन प्रतिवर्षी उत्साहाने साजरा होत असे. अशा प्रकारे सर्व

भूतलावर स्वतःचे देवत्व सिद्ध करून आपल्या आजीला आणण्यासाठी तो पाताळलोकात गेला. डिऑनायससचा संबंध वनस्पतीशी आहे. भविष्यकाळात येणारी संकटे कोणती हे सांगण्याचे दैवी सामर्थ्य डिऑनायससजवळ होते. डेल्फी येथे अॅपोलो इतकाच मान देऊन त्याचे स्वागत करण्यात आले, डिऑनायसस हा विविध पशूंचा आकार घेऊ शकतो. वृषभ. चित्ता, सिंह, नाग, व्याघ्र, गर्दभ व शेळी अशा स्वरूपात तर कधी डॉल्फीनसारख्या जलचराचेही रूप तो धारण करू शकतो. आयव्ही पल्लवांची माला, थिरसस दण्ड व दोन्ही बाजूला कान असलेला मोठा प्याला ही त्याला विशेष प्रिय समजली जातात.

डिऑनायससचा प्रारंभीचा अवतार म्हणजे दाढी असलेला माणूस, पण नंतर नंतर त्याचा आविष्कार एक देखणा जवळजवळ स्त्रीसदृश्य कोमलता असणारा तरुण व क्वचित अर्भक म्हणूनही केला जातो. पुरुषवृक्ष ( Dentrites ) म्हणून त्याचा गौरव केला जातो तोही निसर्गाचा वनस्पतींचा, उत्पत्ती करणारा म्हणूनच, केवळ द्राक्षवेलींचाच नाही.

( २ ) **बॅकस** ( Bacchus ) : मद्य व सुफलता यांची ग्रीक देवता. डिऑनायससशी याचे खूपच साम्य आहे, लोककथांनुसार या देवाने खूप हिंडून जनतेला द्राक्षपिकांची माहिती दिली. त्याने अॅरिअडनी या स्त्रीशी विवाह केला, पण ज्यूनोच्या दुष्टाव्यामुळे त्याला हद्दपार व्हावे लागेल.

मद्यपान व उच्छृंखल वर्तन यांच्याशी या नावाची सांगड घातली जाते. देवांमध्ये याची गणना होऊ लागताच याचे पूजनोत्सव सर्वत्र मोठ्या उत्साहाने होऊ लागले. या उत्सवात स्त्रिया अधिकाधिक संख्येने भाग घेऊ लागल्या. त्यांना बाकाए म्हणत. रोममध्ये या उत्सवाबद्दल जनतेत रोष उत्पन्न होऊन खिस्तपूर्व १८६ या वर्षी या उत्सवावर बंदी घालण्यात आली.

ग्रीसमध्ये या उत्सवाला डिओनेसिआ ( Dionysia ) असे म्हणत. या नृत्यात मद्यपान व स्वैराचार यांना धरबंद नसे. इजिप्शिअन ऑसिरीस Osiris या देवाशी त्याचे साम्य असल्याचे समजले जाते. बॅक्स हे डिऑनायसचेच एक नाव असेही म्हणतात.

( ३ ) **बाकाई** ( Bacchae ) : बॅकसच्या उत्सवात भाग घेणाऱ्या स्त्रियांना बाकाई म्हणत. बॅक्स हे डिऑनायससचेच नाव. हा उत्सव रोममध्ये Etruria मधून आला. वर्षातून तीन दिवस हा उत्सव साजरा होई व फक्त स्त्रियाच त्यात भाग घेत असत. पुढे पुरुषांनीही त्यात भाग घ्यायची मुभा मिळाली, व हा उत्सव वर्षातून तीनदा ऐवजी महिन्यातून पाच वेळा होऊ लागला, उत्सवात मद्यपान, स्वैराचार तर भरपूर प्रमाणावर असे, पण सर्व प्रकारंचे गुन्हे व राजकीय कट इथे शिजले जात. खिस्तपूर्व १८६ मध्ये संपूर्ण इटलीत या प्रकारांना कायद्याने बंदी घालण्यात आली तरीही दक्षिण इटलीत ते बराच काळ चालू होते.

( ४ ) **कॅडमस** ( Cadmus ) ग्रीक वीरपुरुष Phoenicia चा राजा फोनिक्स तथा

ॲगोनोर याचा मुलगा, युरोपाचा भाऊ. त्याच्या बहिणीला झ्यूसने पळवून नेल्यानंतर तिचा शोध घेण्यासाठी कॅडमस घराबाहेर पडला. बहीण न सापडल्याने निराश होऊन तो डेल्फी येथे आला. तिथे दैवीवाणी झाली. त्याने बहिणीचा शोध सोडून द्यावा व त्याला एक गाय भेटेल तिच्या मागोमाग जावे, नि गाय जिथे खाली बसेल त्या ठिकाणावर एक शहर उभारावे. त्याप्रमाणे Phocis मध्ये त्याला तशी गाय भेटली व तिने त्याला Boetia कडे नेले. त्याठिकाणी त्याने थीब्स शहर वसवले. या गाईचा देवाला बळी द्यावा म्हणून त्याने आपल्या काही दोस्तांना झऱ्यावर पाठविले. पण एका क्रूर सर्पाकडून ते सर्व मारले गेले. तेव्हा कॅडमस क्रुद्ध झाला व त्या रागाच्या भरात त्याने त्या सर्पराजाला यमसदनास पाठविले. पुढे अथेनीने सांगितल्यावरून कॅडमसने त्या सर्पराजाचे दात जमिनीत पुरले. या भूमीतून पहाणाराचा थरकाप उडवतील असे सशस्त्र वीरपुरुष वरती आले. त्यांना स्पार्टी म्हणत. कॅडमसने या वीरपुरुषांवर एक दगड फेकला त्यामुळे ते आपापसांतच लढू लागले व आपापसात लढता लढता मरून गेले, फक्त पाचच वीरपुरुष शिल्लक राहिले. या पाच वीरांच्या सहकार्याने कॅडमसने थीब्स शहराचा बालेकिल्ला उभारला. या शहराच्या सर्वांत श्रेष्ठ घराण्याचा हा संस्थापक, आपल्या हातून झालेल्या अपकृत्यांच्या पापशमनार्थ त्याने आठ वर्षे तप केले.

मग देवांनी त्याचा हार्मोनिआशी विवाह करून दिला. कॅडमसला पॉलिडोनस ( Polydones ) हा पुत्र व इनो, ॲटोने, ॲगेवे व सेमेल या चार कन्या झाल्या. या सगळ्या मुली कमनशिबी ठरल्या. ॲगेवेच्या हातून स्वतःच्याच पुत्राची हत्या झाली. तिला व तिच्या बहिणींना थीब्समधून हद्दपार व्हावे लागले. कॅडमस व त्याच्या पत्नीचे रूपांतर सर्पयोनीत झाले.

( ५ ) **सेमेल** (Semele) : थीब्स शहराचा संस्थापक कॅडमस व त्याची पत्नी हारमोनिया यांची ही कन्या. हिचा विवाह झ्यूस या विद्युत देवतेशी झाला. तिला झ्यूसपासून गर्भ राहिला; व तिने झ्यूसला भेटायला बोलावले असताना त्याचे प्रखर तेज सहन न होऊन ती मृत्यू पावली. तिचा गर्भ मग झ्यूसने स्वतःच्या मांडीत वाढवला. हा गर्भ म्हणजेच पुढे, जन्माला आलेला डिऑनायसस.

( ६ ) **झ्यूस** ( Zues ) : प्राचीन ग्रीकमधील आकाश व वायू यांचेवर प्रभुत्व गाजविणारा देव. हवामानातील सर्व लहानमोठे बदल हाच देव घडवून आणतो. वीज, वादळ, गडगडाट, पाऊस ही याच्याच हुकमतीने वागतात. विद्युतपात हे त्याचे परंपरागत अस्त्र. स्वच्छ, निरभ्र व मस्त हवा, ही सुद्धा याचीच देणगी. घरातील पूजेतही झ्यूसला स्थान होते. यानेच सेमेलेशी संबंध ठेवल्याने डिऑनायससचा जन्म झाला. पण याचे पुत्रप्रेम एवढे जबरदस्त की सेमेले अपघाती मृत्यू पावताच तिच्या उदरात पुरा न वाढलेला गर्भ त्याने आपल्या मांडीत ठेवला व हेरा ह्या दुष्टात्म्यापासून त्याचे संरक्षण करून डिऑनायससला

जन्म दिला.

( ७ ) **ॲक्टिऑन** ( Actaeon ) : ग्रीक पुराणातील माहितीनुसार ॲक्टीऑन हा Aristaeus आणि Autonoe यांचा पुत्र, बोएशिअन वीरपुरुष व शिकारी. रोमन महाकवि ओव्हिड याने लिहिलेल्या मेटॅमारफोसिस या कथा-काव्यातील तपशिलाप्रमाणे सिथेइरॉन टेकडीवर आर्टेमिस स्नान करीत असताना ॲक्टिऑनने तिला पाहिले. तिने रागाने त्याचे रूपांतर एका काळविटात केले. इतकेच नव्हे तर ॲक्टीऑनची पन्नास शिकारी कुत्री त्याच्यामागे धावली व त्या कुत्र्यांनी ॲकटीऑनला फाडून खाल्ले. ही कथा सर्वपरिचित अशी असून दुसऱ्या शतकातील ग्रीक प्रवासी व भूगोलतज्ज्ञ Pausanias याच्या माहितीनुसार ज्या शिलाखंडावर बैठक मारून ॲक्टीऑन स्नान करणाऱ्या ओलेती आर्टिमिसकडे टक लावून पाहत होता ती Megara हून Platuea कडे जाणाऱ्या रस्त्यावरील शिला त्याने पाहिली होती. ॲक्टीऑनच्या जीवनावर काही कवींनी नाट्यकृतीही सादर केल्या आहेत. Platuea आणि Orchomenus मध्ये ॲक्टीऑनची पूजा केली जाते.

( ८ ) **सिबेले** ( Cybele ) पीकसमृद्धीची ग्रीक निसर्ग देवता. तिच्या पूजनाची सुरुवात ''एशिया मायनर ' मधील Cretex मध्ये झाली. नंतर तिचे महत्त्व ग्रीस देशात फैलावले ती महन्माता ऱ्हेआ ( Rhea ) म्हणूनही ओळखली जाते.

( ९ ) **क्रोनोस** ( Chronos ) एक ग्रीक देव. या देवाचा संबंध शेतीशी येतो. स्वर्ग आणि पृथ्वी यांचा हा पुत्र. स्वर्गाचे बहुतेक पुत्र राक्षसी कृत्ये करणारे असल्याने त्यांना तो जन्मल्याबरोबर पृथ्वीच्या उदरात दडवीत असे. आपल्या वडिलांवर सूड घ्यावा म्हणून पृथ्वीमातेने आपल्या मुलाना विनंती केली. पण त्या कामाला क्रोनोसशिवाय कुणीही होकार दिला नाही. क्रोनोसने ते काम केले व स्वर्ग पृथ्वीपासून वेगळा काढला. पण तुझीच अपत्ये तुझा नाश करतील ' असे त्याच्या जन्मदात्याने सांगितल्यावर क्रोनोसने आपली अपत्ये आपणच स्वाहा करण्यास सुरुवात केली. पण झ्यूसचा जन्म झाला तेव्हा त्याच्या मातेने त्याला क्रीट बेटावर दडवून टेवले व क्रोनोसला त्याऐवजी दगड खावयास दिला, शेवटी झ्यूसने क्रोनोसचा पराभव केल्यानंतर एका दंतकथेप्रमाणे क्रोनोस कैदी म्हणून राहिला, तर आणखी एका दंतकथेप्रमाणे तो सुवर्णयुगाचा राजा झाला. त्याच्या कारकीर्दीत माणसे सुखी होती व मशागत न करताच पृथ्वी धान्य देत होती.

( १० ) **क्युरेटस** ( Curetes ) : ऱ्हेआपंथाशी संबंधित व झ्यूस या बालकाच्या सेवकांच्या तुकडीतील व्यक्ती. इतिहासकाली ग्रीक जगतात या पंथाचा प्रभाव होता. या पंथात सैनिकी आयुधे घेऊन करावयाच्या Pyrrhic नृत्याचा समावेश होता. या पंथाचा उगम ग्रीसमधील सर्वात मोठे बेट क्रीट येथे झाला. या पंथातील स्त्री-पुरुषांचे प्रमुख कार्य म्हणजे झ्यूस व ऱ्हेआ यांची सेवा करणे हे होते. एक आख्यायिका अशी की, झ्यूसचा जन्म होऊन अर्भकावस्थेत त्याला क्रीटमध्ये आणण्यात आले तेव्हा या

पंथातील स्त्री-पुरुषांनी नृत्य करून व शस्त्रांचा खणखणाट करून झ्यूसचे रुदन थांबविण्याचा प्रयत्न केला.

( ११ ) **ॲफ्रोदायती** (Aphrodite) : मदन व सौंदर्य यांची ग्रीक देवता. एका लोककथेप्रमाणे ती झ्यूस व Dione यांची कन्या. आणखी एका आख्यायिकेप्रमाणे तिचा जन्म समुद्रफेसातून झाला. तिच्या नावातच तो अर्थ समाविष्ट आहे. सागरातून तिने प्रथम सायप्रसच्या भूमीवर पाऊले टाकली, तेव्हा तिची पाऊले पडली त्या जागेवर कोवळे कोवळे तृणांकुर उगवले. वनस्पतीच्या उत्पत्तीशी तिचा संबंध आहे.

जनन व आदर्श स्त्री-सौंदर्य यांची ही देवता. ग्रीक शहरात सर्वत्र तिची पूजा होत असे. तिची मेखला हे मदनाचे अमोघ अस्त्र समजले जाई. वैषयिक भावना जागृत करणाऱ्या औषधांना Apbrodisiac Drugs असे संबोधतात.

( १२ ) **डिमीटर** (Demeter) : ग्रीक पुराणानुसार क्रोनोस व ऱ्हेआची कन्या झ्यूसची बहीण व शेतीविषयक उत्पादनाची देवता. परंतु या देवतेचा संबंध शेतीउत्पादनाव्यतिरिक्त बागायती फळे व तत्सम उत्पादनाशीही जोडण्यात येतो.

( १३ ) **आर्टिमिस** (Artemis) : ग्रीक पुराणातील देवता. वन्यपशू, वनस्पती, पातिव्रत्य, अपत्यजन्म व शिकार यांच्याशी तिचा संपर्क जोडला जातो. सर्वसाधारण माणसाला त्याकाळी ही देवता विशेष आपलीशी वाटे. ही झ्यूस व लेटो (Leto) यांची कन्या. तिची मूर्ती बहुशः धनुष्य बाणासहित असते. ती स्नान करीत असताना तिच्याकडे टक लावून पाहाणाऱ्या ऑक्टिओनला तिने त्याच्या कुत्र्याकडून मारविले.

( १४ ) **गॉरगॉन्स** (Gorgons) तीन पंखांच्या राक्षशिणी. त्यांना केसांच्या ठिकाणी सर्प असतात, चेहेरा वाटोळा, नाक बसकट, जीभ बाहेर लोंबणारी आणि दात पुढे आलेले असे त्यांचे रूप असते. मेडुसा हीच फक्त मर्त्य होती. हिच्या मस्तकाकडे पाहाणारा मानव दगड होत असे. काही वाईट घडू नये म्हणून या राक्षशिणीचे मुंडके लावण्याची पद्धत होती.

( १५ ) **सातीर** (Satyrs) : जंगले व डोंगरदऱ्या यांत वावरणारे काल्पनिक प्राणी यांचे रूप अर्धे माणसाचे व अर्धे पशूचे असे असे. याचे डिऑनायससशी घनिष्ठ संबंध होते. होमरच्या काव्यात त्यांचा उल्लेख नाही पण Hesiod त्यांचा उल्लेख डोंगर-दऱ्यातील वनदेवता व क्युरीटीज यांचे बंधू असा करतो. सातीर हे गाण्यावजावण्याचे व नृत्याचे शौकीन असून त्यांना मद्य व स्त्रिया यांचा सहवास फार प्रिय होता. ते मानवाना भीती दाखवीत.

( १६ ) **कोरल ओड** (Choral Ode) : चर्चमध्ये म्हटले जाणारे बोधपर गीत. हे गाणारांचा एक ताफा असतो. प्रसंगानुसार केवळ मुले वा मुले व स्त्रिया किंवा स्त्री-पुरुष यांत असतात.

( १७ ) **ग्रेसेस** (Graces) समृद्धीच्या ग्रीक देवता. फलपुष्पांनी व धान्याने समृद्ध

अशा शेतास हा शब्द योग्य आहे. Agalia ( म्हणजे तजेला ) Euphrosyne ( म्हणजे आनंद ) व Thalin ( म्हणजे मुसमुसणे ) या तिघी झ्यूस आणि हेराच्या कन्या. ग्रेसेस या सर्वसाधारणपणे आकर्षकता व सौंदर्य यांच्या देवता. त्यामुळे त्यांचा संबंध ॲफ्रादायती व हर्मिस यांच्याशी विशेष येतो.

( १८ ) **म्यूझेस** ( Muses ) : संगीताची देवता; त्यांची उत्पत्ती नक्की ज्ञात नसली तरी फार प्राचीन हे निर्विवाद. बोएशिया ग्रीसमध्ये यांच्या पंथांचा विशेष प्रभाव होता. या देवता कुमारिका निदान अविवाहित समजल्या जातात. ग्रीक कथेत या देवतांची संख्या नऊ आहे. काव्य, कला व शास्त्र यांच्या या देवता होत.

( १९ ) **थिरसस** ( Thyrsus ) : डिऑनायसस व त्याचे भक्त, भक्तिणी जो दंडा हातात घेत तो हा. हा थांबू वा कळकासारखा असून त्याला एका बाजूला भाल्यासारखे टोक असते; सदर टोक द्राक्षवेलीच्या पानांनी व फुलांनी झाकून टाकतात, डिऑनायससच्या भक्तिणी तो हातात घेत; पूजनविधीचे वेळी या दंडात अद्‌भुत शक्ती येत असे.

( २० ) **थीब्स** ( Thebes ) : अपर इजिप्त ( Upper Egyyt ) च्या जुन्या राजधानीचें ग्रीक नाव. खरोखरी या शहराला संरक्षक भिंती नव्हत्या. पण या शहरात इतकी देवालये होती की त्यांच्या आवारात प्रवेश करावयाचा म्हणजे आपोआपच त्या आवाराभोवती उभारलेल्या भिंतींना असलेल्या वेशीसारख्या दारातून यावे लागे. हे शहर कॅडमसने उभारले. फक्त पाच स्पार्टीजच्या सहकार्याने कॅडमसने या शहराचा बालेकिल्ला उभारला.

( २१ ) **फ्रीजिया** ( Phrygia ) : एशिया मायनरमधील प्राचीन कालखंडातील एका मोठ्या प्रांताचे नाव, या प्रांतातील लोकांना ग्रीक Phryges म्हणत, Phryges या शब्दाचा अर्थ स्वतंत्र मानव. त्यावरून या प्रांताला फ्रीजिया नाव पडले असावे.

( २२ ) **लीडिया** ( Lydia ) : एशिया मायनरमधील एक प्रांत. इ. स. ५४६ मध्ये ते पर्शिअन राजाच्या ताब्यात होते. खिस्तपूर्व १३३ या वर्षा मात्र ते रोमन साम्राज्याचा भाग होते. सार्डिस ही त्याची राजधानी. धातूचे नाणे प्रथम लिडियात अस्तित्वात आले असे म्हणतात. लिडियातला माणूस तो लीडियन होय.

( २३ ) **लीबिया** ( Libya ) : इजिप्तसह आफ्रिकेचा दक्षिण भाग. या भागाला प्राचीन ग्रीकांनी हे नाव दिले. हा भाग फार सुपीक होता असे होमरच्या काव्यातील सदर प्रांताच्या वर्णनावरून समजते. रोमन इतिहासातील आज जे लीबियन वाळवंट म्हणून ओळखले जाते ते त्याच बाजूला होते. सांप्रतचे लीबिया, टयूनिस हे इजिप्तमधील सागरतीराच्या उत्तर किनाऱ्यावर आहे.

( २४ ) **सिथेइरॉन** ( CithaeRon ) : सांप्रतची सिथेइरॉन, ग्रीसमधील एक पर्वतराजी, ( उंची ४६२३ फूट ) हा पर्वत ग्रीक पुराणात महत्त्वाचा होता, याच पर्वतावर ॲकीऑनचे काळवीटात रूपांतर झाले. डिऑनायससच्या पूजन-अर्चन विधीचे हे महत्त्वाचे

ठिकाण. पेन्थेअसची दुर्दैवी अखेरी झाली ती याच पर्वतावर.

( २५ ) **ॲखेरॉन** ( Acheron ) ग्रीक व्युत्पत्ती संशयास्पद. सर्वसाधारणपणे यातनांची नदी ( River of Woe ) म्हणून ओळखली जाते. ग्रीक पुराणात हे नाव हेडीज या नदीला देण्यात आले होते. हेडीज हा क्रोनोस व र्‍हेआचा पुत्र व झ्यूसचा भाऊ. त्याच्या वाट्याला पाताळ लोक आला. त्या ठिकाणी राणी पेर्सोफोनी ( Persephone ) बरोबर त्याने राज्य केले. मृतांवर व क्षुद्र योनीतील जीवांवर त्याची सत्ता असे.

( २६ ) **हेलास** ( Hellas ) : ग्रीसचेच एक नाव. प्राचीन काळी सर्व ग्रीक जगताला उद्देशून हा शब्द उच्चारीत. मूळ ग्रीसशिवाय त्यावेळी एशिया मायनर, सिसिली आणि भू-मध्य सागराच्या किनाऱ्यावर असणाऱ्या ग्रीसच्या सर्व प्रदेशाला मिळून हा शब्द वापरीत. हा शब्द वापरण्याचे कारण सर्वजण आपल्याला हेलनचे वंशज समजत.

( २७ ) **डेल्फी** ( Delphi ) : प्राचीन ग्रीकमधील एक गाव. ॲपोलोच्या दैवी वाणी-बद्दल प्रसिद्ध – डेल्फी हे गांव Parnussus डोंगराचे उतारावर असून वर उंच चकाकणारे डोंगराचे सुळके दिसतात, हा सर्व देखावा मनोहर वाटतो.

डेल्फी हा पृथ्वीचा मध्यभाग असे ग्रीक समजतात. त्याबाबत अशी कथा सांगतात की झ्यूसने पूर्वेकडून एक व पश्चिमेकडून एक असे दोन गरुड पक्षी एकाच वेळी सोडले व त्याना मध्य भागाकडे पलायन करावयास लावले. बरोबर मध्य गाठून परस्परांना ते डेल्फी येथे भेटले. ज्या ठिकाणी त्यांची भेट झाली, तिथे देवालयात एक शिला रोवण्यात आली.

देवालयाचा मधला परिसर साधारण चौकोनी आहे. चारी बाजूला भिंती असून मध्य-भागी अपोलोचे भव्य मंदिर आहे. समोरच वेदी आहे. सांप्रतचे देवालय खिस्तपूर्व चवथ्या शतकातील असावे. पाया व काही पायऱ्या प्राचीन आहेत, मागील बाजूस जो गाभारा आहे तिथे दैवी वाणी ऐकू येई. देवालयाच्या वरील भागास नाट्यगृह असून त्याहीवर स्टेडियम आहे. जिम्नेशिअम ( व्यायामशाळा ) खालच्या बाजूस आहे. या देवालयाला ठिकठिकाणहून मोठमोठ्या देणग्या येत.

हे देऊळ ॲपोलोच्या दैवीवाणी ( Oracle ) बद्दल विशेष प्रसिद्ध होते. 'लढाईत जय मिळेल किंवा नाही, किंवा एखाद्या धाडसा'च्या कामात यश हाती लागेल वा नाही ? या प्रश्नाला देवाचे म्हणून, देवाच्या उपाध्या वा उपाध्यिण इच्या तोंडून मिळालेले उत्तर असा प्राचीन ग्रीक लोकांतील Oracle या शब्दाचा मूळ अर्थ आहे. आपल्याकडील कौल लावण्याचा प्रकार जवळजवळ याच पद्धतीचा असावा.

( २८ ) **डिर्से** ( Dirce ) ग्रीक पुराणानुसार थीब्सचा राजा Lycus याची पत्नी. राजाच्या पहिल्या बायकोला म्हणजे सवतीला तिने फार वाईट रीतीने वागविले. या सवतीचे नाव Antiope पण पुढे Antiope च्या मुलांनी राजाला ठार केले व डिर्सेला एका मत्त बैलाच्या पायाला बांधून तिचा वध केला.

( २९ ) **ऑलिम्पस** ( Olympus ) ; असंख्य डोंगरांच्या रांगांचे हे प्राचीन नाव Thessaly आणि Macedonia यांच्या सरहद्दीवर; सर्वांत उंच शिखर ९७५४ फूट. वर्षातील नऊ महिने ते बर्फाच्छादित असते. ही गिरिशलाकाची मालिका, ग्रीकांच्या समजुती-प्रमाणे त्यांच्या देवांचे वसतिस्थान होते. या गिरीशलाकांच्या शिखरावर झ्यूसचा राजप्रासाद आहे असे समजत.

( ३० ) ' **बाकाओ** 'च्या इंग्लिश भाषांतरात ( भाषांतरकार : Philip Vellacott ) पृष्ठ २२३ वर ' He was like ... पासून and acknowledge the Gods ' या भाषणा-नंतर अॅगेवेचे भाषण आहे ' Further you see how one terrible hour has shat-tered my whole lifie .... ' ( मराठी भाषांतर, पृष्ठ ५३ ) यानंतर मूळ नाटकाच्या लेखनात बराच खंड आहे. युरायपिडीजने यानंतर काय लिहिले होते समजण्यास मार्ग नाही. पण तत्कालीन लेखकांच्या लेखन पद्धतीचा मागोवा घेत ही नाट्यकृती संपादन करणाऱ्या जाणकार संपादकांनी या जागा सोडलेल्या ठिकाणी उपलब्ध असलेल्या मजकुराच्या आधारे व दर्जेदार शोकांतिका लिहिणाऱ्या युरायपीडीजसारख्या लेखकाने काय लिहिले असते याचा अंदाज घेत त्यापुढील ओळी लिहिल्या आहेत. इंग्लिश आवृत्तीत पृष्ठ २२५ वर डिऑनाय-ससचे भाषणास ' Behold me a God, great and powerful ... ' या संभाषणापासून ' Now Cadmus I will tell you ... ' या वाक्यानंतरच्या ' You shall change your form to a aerpant. ' येथपासून पुनश्च युरायपीडीजने लिहिलेला मूळ मजकूर मिळू शकतो. ( मराठी भाषांतर, पृष्ठ ५५ )

( ३१ ) ' **बाकाओ** 'चे इंग्लिश भाषांतरात पृष्ठ २२७ वर अॅगेवे ' Farewell my home, farewell the land I know .... ' वगैरे सद्‌गदित म्हणते. Farewell या शब्दात त्या त्या ठिकाणांचा साश्रु नयनाने अखेरचा निरोप घेणाऱ्या कालवाकालव करणाऱ्या शोकाकुल अवस्थेतही Farewell ' या शब्दाने ' मी नसले तरी त्या त्या स्थानांची भावी कालात उन्नती होवो, भरभराट होवो असाही अर्थ निघतो व व्याकुळ अॅगेवेच्या त्या दयनीय अवस्थेतही तिची त्या त्या वास्तूबद्दलची आत्मीयता पाहून या दुर्दैवी स्त्रीबद्दल मन दुःख-युक्त आदराने भरून येथे व माथा विनम्र होतो.

( ३२ ) इंग्लिश भाषांतरात पृष्ठ १८५ वर ' There the celebrant, wrapped in his sacred fawnskin ... ' वगैरे वर्णन आहे.

डिऑनायसस आणि त्याने बरोबर आणलेला भक्तिणींचा ताफा ( कोरस ) हा बाकाओ पूजकांचा वैशिष्ट्यपूर्ण नमुना. डिऑनायससारखा तरुण यातला प्रमुख व तरुण स्त्रिया आणि मुली असा भक्तिणींचा संच. नृत्यातील परमोच्च आनंदाच्या क्षणी हा प्रमुख स्वतःला भूमीवर झोकून देतो व देवाची शक्ती त्याच्या शरीरात संचार करते आणि तो झपाटला जातो.

( ३३ ) **हेरा** ( Hera ) : ग्रीक पुराणातील कथांनुसार क्रोनोस व ऱ्हेआ याची कन्या. ऑलिंपिअन देवांची राणी व झ्यूसची पत्नी. हेरा या शब्दाचा अर्थ कुलवान् स्त्री ( Lady ) झ्यूसची पत्नी म्हणून तिने आपल्या अल्केमेने, लेटो व सेमेलसारख्या सवतींचा अतोनात दुस्वास केला व कजाग वृत्तीने वागली.

( ३४ ) **मेएनॅडस** ( Maenads ) : डिऑनायसस बरोबर असणाऱ्या सेविका; त्यांना 'बाकाऔ' असेही म्हणत.

( ३५ ) **एकीऑन** ( Echion ) : कॅडमसने पेरलेल्या नागसर्पाच्या दातांच्या बीजांतून उगवलेल्या योद्ध्यांपैकी एक. ॲगेवेचा पती व पेन्थेअसचा पिता.

✣